


# करारावर घेतलेला देश

गर्दीने गजबजलेलं, तरी पण फार सुंदर दिसणार छोटसं शहर हाँगकाँग एक लहानसं बेट आहे, तो एक छोटा देश आहे. तरी पण तो ब्रिटिशांची एक वसाहत आहे.

आपण आशियाचा नकाशा पाहिला तर असं दिसेल की हा चीनचाच एक भूभाग आहे. मग हा ब्रिटिशांची वसाहत कसा बनला? कित्येक वर्षे ब्रिटन चीनला अफूची निर्यात करीत असे. चीनी सरकारने अचानक-पणे सन् १८४१ मध्ये या अफूच्या आयाती-वर निर्बंध घातला. यावर ब्रिटिश सरकारला राग आला आणि त्यांनी हाँगकाँगवर आपला अधिकार प्रस्थापित केला.





तरी पण आपण करीत आहोत हे योग्य नव्हे याची ब्रिटिश सरकारला चांगली जाण होती. काही लहान-मोठ्या लढाया आणि तह झाल्यावर ब्रिटिश सरकारने मान्य केले की हाँगकाँग हा चीनने शंभर वर्षांच्या करारावर ब्रिटनला दिलेला एक भूभाग आहे.

या कराराची मुदत १९९७ साली संपणार आहे. आता ही कराराची मुदत वाढवायची चीनची इच्छा नाही. चीन हाँगकाँग परत आपल्या ताब्यात घेणार निश्चित!

दरम्यानच्या काळात हाँगकाँग जगातील एक अत्यंत महत्वाचं शहर बनलं. व्यापारी दृष्टीने या शहरात खूपच उलाढाल होऊ लागली. गगनचुंबी इमारती, त्यातील विलासमय जीवन आणि आधुनिक तांत्रिक सुखसोयी यामुळे हाँगकाँग शहराचे दृश्य चीनमधील अन्य शहरांच्या तुलनेत अगदीच निराळे दिसते. त्याचा साम्यवादाशी जरा ही संबंध नाही. अशा या शहराला चीनचे साम्यवादी सरकार आपला अनिर्बंध व्यापार करू देईल की नाही? चीनचे सरकार सांगत आहे की हाँगकाँगची स्थिति पूर्ववत् राहील, पण हाँगकाँगच्या मोठ-मोठ्या व्यापाऱ्यांचा या अश्वासनावर विश्वास नाही. म्हणून ते आपली कार्यपद्धति सिंगापुर, बँकॉक, मनीला इत्यादि शहरांच्या पद्धतीनुसार बदलीत आहेत.



# नातेवाईकांपासून सावध!

खूप जुनी गोष्ट आहे. मधुपुरी गावात रमानाथ नावाचा एक दानशूर गृहस्थ रहात असे. प्रथम तो चांगला श्रीमन्त होता; परन्तु आपल्या भविष्यकाळाचा विचार न करता प्रत्येकाला दान देत सुटल्यामुळे आता तो अगदीच दरिद्री बनून गेला होता. त्याची परिस्थिति चांगली असताना, त्याच्या उदारपणाचा फायदा घेणाऱ्यात जास्त भरणा त्याच्या नातेवाईकांचाच असे. पण आता त्याच्या पडत्या काळात त्याला मदत करायला मात्र त्यांच्यापैकी कोणीच पुढे यायला तयार नव्हते. उलट आता ते रमानाथबद्दल उलटसुलट प्रचार करून अफवा पसरवायला लागले होते!

काही नातेवाईक म्हणत की–रमानाथला स्वत:ला 'दानशूर' म्हणवून घ्यायची मोठी हौस असल्याने मागचापुढचा विचार न करता दानधर्म करून आता तो दरिद्री बनला आहे. काही म्हणत की–त्याने अनुचित मार्गाने पैसा मिळवला होता; तेव्हा आता तो सर्व 'हपापाचा माल गपापा' झाला! काही नातेवाईक तर असाही अपप्रचार करत की–रमानाथचं मनच चांगलं नाही. त्यामुळे त्याच्याकडून पैसे घेऊन आपलंही नुकसानच झालं! ते सर्वजण आता असा प्रचार करू लागले की-कोणी रमानाथला मदत केली, तर त्याचं काहीतरी 'अशुभ' होईल.

रमानाथचे नातेवाईक नसलेले काही लोक प्रथम त्याला मदत करू इच्छित होते; पण या सर्व अपप्रचाराच्या प्रभावामुळे तेही कोणी मदतीचा हात पुढे करीनात.

अशा स्थितीत रमानाथला त्या गावात रहाणेच अशक्य झाले आणि मुला-बाळांना घेऊन एकाद्या दूरच्या गावी जाऊन रहाण्याच्या इराद्याने तो मधुपुरी सोडून



निघाला. थोडा प्रवास केल्यानन्तर ते सर्वजण एका झाडाखाली बसले. मुलं पटकन झोपूनही गेली.

रमानाथची बायको दुःखी आवाजात त्याला म्हणाली–"हे पहा, आपण तर सर्व नातेवाईकांना आपल्याकडून होईल तितकी मदतच केली होती, आपण कुणाचा कधी अपकार केला नाही. तरीही आपल्या नातेवाईकांचा आपल्यावर असा रोष का? मला तर काहीच कळत नाही!"

यावर रमानाथ हसून तिला म्हणाला–"वेडी रे वेडी! तुला तर काहीच समजत नाही! ते आपले नातेवाईक असल्यामुळ पडल्या काळात आपल्याला मदत करणं, ही त्यांची जबाबदारी आहे. ती टाळण्यासाठीच ते आपणाबद्दल अपप्रचार करून त्यांचा आपल्यावर राग आहे असं ढोंग करत आहेत! ते फक्त घेऊपासरे आहेत, दया-सहानुभूति वगैरे शब्द त्यांना ठाऊकच नाहीत. असल्या अपमतलबी लोकांच्या बाबतीत विचार करणं म्हणजेही आपला वेळ वाया घालवणंच होय! जाऊ दे, आता झोप तू!"

थंड श्वास घेऊन रमानाथची बायको झोपून गेली. आता रमानाथही आडवा झाला आणि थोडयाच वेळात त्यालाही झोप लागली. झोपेत त्याला एक स्वप्न पडलं–एक साधु त्याला दिसला. तो म्हणाला–"मागचा-पुढचा विचार न करता प्रत्येक पात्र माणसाला दान दिल्यामुळे आज तुला ही अवस्था प्राप्त झाली आहे. तरीही तू केलेलं पुण्य काही वाया गेलेलं नाही. ते एका अंगठीच्या रूपात या झाडाच्या ढोलीत पडून आहे. ती तांब्याची अंगठी तू शोधून काढून आपल्या बोटात घाल. तुला हवं तितकं धन त्या अंगठीच्या प्रभावाने मिळत राहील. अंगठी घालून तू प्रथम एक काम कर. इथं जवळच असलेल्या कमलापुर गावात जा. तिथे चावडीवर दहा माणसं बसलेली तुला दिसतील. त्यात एकजण नातेवाईक असेल.



कोणालाही न विचारता आपला तो नातेवाईक तू ओळखलास, तर ही तांब्याची अंगठी सोन्याची होईल. त्या क्षणापासून ती अंगठी तुला इच्छित धन देऊ लागेल. पण समजून-उमजूनही तू जोपर्यंत अपात्री दान करणार नाहीस तोपर्यंतच अंगठीचा प्रभाव टिकून राहील. जेव्हा केव्हा ती सोन्याची अंगठी पुन्हा तांब्याची होईल तेव्हा समज, की तिचा प्रभाव नाहीसा झालेला आहे! आपल्या त्या नातेवाईकाकडे फक्त एकच रात्र मुक्काम करून तू पुन्हा आपल्या गावी परत जा. आता ऊठ, लवकर आटप."



रमानाथ एकदम खडबडून उठून बसला. झाडाच्या पोकळीत थोडंसं शोधल्यावर त्याला तांब्याची अंगठी सापडली. ती त्याच्या डाव्या हाताच्या तर्जनीत बरोबर बसली.

रमानाथने आपल्या बायको-मुलांना उठवलं अन् सर्वांसह तो कमलापुरकडे निघाला. अंधार होण्यापूर्वीच तो चावडीवर पोचला. स्वप्नात साधुने सांगितल्याप्रमाणेच तेथं दहा माणसं त्याला दिसली. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यावेळी ते सर्वजण रमानाथबद्दलच बोलत होती.

"माझे वडील एकदा काही कामासाठी मधुपुरीला गेले होते. तेथं त्यांना हृदयविकाराचा झटका आला, पण त्यांच्या ओळखीच्या माणसांनीही त्यावेळी त्यांना कसली ओळख दाखवली नाही, की कसली मदत केली नाही. कोणा एका अनोळखी माणसाने माझ्या बाबांना वैद्याकडे नेले. वैद्याने फीदाखल खूप मोठी रक्कम मागीतली, ती सुद्धा त्या भल्या माणसाने दिली आणि कधी ते पैसे परतही मागितले नाहीत. हे सर्व बाबांनी आम्हाला मागाहून सांगितले होते. पण अलिकडे ऐकलं की तो माणूस वाईट परिस्थितीत आहे, अन् मधुपुरी सोडून निघाला आहे! हु ऽऽऽ! भल्या माणसांचे दिवस राहिले नाहीत आता!" एकजण बोलला.



अशा तऱ्हेने एका पाठोपाठ एक एकजण रमानाथची स्तुति करत होते. त्यांच्यात महेश नावाचा एकच माणूस जरा निराळा होता. तो म्हणाला—"हं ऽ, तुम्हा लोकांना खरी गोष्ट माहीतच नाहीसं दिसतंय! रमानाथच्या आजोबांनी अनेक अत्याचार करून खूपशी मिळकत केली होती. त्या पापांचं फळ म्हणून त्याला महारोग झाला आणि त्या रोगानेच त्याचा प्राण घेतला."

"हं ऽऽ! अस्सं आहे होय? पाहिलंत? महेशनं हे सांगितलं नसतं तर आपण खरो-खरच रमानाथला मोठा उदार, दानशूर असं समजत राहिलो असतो." बाकी सगळे बोलले.

त्याच वेळी रमानाथ सरळ महेशजवळ जाऊन म्हणाला—"बेटा, मी रमानाथ. आम्ही आत्ताच मधुपुरीहून इथे येत आहोत. मला कल्पनाही नव्हती की इथे कमला-पुरमधे माझा कोणी नातेवाईक असेल. पण आत्ता तुला पाहिलं, अन् ओळखलं की तू माझ्या नात्यातलाच आहेस."

तिथे बसलेल्या लोकांना जेव्हा कळलं की हाच रमानाथ आहे, तेव्हा महेश सोडून बाकी सर्वजण उठून उभे राहिले, अन् मोठ्या आदराने हात जोडून ते त्याला म्हणाले—"महाराज, आम्ही आपणाबद्दल खूप ऐकलंय्. आज आपलं दर्शन घडलं, आमचं मोठं भाग्यच म्हणायचं! आपल्या-सारख्या सज्जन माणसाला असे वाईट दिवस आलेले पाहून आम्हाला फार वाईट वाटतंय. आता आमच्याकडून आपणाला कसली मदत होण्यासारखी असेल तर सांगा, आम्ही जरूर ती करू."

रमानाथचे आपल्या हातातल्या अंगठी-कडे लक्ष गेलं. ती आता तांब्याची राहिली नव्हती, सोन्याची झाली होती!

त्या लोकांकडे पाहून मन्दसे हसत रमानाथ म्हणाला—"मला कुणाच्या मदतीची अपेक्षा नाही. चांगलं काम करणाराला संकटं कधीच सतावत नाहीत. तुमच्यापैकीच कुणाला कसली गरज असेल





तर सांगा मला, मीच मदत करीन त्यांना. मला कुणाच्या मदतीची खरंच काही आवश्यकता नाही!"

यावर त्यांच्यापैकी एकजण म्हणाला—"मी सावकाराकडून शंभर रुपये कर्जाऊ घेतले होते, व्याजासकट आता ते पाचशे झालेत. मी उद्यापर्यंत हे पैसे दिले नाहीत तर तो माझं शेत ताब्यात घेणार आहे."

"तू रात्री आपल्या सावकाराला घेऊन माझ्यापाशी ये. मी आज महेशकडे राहणार आहे." रमानाथ म्हणाला.

महेशला वाटलं, की रमानाथ पुन्हा चांगला श्रीमन्त झालेला दिसतोय, म्हणून मोठ्या अदबीने त्याला नमस्कार करत महेश म्हणाला—"माझे बाबा म्हणाले, की आपण माझे काका लागता. चला ना. आपण आमच्या घरी जाऊ."

हा सर्व तमाशा रमानाथच्या बायको-मुलांना मोठा आश्चर्यजनक वाटला. त्या रात्री रमानाथ आपल्या कुटुंबासह महेशच्या घरी राहिला त्याने गरजू लोकांना पैशांची मदत केली. डाव्या हातातली अंगठी त्याला इच्छामात्रेण पैसे देत होती ही गोष्ट त्याने आपल्या बायकोला सांगितली.

दुसऱ्या दिवशी रमानाथ घरी निघाला. तेव्हां महेशच्या वडिलांनी त्याच्याकडे मुलीच्या लग्नासाठी दोन हजार रुपयांची



मागणी केली. रमानाथने त्याच्याकडून कर्जरोखा लिहून मागितला, पण तो देण्याची त्याची तयारी नव्हती.

तेथून आपल्या गावाकडे परत जाताना पुन्हा रमानाथ आपल्या कुटुंबासह त्याच झाडाखाली थांबला, अन् विश्रान्ती घेऊ लागला. रमानाथची मुलं लवकरच झोपली. तेव्हा रमानाथची बायको त्याला विचारू लागली—"तुम्ही सगळयांना मदत करता, मग आपल्या या भावाला का मदत केली नाहीत?"

"बावळे! तू अगदीच असमंजस आहेस बघ. माझ्याकडे आता पैसा आहे, हे पाहूनच त्याने माझ्याकडे पैसे मागितले,

फार निकड होती म्हणून नव्हे. तसं असतं तर कर्जरोखा लिहून द्यायला त्याने मागे-पुढे पाहिले नसते; कर्जाऊ का होईना, पण पैसे घेतले असते. कळलं ना? एकाद्या अनोळखी माणसाने पैसे मागितले, म्हणजे त्याचा अर्थ होतो की तो खरोखरीच गरज-वन्त आहे. अशा तऱ्हेने पैसे मागणारात काही ढोंगी लोक असू शकतात. पण त्यांचं ढोंग जोपर्यंत आपल्याला माहीत नसतं, तोवर आपण त्यांचा संशयही घेऊ शकत नाही. अन् प्रत्येकाचाच संशय घेतला तर खऱ्या गरजू व प्रामाणिक लोकांना आपण मदतही करू शकणार नाही ना? पण दोस्त अन् नातेवाईकांच्या बाबतीत विचार करायचा, तर त्यांच्याकडून मात्र रोखा लिहून घेतल्याबाचून त्यांना मदत मुळीच करू नये. आता कळलं नीट सगळं?" रमानाथनं समजावले.

रमानाथच्या या उत्तराने त्याच्या बायकोचं समाधान झालं अन् तीही झोपून गेली. रमानाथलाही आता जांभई आली अन् तो झोपेच्या अधीन झाला. स्वप्नात पुन्हा त्याला तो साधू दिसला. "जो मागेल त्याला दान देण्याच्या तुझ्या पूर्वीच्या धर्मकार्यापेक्षा तुझं आजचं धर्मकार्य हे अधिक श्रेष्ठ दर्जाचं आहे. कमलापुरच्या आपल्या नातेवाईकाला तू बरोबर ओळ-खलंस, तेव्हाच माझ्या लक्षात आलं की आता तुझी अक्कल ठिकाणी आली आहे. इथून पुढेही अशाच प्रकारे बुद्धि वापरून दान-धर्म कर, म्हणजे तुला कधीही गरीबी येणार नाही." इतके सांगून साधुमहाराज अन्तर्धान पावले.

झोपून उठून रमानाथने आपल्या बायको-मुलांनाही उठवले. अन् तो पुन्हा मधुपुरीला गेला. नंतर अनेक दानं देत तो आपलं आयुष्य घालवत राहिला, आता त्याला आराम अन् चांगलं नावही मिळू लागलं. त्याच्यासारखी कीर्ति आसपास कुणालाच कधी मिळाली नाही. आता रमानाथबद्दल एकही अपशब्द काढायची कोणाची हिम्मत नव्हती.





# डाकू युवराज

[१५]

[जयपुरीचा सरदार याने भग्नावशेषातून बाहेर काढलेली देवी कनकदुर्गेची सोन्याची मूर्ती वीरसिंहाला देऊन टाकायला नकार दिला होता; म्हणून सर्पदन्त सोन्याची मूर्ति हस्तगत करून नावेतून घेऊन जाऊ लागला. परन्तु जणू आकाशातूनच अचानक टपकल्यासारखा कोणी माणूस नावेत उतरला आणि मूर्ति घेऊन तेथून नाहीसाही झाला. —यानन्तर]

"**थां**बा!" सेनापति सर्पदन्त वेड लागल्यासारखा ओरडला. नन्तर नावेजवळ पोचून त्यातल्या शिपायांना धमकावत त्याने विचारले—"बोला, कुठे गेला तो डाकू? नावेचा पाठलाग करत नदीतून तुमच्या मागेमागे यायला तो कोणी मासा किंवा मगर तर नक्कीच नाही ना! गप्प का बसलात? तुम्ही काय झोपला होतात सगळे? की दिवसा-ढवळ्या कसली स्वप्नं पहात होतात?"

"सरकार, पापणी लवायच्या आत तो मूर्ति घेऊन जंगलात पळून गेला!" नावेतून किनाऱ्यावर उतरत ते शिपाई म्हणाले.

त्यांचे बोलणे समजायलाच सर्पदन्तला थोडा वेळ लागला. समजल्यावरही त्याचा यावर विश्वास बसेना. दोराच्या साह्याने कोणी नावेवर उतरला आणि डोळा



लवायच्या आता इतकी जड, वजनदार मूर्ति उचलून सहजतेने नदीपार पोचून गेला-असे घडेलच कसे? हा विचारही अगदी अशक्य वाटतो! कारण शेवटी ती मूर्ति किल्ल्याबाहेर काढून नदीकिनारी आणायलाच चार शिपायांना मिळून किती त्रास झाला होता! तेव्हा इतके मोठे ओझे उचलून तो एकटाच डाकू नदीपलीकडे जाऊच कसा शकला?

शिपाई बिचारे माना खाली घालून सर्पदन्तसमोर चुपचाप उभे होते.

आपण मोठ्या कौशल्याने मिळवलेली मूर्ति अशी हातून निसटली—ही गोष्ट सर्पदन्तच्या दृष्टी क्षुल्लक नक्कीच नव्हती. त्यामुळे रागाने तो वेडापिसा झाला. जवळच उभ्या असलेल्या एका शिपायाला सणसणीत चपराक मारून तो ओरडला—"कोणी अनोळखी, बंडखोर आला अन् ती सुन्दरशी सोन्याची मूर्ति घेऊन पळून गेला—तोवर तू काय करत बसला होतास? अंडी उबवत होतास, की डोळे उघडे ठेवून झोपला होतास?"

तो शिपाई म्हणाला—"सरकार, इतके मोठमोठे योद्धे हत्यारबन्द होऊन मूर्तीचे रक्षण करीत असताना, एकाद्या सामान्य माणसाला ती उचलून नेणं कसं शक्य होईल? हे शक्य होईल असं आपल्याला तरी वाटतं का?"

"म्हणजे, तुला म्हणायचंय तरी काय?" सर्पदन्तने विचारले.

"ती मूर्ति नेणारा कोणी डाकू, लुटारू नसून, हे कोण्या दुष्ट आत्म्याचंच काम असलं पाहिजे सरकार!" तो शिपाई म्हणाला.

"ओहो! असं होय?" सर्पदन्तने मान हलवली अन् काहीसा विचार करून तो म्हणाला—"हां, असंच असलं पाहिजे. आता ही गोष्ट तूच आपल्या महाराजांना सांग."

शान्तिपुरला पोचताच सर्पदन्त व शिपाई यांनी मिळून वीरसिंहला सांगितले की—"अर्ध्या रात्रीच्या मिट्ट काळोखात भुता-



सारखी एक काळी आकृति अचानक उडी मारून नावेवर आली आणि डोळ्यांची पापणी लवते न लवते तोच सोन्याची मूर्ति उचलून अदृश्य झाली."

त्यांच्या गोष्टीवर वीरसिंहचा विश्वास बसेना! तरीही तो काहीसा विचारात पडला—सध्या तरी आपली सगळीकडून हारच होत आहे. असं का बरं होत असावं? कुणी आपल्यावर काही जादू-टोणा तर केला नाही नं? असेल?—या सर्वांचा वीरसिंह मोठ्या गंभीरतेने विचार करू लागला.



तिकडे जयपुरीवरही उदासीनतेचे ढग पसरले होते. कनकदुर्गेच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्याच्या वेळेची सर्वजण मोठ्या उत्कंठेने वाट पहात होते. नवीन मंदिरही बांधून तयार होते. अशा ऐन वेळीच वीरसिंहचा सेनापति सर्पदन्त मूर्ति हस्तगत करून निघून गेला. लोकांना या गोष्टीचा मोठा अचंभा वाटला! सुमेध राज्यावर एका दुष्ट शासकाचा अधिकार चालू आहे, ही गोष्ट जयपुरीच्या लोकांना माहित होती. पण त्याची दुष्ट नजर प्रेताच्या सावलीसारखी आपल्याही राज्या-वर पडेल याची मात्र त्यांना कल्पना नव्हती.

राजा शंकरवर्मा एका खोलीत मुकाट्याने बसून होता. कोणीही त्याच्याजवळ जाण्याचे धाडस करू शकत नव्हते! अशा नाजुक परिस्थितीत त्याची एकुलती एक मुलगी सुकन्या त्याच्याजवळ गेली आणि आपल्या मृदुमधुर आवाजात बोलू लागली—"बाबा, मला आतून कुठून तरी अशी खात्री वाटतेय की देवी कनकदुर्गा स्वतःच नक्की आपल्याकडे परत येईल."

तिचे बोलणे ऐकून शंकरवर्माच्या उदास चेहऱ्यावर हास्य फुलले!

खरोखरच अघटित घडले होते. देवी कनकदुर्गेच्या मूर्तीवर सुकन्येचे फार प्रेम बसले होते, म्हणूनच देवीच्या प्रतिष्ठा-पनेचा उत्सव खूप धुमधडाक्याने साजरा करायचे ठरवले होते शंकरवर्माने. अशातच



देवीची मूर्ति जेव्हा शत्रूने पळवून नेली तेव्हा सुकन्येच्या मनावर जोरदार आघात झाला होता. पण इतके सगळे घडूनही सुकन्या आपल्या मनातले दुःख मनातच दाबून आपल्या पित्याला उत्साहित करायचा प्रयत्न करत होती. ही गोष्ट शंकरवर्मा जाणून होता, त्यामुळे आपले उफाळणारे दुःख आतल्या आत दाबून ठेवत मोठ्या प्रेमाने सांत्वन देण्यासाठी त्याने आपल्या मुलीला मिठीत घेतले.

"बाबा!" पक्षाच्या आवाजासारखा एक आवाज अचानक ऐकू आला.

शंकरवर्मा आश्चर्यचकित होत आवाजाच्या दिशेने पाहू लागला. जयानन्द मुनींच्या आश्रमातला पोपट 'मल्ली' तेथे खांबावर बसलेला त्याला दिसला.

त्याला पाहून शंकरवर्मा एकदम उभा राहिला अन् त्याने पोपटाला खांबावरून उचलून खाली घेतले. पण मल्ली पुन्हा फुर्रकर उडाला अन् दिव्याच्या एका ठाणवईवर बसला अन् मागे वळून पाहू लागला. त्याचा संकेत समजून शंकरवर्मा त्याच्या मागे मागे जाऊ लागला. सुकन्याही त्यांच्याबरोबर निघाली.

थोड्याच वेळात पोपट राजाच्या उद्यानात पोचला. त्यावेळी तेथे सर्वत्र चांदणे पडलेले होते. पोपट एका डाळिंबाच्या झाडाच्या डहाळीवर बसलेला होता. त्याच्याकडेच पहात शंकरवर्मा चालत होता. पण अचानक सुकन्या म्हणाली—"बाबा, इकडे पहा! देवी पुन्हा आपल्याकडे निघून आली!" अन् असे बोलत असताना तिचा आवाज अद्भुत आवेग आणि आनन्द यांमुळे गदगदून गेला होता!

सर्पदन्त जी मूर्ती जबरदस्तीने घेऊन गेला होता ती मूर्ति आता त्या डाळिंबाच्या झाडाखाली उभी होती! सुकन्या धावतच मूर्तिजवळ जाऊन बसत, आणि आनन्दाश्रु ढाळत उत्साहाने म्हणाली—"बाबा, मी म्हटलं नव्हतं, आपल्याकडे ही मूर्ति आपण होऊन निघून येईल असं? पहा आता स्वतःच!"

शंकरवर्मा यावर काय बोलणार? आपल्या हातून सुटून गेलेली मूर्ति परत आली खरी! पण हे सर्व कसे घडले? ती इथे आणली तरी कोणी? अन् कशी? अशा विचारात गढून तो अपलक मूर्तिकडेच पहात राहिला.

आता मल्लीनाथ आवाज करत हसू लागला. शंकरवर्माने आश्चर्याने तिकडे पाहिले. झाडाखाली एक सुन्दर तरुणाचा हात दिसत होता. त्यावरच मल्ली बसलेला होता! तो तरूण हळूहळू शंकरवर्माजवळ पोचला, आणि नमस्कार करून म्हणाला—"मी कोण आहे, हे आपल्याला ठाऊक नसेल, पण गुरुदेव जयानन्द मुनींनी मला आपणाबद्दल सर्व सांगितले आहे."

"तू....युवराज सन्दीप आहेस. होय न?" मोठ्या उत्साहाने आणि आनन्दाने शंकरवर्माने विचारले.

"होय, मी आपला सेवक आहे." युवराज संदीप उत्तरला.

दुसऱ्याच क्षणी शंकरवर्माने प्रेमाने युवराजाला मिठी मारली आणि म्हटले—"मी तुला भेटायला किती आतुर होतो हे तुला माहीत नसेल. इतक्या दिवसांनंतर माझी ती इच्छा पूर्ण झाली! देवाचे खरोखर आभारच मानायला हवेत यासाठी. तरीही मला अजून हे नाही समजलं





की सर्पदत्तने नेलेली मूर्ति इथे कशी आली?"

"ही कनकदुर्गेची मूर्ति परत आणून आपल्या हवाली करायचं भाग्य मलाच लाभलं, महाराज!" राजकुमार सन्दीपने सांगितले.

"खरंच? कशी आणलीस तू ती?" शंकरवर्माने उत्सुकतेने विचारले.

सर्पदत्तच्या शिपायांची नजर चुकवून आपण ती मूर्ति नावेतून कशी पळवली, याची हकिकत सन्दीपने थोडक्यात निवेदन केली. ते ऐकून शंकरवर्मा चकितच झाला! त्याने विचारले–"तरी ही इतकी वजनदार मूर्ति एकाच हाताने उचललीस तरी कशी तू?" प्रश्न विचारत असताना शंकरवर्माचे डोळे आश्चर्याने विस्फारित झाले होते.

"एका गोष्टीची आठवण झाली की मलाही मोठं आश्चर्य वाटतं. हेच काम मी पुन्हा कधी करू शकेन की नाही याची मलाही शंकाच वाटते." सन्दीप म्हणाला.

"ती काही दैवी शक्ति असली पाहिजे, याबद्दल शंकाच नाही. इकडे परत यायची देवीचीच इच्छा असावी म्हणून ती परत निघून आली इथे!" सुरेल आवाजात सुकन्या बोलली.

आश्चर्याने सन्दीप सुकन्येकडे पाहू लागला. हे सर्व पहात हळूच हसत शंकरवर्मा म्हणाला–"राजकुमार! ही माझी सुपुत्री सुकन्या! युवराजाशी कसं बोलावं, हे अजून कळत नाही तिला! आता यापुढे शिकेल ती!"

"तरीही, खरं बोलायला तिला कोणी काही शिकवायची गरज नाही, मला वाटतं!" मन्द हसत युवराज सन्दीप बोलला.

आपल्या मुलीकडे वळून शंकरवर्मा म्हणाला–"युवराज आता आपला पाहुणा आहे बाळ! त्याचे उत्तम आतिथ्य करायची जबाबदारी आहे आपली."

"मी आपणाबरोबर राजवाड्यात यायला नकार देत नाही, पण जास्त वेळ मी



आपणाबरोबर राहू नाही शकणार! सर्वजण माझी मोठ्या आतुरतेने वाट पहात असतील. आणखी एक खास गोष्ट आहे. वीरसिंह कोणत्याही क्षणी आपल्यावर हल्ला करायला येईल. मी आणि माझे साथीदार आपल्या संरक्षणाची व्यवस्था करू. तरीही आपण सजग व सावधान असावे." असे बोलत युवराज सन्दीप शंकरवर्माबरोबर त्याच्या राजवाड्यात गेला.

युवराज एका आसनावर बसलेला होता. त्याच्यासाठी दूध व फळे घेऊन सुकन्या निघाली. तेव्हा शंकरवर्मा युवराजाला म्हणाला – "युवराज, मला स्वतःच्या सुरक्षिततेची मुळीच काळजी वाटत नाही. मी तुझ्या सुरक्षिततेबद्दल शंकित आहे! खरं म्हणजे हा वीरसिंह जिवन्त असेपर्यंत तुझ्या डोक्यावर नेहमीच संकटाचे ढग पसरलेले असतील. त्या दुष्टाचे अत्याचार यापुढे सहन करणे, शहाणपणाचे ठरणार नाही. मला वाटतं की त्याचा अन्त करायची हीच बरोबर वेळ आहे."

"वीरसिंहाचा अंत करण्याची संधि मला अनेकदा मिळाली होती. पण त्याला युद्धभूमीवर आमनेसामने लढून कंठस्नान घालण्याचा माझा विचार आहे. कपट-कारस्थान करून त्याने माझ्या पित्याचा अंत घडवून आणला हे मला माहीत आहे. पण तरीही त्याच पद्धतीने आपण त्याचा अन्त करावा हे मला पसन्त नाही. त्याच्याशी रणभूमीत आमनेसामने लढावं आणि त्याचं सैनिक बळ नष्ट करून रणांगणावरच तो कामी यावा ही माझी इच्छा आहे. पण, जर मी हारलो, तरीही मला त्याची चिन्ता नाही. कारण वीरता व बहादुरीचा हा रिवाजच आहे!" युवराज सन्दीप गंभीर आवाजात म्हणाला.

फळांनी भरलेली थाळी घेऊन त्या खोलीत पाऊल ठेवणाऱ्या सुकन्येने त्याचे हे शब्द ऐकले अन् ती लाकडी पुतळी सारखी उभीच राहिली! युवराजाचे बोलणे ऐकून शंकरवर्माही फार खूष झाला.

(क्रमशः)





# देवकन्येचा वर

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा झाडाजवळ गेला.

झाडावरून प्रेत उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून त्याने स्मशानाचा रस्ता सुधारला. तेव्हा प्रेतात वास करणारा वेताळ बोलू लागला–"राजा, तुझा दृढ-संकल्प आणि कष्ट करण्याची जिद्द बघून मला मोठं आश्चर्य वाटत आहे. असंही असेल, की तू कुणाला तरी वचन दिलं असावंस, अन् ते पुरं करण्यासाठी इतका सारा त्रास सहन करत असावास. मला हे मान्य आहे की माणसाने आपण दिलेले वचन व देवाने आपण दिलेला वर कधीच मागे घेऊ नये. द्वेष आणि हेवा यांच्या आहारी जाऊन या विरुद्ध वर्तन करणाऱ्या एका देवकन्येची गोष्ट मी आता तुला सांगतो. ऐकता ऐकता तुला आपल्या कष्टांचा विसर पडायलाही मदत होईल."

## वेताळाच्या गोष्टी



आणि वेताळ गोष्ट सांगू लागला– चक्रधरपुरमधे रहाणाऱ्या चन्द्रकान्तचे आईवडील त्याच्या लहानपणीच वारले होते. स्वतःवर काही जबाबदारी आहे, याची कसलीही जाणीव न होताच पोरका चन्द्रकान्त आपल्या आजीच्या देखरेखी-खाली वाढला. वडिलार्जित संपत्तीच्या नावाने त्याच्या वाट्याला दहा एकरांचा एक ओसाड जमिनीचा तुकडाच काय तो आला होता, बाकी पैशा-अडक्याच्या नावे पूज्यच!

एकदा रात्री चन्द्रकान्तला आपल्या झोपडीत काही केल्या झोप येईना, म्हणून तो आपल्या त्या पडीक शेतात जाऊन झोपला. पण तेथेही त्याला चैन पडेना. जंगलात जाऊन पडल्यासारखी त्याला भीति वाटू लागली. थोड्या वेळाने आकाशात चन्द्र दिसू लागला, चांदणं पडलं आणि थंड वारा वाहू लागला. आता कुठे चन्द्रकान्तला झोप लागली.

बरीच रात्र उलटल्यावर कुठूनसे सुरेल आवाजातले गाणे त्याला ऐकू येऊ लागून तो झोपेतून अचानक जागा झाला. एक अद्भुत सौन्दर्यवती स्त्री हिरवी साडी आणि अमूल्य असे दागिने धारण करून आपल्याच दिशेने येत असलेली त्याला दिसली.

तिला पहाताच, ती कोणी देवकन्या असावी असे चन्द्रकान्तला वाटले. तो तिला म्हणाला–"तू मोठी नशीबवान आहेस, कसली काळजी किंवा त्रास हा काय प्रकार असतो याचा तुला कधी अनुभवच नाही! म्हणूनच अशी खुल्या चांदण्यात रात्री मजेने इकडे तिकडे फिरताना दिसत आहेस! आम्हा मानवांच्या नशीबी मात्र केवळ त्रासच त्रास वाढून ठेवलेला असतो."

चन्द्रकान्तकडे निरखून पहात देवकन्या म्हणाली–"अरे, तू तर अजून विशीही ओलांडली आहेस की नाही असं वाटतंय मला, अन् इतक्यात इतकी विरक्ति? आश्चर्याची गोष्ट आहे! आत्मशक्तीवर



विश्वास ठेऊन दृढनिश्चयाने चांगली मेहनत केली, तर निराशा पदरी येण्याची शक्यता नसते. अच्छा, पण तुझ्यावर कसलं संकट आलंय?"

"माते, ही जमीन तर अजिबात नापीक आहे, हे तुला माहीतच आहे. कितीही मेहनत केली तरी यात काय पेरलेलं उगवून येईल?" त्याने विचारले.

"हां, तू म्हणतोस ते तर बरोबरच आहे म्हणा!" देवकन्या म्हणाली, अन् थोडा वेळ थांबून पुन्हा ती बोलू लागली– "हे बघ, मी तुला एक वर देते. या जमिनीत तू आपल्या हाताने कोणतेही बी पेरलेस तरी ते नक्की उगवून येईल. आता तू चांगली कडक मेहनत करू लाग आणि पीक काढ. या माझ्या वराची परतफेड म्हणून तू मला इथे फिरायची परवानगी द्यायचीस आणि विन्ध्यवासिनी देवीच्या पूजेसाठी इथून मला फुलं तोडू द्यायचीस! या शेताच्या एका बाजूला यासाठी तू फुलझाडं लावायचीस. कबूल?"

मोठ्या आनन्दाने चन्द्रकान्तने कबुली दिली.

नन्तर एका महिन्यातच चन्द्रकान्तने ती ओसाड जमीन नीट नांगरून तयार केली. एका बाजूला उसाची शेती करून त्याने दुसरीकडे फळझाडे अन् एकीकडे फुलझाडांचे



बी पेरले. शेतातच एका बाजूला त्याने स्वतःसाठी एक झोपडीही उभारली.

थोड्याच अवधीत त्याने पेरलेले बी अंकुरले अन् ती ओसाड, नापीक जमीन हिरवीगार दिसू लागली. फुलझाडांवर रंगीबेरंगी फुले दिसू लागली.

एका रात्री चन्द्रकान्त आपल्या झोपडीत झोपलेला असताना, आपल्या परिचित देवकन्येच्या गाण्याने त्याची झोप मोडली अन् तो झोपडीबाहेर आला.

निरनिराळे सुगन्ध पसरवत पूर्णतः उमललेल्या फुलांच्या झाडांच्या मधून फिरणाऱ्या अन् फुलं तोडणाऱ्या देवकन्येला त्याने पाहिले, अन् तो त्या दिशेने निघाला.



चन्द्रकान्तला आपणाकडे येताना पाहून त्याला शाबासकी देत देवकन्या म्हणाली— "पाहिलंस? मी म्हटलं नव्हतं कि कष्ट करायची तयारी असेल, तर माणसाला अशक्य काहीच नाही!"

"हा तर तुझ्याच वरदानाचा प्रभाव आहे माते!" चन्द्रकान्त नम्रतेने म्हणाला.

त्या दिवसापासून नेहमीच देवकन्या रात्रीच्या वेळी चन्द्रकान्तच्या फुलबागेत मोठ्या आवडीने फिरू लागली. बहुधा यामुळेच पाच-पाच वर्षेपर्यंतही फुलं न येणारी झाडं दोन वर्षातच फुलू लागली अन् त्यांवर फळंही धरू लागली. ऊस व इतर धान्याचे पीकही खूपच छान येऊ लागले. त्यामुळे चन्द्रकान्तच्या त्या दरिद्री झोपडीत आता अपार धन जमा झाले!

इतके धन पाहून चन्द्रकान्तला आता आपल्या झोपडीची लाज वाटू लागली. म्हणून त्याने तेथे एक पक्के घर बांधले. पण ते बांधताना जागा न पुरल्याने त्याने काही फुलझाडे अन् फळझाडे कापून टाकली. त्यानन्तर एका रात्री देवकन्या तेथे आली अन् कापलेल्या झाडांचे बुंधे पाहून अश्रु ढाळू लागली. पण ते पाहूनही न पाहिलेसे करून चन्द्रकान्त आपल्या घरात निघून गेला.

आता जवळ भरपूर पैसा आल्यामुळे चन्द्रकान्तने शेतावर कामासाठी मजूर लावले. फुलझाडांच्या देखरेखीसाठीही त्याने माळी लावले. त्याला भरपूर मोकळा वेळ मिळू लागल्यामुळे तो चावडीवर बसून इकडच्या-तिकडच्या गप्पांमधे आपला वेळ काढू लागला.

एका रात्री देवकन्या त्याला म्हणाली— "हल्ली इथे आसपास फार माणसं हिंडू-फिरू लागल्याने मला फुलबागेत फिरायला अडचण भासू लागली आहे, तेव्हा फुल-झाडांना पाणी देणं अन् वाफे वगैरे करण्यासारखी कामं तू स्वतःच केलीस तर बरं होईल."



यावर चन्द्रकान्त जरा चिडूनच म्हणाला— "मला आता पहिल्यासारखा वेळ नसतो, अन् पूर्वीसारखी शक्तीही माझ्या शरीरात राहिली नाही. आता बाग-बगीचात माली मळत बसायची जरूरही मला राहिलेली नाही. हां, पण रात्री इथे कोणी राहू नये याची दक्षता मात्र मी घेऊ शकेन."

देवकन्या बिचारी यावर काहीच बोलली नाही. या घटनेच्या दुसऱ्याच दिवशी एक राजकर्मचारी आपल्या कामासाठी कुठेसा जात असताना एक रात्र चन्द्रकान्तच्या गावात मुक्कामाला राहिला. चन्द्रकान्तने त्याला उत्तम मेजवानी दिली. त्यावेळी गोष्ट करता करता चन्द्रकान्तला कळले की गेल्या चार वर्षांपासून महाराज कसल्याशा भयानक जखमेमुळे हैराण आहेत. अनेक मोठ मोठे वैद्यही राजाची त्या वेदनेपासून सुटका करू शकले नाहीत. काही दिवसांपूर्वीच तेथे एक संन्यासी आला होता, त्याने जखमेची परीक्षा करून म्हटले की हिमालयात आढळणाऱ्या एका विशिष्ट वनस्पतीचे फूल आणून, ते पिळून रस जखमेवर चोळला तर ती बरी होईल. इतक्या लांबून फूल वाळू न देता आणणे अशक्य असल्याने त्याने त्या वनस्पतीचे बी पाठवायचे कबूल केले. नंतर काही लोकांना बरोबर घेऊन जाऊन त्या संन्याशाने त्यांच्या हाती त्या अद्भुत वनस्पतीचे बी ही पाठवले. एक वर्षापूर्वीची ही गोष्ट आहे, पण इथल्या वातावरणात ते बी





खराब झाले अन् त्यात किडे पडले, त्यामुळे आता नाइलाज होऊन राजाने जाहीर केले आहे की, जो कोणी त्याची जखम बरी करील, त्याला राजा आपले अर्धे राज्य बक्षीस देईल.

ही वार्ता ऐकून चन्द्रकान्त ताबडतोब राजधानीला जायला निघाला. राजाला भेटून तो म्हणाला–" महाराज, ते खराब झालेले बी मला द्या. ते पेरून रोपाला फूल लागल्याबरोबर मी ते आपणाकडे घेऊन येईन. जखमेच्या वेदनेपासून आपली सुटका करायची जबाबदारी आता माझी!"

राजाने ते खराब झालेले बी चन्द्रकान्तच्या हवाली केले. आपल्या घराजवळच एक वाफा करून चन्द्रकान्तने ते बी पेरले. तेथे एक रोप उगवले आणि सन्ध्याकाळपर्यंत त्याला एक कळी लागली. सकाळ होण्यापूर्वी थोडा वेळ अगोदरच त्या कळीचे सोनेरी रंगाने चमकणाऱ्या फुलात परिवर्तन झाले!

त्याच वेळी नेमकी देवकन्या तेथे आली. ते फूल पाहून–" अहाहा! काय अद्भुत फूल हे! आता देवीच्या पूजेसाठी मी याचा उपयोग करीन." असे म्हणत ती ते फूल तोडण्यासाठी पुढे झाली.

इतक्यात तिला थांबवत चन्द्रकान्त म्हणाला–" नाही नाही! ते फूल तुझ्यासाठी नाहीय! या फुलाच्या साह्याने मी आता अर्ध्या राज्याचा मालक बनणार आहे."

यावर एकदम चमकून देवकन्या म्हणाली–" मी तर तुझ्याकडून वचन घेतलं होतं ना, की या बगीचात उमललेलं कोणतंही फूल मी तोडून घेऊ शकते? तू विसरलास की काय?"

"ते सर्व विसर आता! मी राजा बनणार आहे म्हटलं!" चन्द्रकान्त मोठ्या विश्वासपूर्वक बोलला.

"ओह! असं होय?" असे म्हणून देवकन्या ताबडतोब तेथून अदृश्य झाली.

पण चन्द्रकान्त जराही विचलित झाला नाही. ते फूल घेऊन मोठ्या खुशीने तो राजधानीकडे निघाला. पण तिथे पोचूनही त्याच्या पदरी निराशाच पडली! गल्ली-बोळांतून लोकांच्या झुंडी बाहेर पडत होत्या! एकाने सांगितले की, राजा रात्रीच मृत्यु पावला! अपार दुःखाने चन्द्रकान्त आपल्या घराकडे परत फिरला. पण तेथे पोचल्यावर आपल्या जमिनीतले प्रत्येक झाड पार सुकून गेलेलं त्याला दिसून आलं!

यानन्तर चन्द्रकान्तने कुठलेही बी पेरले तरी ते उगवून येईनासे झाले!

आपली ही गोष्ट संपवून वेताळ म्हणाला–" राजा, देवकन्येला चन्द्रकान्तचा राग का बरं आला? चन्द्रकान्त राजा होणार म्हणून देवकन्येची त्याच्यावर खफा मर्जी झाली असं मला नाही वाटत. केवळ फूल तोडायला मनाई केली म्हणून ती चन्द्रकान्तला एकदम दरिद्री बनवू पहात होती? एका दैवी स्त्रीच्या भूमिकेतून पहाता, तिचं हे वागणं बरोबर वाटतं काय? असं करणं म्हणजे अन्याय व स्वार्थपरायणताच नव्हे का? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होऊन पडतील."

यावर विक्रम म्हणाला–" देवकन्येच्या वागण्यात द्वेष ही दिसत नाही, अन् स्वार्थपरायणताही दिसत नाही. अन्न, वस्त्र



आणि निवाराही मिळायची मारामार होती चन्द्रकान्तला. अशा फाटक्या अवस्थेत असणाऱ्या त्याला देवकन्येने दया दाखवली अन् त्याचं सर्वतोपरी कल्याणच केलं. त्याच्या बदल्यात तिने केवळ पूजेसाठी फुलांचीच अपेक्षा ठेवली होती. चन्द्रकान्तने सुरुवातीला ते मान्यही केलं होतं. पण पुढे त्याच्याकडे जसजसा पैसा जमू लागला तसतसा त्याच्यात आळशीपणा आणि आणि बप्पलपोटेपणाही उत्पन्न होऊ लागला. त्यामुळेच शेतीवाडीचं कामकाज मजुरांवर सोपवून तो चावडीवर गप्पाटप्पा करण्यात वेळ व्यर्थ घालवू लागला. अर्ध राज्य बळकावण्यासाठी आपल्या उपकारकर्त्या देवकन्येला एक फूल तोडायला त्याने मनाई केली, तिचा अपमान केला. त्याच्यात स्वार्थ इतक्या पराकोटीला पोचला की आता स्वतःच राजा व्हायचं स्वप्न तो पाहू लागला. असा स्वार्थी माणूस राजा झाला, तर केवळ आपल्या शासनाखालील जनतेसाठीच नव्हे तर आपल्या शेजारच्या राजासाठीही तो धोकादायक होऊ शकतो ना! चन्द्रकान्त राजधानीला पोचला तेव्हाच नेमका राजाचा मृत्यु घडण हा तर केवळ योगायोगच होता. आपल्या वैयक्तिक स्वार्थासाठी चन्द्रकान्तने ज्या क्षणी देवकन्येचा अपमान केला, त्याच क्षणापासून त्याच्या शेतातल्या झाडा-झुडुपातलीच नव्हे, तर राजाची जखम बरी करणाऱ्या फुलातली शक्तीही नाहीशी झाली! एका अयोग्य व्यक्तीला वर दिल्यानन्तर आपल्याला आलेल्या अनुभवावरून स्वतःची चूक देवकन्येच्या लक्षात आली. आणि तिने आपला दिलेला वर परत घेतला. परंतु हे तिने कोणत्याही प्रकारच्या द्वेषामुळे केलं नव्हतं, घडलेल्या परिणामाला स्वतः चन्द्रकान्तच जबाबदार होता."

अशा तऱ्हेने राजाचा मौन-भंग होताच ते प्रेत वेताळासह अदृश्य होऊन पुन्हा त्याच झाडाच्या फान्दीवर जाऊन लटकू लागले!



चांदोबा पुरवणी–२५

# महान् स्वप्नदर्शी भारत

## भारताची अंतरचेतन कोणती?

अंधविश्वास व निष्क्रियतेच्या जंजाळातून भारतीय जनतेला बाहेर काढणे हे स्वामी विवेकानन्द (१८६३-१९०२) यांच्या जीवनाचे ध्येय होते. एक महान् योगी म्हणून भारताच्या उद्धाराचे रहस्य स्वामीजींनी जाणले होते. धर्म म्हणजे पारलौकिकता हे ते रहस्य आहे असे ते सांगत.

"प्रत्येक व्यक्ती प्रमाणे प्रत्येक राष्ट्राचे ही एक जीवन-तत्त्व असते. या प्रमुख स्वराभोवती अन्य स्वर-संकेत विहरत असतात नि शेवटी त्या प्रमुख स्वरात विलीन होऊन एका अपूर्व एकतेची साक्ष देतात. शतकानुशतके परंपरेने चालत आलेल्या पथ-प्रदर्शक राष्ट्रीय सजीव तत्त्वाची जर एकाद्या देशाने बूज ठेवली नाही, तर त्या देशाचा सर्वनाश अटळ असतो....एकाद्या राष्ट्राचे जीवन-तत्त्व त्याच्या राजनैतिक शक्तीत असते. उदाहरणार्थ-इंग्लंड. दुसऱ्या एकाद्या राष्ट्राचे जीवन तत्त्व त्याच्या कलात्मक जीवनात असते. भारतात धर्म-तत्त्व प्रधान राहिले, राष्ट्रीय जीवनाच्या संपूर्ण संगीताचा मुख्य सूर धर्मच राहिला!"

स्वामी विवेकानन्दांच्या दृष्टीने धर्माचा अर्थ सत्यशोधन, कर्म-कांड नव्हे. या महान् गुरूचे हे तत्त्वज्ञान आपण कितपत समजतो हे आम्ही स्वतःला विचारावे.

### तुम्हाला माहीत आहे?

१. ज्याच्यामुळे प्राचीन भारतातील एका महान् सम्राटाबद्दल बरीच माहिती मिळते तो विदेशी प्रवासी कोण?
२. ज्याच्याबद्दल त्याने इतकं खूप लिहिलं तो राजा कोणता?
३. या राजाची राजधानी कोणती?
४. जगांतील सर्वात पहिले विमान उडाले, ते किती उंच उडाले?
५. जगातील सर्वात मोठा पक्षी कोणता?

[पान ३६ पहा]

# विष्णु

ब्रह्मा, विष्णु आणि महेश ही भारताच्या पुराणातील तीन प्रमुख दैवते आहेत. वस्तुतः श्रेष्ठतम दैवी शक्तीची ही तीन विभिन्न रूपे आहेत. सृष्टि, स्थिति आणि लय ज्या शक्ती मुळे होतात तिची ही तीन बाह्य-रूपे आहेत.

वेदांमध्ये विष्णुचे वर्णन अशा प्रकारे केले आहे. धरती, आकाश नि त्या पली-कडील अंतरिक्ष-मंडलावर तीन पाउले टाकून ते सर्वत्र व्यापून राहिले. जगात जेव्हां महान् क्रांतीची आवश्यकता असते, तेव्हां भगवान विष्णु अनेक रूपांनी अवतार घेतात. आज पर्यंत त्यांनी नऊ अवतार घेतलेले आहेत. राम आणि कृष्ण ही अन्य कोणी नाही, भगवान विष्णूचे अवतार आहेत. दहावा अवतार अद्याप घेतलेला नव्हता. कल्कीचा अवतार घेऊन भगवान विष्णु मानवाच्या अज्ञानमूलक जंगली स्वाभावाचा नाश करतील आणि अशा रीतीने आध्यात्मिक दृष्ट्या जागृत मानव जातीची निर्मिति करतील.



विविध शिल्प नि चित्रात भगवान विष्णूचे रूप मोठे सुंदर अंकित केलेले असते. मस्तकावर एक सुंदर मुकुट, वरच्या दोन हातात शंख आणि चक्र, नि खालच्या हातात गदा आणि पद्म धारण केलेले दिसते.

त्यांच्या उजव्या बाजूला देवी लक्ष्मी आणि डाव्या बाजूला पृथ्वी म्हणजे भूदेवी अंकित दिसते. काही दुसऱ्या प्रकारची चित्रे ही दिसतात, ज्यात कधी भगवान विष्णु शेषशायी दिसतात तर कधी आपले वाहन गरुडावर स्वार झालेले!

त्यांच्या अनेक नावापैकी काही नावे आहेत - अनंत, वैकुंठेश्वर, वेंकटेश्वर, केशव, अच्युत, माधव, पीताम्बर, जनार्दन, विश्वंभर, दामोदर, चतुर्भुज, मुकुन्द, मुरारी, नारायण, पद्मनाभ, हरि आणि यज्ञेश्वर.

## चांदोबाच्या बातम्या

### बहिऱ्यांची नगरी

काही विशेषज्ञ असे सांगतात की जर कलकत्ता महानगरींतील गडबडीचे प्रमाण असेच वाढत गेले तर आणखी काही वर्षांनी शेकडो-हजारो लोक निश्चित बहिरे होऊन जातील. ते कसे ही होवो, निदान यामुळे लोकांची श्रवण-शक्ति झपाट्याने क्षीण होत जाईल. भारतातील शहरात कलकत्ता सर्वाधिक कोलाहलपूर्ण शहर आहे. लोकांच्या गर्दीतील आवाज, वाहनांचे कर्णकर्कश भोंगे आणि लहान-मोठ्या कारखान्यांतून निघणारे ध्वनि—या सर्वांना यासाठी धन्यवाद दिले पाहिजेत?



### खूप जुनी विहीर

जगातील प्रसिध्द जुनी विहीर आहे तुर्कस्थानातील. पण अलीकडे इस्राइल मध्ये सापडलेली एक विहीर तुर्कस्थानातील विहिरीहून जुनी आहे. ती ८,००० वर्षा पूर्वीची असावी असा अंदाज आहे. ही पाषाण युगातील विहीर आहे आणि यावरून असे लक्षात येते की प्राचीन काळातील लोकांना जलाशयांचे खूप चांगले ज्ञान खास होते.



# साहित्य सोनियाचिया खाणी

१. रॉबिनहूड या काल्पनिक कथापात्राच्या जवळपास सत्य जीवनातील एक माणूस वावरत असे. तो कोण?
२. एका सुप्रसिद्ध लेखकाने त्याच्या वर कादंबरी लिहिली. तो लेखक कोण? नि त्या कादंबरीचे नाव काय?
३. त्याच लेखकाने लिहिलेल्या अन्य कादंबऱ्या कोणत्या?
४. रवीन्द्रनाथ टागोर यांच्या 'गीतांजली'चा बंगालीतून इंग्रजीत कोणी अनुवाद केला?
५. या इंग्रजी संस्करणाला प्रस्तावना कोणी लिहिली?
६. प्रकाशनाच्या पहिल्याच वर्षात गीतांजलीच्या इंग्रजी संस्करणाचे किती वेळा पुनर्मुद्रण झाले?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे?

१. चीनी प्रवासी फाहियान.
२. विक्रमादित्य.
३. उज्जयिनी.
४. १९०३ मध्ये राइट बंधूंनी ८ ते १२ फुट उड्डाण केले होते. बारा सेकंदांसाठी.
५. उत्तर आफ्रिकेतील शहामृग.

### साहित्य

१. स्कॉटलंडचा रॉब राय.
२. सर वाल्टर स्काट (१७७१ ते १८३२), कादंबरीचे नाव आहे 'रॉब राय'
३. 'आयव्हानहो', 'द टालिस मॅन', 'ए लिजेंड ऑफ माण्ट्रोज' इत्यादि.
४. स्वतः कवीने.
५. डब्ल्यु. बी. यीट्स्.
६. मार्च १९१२ ते डिसेंबर १९१२ पर्यंत तेरा वेळा पुनर्मुद्रण.



# श्री रामकृष्ण परमहंस

## (६)

ब्रह्म समाजाचे संचालक श्री केशवचन्द्र सेन एक महापुरुष होते. एके दिवशी श्रीरामकृष्ण त्यांच्या घरी गेले आणि तत्काल समाधि अवस्थेत विलीन झाले. केशवचन्द्र व त्यांच्या आसपासच्या लोकांवर श्रीरामकृष्णांनी चांगलीच छाप पाडली.

श्रीचैतन्य भजन गात असताना त्यांच्या बरोबर नित्य वैष्णव भक्तांचा मेळावा असे. ते दृश्य आपण आपल्या डोळ्यांनी पहावे अशी श्रीरामकृष्णांची इच्छा होती. एके दिवशी खरोखरीच भक्त-वृन्दासह भजन गात असलेले श्रीचैतन्य त्यांच्या डोळ्यांना दिसले. श्रीरामकृष्ण मोठ्या तन्मयतेने हे दृश्य बराच वेळ पहात राहिले.





१८८० च्या नोव्हेंबर महिन्यात नंतर विवेकानन्द म्हणून प्रसिद्ध झालेले श्री नरेन्द्रनाथ श्रीरामकृष्णांकडे आले. त्यांना पाहताच श्रीरामकृष्णांना फार आनन्द झाला. नरेन्द्रनाथांच्या मनात प्रथम थोडे भय होते, त्यांना असे ही वाटून गेले ही हा महात्मा अमळ वेडा तर नाही! पण नंतर या ज्ञानसंपन्न महापुरुषाबाबतचे त्यांचे आकर्षण नित्य वाढत गेले.



हळू हळू नरेन्द्रनाथांना वाटले की त्यांचे गुरुवरील प्रेम दृढ होत चालले आहे. वडिलांच्या मृत्यूनंतर आपल्या कुटुंबाच्या पालन-पोषणाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. त्यांनी श्रीरामकृष्णांना विनंती केली की आर्थिक साह्य देण्यासाठी त्यांनी काली मातेला प्रार्थना करावी. हे काम स्वत:च करण्याचा त्यांना सल्ला दिला. तथापि नरेन्द्रनाथांनी काली मातेकडे धनाऐवजी ज्ञानाची मागणी केली.

त्या काळचे महान समाज-सुधारक व शिक्षणतज्ज्ञ ईश्वरचन्द्र विद्यासागर यांना श्रीरामकृष्ण भेटले. त्यांना कोणी तरी विचारलं–"ज्ञान ग्रहण करणारा माणूस कधी बोलतो का ?" ते म्हणाले–"फुलातील मध चाखणारा भृंगा थोडा वेळ गप्प बसतो खरा. पण पोटभर मध खाऊन झाला की पुन्हा गुंजारव करू लागतो."





त्या काळची अनेक प्रसिद्ध मंडळी श्रीरामकृष्णांना भेटत असत. त्यापैकी देवेन्द्रनाथ टागोर, विजयकृष्ण गोस्वामी आणि स्वामी दयानन्द हे काही होत. नाटककार गिरीशचन्द्र घोष त्यांचे शिष्य बनले. श्रीरामकृष्ण त्यांची नाटके पाहून त्यातील सर्व कलाकारांनी आशीर्वाद देत असत.

श्रीरामकृष्ण लोकात खूप प्रसिद्ध झाले. या महाज्ञानी सत्पुरुषाचा साधेपणा आणि दिव्य वाणी यांनी अनेकांच्या आयुष्याला नवे वळण लावले. यांना पाहण्यासाठी लोक नेहमी गर्दी करीत. ते जेथे जात तेथे त्यांची भक्त-मंडळी बहुसंख्येने जमत.





सन १८८५ मध्ये श्रीरामकृष्ण गळ्याच्या व्यथेने आजारी पडले. डॉक्टरांनी सल्ला दिला की त्यांनी जास्त बोलू नये नि समाधि अवस्थेत जाऊ नये. पण या दोन्ही गोष्टी शक्य नव्हत्या. कोणी प्रश्न विचारला म्हणजे त्याचं उत्तर द्यायलाच लागे. त्यांच्या पवित्र आत्म्याला भक्तिपूर्वक परमेश्वराचे स्मरण करताना समाधि अवस्थेत जावेच लागे.

श्रीरामकृष्णांची तब्येत फारच बिघडली. तेव्हा कलकत्त्या-जवळील काशीपुर उद्यानात त्यांना नेण्यात आले व तेथे उपचार सुरु झाले. महेन्द्रलाल सरकार यांच्यासारख्या विख्यात डॉक्टरांनी औषधोपचार केले. तरी त्यांची प्रकृति ढासळतच चालली. एके दिवशी श्रीरामकृष्णांनी नरेन्द्रनाथांना आपल्याजवळ बोलवले व त्या तरुण शिष्याला आपल्या सर्व अद्भुत शक्ति प्रदान करून ते त्याच्याकडे पाहू लागले.





श्रीरामकृष्ण परमहंस १६ ऑगस्ट १८८६ रोजी निधन पावले. त्या दिवशी संध्याकाळी त्यांचा पार्थिव देह काशीपुर घाटावर चितेवर ठेवण्यात आला आणि अग्नि-संस्कार करण्यात आला. अशा रीतीने एका महान् आध्यात्मिक पुरुषाची जीवन-लीला समाप्त झाली. त्यांच्या मृत्यूनंतर तर त्यांचा प्रभाव लोकांवर अधिकच दिसू लागला.

श्रीरामकृष्णांची पत्नी पूज्य माता शारदादेवींचे दर्शन करून आता त्या स्वर्गीय महापुरुषाचे भक्त आश्वस्त होऊ लागले. भक्त त्यांच्याजवळ आले म्हणजे लहान मुलांना आपल्या आई-जवळ जे प्रेम लाभते, ते त्यांना माता शारदादेवींच्या सान्निध्यात मिळू लागले.





आपल्या गुरूकडून विश्वासपूर्वक मिळालेल्या शक्तींच्या आधारे नरेन्द्र-नाथांनी खूपच प्रगति केली आणि नंतर ते विवेकानन्द या नावाने प्रसिद्ध झाले. त्यांनी आपले गुरु श्रीराम-कृष्ण यांच्या उपदेशांचा देशो-देशी प्रचार केला. श्रीरामकृष्णांचे उपदेश मानवजातीला नित्य स्फूर्ति देत राहतील. (समाप्त)



# धर्मेन्द्राने घेतलेली परीक्षा

गंगानगर गावात धर्मेन्द्र नावाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. तसा तो सुप्रसिद्ध होता. त्याचा मुलगा विशाल रूपगुणसंपन्न होता. आता विशाल लग्न करण्यासारखा युवक झाला, म्हणून धर्मेन्द्राने एकाद्या सुयोग्य रूपवती नि गुणी मुलीचे स्थळ शोधायला सुरुवात केली.

त्याच गावात धर्मेन्द्राचा एक मित्र होता त्रिलोक. तो आपल्या घरी हातमागावर जरीच्या साड्या विणी नि आसपासच्या गावी जाऊन विकी. श्रीमंत लोकच या जरीच्या साड्या खरेदी करीत असत. यामुळे त्रिलोकला अनेक श्रीमंत लोकांची चांगली माहिती होती.

एक दिवशी त्रिलोक धर्मेन्द्राला म्हणाला— "विशालसाठी तू मुलगी शोधतो आहेस असं कळलं मला! सीतापुरातल्या रामा-नन्दाची मुलगी कमला मोठी सुरेख आहे. तसेच लखिमपुरच्या विश्वेश्वराची मुलगी सरिता पण फार सुंदर आहे. तू विशालसह एकदा त्यांच्याकडे जाऊन दोन्ही मुली पाहून ये. दोघींच्या पैकी कोणा ही एकीला तू पसंत केलंस की तुला छान सून मिळालीच समज. रामानंद नि विश्वेश्वर दोघे ही नवीन संबंध जोडण्यासाठी तुझ्यासारखेच घरंदाज नि श्रीमंत आहेत."

त्रिलोकच्या सांगण्यावरून धर्मेंद्र आपल्या मुलांसह दोन्ही गावी गेला आणि कमला नि सरिता या दोघींना पाहून आला. दोघी पण एकीहून एक सरस होत्या. म्हणून विशालने दोघीं पैकी कोणा एकीची निवड करण्याची जबाबदारी आपल्या वडिलांवर सोपवली. दोघीं पैकी एकीला आपली सून म्हणून निवडणं धर्मेन्द्राला ही मोठं कठिण होऊन बसलं! तो त्रिलोकला म्हणाला—"त्रिलोक, सुनेची

नमूताई गोखले



निवड करणं ही एक समस्या झाली आहे बघ! कमला नि सरिता दोघी ही फार सुंदर आहेत. पण शारीरिक सौंदर्य नेहमी टिकणारं थोडंच आहे? मला असं वाटतं की आपण दोघींची परीक्षा करू या. या कामी मला तुझी मदत पाहिजे.

त्रिलोक मंद-स्मित करीत म्हणाला—"धर्मात्मा म्हणून तू खूप प्रसिद्ध आहेस. तुझ्या सारख्या मित्राला काही मदत करण्याची संधि मला भाग्याने मिळत आहे. बोल, मी काय बरं करू?"

त्रिलोकने काय करावं हे धर्मेन्द्राने त्याला समजावून सांगितले. धर्मेन्द्राच्या सूचनेनुसार नवीन प्रकारच्या जरीच्या साड्या घेऊन प्रथम त्रिलोक सीतापुरला गेला. त्रिलोकला पाहून कमला म्हणाली—"नवीन साड्या आणल्या असल्या तर दाखवा पाहू!"

त्रिलोकने साड्यांचं गाठोडं खाली उतरवून उघडलं नि म्हणाला—"नवीन साड्या तयार झाल्या की प्रथम मी इथंच येतो ना बेटा!" मग त्रिलोकने एक-एक साडी दाखवायला सुरुवात केली.

नवीन साड्या पाहून कमला खूश झाली. त्रिलोकने एक साडी कमलाच्या हाती देत म्हटलं—"बेटा, ही साडी फार छान आहे. हिचा जर फार उत्तम आहे. तू ही साडी नेसलीस म्हणजे मग माझं म्हणणं पटेल तुला!"

साडी हातात घेत कमला म्हणाली—"यावेळी पोलक्याचं कापड आणायला तुम्ही विसरला वाटतं! नाही तर साडी बरोबर पोलक्याचं कापड ही घेतलं असतं मी!"

डोकं खाजवीत त्रिलोक म्हणाला—"खरंच मुली, ते कापड मागावर आहे. ८-१० दिवसात ते मी घेऊन येईन." साडीचे पैसे घेऊन त्रिलोक थेट लखिमपुरला पोचला.

तिथे विश्वेश्वरची मुलगी सरिता हिला पण त्रिलोकने आणलेल्या जरीच्या साड्या खूप आवडल्या. त्रिलोकने एक छान साडी



सरिताच्या हाती देत म्हटलं—"या साडीला योग्य पोलक्याचं कापड मी पुढील आठवड्यात घेऊन येईन. ते कापड मागावर आहे. दुसरीकडून कोठून खरेदी करण्याच्या फंदात पडू नकोस."

सरिताने साडीची किंमत देऊन टाकली. त्रिलोक आपल्या गावी परत आला. दोन आठवड्यां नंतर धर्मेन्द्राच्या सूचनेनुसार कमला नि सरिता यांना विकलेल्या साड्यांच्या अनुरूप पोलक्यांचे कापड घेऊन त्रिलोक पुन्हा निघाला.

प्रथम कमलाकडे जाऊन त्रिलोक म्हणाला—"बेटा, तुझ्या नवीन साडीवर शोभेल असं झकास पोलक्याचं कापड आणलं आहे आज. पहा बरं!"

पण कमला म्हणाली—"काका, आता त्याची जरूर नाही. मी बाजारातून योग्य ते कापड खरेदी केलं आहे."

"ठीक आहे. तर मग मी जातो." असं म्हणून त्रिलोक लखिमपुरला पोचला. लांबूनच त्याला पाहून सरिता म्हणाली—"पोलक्याचं कापड आज घेऊन आलात वाटतं!"

"होय बेटा, घेऊन तर आलोय, जरा उशीरच झाला. तू दुसरीकडून कोठून तर कापड खरेदी केलं नाहीस?" त्रिलोकने विचारले.



सरिता हसत म्हणाली—"तुम्ही अगदी विसरभोळे कापड व्यापारी आहात काका! जी साडी तुम्ही मला दिलीत, तिच्यात पोलक्याचं कापड ही ठेवलेलं होतं. मी साडी उलगडली तेव्हा ते खाली पडलं. थांबा, दाखवते तुम्हाला." असं म्हणत ती घरात गेली आणि ते कापड घेऊन आली. मग सरिताने विचारले—"या कापडाची किंमत किती काका? मी देऊन टाकते तुम्हाला."

"हं आता म्हातारा झालोय! विसरतो अनेक गोष्टी!" हसत त्रिलोक म्हणाला नि पोलक्याच्या कापडाचे पैसे घेऊन घरी परतला.

तो प्रथम धर्मेन्द्राकडे गेला आणि कमला नि सरिता यांच्याकडे जे घडलं ते सारं त्याला सांगितलं.

सगळं ऐकून धर्मेन्द्र मंद-स्मित करीत म्हणाला–"झालं, आपली समस्या सुटली तर! कोणाला आपली सून करावी हे समजलं आता! चांगला मुहूर्त पाहून आता मागणी घालू या."

त्रिलोकने आश्चर्याने विचारले–"माझ्या लक्षात नाही आलं कोणाला तुझी सून बनवणार आहेस तू?"

धर्मेन्द्रने प्रश्न केला–"मी सांगितल्या-प्रमाणे तू कमला नि सरिता यांना साड्या दिल्यास ना?"

"होय, मी साड्यांची तारीफ करीत उत्तमोत्तम साड्या त्या दोघींना दिल्या!" त्रिलोकने उत्तर दिले.

"त्या दोन्ही साड्यांच्या पोटात अनुरूप पोलक्यांचं कापड ही आपण दिलेलं होतं हे तुझ्या लक्षात आहे न?" धर्मेन्द्राने विचारले.

एक क्षणभर चपापून त्रिलोक म्हणाला–"हूं, आता लक्षात आलं! तुझी होणारी सून सरिताच न?"

"होय त्रिलोक, बरोबर अंदाज केलास तू! सरिता मध्ये जो प्रमाणिकपणा आहे तो कमलात नाही. कमलाने ही साडीत लपविलेलं पोलक्याचं कापड पाहिलं, पण ते लपवून ठेवलं आणि तुला सांगितलं की पोलक्याचं कापड तिने बाजारात खरेदी केलं! या लहान-सहान बाबीतच माणसाचा स्वभाव कळतो. बरं, कमलाला दिलेल्या पोलक्याच्या कापडाची किंमत सांग. मी तुला देऊन टाकतो." धर्मेन्द्र म्हणाला.

"तू पैसे दिलेस तरी मी थोडाच घ्यायला बसलोय? तुझ्या मुलासाठी योग्य वधूच्या शोधासाठी मी थोडी मदत केली असं समज. एवढा संतोष मला मिळू दे, तेवढंच मला पुरे झालं!" त्रिलोक धर्मेन्द्राला म्हणाला.

यानंतर धर्मेन्द्रचा मुलगा नि सरिता यांचा विवाह थाटामाटात साजरा झाला.





# वीर हनुमान

**वा**ली अजून गतप्राण झाला नव्हता. त्याने डोळे उघडून चहूंकडे पाहिले. आपल्या मुलाजवळ उभा असलेला सुग्रीव त्याला दिसला. वाली सुग्रीवाला म्हणाला–

"मी तुला आपल्या राज्यातून हाकलून दिले, तुझ्या पत्नीचे अपहरण केले–यात मला दोषी ठरवू नकोस. भावाभावात वाटून राज्य-सुखाचा उपभोग घेणे माझ्या नशिबी नव्हते, म्हणून मी बुद्धिभ्रष्ट झालो. आता मी प्राण सोडीत आहे, तू वानरांचा राजा हो. माझी अंतिम इच्छा अमलात आणणे कठीण असले, तरी ती अवश्य पुरी कर. अंगद मला आपल्या प्राणांहून प्रिय आहे, तू त्याला ही आपला मुलगाच समज. त्याचं पालन-पोषण करण्यात कोणतीही कसर ठेवू नकोस. तुझ्याशिवाय त्याचं असं कोणी नाही आता. तो तुझ्याच सारखा पराक्रमी आहे. सर्व कामात तुला मदत करील. सुषेणची मुलगी आणि माझी पत्नी म्हणून राहिलेली तारा मोठी बुद्धिमान आहे. येऊ घातलेली संकटे तिला अगोदरच समजतात. म्हणून ती सांगेल त्याप्रमाणे तू काम करीत रहा, अन्यथा तुझ्या जिवाला धोका राहील. देवेन्द्राकडून मिळालेली ही कांचनमाला मी तुला देतो. ती माझ्यापाशी असताना मी जर मेलो, तर ती तेजहीन होऊन जाईल; म्हणून तावडतोब तू ही आपल्या ताब्यात घे."

वालीचं बोलणं सुग्रीवाने विनयपूर्वक ऐकून घेतलं नि त्याच्या गळ्यातील कांचन-माला काढून घेतली.

६. सुग्रीवाचा राज्याभिषेक



यानंतर वालीने अंगदाला आपल्या जवळ बोलवलं आणि त्याला हितोपदेश दिला– "तू माझ्यावर जसं प्रेम केलंस, तसंच सुग्रीवावर ही कर. सुग्रीवाच्या शत्रूंना सामिल होऊ नकोस. सुग्रीव तुला जे काम करायला सांगेल ते श्रद्धा-भक्ति-पूर्वक कर. कोणाशी फार मैत्री ठेवणं अथवा मुळीच मैत्री न करणं–दोन्ही चुकीचंच आहे." असं म्हणून वालीने प्राण सोडले. सर्व वानर आरडा-ओरड करून रडू लागले. वालीचे महान् कार्य ते स्मरू लागले.

गोलभ नावाच्या गंधर्वाबरोबर वालीने सतत १५ वर्षे युद्ध केले नि शेवटी त्याचा वध केला. वाली जिवंत होता तोपर्यंत वानरांना कसला ही धोका नव्हता.

आपल्या पतीचे स्मरण करीत तारा खूप रडली. वालीच्या वक्ष-स्थळांत घुसलेला बाण तिने बाहेर काढला. ताराच्या सांगण्यावरून अंगदाने वालीला नमस्कार केला. ताराची व्यथा पाहून वालीचा वध करविण्याबाबत सुग्रीवाला दुःख वाटले. डोळ्यात आसवे आणून तो रामाजवळ आला.

सुग्रीव रामाला म्हणाला–"हे रामा, तू दिलेले वचन पाळलेस नि वालीचा वध केलास. मला राज्य मिळवून दिलेस. पण माझी आता जिवंत राहण्याची इच्छा नाही. तारा आणि सर्व वानर रडत आहेत, मला हे राज्य घेऊन काय करायचंय? प्रथम वालीने मला फार त्रास दिला, म्हणून तो मरावा अशी मी इच्छा केली. पण आता वालीच्या मृत्युनंतर मी पश्चात्तापाच्या आगीच जळत आहे. मी आपलं उर्वरित जीवन ऋष्यमूक पर्वतावर घालवलं असतं तर तेच बरं झालं असतं. आता मला स्वर्ग ही नकोसा झालाय! वालीने मला जिवंत राहू दिलं होतं, मी तर त्याचे प्राण घेतले. माझ्याहून अधिक पापी दुसरा कोण असेल? आता मी युवराज होण्यायोग्य ही नाही. मग राजा कसा बनू? मी पण वालीच्या चिते बरोबर अग्निकाष्ठे भक्षण करावी म्हणतो. सीतेचा शोध करण्याचं काम वानर करतील."

रामाकडे पाहून तारा रडत रडत म्हणाली–"ज्या बाणाने माझा पति वालीचा तू वध केलास, त्याच बाणाने मला ही वाली बरोबर पाठव. मी जवळ नसले तर वाली सुखाने कसा राहील? सीतेच्या विरहाने तू जसा दुःखी आहेस, तसाच तो स्वर्गात माझ्या विरहाने दुःखी राहील. तू जर मला ही मारलंस, तर वालीच्या वधा-बद्दल कोणी तुला दोष देणार नाही."

ताराचं हे बोलणं ऐकून तिचे सान्त्वन करीत राम म्हणाला–"तू एक वीर पत्नि आहेस. अशी दुःखाने व्याकुळ होऊ नकोस. वाली जिवंत असताना तू जशी सुखी होतीस, तशीच आता ही सुखी राहशील! तुझा मुलगा अंगद युवराज बनेल."

मग राम वानरांना म्हणाला–"मित्रांनो, तुम्ही किती ही रडलात, तरी त्यामुळे मृत व्यक्तीचे काही कल्याण होणार नाही. उगाच व्यर्थ वेळ का दवडता? वालीला उत्तम गति प्राप्त व्हावी यासाठी आपले जे कर्तव्य आहे, ते आता आपण करू या!"

दुःख-सागरात बुडलेल्या सुग्रीवाला लक्ष्मण म्हणाला–"सुग्रीवा, वालीचा दहन-संस्कार केला पाहिजे. यासाठी आवश्यक ती वाळलेली लाकडे व चंदन जमा कर. अंगदाचे सान्त्वन कर नि मृत पित्याच्या चितेला अग्नी देण्यासाठी त्याला तयार कर.





इथून पुढे तुला किष्किन्धेचे राज्य चालवायचे आहे. असा रडत बसलास तर काम कसे चालेल? अंगदा करवी फुले, कापड, तूप, तेल, सुगंधी द्रव्ये इत्यादि साहित्य मागवून घे. एक पालखी पण लागेल. वालीचे मृत शरीर वाहून नेण्यासाठी सर्व वानर तयार राहू देत."

तार पालखी आणण्यासाठी तावडतोब किष्किंधेला गेला नि पालखी घेऊन आला. सुग्रीव आणि अंगद दोघांनी मिळून वालीचा मृत देह उचलला नि पालखीत ठेवला. सुग्रीवाने वालीच्या देहावर फुले वाहिली आणि प्रेत-यात्रेच्या वाटे वर वानरांनी फुले विखरत जावे अशी सूचना त्यांना दिली. मृत देहा बरोबर अंगद आणि तार इत्यादि नातेवाईक व स्त्रिया चालू लागल्या. एका नदीच्या किनाऱ्यावरील वाळवंटात चिता रचण्यात आली. नंतर दाह-कर्म पूर्ण करण्यात आले नि पाण्याचा अर्घ्य देण्यात आला. रामाने वानरांच्या मदतीने सर्व क्रिया-कर्म विधिवत् संपन्न केले.

सुग्रीवाने स्नान केले आणि ओल्या कपड्यानिशी राम व लक्ष्मणापाशी आला. सर्व वानर जवळच उभे राहिले. तेव्हा हनुमान रामाला म्हणाला–"हे राम, तुमच्या कृपेने सुग्रीवाला राज्य मिळाले. आता तुम्ही आज्ञा दिली की त्याला किष्किन्धेत जाऊन अनेक कामें केली पाहिजेत. विधिवत् राज्याभिषेक झाल्यावर तो राजा बनला म्हणजे तुमचा यथायोग्य सन्मान करील. म्हणून आमची तुम्हाला अशी विनंती आहे की तुम्ही आमच्या सह चलावे, सुग्रीवाचा राज्याभिषेक करावा नि आम्हा वानरांना संतुष्ट करावे."

यावर राम म्हणाला–"हे हनुमान, मी आपल्या पित्याच्या आज्ञेनुसार चौदा वर्षांचा वनवास भोगीत आहे, म्हणून मी एकाद्या नगरीत प्रवेश करणं मला इष्ट नाही. म्हणून तुम्हीच सर्वजण मिळून सुग्रीवाचा राज्याभिषेक करा आणि अंगदाला युवराज बनवा. श्रावण महिना सुरू होत





आहे. आता चार महिने पाऊस पडत राहील. म्हणून हे दिवस युद्ध करण्यासाठी योग्य नाहीत. तुम्ही सर्व जण किष्किंधेला जा. मी लक्ष्मणासह इथेच राहीन. ही गुंफा आम्हाला राहण्यासाठी फार छान आहे. जवळच पाणी आहे, कमल पुष्पे आहेत. कार्तिक महिना सुरू झाला म्हणजे आपण रावणाच्या वधाचा प्रयत्न करू या."

अशा प्रकारे रामाची आज्ञा मिळाल्यावर सुग्रीव किष्किंधेला आला. सर्व वानर त्याच्या सह नगरीत पोचले. अनेक वानर प्रमुख सुग्रीवाच्या दर्शनासाठी आले. त्यांच्याशी सल्ला-मसलत करून ताराचे शांतवन करण्या-साठी सुग्रीव वालीच्या अंतःपुरात गेला.

सुग्रीव वालीच्या अंतःपुरातून परत येईपर्यंत वानरांनी राज्याभिषेकासाठी आवश्यक सर्व सामग्री जमवली. सोन्याचा कशीदा काढलेले छत, दोन चौऱ्या, अनेक प्रकारची रत्ने, निरनिराळी धान्ये, औषधि वनस्पति, फुले, चन्दन, अक्षदा, केशर, मध, तूप, दही इत्यादि सर्व वस्तु तयार ठेवल्या. व्याघ्रचर्मापासून बनविलेली पादत्राणे सुग्रीवासाठी आणण्यात आली.

ब्राह्मणांनी अग्नि प्रज्वलित करून अग्नि-पूजा केली व नंतर वेदोक्त विधि अनुसार सुग्रीवाचा राज्याभिषेक करण्यात आला. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, हनुमान, जांबवंत, नल इत्यादींनी सुवर्ण-कलशांतून पाणी आणलं आणि सुग्रीवाला अभिषेक केला.

रामाच्या आज्ञेनुसार सुग्रीवाने अंगदाचा युवराज म्हणून अभिषेक केला. वानरांनी याबद्दल सुग्रीवाची खूप प्रशंसा केली. सर्व वानरांनी एक उत्सवच साजरा केला.

एवढे झाल्यावर सुग्रीव रामाला भेटला नि सर्व समाचार कथन केला. शेवटी तो रामाला म्हणाला–"मित्रा, राज्यकार-भाराचे काम नीट चालू करून देऊन मी तुझ्या कामासाठी निघेन. हे पावसाळ्याचे दिवस संपून जाऊ देत. नंतर लगेच मी सीतेच्या शोधार्थ बाहेर पडीन." नंतर तो राजधानीत परत आला आणि आपली पत्नी रूमा हिच्या सह आनंदाने राहू लागला.

राम-लक्ष्मण पावसाळ्यात जिथे राहणार होते, ते स्थान प्रस्रवण पर्वतावर होते. हा प्रदेश फार रमणीय होता. जवळच कमल-पुष्पांनी भरलेलं एक सरोवर होतं. त्यांच्या गुंफेचं प्रवेश-द्वार नैऋत्य दिशेला होतं, त्यामुळे पावसाचे तुषार आत येत नसत. पूर्वेकडून येणारे थंड वारे आत प्रवेश करू शकत नसत. समोरच एक सुंदर मैदान होतं. जवळून एक नदी वहात होती. किष्किंधा येथून जवळच होती, त्यामुळे राजधानीतील उत्सव व अन्य समारंभांच्या मंगल वाद्यांचे सूर गुंफेत स्पष्ट ऐकू येत.

अशा सुंदर ठिकाणी रहात असताना एकीकडे राम सीतेच्या विरहाने दुःखी असे तर दुसरी कडे त्याला अशी आशा होती की रावणाचा वध करण्याच्या कामी सुग्रीव आपल्याला खूप उपयोगी पडेल. राम शरद् ऋतूची वाट पाहू लागला. हळू हळू पावसाळ्याचे दिवस एक-एक करीत एकदाचे संपले.

आता पाऊस थांबला. हनुमानाला वाटलं सुग्रीव रामाचं काम पूर्णपणे विसरून गेला आहे. सुग्रीवाने राज्यकारभाराची सारी कामे आपल्या मंत्र्यांना वाटून दिली



आणि स्वतः मात्र अंतःपुरात भोग-विला-सात मग्न होऊन राहिला.

हनुमान हे सर्व पहात होता. म्हणून सुग्रीवाकडे जाऊन तो म्हणाला–"तुला राज्य मिळालं, राजवैभव मिळालं! आता मित्रधर्म विसरू नकोस. ती जबाबदारी तुला पार पाडली पाहिजे. आपली काही कामे राहिली तरी हरकत नाही, मित्राचं काम अवश्य झालं पाहिजे. रामाच्या सीतेला शोधून काढण्याचं काम आपल्याला केलंच पाहिजे. खरं म्हणजे आता पर्यंत हे काम सुरू होऊन जायला हवं होतं. राम चांगला माणूस आहे, म्हणून सर्व काही सहन करीत राहिला. सीतेचा शोध करण्या-

साठी आता काही लोकांना पाठवणं आवश्यक आहे."

सुग्रीवाला हनुमानाचं म्हणणं पटलं. त्याने नीलला बोलवलं नि सर्व वानर सैनिकांना एकत्र करण्याची आज्ञा दिली. त्याने असे ही जाहिर केले की पंधरा दिवसांच्या आत जे वानर किष्किंधेला पोचणार नाहीत, त्यांना मृत्यु-दंडाची शिक्षा दिली जाईल.

याच काळात पावसाळा संपला तरी सुग्रीव न आल्याबद्दल रामाला वाईट वाटू लागले. तो लक्ष्मणाला म्हणाला– "शरद् ऋतु सुरू होताच सीतेला शोधून काढायचं वचन सुग्रीवाने आपल्याला दिलेलं होतं. पण आपलं काम झाल्यावर आता तो ते सगळं विसरलेला दिसतोय! माझ्या बाणाने तर तो घायाळ होऊ इच्छित नाही? तू त्याच्याकडे जा नि त्याला सांग की मी रागावलो आहे. वालीच्या वाटेने मी त्याला ही पाठवू शकतो म्हणावं. मला वाटलं तर मी त्याचा ही वध करू शकतो. तू हे सगळं सुग्रीवाला जाऊन सांग. होय, पण तुला जसं योग्य वाटेल तसंच सांग."

लक्ष्मणाला ही सुग्रीवाचा राग आला. "या सुग्रीवाला राज्य कसं मिळालं हे विसरला वाटतं तो! या राज्यापासून आता त्याला सुख मिळणार नाही. मी आता जाऊन सुग्रीवाचा वध करतो. अंगदाच्या मदतीने मी सीतेचा शोध करीन." असं म्हणून लक्ष्मण रागाने निघाला. त्याला थांबवीत राम म्हणाला– "लक्ष्मण, असं नको करूस. सुग्रीवाची व आपली मैत्री विसरू नकोस. शांतपणे सुग्रीवाशी बोल. त्याने विलंब जरूर केला आहे. पण आपल्यावर अत्याचार तर काही केलेला नाही! कदाचित राज्यकारभाराच्या कामात फार गुंतून पडला असेल. किंवा त्याची अन्य काही अडचण असण्याची शक्यता आहे. ती समजून घे. तू त्याला भेटलास की लगेच तो मित्र-कार्यासाठी निघेल असं मला वाटतं!"





# कामेशाचा राग

कामेशचा स्वभाव चिडका होता. बारीक सारीक गोष्टींवरूनही तो अस्वस्थ होई, रागावे. नुकतेच त्याचे लग्न झाले होते. त्याची बायको शान्ति अगदी पहिल्याने जेव्हा सासरी आली, तेव्हा सर्वांनी तिला सुचवले की, घरात प्रवेश करताना प्रथम उजवा पाय आत ठेव. पण चुकून, नीट लक्षात न आल्याने तिने प्रथम डावा पाय पुढे केला.

ते पहाताच कामेश रागावला व नूतन वधूचा हात धरून तिला मागे खेचत तो ओरडला–"इतके लोक सांगताहेत, ऐकू येत नाही? प्रथम उजवा पाय आत ठेव."

त्याच क्षणी शांतीने ओळखले की आपला नवरा चांगलाच रागीट आहे. नंतर घरातल्या सर्व लोट्यांना आणि ताटे-वाट्यांना पोचे आलेले तिला दिसले, तेव्हा तावडतोब हा आपल्याच नवरोजींचा प्रताप आहे हे तिच्या लक्षात आले.

एके दिवशी भितींवरील डाग न्याहाळून पहात असताना शांतीची सासू तिला म्हणाली–"मुली, घरात जेव्हा जेव्हा भाजी-आमटी बरोबर झाली नाही, तेव्हां तेव्हां तुझ्या नवऱ्याने ताटं-वाट्या भिरकावून दिल्या आहेत. त्यावेळी पडलेले डाग बरं!"

ते ऐकून सहा वर्षांची तिची नणंद जोरजोरात टाळ्या पिटून हसली.

परन्तु शांतीला मुळीच हसू आले नाही. आपल्या नवऱ्याला इतका राग का येतो हेच तिला कळेना. एकदा एकान्तात तिने त्याला याबद्दल विचारलेही. पण नुसतंच हसून त्याने उत्तर देणे टाळले.

शांति चांगलीच हुशार होती. आपल्या नवऱ्याचा स्वभाव सुधारण्यासाठी काही उपाय शोधून काढायचे तिने ठरवले. आपला नवरा आपल्याला अजून भोळी-भाबडी, बावळट समजतो आहे, तेव्हा त्याची ही

सिंधु देशपांडे

समजूत तशीच काही दिवस कायम ठेवावी असे तिला वाटले.

राग आला की कामेश एकदम कडकपणे काहीही बोलत असे. त्याच्या शब्दांचाच आधार घेऊन त्याचा राग घालवावा असा तिने निश्चय केला.

एके दिवशी रागाने चेहरा लाल करूनच कामेश बाहेरून कुठूनसा घरी आला. आपला राग शान्तीवर काढत तो तिच्यावर ओरडला–"भरकन चार शित घालून ताट आण माझं. खाऊन लवकर जाऊन खपायचय मला तिथं!"

चेहऱ्यावरचा भोळा भाव कायम ठेवत, खरोखरीच मोजून भाताची चार शितं ताटात घालून घेऊन शांतिने ते त्याच्यापुढे ठेवले व आपण दुसरेच काम करत असल्याचा आव आणला. त्याच्याकडे न बघताच ती बोलू लागली–"मला मोठ आश्चर्य वाटतंय. हे तर सर्व एकाद्या गोष्टीतल्यासारखंच वाटतंय मला! नाहीतर फक्त चारच शितं खाऊन माणसाचं पोट कसं भरेल म्हणते मी!"

आतापर्यंत खरं तर कामेशचा राग चांगलाच भडकला होता. त्याला वाटले होते की आपल्या बायकोने मुद्दामच असे केले आहे. पण तिचे हे बोलणे ऐकून त्याला वाटल की, शान्ती खरोखरच अगदी भोळी आहे! ती भोळी-भाबडी आहे, हे त्याला माहीत होते, पण ती इतकी बावळट असेल असे नव्हते वाटले त्याला! या



विचाराने त्याचा रागाचा पारा झरंकन् खाली उतरला!

अशाच प्रकारच्या आणखीही तीन-चार घटना घडल्या–एकदा असाच कामेश घुस्स्यात होता! स्वयंपाकघरात असलेल्या आपल्या बायकोला हाका मारून तो म्हणाला–"पिशवी आणून फेक माझ्या तोंडावर, बाजारातून भाजी वगैरे आणून मरतो एकदाचा!"

शान्तीने पिशवी आणून नवऱ्याने सांगितल्याप्रमाणे खरोखरच त्याच्या तोंडावर फेकली! तिने असे का केले याबद्दल कामेश ओरडताच ती मक्खपणे म्हणाली–"मला काय माहीत? मला वाटलं की बाजारात जाताना नवऱ्याच्या तोंडावर पिशवी फेकायची या घरची रीतच असावी. त्यामुळे काही शुभ होत असावं!"

यावर काय बोलावे, हेच कामेशला सुचेना!

असेच एकदा घरचे सर्व लोक शेजारच्या गावी लग्नाला गेले होते. घरात केवळ शान्ति अन् कामेशच काय ते होते. पडवीत ठेवलेला तांदुळाच्या धुवणीच्या पाण्याचा घडा भरून गेला होता. दूर झाडाखाली त्यासाठीच ठेवलेल्या मोठ्या कुंडीत ओतण्यासाठी घडा उचलून शान्ति बाहेर आली. पण रात्री आधीचे पाणी गाय प्यायली नव्हती, म्हणून कुंडीही भरलेली तशीच होती. आता हे धुवणीचे, पेजेचे पाणी खाली कसे ओतून द्यायचे?



जवळच निंबाच्या झाडाखाली कामेश योगासने करत होता. त्याला हे सर्व सांगून आता त्या पाण्याचे काय करावे याबद्दल शान्तीने विचारले. कामेशने चिडून तिच्याकडे पाहिले अन् रागाने ओरडून–"ओत माझ्या टाळक्यावर!" असे म्हणून पुन्हां डोळे मिटून पद्मासन घालून बसला.

कामेशच्या तोंडून हे शब्द बाहेर पडायचाच अवकाश, कि तो धुवणीच्या पाण्याच्या घडा शान्तीने त्याच्या डोक्यावर उपडा केला! कामेशने एकदम घाबरून डोळे उघडले अन् रागाने शान्तीच्या गालावर एक चपराक मारली. शान्ती आश्चर्याने त्याच्याकडे पहातच राहिली!

रागाने लाल होत कामेशने तिला विचारले–"आता या वयात काय मी तुला रीत-भात शिकवायला हवी? काय केलंस तू?"

डोळ्यात पाणी आणून शान्ति म्हणाली–"तुम्हीच तर मला ते डोक्यावर ओतायला सांगितलंत नं? मला आपलं वाटलं की हे तांदूळ-धुवणीचं पाणी असं डोक्यावर ओतलं, तर तब्येतीला चांगलं असतं!"

तिचं हे बोलणं ऐकून आपल्याच कपाळावर हात मारून कामेश गप्प बसला. आतून पंचा आणून त्याचं डोकं व अंग पुसत शान्ती म्हणाली–"माझं काही चुकलं असलं तर क्षमा करा हं मला!"

बायकोच्या या भोळेपणामुळे आता कामेशला तिच्याबद्दल सहानुभूति वाटली अन् यापूर्वी अशा प्रकारच्या घडलेल्या घटनांचीही त्याला आठवण झाली. यानंतर आपल्या स्वभावानुरूप राग येऊन काही अपशब्द तोंडून काढण्यापूर्वीच तो स्वत:ला आवरून शान्त होण्याचा प्रयत्न करू लागला.

ही गोष्ट शान्तीच्याही लक्षात आली. तीही नन्तर नवऱ्याच्या अपेक्षेप्रमाणे वागू लागली, त्याला कधी दु:ख होईल असे ती वागली नाही. हळूहळू कामेशचा रागही आपोआपच शान्त होऊन त्याच्यात एक सौम्यपणा आला.





# सोन्याचा उन्दीर

प्रतिष्ठान देशात आदर्शनगर नावाचे एक शहर होते. त्या शहरात एक वैश्य विधवा रहात असे. तिचा पति वारला, त्यावेळी तिच्या भाऊबन्दांनी त्याची सर्व संपत्ति हडपली. ती त्यावेळी गर्भवती होती. तिला नन्तर एक मुलगा झाला. खूप हाल-अपेष्टा सहन करून तिने आपल्या मुलाला वाढवले. तो मोठा झाला, तेव्हा ती आपल्या मुलाला जवळ बोलावून म्हणाली–

"बाळा, तू तर वैश्यपुत्र आहेस. याच शहरात धनगुप्त नावाचा एक करोडपति रहातो. गरीब वणिक्पुत्रांना तो मदत करतो. तूही त्याला भेट अन् व्यापारासाठी आवश्यक इतके भांडवल त्याच्याकडून मिळव."

आईच्या सल्ल्यानुसार तो वैश्य पुत्र करोडपति धनगुप्ताला भेटण्यासाठी निघाला. तो जेव्हा धनगुप्तकडे पोचला, तेव्हा तो एका तरुणाला रागावून म्हणत होता–

"तुझ्यात थोडीही व्यापारदक्षता दिसून येत नाही. कितीतरी वेळा मी तुला आर्थिक मदत केली, पण तू एकदाही फायदा करून घेऊ शकला नाहीस. कोणी खरा बुद्धिमान असेल, तर तो तिथे पडलेल्या मेलेल्या उंदराचाही भांडवल म्हणून उपयोग करून लाखो रुपये मिळवू शकेल."

हे ऐकून वणिक पुत्राने मनात काही विचार केला आणि धनगुप्तकडे व्यापारासाठी पैसे न मागता, तिथे पडलेला मेलेला उंदीरच उचलून घेऊन निघून आला. एका ठिकाणी वाण्याच्या दुकानात रहाणाऱ्या पाळीव मांजराला त्याने तो उंदीर खायला दिला. यावर खूष होऊन वाण्याने वणिक् पुत्राला दोन ओंजळी हरभरे दिले. त्याने ते तळून, तिखट मीठ लावून त्याचे छान स्वादिष्ट मसालेदार चणे बनवले अन् थंड पाण्याचा एक घडा व ते चणे घेऊन तो

गावाच्या बाहेर रस्त्याच्या कडेला एका झाडाखाली बसला.

बाहेर कडकडीत ऊन पडलेले होते. जंगलात लाकडे तोडून येणारे लाकूडतोडे रोज या छायादार झाडाखाली विश्रान्तीसाठी बसत असत. त्यांना हा वणिक पुत्र थोडे मसालेदार चणे देऊन वर थंडगार पाणी देऊ लागला. तेव्हा खूष होऊन ते याला दोन लाकडे बक्षीस देऊन आपापल्या वाटेने जाऊ लागले.

अशा प्रकारे मिळालेली मोळी घेऊन वणिक पुत्र शहरात आला. ती लाकडे विकून त्याने हरभरे खरीदले. या काळात मिळालेली लाकडे विकून त्याने बऱ्यापैकी पैसे जमवले. आता चणे विकायचे सोडून त्याने लाकडेच खरेदी करून जमवून ठेवली. इतक्यात पावसाळा सुरू झाला आणि लाकडांचा भाव वाढला. आपल्या जवळची सारी लाकडे त्याने चढ्या भावाने विकून एक छोटेसे वाणसामानाचे दुकान घातले.

या व्यापारात त्या वणिक् पुत्राला चांगला लाभ होऊ लागला. अशा तऱ्हेने फारच थोड्या दिवसात या वणिक पुत्राने एक मोठा व्यापारी म्हणून नाव कमावले. अनेक घरे व शेत-जमिनी खरेदी करून तो आपली संपत्ति वाढवीत राहिला आणि एक दिवस तो खरोखरीच लखपति बनला! त्याने आपला व्यापार उंदराच्या भांडवलापासून सुरू केला होता, म्हणून लोक त्याला 'मूषकशेट' म्हणत असत.

मूषकशेटने एक दिवस एक सुंदरसा सोन्याचा उंदीर बनवून घेतला, अन् तो घेऊन धनगुप्तला देत तो म्हणाला—"महाराज, हे आपण मला दिलेलं भांडवल आहे. व्याजासकट आपलं भांडवल मी परत द्यायला आलो आहे, कृपया स्वीकार करावा."

त्याची बुद्धिमत्ता व सद्व्यवहार यामुळे धनगुप्तला फार संतोष वाटला. आपल्या एकुलत्या एका मुलीचा विवाह त्याने या तरुणाशी लावून दिला व तो सोन्याचा उंदीर जावयालाच बक्षीस दिला.





# चिनी वस्त्र

खूप जुनी गोष्ट, तीन हजार वर्षांपूर्वीची.

चीनच्या राजाने एका सुन्दरशा मुलीशी विवाह केला. त्या सुन्दरीचे नाव होते सीलिंगशी. बिचारी चौदाच वर्षांची होती. तसे पहिले तर राजाची पट्टराणी ती. तिला काय कमी असणार?

पण असे असूनही सीलिंगशी उदास असे! तिच्या डोळ्यातून नेहमी अश्रू वहात असत. लहान वयात आईबापांचा विरह घडला होता तिला. आपले आई-वडील, भावंडे आणि अन् नातेवाईकांपासून दूर रहाणे जड जात होते. त्यांच्या आठवणीत हरवल्यासारखी राहून ती उदास व खिन्न दिसे.

पट्टराणीच्या उदासीबद्दल राजाला समजले आणि तो तिला भेटण्यासाठी उद्यानात निघून आला. तेथे तुतीच्या एका झाडाखाली बसलेल्या राणीजवळ जाऊन तो म्हणाला—"काय झालं प्रिये तुला? बरं वाटत नाही का?"

"असं काही नाही स्वामी! उगीचच माझं मन अप्रसन्न आहे!" सीलिंगशी उत्तरली.

राजाने ताबडतोब मन्त्र्यांना बोलावून आज्ञा दिली, "हे पहा, महाराणीचं मन उदास आहे. तिला हर्ष व उल्हास वाटण्यासाठी ताबडतोब काही उपाय करा."

इतक्यात दासींनी चहाची किटली आणून महाराणीसमोर ठेवली. आपल्या सवयीप्रमाणे चहाचे कप भरून तिने प्रथम ते नर्तक व गवयांना दिले आणि एक कप स्वत: पुढे ठेवला.

त्याच वेळी तुतीच्या झाडावरून काही तरी टपकन अगदीबरोबर राणीच्याच कपात पडले आणि चहाचे शिंतोडे राणीच्या कपड्यांवर उडाले. दासी ताबडतोब राणीकडे धावल्या.

चीनची एक लोक कथा



"अगोदर चहाच्या कपात काय पडलंय ते तर पहा!" महाराणी म्हणाली.

दासींनी चहाच्या कपातून सुताच्या लडीसारखी वस्तु उचलून राणीच्या हाती दिली. ती वस्तु म्हणजे दुसरे काही नसून रेशमाच्या किड्याचा कोष होता!

तो कोष हाती घेताना एक गोष्ट सीलिंगशीच्या लक्षात आली की कोष उघडला गेला होता अन् त्यातून उत्तम असे मजबूत व चमकदार तंतू बाहेर पडत होते!

"वा, वा! किती आकर्षक तंतू हे! हेच जर धागे असते तर यांच्यापासून किती सुंदर अन् चमकदार वस्त्र बनू शकले असते!" तिच्या मनात आले. दुसऱ्याच क्षणी आणखी एक विचार तिच्या मनात आला. हे बारीक आहेत, पण ते चांगलेच मजबूत व दर्जेदार आहेत, लवकर तुटायचे नाहीत. या तंतूना नीट पीळ घालून याचा चांगला मजबूत धागा तयार होईल आणि मागावर याचे सुंदर व उत्तम असे कापड विणता येईल!

हा विचार मनात आल्याबरोबर तिचे डोळे आनन्दाने चमकू लागले. तिची खिन्नता कुठल्याकुठे पळून गेली. तिने ताबडतोब आपल्या हातातल्या कोषातल्या तंतूपासून धागा बनवायची आज्ञा दिली. दासी तावडतोब धागा बनवून त्याच्या लडी तयार करायच्या उद्योगाला लागल्या.

"यातून असा कितीसा धागा मिळेल? कपडा बनवण्यासाठी पुरेसा धागा मिळणे आवश्यक आहे, तेव्हा तुम्ही असं करा. झाडावर जितके सापडतील तितके सारे कोष काढून आणा आणि चहात टाका!" सीलिंगशी राणीने आज्ञा दिली.

आता कुणालाच फुरसत नव्हती. महाराणी रिकामी नव्हती अन् दासीही नव्हत्या! यापूर्वी राणीचा एकेक क्षण एकेका युगासारखा जात होता, आता एक एक तास तिला एकेका सेंकदासारखा वाटू लागला! सूर्यास्तापूर्वी धाग्याच्या अनेक लडी तयार होऊन पडल्या! महाराणीने सुतारकाम



करणाऱ्या कारागिरांना बोलावून घेतले आणि त्यांना आज्ञा दिली—"हा धागा पहा. आता किती बारीक व पातळ आहे हा! याचा कपडा विणण्यासाठी मला लवकरात लवकर एक खास असा माग बनवून द्या. सकाळच्या आत माग तयार होऊन माझ्या महालात हजर करा."

दुसऱ्या दिवशी महाराजांनी मन्त्र्यांना विचारले—"महाराणीला आनन्द व्हावा म्हणून काय उपाय शोधून काढला आहात?"

"आम्ही एक उपाय शोधलाय प्रभु! एक सुंदरसा मोर मागवून घेऊन महाराणीच्या उद्यानात सोडा. त्याचा नाच व सौन्दर्य पाहून राणीसाहेब खूष होतील." दोन मन्त्री हळूच म्हणाले.

राजाने ओळखले की आपल्या या दोन्ही मन्त्र्यांनी योग्य उपाय शोधलेला नाही. त्याने मन्त्र्यांना आज्ञा दिली की त्यांनी महाराणीला आपणाकडे पाठवावे.

"प्रभु, महाराणी तर अजून आपल्या महालातून बाहेर आलेल्या नाहीत." दासी म्हणाल्या.

"का बरं अजून आली नसेल ती!" राजाच्या मनात आले. आपल्या लाडक्या राणीबद्दल त्याला चिन्ता वाटली. त्यामुळे सिंहासनावरून उतरून तो सरळ राणीच्या महालाकडे चालू लागला. महालात पाऊल



ठेवताच त्याला जे काही दिसले, त्यामुळे त्याला मोठे आश्चर्य व आनन्द वाटला.

आता महाराणी उदास व खिन्न नव्हती. एका विशेष अशा हात मागासमोर बसून ती कधी कोणी पहिलेही नसतील अशा चमचमत्या धाग्यांनी एक चमकदार वस्त्र विणत होती!

राणीने मस्तक उचलून राजाकडे पाहिले. तिच्या डोळ्यात अपूर्व असा आनन्द दिसत होता अन् चेहरा हसरा होता!

"स्वामी! मी आपल्या खिन्नतेमुळे आपल्याला दुःख दिलं आहे. क्षमा करावी मला! त्या बदल्यात आपल्याला हे अद्भुत वस्त्र विणून द्यायची इच्छा आहे माझी!

आपला राग तर नाही ना माझ्यावर?" सीलिंगशीने विचारले.

"राग? कशाबद्दल बुवा? इतकं अद्भुत आणि अपूर्व असं वस्त्र तुझ्या सुंदर हातातून बक्षीस म्हणून घेताना मला राग का बरं यावा?" हसतच महाराजांनी विचारले.

आता आपल्याला हे विणायची प्रेरणा कशी मिळाली याबद्दलची सर्व हकिकत सीलिंगशीने राजाला सांगितली.

"आपल्यासारख्याची पत्नी व देशाची महाराणी असूनही मी स्वतः आपल्या हाताने काम करते, हे पाहून लोकांना बरं वाटणार नाही या विचारानेच मी हे सर्व गुप्त ठेवले." महाराणी म्हणाली.

"याबद्दल मला जराही दुःख नाही प्रिये! तुझ्या मनाला आनन्द मिळावा म्हणून मी आपलं अर्धं राज्यही वेळ आल्यास देऊन टाकीन. तुझं दुःख दूर झालं, याचाच मला आनन्द वाटतोय." राजा बोलला.

"स्वामी, मग माझी एक इच्छा आहे, पुरी कराल?" राणीने विचारले.

"हां, हां! जरूर पुरी करीन. मागून तर पहा." राजा आनन्दून म्हणाला.

"हजार तुतीची झाडं लावून एक बाग माझ्या हवाली करावा महाराजांनी." सीलिंगशीने आपली मागणी बोलून दाखवली अन् महाराजांनी ती तावडतोब पुरी केली.

दुनियेतलं पहिलं रेशमी वस्त्र विणण्याचं श्रेय सीलिंगशीला मिळालं. चिनी भाषेत आजही 'सी' या शब्दाचा अर्थ होतो रेशीम त्यानन्तरही एक संप्रदाय म्हणून चीनच्या सर्व राण्या वर्षातून एक दिवस स्वतःच्या हाताने रेशमाच्या किडयांना खाणे देत असतात.

हळूहळू रेशीम बनवण्याचे रहस्य चीन मधून अन्य देशातही फैलावले म्हणूनच आपले पूर्वज रेशमी कापडाला 'चिनी वस्त्र' असे म्हणत. आज इतर सर्व देशात रेशमी कपडा बनतो, पण चीनमधे बनणाऱ्या रेशमाचे आपले असे वैशिष्ठ्य असते.



## निसर्गातील आश्चर्यं :

पृथ्वीवरील एकूण जमिनीचा वरचा १०.४ टक्के भाग म्हणजेच जवळजवळ ६०,२०,००० वर्गमैल इतके क्षेत्र कायम हिमाच्छादित असते, असे मानले जाते. हा भाग हिमनदीच्या रूपात हळूहळू उताराकडे सरकत रहातो.




### सर्पहन्ता पक्षी



आफ्रिकेत आढळणारा 'सेक्रेटरी बर्ड' नावाचा पक्षी सांपाची शिकार करतो. पण ही शिकार तो हवेत करत नाही, तर जमिनीवरच तो सांपाना आपल्या पायांनी तुडवून मारतो.

### खोल सरोवर

जगातील सर्वांत खोल सरोवर म्हणजे रशियातील मध्य सैबेरियात असणारे 'लेक बेकल' हे होय. याची खोली ४,८७२ फूट म्हणजेच १,४८५ मीटर इतकी आहे.



# नोबेल शांति पारितोषिक

"शांति स्थापन करायची असेल तर युद्धासाठी तयार राहिलं पाहिजे." हा प्राचीन रोमन लोकांचा सिद्धान्त होता. खरं पाहिलं तर या सिद्धान्ताच्या आधारे कधी ही शांति स्थापित होणार नाही. युद्धाची तयारी केली तर युद्धच होण्याची शक्यता आहे. जर एकादा देश युद्धासाठी तयार असला, तर शेजार-पाजारच्या देशात संदेहाचे वातावरण निर्माण होते. म्हणून ते संभाव्य धोका टाळण्यासाठी युद्धाची तयारी करू लागतात. जेव्हा दोन देश युद्धासाठी सुसज्ज होतात, तेव्हा लढाई सुरू व्हायला कोणती ही सामान्य घटना वा यत्किंचित गैरसमज पुरेसा होतो ! बरोबर आहे ना ?

रोमन लोकांच्या त्या काळापासून आज-पर्यंत अशीच स्थिति चालत आलेली आहे. भाषणे देणाऱ्या पुढाऱ्यांच्या अंत:करणाची शुद्धता मात्र शंकास्पदच असते. दुसऱ्या देशांना भयानक अस्त्रांचा पुरवठा करून ते आपल्या देशाची समृद्धि वाढवतात. मनात युद्धाचा उद्देश बाळगून बाहेर शांतीचा उपदेश करणे–हा आजकालच्या राजकीय पुढाऱ्यांचा स्वभाव बनला आहे.

जर मनात शांति नसेल, तर बाहेरच्या जगात तिचा शोध घेणे व्यर्थ आहे. पुढाऱ्यांच्या मनात शांति असेल, तर त्यांची व्याख्याने अधिक प्रभावी ठरतील. तरच काही प्रयोजन सिद्ध होऊ शकेल.





सोविएट रशियाचे नेते श्री. माइकेल गुर्बाचेव या दिशेने प्रयत्न करीत आहेत. ते केवळ शांतिप्रिय आहेत असे नव्हे, तर ते शांति-योद्धा ही आहेत. त्यांच्या आधीच्या साम्यवादी सुलतानशाहीने सोविएट जनता नि पोलंड सारख्या आपल्या ताब्यातील देशांच्या जनतेवर अनन्वित अत्याय केला. या राजवटीने पश्चिमी देश, विशेषतः अमेरिकेशी शस्त्रास्त्र-स्पर्धा केली नि अनेक भयानक अस्त्रांच्या निर्मितीला उत्तेजन दिले. या सर्व परिस्थितीचा गुर्बाचेव यांनी प्रकटपणे विरोध केला, व्यक्ति आणि देश यांच्यां स्वातंत्र्याला त्यांनी मानाचे स्थान दिले. त्यांनी समर्थपणे विचार मांडला की आपण एकमेकांचे गळे कापायला तयार न होता, आपापसांतील सद्भाव व एकता यांना उत्तेजन दिले पाहिजे.

श्री गुर्बाचेव यांना नोबेल शांति पारितोषिक देण्यात आले ही खरोखरीच एक अभूतपूर्व घटना होय. योग्य व्यक्तीला हे पारितोषिक दिल्याबद्दल सर्वांनाच फार समाधान वाटले. या महान् शांतिप्रिय नेत्याचा आशय आपण सर्वांनी नीट जाणला पाहिजे. आपण असे केले तरच विश्व-शांतीचे आपले स्वप्न साकार होईल.



# वराची निवड

चन्दन देशचा राजा विक्रम याला मुलगा नव्हता. केवळ एक मुलगीच काय ती होती. तिचे नाव होते श्रीलेखा. एकुलती एक असल्यामुळे तिचे खूप लाड केले गेले. वयात आली तेव्हा ती अत्यन्त सुंदर व असामान्य विदुषी म्हणून नावारूपास आली. आपल्या मुलीमुळे राजाचे मन नेहमी प्रसन्न असे. तिच्याबद्दलच्या अभिमानाने त्याची छाती नेहमीच फुगलेली असे.

आता राजाच्या मनात श्रीलेखेच्या विवाहाबद्दल चिन्ता उद्भवली! योग्य अशा मुलाची निवड केली पाहिजे. शेवटी आपला जावई बनून येणारा मुलगाच तर सिंहासनाचाही वारस बनणार! अशा विचारांनी राजा विक्रम बेचैन झाला.

एक दिवस राजा विक्रमवर्माच्या दरबारात एक पंडित आला. आपला परिचय करून देताना तो म्हणाला—

"राजा, माझं नाव आहे केशवभट्ट! मी मध्यदेशच्या काशी आणि तक्षशिला—विद्यापीठांमधल्या सर्वांच्या सर्व पंडितांशी शास्त्रार्थ करून त्यांचा पराजय केला आहे. इथेही शास्त्रार्थ करायची माझी इच्छा आहे. मी तीन प्रश्न विचारीन. कोणी उत्तरं देऊ शकलं तर मी त्याला वाकून नमस्कार करीन, आपल्या सर्व पदव्या त्याला बहाल करून, हा हातातला तोडाही देऊन टाकून इथून चालता होईन. पण याउलट तुझा कोणीही देशवासी उत्तरं देऊ शकला नाही, तर मात्र माझी अट ऐकून ठेव—तुझ्या सर्व दरबारी पंडितांनी मला पालखीत बसवून, स्वतःच्या खांद्यावरून मला मिरवून आणायचं, अन् मग तू माझा सन्मान करायचास!"

"पंडितमहाराज, आपल्या अटी आम्हाला कबूल आहेत! आता आपले तीन प्रश्न सांगा. माझे नागरिक तीन

सौ. माधुरी कोकमठाणकर



दिवसातच त्यांची उत्तरं सांगतील." राजा विक्रमवर्मा गंभीर स्वरात बोलला.

केशवभट्ट आपले प्रश्न उच्चारू लागला– "पहिला प्रश्न–एक असं सत्य सांगायचं की, ते सत्य खरं मानायला कोणी 'नाही' म्हणणार नाही, पण ते सत्य असं असेल की जे अगदी निखालस 'खोटं' असेल! दुसरा प्रश्न–ऐकू येत नाही असा आवाज आणि दिसू शकत नाही असं दृश्य कोणतं? आणि शेवटचा तिसरा प्रश्न–अगदी रंकापासून रावापर्यंत सर्वजण जिभेच्या आहारी जातात अशी गोष्ट कोणती?"

केशवभट्टचे हे प्रश्न ऐकून विक्रमवर्माच्या दरबारी पंडितांचे चेहरे पांढरे फटक पडले! त्यांचे पडलेले चेहरे पाहून केशवभट्ट मनातल्या मनात खूश झाला. त्याची खात्री झाली, की इथेही कोणी आपल्याला उत्तरं देऊ शकणार नाही, आणि विजयश्री आपल्यालाच मिळणार! मोठ्या आनंदाने तो तेथून निघून गेला.

दरबारी पंडित केशवभट्टाच्या प्रश्नांची उत्तरे शोधून काढण्यासाठी डोकी लढवू लागले. आपापसात वादविवाद करू लागले. आपापल्या पद्धतीने ते त्या प्रश्नांची उत्तरे सांगू लागले. पण राजा विक्रमवर्माला कोणाचीच उत्तरे बरोबर वाटत नव्हती. तेव्हा तो म्हणाला–"केशवभट्ट अहंकारी असेल, पण तरीही तो मोठा बुद्धिमान् नक्कीच वाटतो. त्याच्या प्रश्नांची उत्तरं शोधायचं काम चालू ठेवा."

नंतर सभा समाप्त करून राजा विक्रमवर्मा अंतःपुरात आपल्या कन्येला भेटायला गेला.

अशा अवेळी चिन्तित मुद्रेने आलेल्या आपल्या पित्याला पाहून श्रीलेखा आश्चर्यचकित झाली. दरबारात घडलेल्या घटनेबद्दल तिला सांगून राजा म्हणाला– "मला तर पराजयाचीच चिन्हं दिसत आहेत बाळा! चांगल्या सुसंस्कृत माणसासमोर पराजय होणं प्रगतिकारकच असतं, पण असल्या अहंकारी माणसाकडून होणाऱ्या पराजयाचं दुःख मरणासमान वाटतं, आत्महत्त्याच करावीशी वाटते अशा वेळी! एकच आशाकिरण या परिस्थितीत मला दिसतो आहे, अन् तो म्हणजे तूच बेटी!"

श्रीलेखाने जरासा विचार केला आणि ती म्हणाली–"बाबा, मलाही काही सुचत नाही पहा!"

हे उत्तर ऐकून राजा अगदीच हताश झाला. सहजच त्याच्या तोंडून उद्गार निघाला–"आहे! आता काय होणार?"

पित्याच्या मनावरचा हा ताण पाहून जरासे हसून श्रीलेखा म्हणाली–"बाबा, तुम्ही काळजी करू नका. मला उत्तरं आली नाहीत म्हणून काय झालं! मी असं ऐकलंय की आपल्या मन्त्रीवरांचा पुत्र राजशेखर मोठा बुद्धिमान आहे! माझी खात्री आहे, की तो या प्रश्नांची उत्तरं नक्कीच देऊ शकेल."

हे ऐकून राजा विक्रमवर्माला फारच आश्चर्य वाटले. "ठीक आहे, पाहू या." असे म्हणून तो तेथून उठला आणि निघून गेला.

राजा तेथून सरळ महाराणी वैजयन्ती देवीकडे गेला आणि या गोष्टीचा उल्लेख करून म्हणाला–"देवी, मी श्रीलेखाला चांगलं ओळखतो. तिला खरोखरच उत्तरं माहीत नसतील तर आपल्या देशावर



आलेल्या आपत्तीमुळे तिला दुःख तर नक्कीच झालं असतं ना? पण तिच्या चेहऱ्यावर असा दृढविश्वास दिसून आला की राजशेखर मला नक्कीच योग्य उत्तरं देऊ शकेल. मला तर हे काहीच कळत नाहीये!"

यावर हसत राणी म्हणाली–"आपण हा प्रश्न मला का बरं विचारत आहात? असंच ना, कि एक स्त्री, दुसऱ्या स्त्रीचं मन बरोबर ओळखू शकते?"

आता विक्रमवर्मालाही हसू आले. तो म्हणाला–"अं, असंच काही नाही! पण फक्त आणखी थोडं जाणू इच्छितो मी!"

"इतकंच असेल तर ऐका, श्रीलेखाच्या मैत्रिणींकडून मला असं कळलंय की तिला



राजशेखर खूप आवडतो! अन् असंही कळलंय की राजशेखरचंही तिच्यावर खूप प्रेम आहे, श्रीलेखा आपणाजवळ असं काही बोलली असेल तर नक्कीच तिच्या मनात असावं की या उत्तरांद्वारे आपण राजशेखरची योग्यता स्वतःच पारखावी आणि तो तिच्यासाठी योग्य वर आहे की नाही याचा निर्णय घ्यावा." राणी वैजयन्ती म्हणाली.

"मग आता वाट कसली पहायची? ताबडतोब बोलावून घेऊ या त्याला!" राजा म्हणाला.

थोडयाच वेळात राजशेखर तेथे पोचला. त्याचे देखणे रूप व धारदार नासिका वगैरे पाहून राजा मनातल्या मनात खूप खूष झाला. तो मोठ्या प्रेमाने म्हणाला–"बस बेटा!" राजशेखर अदबीने समोर बसला.

आता राजाने राजशेखरला केशवभट्टचे प्रश्न सांगितले आणि म्हटले–"श्रीलेखाला खात्री वाटतेय की तू या प्रश्नांची उत्तरं देऊ शकशील?"

जरासे हसून राजशेखर बोलला–"महाराज, हा केशवभट्ट मोठा बुद्धिमान असला पाहिजे. त्याने या तीन प्रश्नात शास्त्र, कल्पना आणि वास्तविकता या तिन्हींचाही समावेश केलेला आहे. पहिला प्रश्न तर्कशास्त्राशी संबंधित आहे. त्याचं उत्तर आहे–'मला मरण येणार नाही.' लौकिक दृष्टचा हे विधान पूर्णतः खोटं आहे, कारण ज्याला मृत्यु नाही, असा या जगात कोणीच नाही. पण, तरीही तर्काच्या आधाराने हे एक असे सत्य आहे की कोणीही ते नाकारू शकणार नाही. कारण इथे 'मी' हा आत्म्याशी संबंधित आहे, पार्थिव विनश्वर देहाशी नव्हे. 'मला मरण येणार नाही'–याचा अर्थ 'माझा आत्मा मरणार नाही.' अशा तऱ्हेने हे एक असे सत्य आहे की जे कोणीही कबूल करायला कचरणार नाही. पण त्याच वेळी हे विधान अगदी पूर्णतः खोटंही आहे!"

राजशेखरच्या या स्पष्टीकरणावर राजा खूष झाला. तो म्हणाला–"होय, तुझं



म्हणणं बरोबर आहे. आता बाकीच्या प्रश्नांची उत्तरं सांग बेटा!"

"महाराज, ऐकू न येणारा आवाज म्हणजे आपल्या आत्म्याची हाक होय. ती मेंदूपर्यंत ध्वनितरंगांच्या आधाराने नव्हे, तर मनाच्या आधाराने पोचते. आणि ती केवळ तो अनुभव घेणारालाच ऐकू येते, इतरांना नाही. आता राहिलं दुसऱ्यांना न दिसणारं दृश्य म्हणजेच देखावा. तो देखावा म्हणजेच केवळ आपल्या विचारांच्या साह्याने प्रत्येकाच्या मनोपटलावर दिसणारं दृश्य! ते केवळ अंतश्चक्षूंनाच दिसू शकतं. हे झाले न ऐकू येणारा आवाज आणि न दिसणारं दृश्य! दुसऱ्या प्रश्नांचं हेच उत्तर होय." राजशेखर म्हणाला.

राजाने प्रसन्नतेने एक वार राणीकडे अर्थपूर्ण कटाक्ष टाकला.

"वा, वा! छानच सांगितलंस बेटा. एकदम उत्तम स्पष्टीकरण केलंस बघ!" राजशेखरकडे प्रशंसात्मक दृष्टीने पहात राजा बोलला.

"महाराज, आता तिसऱ्या प्रश्नाचं उत्तर ऐकावं. रंकापासून राजापर्यंत प्रत्येक जण कशाला शरण जात असेल तर प्रशंसेला! स्तुतीच्या अधीन होत नाही असा माणूस विरळाच!" मोठ्या आत्मविश्वासाने राजशेखर बोलला.



हे ऐकल्या वर राजा विक्रमवर्मा टाळ्या वाजवत म्हणाला–"शाब्बास राजशेखर, शाब्बास! तू तर खरोखरच लाजवाब उत्तरं दिलीस! आता मी तुझी आणखी एका बाबतीत परीक्षा घेणार आहे. मी आत्ता जे दृश्य पहात आहे, पण जे तुला दिसू शकत नाही असे दृश्य कोणते?"

हळूच हसत राजशेखर उत्तरला–"आपली चुकीची समजूत आहे महाराज! आपण जे दृश्य पहात आहात, ते तर मलाही दिसतंय!"

आश्चर्याने राजाने विचारले–"म्हणतोस काय? बरं, सांग पाहू ते दृश्य कोणते?"

जरासे संकोचत राजशेखर म्हणाला–"बास, आपली कन्या माझ्या गळयात वरमाला घालत आहे–हेच ते दृश्य !"

त्याच्या या उत्तरावर राणीला मनातल्या मनात हसूच आले. पण खोटाच राग दाखवत राजा म्हणाला. "केवल तीन प्रश्नांची उत्तरं बरोबर देता आली म्हणून स्वत:बद्दल इतका आत्मविश्वास बाळगतोस ? तुला असं कसं वाटलं, की इतक्याशा कारणावरून मी राजकन्येचा विवाह तुझ्याशी करून देईन ?"

राजाचा हा राग पाहून जराही विचलित न होता राजशेखर फक्त हसला अन् त्याने राजाला उत्तर दिले–"महाराज, आपल्या मनात जर तसा विचार नसता, तर मी उत्तरं दिली, तेंव्हा आपण माझी इतकी स्तुति केली नसतीत ! आपण फक्त इतकंच म्हणाला असतात की–हं, ठीक आहे ! त्या पंडिताला विचारून उत्तरं बरोबर आहेत की नाहीत हे विचारून घेईन. आपण आपलं राजकार्य सोडून देऊन माझ्या बुद्धीची आणखी एक परीक्षा घेऊ पाहिलीत, याचा दुसरा काय अर्थ होऊ शकतो ?"

हे त्याचे उत्तर ऐकून तर आनन्दाने एकदम उठून राजाने राजशेखरला मिठीतच घेतले, आणि तो म्हणाला–"बेटा, तुझा जराही विचलित न होणारा आत्मविश्वास खरोखरच फार प्रशंसनीय आहे. श्रीलेखासाठी खरोखर तूच योग्य वर आहेस. आपल्या दोघांना जे दृश्य दिसलं ते लवकरच आपण इतर सर्वांनाही दाखवू या !"

त्या दिवशी संध्याकाळच्या सभेत उत्तरे ऐकून केशवभट्टने आपला पराभव कबूल केला. इतकेच नव्हे, तर त्या पंडिताने राजशेखरला मस्तक वाकवून नमस्कार केला आणि आपल्या सर्व पदव्या त्याला बहाल केल्या. आपल्या पायातला तोडा काढूनही त्याने राजशेखरच्या पायात चढवला !

तोच मोठा शुभ मुहूर्त होता. सर्व दरबारी लोकांसमक्ष राजकुमारी श्रीलेखाने राजशेखरच्या गळयात वरमाला घातली.





# डाकू युवराज

**[ १२ ]**

[वीरसिंहच्या आज्ञेप्रमाणे सर्पदन्तने शंकरवर्माकडील सोन्याची मूर्ति जबरदस्तीने ताब्यात घेतली अन् ती घेऊन तो नदीच्या मार्गाने शान्तिपुरकडे निघाला. पण ऐन वेळी वाटेतच युवराज सन्दीपने ती मिळवली आणि पुन्हा शंकरवर्माकडे नेऊन दिली. सन्दीपला पाहून शंकरवर्माला फारच आनन्द वाटला. त्यानन्तर–]

सोन्याची मूर्ति आपल्याकडे आणत असतानाच वाटेत नावेतून गायब झाल्याची वार्ता ऐकून वीरसिंह जरा वेळ गप्प राहिला. नंतर अतीव रागाने मुठी आवळून अन् शिरा ताणून तो ओरडला–"जादू, टोणा, मन्त्र, तन्त्र ! याला घाबरून काय आपण गप्प रहायचं ? असंच असेल तर इतकं सारं सैन्य काय कामाचं ? हे सारे पथकप्रमुख काय कामाचे ?"

आपला धीर गोळा करत सर्पदन्त म्हणू लागला–"प्रभु ! आपल्याजवळ उत्तम सैन्यबळ आहे ही गोष्ट खरीच. पण आपण जरा विचार करा, की अशा अदृश्य शक्तींशी एकटी मामुली मानवी शक्ती कुठपर्यंत तोंड देऊ शकेल ? आपण स्वत: पाहिलंतच ना, कि त्या दिवशी जंगलातून आपल्या सैनिकांना तिथल्या जंगली जनावरांनी कसं पिटाळून लावलं ते ? या



जनावरांवर एकाद्या अदृश्य अद्भुत शक्तीचा प्रभाव नसता तर आपल्या चांगल्या सशस्त्र सैनिकांवर ती कशी चालून आली असती? कसं त्यांना पिटाळून लावू शकली असती!"
वीरसिंह यावर लगेच काही बोलू शकला नाही. परंतु आपले दौर्बल्य पहात तो पुन्हा कर्कश आवाजात ओरडला—"जे झालं, ते झालं! पण आता पुढे पाऊल कसं उचलायचं, ती मूर्ति सध्या कुठे आहे हे तर पहायला हवं ना? असा अपमान सहन करून गप्प कसं बसायचं आपण? अं? बोल की स्वत: काही तरी!"

अशा तऱ्हेने घसा खरवडून वीरसिंह ओरडत असतानाच दरबारचा प्रमुख गुप्त हेर तेथे आला अन् त्याने वीरसिंहला वाकून प्रणाम केला.

"काय खबर आणली आहेस?" वीरसिंहने त्याला विचारले.

"महाराज! आपल्या शिपायांच्या हातून गायब झालेली ती मूर्ति आता परत शंकरवर्मांच्याच राज्यात पोचली आहे. नवीन बनवलेल्या मन्दिरात उद्याच तिची प्रतिष्ठापना केली जाणार आहे." गुप्तहेराने बातमी दिली.

"खरी बातमी ही अगदी?" आश्चर्य अन् उत्साहाने वीरसिंहाने विचारले.

"हां महाराज! अगदी शंभर टक्के खरी!" गुप्त हेर उत्तरला.

वीरसिंह पुन्हा दुप्पट उत्साहाने उभा राहिला. त्याच्या आवाजात उत्साह अन् कर्कशता भरून राहिली होती. "हं! म्हणजे याचाच अर्थ असा, की ती मूर्ति चोरण्यासाठी शंकरवर्मानेच एकाद्या जादुगाराला नेमलेलं असणार! मी आता त्या दुष्टाला अस्सा धडा शिकवीन की त्याला जन्माचीच आठवण राहील. आमच्यासमोर एवढं धैर्य?"

"प्रभु! मी आत्ता जाऊन आणू का ती मूर्ति?" सर्पदन्तने मोठ्या उत्साहाने विचारले.



"तू? कशाला, पुन्हा त्या जादुगाराच्या हवाली करायला? आता मी तसं काहीही करणार नाही. मी स्वत:च जायचं ठरवलं आहे. माझ्याबरोबर अत्यन्त साहसी असे काही वीर असतील. आम्ही स्वत:च आता ती मूर्ति ताब्यात घेऊ. आता आम्हीच पाहू, आमच्यावर त्या जादूटोण्याचा कसा प्रभाव पडतो ते!" वीरसिंहने सर्पदन्तला खोडून काढत म्हटले.

* * *

इकडे जयपुरीच्या लोकांना अपरंपार आनन्द झालेला होता. युवराज सन्दीपने कनकदुर्गेची मूर्ति परत मिळवून दिली, ही गोष्ट राजा शंकरवर्माने गुप्तच ठेवली होती. त्यामुळे मूर्ति राज्यात परत आली, ही गोष्ट जनतेला आश्चर्यकारक वाटत होती. नवीन मन्दिरात मूर्तीची स्थापना करण्यासाठी सर्वजण मोठ्या उत्साहाने कामाला लागले होते.

युवराणी सुकन्या तर थोडा वेळही मूर्ती डोळ्याआड होऊ द्यायला तयार नव्हती. ती सारा वेळ मूर्तीजवळच बसून होती. तिला तशी बसलेली पाहून तेथे मोठ्या संख्येने आलेले लोक फारच खूष होत होते.

पंडितांनी मूर्तिस्थापनेसाठी निवडलेला मुहूर्त जवळ येऊन ठेपला होता. मंगलवाद्यांच्या गजरात पुजारी, शंकरवर्मा आणि



सुकन्या मोठ्या भक्तिभावाने ती मूर्ति मन्दिराकडे घेऊन निघाले.

अचानक एक कर्कश आवाज ऐकू आला—"थांबवा हा उत्सव-बित्सव सर्व काही!" वाद्यांच्या आणि बाकीच्या कोलाहलात सुरुवातीला सर्वांना काही तो आवाज ऐकू गेला नाही. पण अचानक तेथे उपस्थित झालेल्या घोडेस्वारांना पाहून सर्व वादक व जनता दगडी पुतळ्यासारखी जागच्या जागीच थबकली! अचानकच सर्वत्र एकदम शान्तता पसरली!

सर्वांत पुढे वीरसिंह आणि त्याच्यामागे सर्पदन्त व अंगरक्षक घोडेस्वार तेथे पोचले होते.



"शंकरवर्मा! युद्धाला तू बहुधा तयार नसशील? युद्धाची इच्छा असेल तर पहा, आम्ही तयारीनेच आलो आहोत." वीरसिंह बोलला.

"तुझ्याशीच काय, पण कुणाशीच युद्ध करायची शक्ति माझ्यात नाही, हे तू जाणतोसच! मला अन् माझ्या जनतेला सुखानें राहू दे!" शंकरवर्मा उत्तरला.

"मग तूच ती सुवर्णमूर्ति चुपचाप आमच्या हवाली कर, म्हणजे आम्हीही तुझ्या शांततेत बाधा आणणार नाही." वीरसिंहने सुचवले.

"हे तर अगदीच अशक्य!" सुकन्या दृढस्वरात बोलली.

वीरसिंहने आश्चर्याने सुकन्येकडे पाहिले. ती त्या मूर्तीला आपल्या कवेत घट्ट लपेटून बसलेली होती!

"ही कोण?" वीरसिंहने विचारले.

"ही माझी एकुलती एक कन्या सुकन्या! हिचं या कनकदुर्गेच्या मूर्तीवर निरतिशय प्रेम आहे!" शंकरवर्माने म्हटले.

"निरतिशय प्रेम?" घोडयावरून उडी मारून उतरून शंकरवर्माजवळ येत वीरसिंह बोलला–"असं असेल तर ऐक, या सुन्दर सुकन्येवर माझंही निरतिशय प्रेम बसलं आहे." आणि तो विकटपणें हसला.

"तुला काय म्हणायचंय?" शंकरवर्माने दचकून विचारले.

"मी सुवर्णमूर्तीचा नाद सोडून द्यायला तयार आहे." वीरसिंह म्हणाला.

"आनन्दाची गोष्ट आहे, धन्यवाद!" शंकरवर्मा बोलला.

"होय! पण याचं प्रतिफळ म्हणून तू तुझी ही कन्या मला द्यायचीस! हां, माझी हिच्याशी विवाह करायची इच्छा आहे. मी तिला सुमेधची पट्टराणी करीन." विकट हसत वीरसिंहने गरळ ओकले.

"वीरसिंह!" दात ओठ खात शंकरवर्मा गरजला.

"तू माझा सामन्त आहेस! सम्राट असल्यामुळे तू मला आदराने संबोधलंस



तर बरं होईल." वीरसिंहने चेतावणी दिली.

"वीरसिंह! दुर्जनता अन् दुष्टतेच्याही काही सीमा असतात!" शंकरवर्मा म्हणाला.

"दुर्जनता अन् दुष्टता? एक सम्राट एका सामन्ताच्या मुलीशी विवाह करू म्हणतो आहे. याला दुष्टता म्हणायची? शंकरवर्मा तू जिला आपला प्राण समजत आहेस ती सुवर्णमूर्ती अन् हे तुझं पक्षाच्या घरटयाप्रमाणे असणारं राज्य यांच्याबाबतीत जरा ध्यान देऊन विचार कर!" वीरसिंह व्यंग्यात्मक स्वरात बोलला.

"आत्मगौरवासाठी मी सर्वस्वाचा त्याग करायला तयार आहे वीरसिंह!" शंकरवर्माने गंभीर आवाजात जाहीर केले.

"शंकरवर्मा! मी तुझ्या मुलीशी लग्न केलं तर ते तुला गौरवपूर्ण नाही वाटणार? तू माझी इच्छा पूर्ण केलीस, तर ही मूर्ती तुझीच राहील. तू नकार द्यायचा प्रयत्न केलास तर ही मूर्ती तुझ्याकडे रहाणार नाही, इतकेच नव्हे तर तुला तुझ्या कन्येलाही मुकावे लागेल. तुझं राज्यही माझं स्वतःचं होऊन तुला परागंदा व्हावं लागेल. तू पुन्हा नीट सावधपणे विचार कर." वीरसिंहने आव्हान दिले.

"बाबा! तुम्ही याची इच्छा पूर्ण करा. ती मूर्ती इथे रहाणार असेल तर मी



याच्यामागे जायला तयार आहे." सुकन्या मधेच बोलली.

इतक्यात व्यापाऱ्याच्या वेषातला एक तरुण सुकन्येजवळ आला आणि तो तिच्या कानात काहीतरी बोलला. नंतर त्याने एकदा शंकरवर्माकडे पाहिले. शंकरवर्माने ओळखले की तो युवराज सन्दीपच आहे, अन् त्याच्या डोळ्यात आनन्द प्रकटला.

नन्तर तो आपल्या मुलीला म्हणाला– "सुकन्या, तू जे बोलत आहेस, ते आपल्या मर्जीनेच बोलत आहेस?"

"होय बाबा, यात आपण काही शंका मनात आणू नका. माझी इतकीच इच्छा आहे, की ही देवी कनकदुर्गेची मूर्ति



आपल्याच राज्यात रहावी. अन् असंच नव्हे, पण हे महाराज चांगले तरुण व सुन्दर आहेत. यांना नाकारण्याचे कारणच काय?" सुकन्या म्हणाली.

"शाब्बास! काय उच्च विचार आहेत तुझे राजकुमारी!" मोठ्या आनन्दाने वीरसिंह उद्गारला.

यावर शंकरवर्मांनेही स्वीकारात्मक मान हलवली.

दुसऱ्याच क्षणी सुकन्येला वीरसिंहबरोबर पाठवण्याची तयारी सुरू झाली. एक उत्तम हत्ती शृंगारून आणण्यात आला. त्यावरील हौद्यात वधुवेषात सजलेली सुकन्या चढून बसली. तिच्याबरोबर तिची सर्वात प्रिय मैत्रीणही बसली. त्या लोकांनी सुमेधच्या दिशेने कूच केले. हत्तीच्या पुढे पुढे वीरसिंह व सर्पदन्त जात होते अन् मागून इतर शिपाई.

हा सर्व तांडा जंगलाजवळ पोचताच जयानन्द मुनीचा पाळीव पोपट मल्ली उडत उडत सुकन्येजवळ आला आणि तिच्या मांडीवर एक चिठ्ठी टाकून निघून गेला. पोपट कुणाला दिसलाही नाही. सुकन्येने चिठ्ठी वाचली अन् आपल्या मैत्रिणीच्या कानात काहीतरी सांगितले. तावडतोब ती बेशुद्ध झाल्यासारखी मैत्रिणीच्या मांडीवर कोसळली.

"थांबा! थांबा!" सुकन्येची मैत्रीण ओरडली.

सर्वजण एकदम चमकून पाहू लागले! मैत्रीण म्हणाली—"युवराणी बेशुद्ध झाली आहे. तिला खाली उतरवून तावडतोब वैद्य बोलवायची व्यवस्था करा."

सुकन्येला तावडतोब अंबारीतून उतरवून खाली झोपवण्यात आले. वीरसिंहाच्या आज्ञेने तेथेच एक तंबू उभारला गेला. एक दूत जयपुरीला पोचला आणि वैद्य व दोन तरुणींना बरोबर घेऊन आला. ते तिघेही राजकुमारीच्या तंबूत शिरले अन् थोड्या वेळाने बाहेरही आले. "महाराज, राजकुमारी थोड्याच वेळात शुद्धीवर येईल. ती



जरा अशक्त झालेली आहे. तिला जराशी विश्रान्ती मिळायला हवी. तिला हत्तीवरून प्रवास घडवणे ठीक नव्हे. पालखीची व्यवस्था करा तिच्यासाठी!" असा सल्ला देऊन वैद्य व त्या दोन तरुणींनी वीरसिंहाचा निरोप घेतला.

जयपुरीहून पालखी आणवायला आणखी काही वेळ लागला; इतक्यात संध्याकाळ झाली. वीरसिंहाने पुन्हा सुकन्येच्या मैत्रिणीला बोलावून विचारले–"आता राजकुमारी प्रवास करण्याइतपत ठीक आहे ना?"

"ती आत विश्रान्ती घेत आहे. आपणच आत जाऊन चौकशी करावी ना!" हळूच गालात हसत मैत्रीण म्हणाली.

वीरसिंह मोठ्या आनन्दाने तंबूत शिरला; नंतर जरा खाकरून त्याने हाक दिली–"राजकुमारी!" परन्तु काहीच चाहूल मिळाली नाही त्याला! अर्धवट प्रकाशात बिछान्यावरील वस्त्र थोडेसे हलल्यासारखे वाटले. तो सुकन्येचा हात समजून, मोठ्या प्रेमाने स्पर्श करून वीरसिंह भावविव्हल होऊन म्हणाला–"युवराणी!"

परन्तु दुसऱ्याच क्षणी ते रेशमी वस्त्र दूर करून एक माकड त्यातून बाहेर आले! वीरसिंहाच्या चेहरा आपल्या नखांनी ओरबाडून एकाच उडीत ते तंबूबाहेर पडून अदृश्य झाले!

वीरसिंह पळभर गप्पच झाला. हताश होऊन शरमेने थोडा वेळ तो आपला चेहराही वर उचलू शकला नाही. येवढ्या-येवढ्यात हे माकड आले तरी कोठून? पुन्हा मन्त्र-वगैरे तर झाला नाही? जादुटोणा वगैरे करून कोणी युवराणीचे माकड तर नाही करून टाकले? हे जर खरे असेल तर पुन्हा माकडाला युवराणीत बदलता येईलच ना?–असा विचार करत करत वीरसिंहने एकदम ओरडून आज्ञा दिली–"अरे! पकडा, पकडा त्या माकडाला!" अन् असे ओरडत तो स्वतःच तीरासारखा तंबूबाहेर धावला. (क्रमशः)





# कीर्तिचन्द्रिकेचा निर्णय

राजा विक्रम दृढनिश्चयी होता. तो पुन्हा झाडाकडे गेला. फान्दीवर लटकणारे प्रेत उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे गुपचुप स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हा प्रेतात वास करणारा वेताळ म्हणाला–"राजा! तुझा दृढनिश्चय आणि कष्टाळू वृत्ति पाहून मला तुझं मोठं कौतुक वाटतंय! आपलं कार्य साधूनही तुला आपल्या अविवेकामुळे किंवा निरर्थक आग्रहीपणामुळे त्याचा काहीच फायदा होणार नाही अशी मला भीति वाटतेय. उदाहरण म्हणून कीर्तिचन्द्रिका नावाच्या एका राजकुमारीची गोष्ट मी तुला सांगतो. ती ऐकताना तुझा श्रम-परिवारही होईल." नंतर वेताळ गोष्ट सांगू लागला–

स्वर्णदीप्ति राज्यावर राजा विश्वकान्त राज्य करीत असे. तो मोठा जनप्रिय राजा

## वेताळाच्या गोष्टी



होता. लोक त्याला 'अजातशत्रु' म्हणत. आसपासच्या राज्यांचे राजेही त्याचा आदर्श पुढे ठेवून आपापला राजकारभार संभाळण्याचा प्रयत्न करीत.

विश्वक्रान्तला चन्द्रदीप्त नावाचा एकुलता एक पुत्र होता. तारुण्यात पदार्पण करीपर्यंत एक सद्गुणसंपन्न व पराक्रमी राजकुमार म्हणून आसपास तो चांगला प्रसिद्ध झाला होता. ज्या ज्या राजांना उपवर कन्या होत्या, ते ते राजे चन्द्रदीप्त आपला जावई व्हावा अशी स्वप्ने पाहू लागले होते. त्यांच्यापैकीच एक राजा होता सूर्यकेतु. त्याच्या राज्याचे नाव सौगन्धी.

सूर्यकेतु हा विश्वाक्रान्तचा चांगला मित्रही होता. आपली कन्या कीर्तिचन्द्रिका चन्द्रदीप्तला द्यावी असे सूर्यकेतुच्या मनात आले. अशातच कीर्तिचन्द्रिकेच्या खास मैत्रिणीकडून त्याला अशी खबर मिळाली की आपल्या मुलीचे मन चन्द्रदीप्तकडेच आकृष्ट झाले आहे आणि तिने विवाह करायचा तर चन्द्रदीप्तशीच असा निश्चय केलेला आहे.

हे कळल्यावर तर सूर्यकेतु स्वःतच आपला मित्र विश्वक्रान्त याला जाऊन भेटला. तो म्हणाला–"प्रिय मित्रा, मी तुझ्या चन्द्रदीप्तला चांगला ओळखतो. तूही माझी कन्या कीर्तिचन्द्रिका हिला पाहिलेलेच आहेस. माझी अशी इच्छा आहे की तिचा आपली सून म्हणून तू स्वीकार करावास आणि आपली मैत्री नात्याने आणखीनच दृढ करावीस."

मित्राचे हे बोलणे ऐकून विश्वक्रान्तला खूपच आनन्द झाला! त्याने तावडतोब आपला पुत्र चन्द्रदीप्त याला बोलावून घेऊन त्याच्यापुढे हा प्रस्ताव मांडला.

पित्याची इच्छा ऐकल्यावर चन्द्रदीप्त म्हणाला–"मला क्षमा करा बाबा, पण सागरिकाची युवराज्ञी मनोज्ञमाला हिच्यावर प्रेम आहे माझं! तिच्याशीच विवाह करायचा निश्चय केला आहे मी!"

विश्वक्रान्त थोडा वेळ विचारात पडला अन् म्हणाला–"ठीक आहे! विवाहाचा प्रश्न हा तुझ्या व्यक्तिगत जीवनाचा प्रश्न आहे. आम्ही दोघं मित्र आहोत, व्याही बनायची इच्छा आहे आमची! पण हरकत नाही, देवाची इच्छा असेल तसंच होईल! जाऊ शकतोस बेटा तू!"

पण मधेच त्याला टोकत सूर्यकेतु म्हणाला–"राजकुमार, माझ्या मुलीने, वाचेने तुलाच वरले आहे. तिला नाकारू नकोस."

चन्द्रदीप्तने मोठ्या नम्रतेने आणि मृदु स्वरात त्याची विनन्ति नाकारली. यावर सूर्यकेतु विश्वक्रान्तला म्हणाला–"अरे, हा चन्द्रदीप्त अजून लहान आहे, अननुभवी आहे. त्याला नीट समजावून सांगायचा प्रयत्न कर ना मित्रा!"

विश्वक्रान्त यावर म्हणाला–"विवाहाच्या बाबतीत जुलूम जबरदस्ती बरी नसते!"

"हरकत नाही, मनोज्ञमालेबरोबर माझ्याही मुलीशी विवाह करायला का सांगत नाहीस तू त्याला?" सूर्यकेतु उतावळेपणाने बोलला.

वडील काही उत्तर देणार, यापूर्वीच चन्द्रदीप्त त्याला म्हणाला–"क्षमा असावी काका, पण आमच्या वंशात एकपत्नीव्रत पाळलं जातं!"



हे ऐकून सूर्यकेतु रागाने लाल होत ओरडला–"तू जर या लग्नाला तयार झाला नाहीस तर परिणाम फार वाईट होईल हं! नकार महाग पडेल फार!" असे बोलून आपल्या रथात बसून सूर्यकेतु आपल्या राज्यात निघून गेला.

यानन्तर एका आठवड्यातच सूर्यकेतुने विश्वक्रान्तच्या राज्यावर हल्ला करण्याची घोषणा केली. नाइलाजाने विश्वक्रान्तही युद्धाच्या तयारीला लागला.

युद्धाला निघालेल्या आपल्या पित्याला चन्द्रदीप्त म्हणाला–"बाबा! या युद्धाचं मूळ मीच आहे. तेव्हा मीच सूर्यकेतुला तोंड देईन."

इकडे कीर्तिचन्द्रिकेलाही आपल्या पित्याची विश्वकान्त विरुद्धची युद्धाची घोषणा बिलकुल आवडली नाही.

खूप विचार केल्यावर तिला एक मार्ग सुचला. ती स्वतःही युद्धकलेत चांगलीच प्रवीण होती. तेव्हा आपल्या राज्याच्या वतीने स्वतःच जाऊन चन्द्रदीप्तशी युद्ध करावे असा तिचा विचार ठरला. युद्धात ती स्वतः हारली तर चन्द्रदीप्तने मनोज्ञ-मालेशी खुशाल विवाह करावा, अन् उलट चन्द्रदीप हारला तर त्याला आपल्याशी लग्न करणे भाग पाडावे—पण, हा विचार केवळ विचार म्हणून चांगला आहे, प्रत्यक्षात चन्द्रदीप्तला हारवणे आपल्याला शक्य होईलच कशावरून ?

कीर्तिचन्द्रिकेच्या मनात जेव्हा ही शंका उत्पन्न झाली, तेव्हा आपल्या राजगुरूचे तिला अचानक स्मरण झाले. सूर्यकेतुच्या राज्याच्या जवळच दक्षकारण्यात नीलावर नावाचा एक मुनि रहात असे. तो महान् तपोबलसंपन्न होता. एकादी गोष्ट न्याय्य वाटली तर लगेच तो वरदान देत असे.

कीर्तिचन्द्रिका ताबडतोब घोड्यावर स्वार होऊन त्याला भरधाव पळवत नीलाम्बर मुनीकडे गेली. आपली अडचण तिने त्याच्या समोर प्रकट केली. थोडा विचार करून मुनि म्हणाला—"बेटी, मी तुला खड्गसिद्धि नावाचा एक मन्त्र देतो. त्या मन्त्राच्या प्रभावाने तुला एका क्षण-भराकरता आपली तलवार विद्युत्वेगाने चालवता येईल. कितीही महान् योद्धा असला तरी त्यावेळी तो तुझ्याशी लढू शकणार नाही ! तुझ्यासमोर त्यावेळी कोणी टिकूच शकणार नाही." मुनीने कीर्ति-चन्द्रिकेला मन्त्रोपदेश दिला.

मोठ्या आनन्दाने मुनीसमोर कृतज्ञता प्रकट करून ती राजधानीत परतली. तिच्याकडून सर्व वार्ता जाणून सूर्यकेतु आनंदला. तो म्हणाला—"तू पुरुषवेषात जाऊन चन्द्रदीप्तशी युद्ध कर. तो हारला की त्याला राज्य परत करण्याचे प्रलोभन दाखवून विवाहासाठी तयार करता येईल."

यानन्तर सूर्यकेतुने एका दूताकरवी विश्वकान्तला कळवले की—"युद्धाच्या निमित्ताने दोन्ही देशांच्या सैनिकांचे प्राण चालवणं बरं नव्हे, असं मला वाटतं. तेव्हा माझ्या राज्यातल्या एका वीराशी तुझ्या पुत्राने खड्गयुद्ध करावे, अन् त्यात जर तुझा चन्द्रदीप्त हारला तर तुझं राज्य आमच्या हाती यावे, अन् या उलट, जर आमचा वीर हारला तर आमचं राज्य तुझं होईल."

हा प्रस्ताव विश्वकान्तने मान्य केला. युद्धभूमिवर पुरुष वेषातल्या कीर्तिचन्द्रिकेचे आणि चन्द्रदीप्तचे युद्ध सुरू झाले. थोडा वेळ झाल्यावर चन्द्रदीप्तचे वार चुकवणे कीर्तिचन्द्रिकेला कठीण जाऊ लागले. आता तिने मुनीकडून प्राप्त झालेला खड्गसिद्धि मन्त्र जपला. ताबडतोब तिच्या हातातली







तलवार विजेसारखी चपलगतीने चालू लागली. क्षणभर काय चालले हेच चन्द्रदीप्तला कळेना! बास, दुसऱ्याच क्षणी त्याच्या हातातली तलवार निखळून दूर जाऊन पडली!

चंद्रदीप्तला कैद करून घेऊन सूर्यकेतु आपल्या राज्यात गेला. दुसऱ्या दिवशी तो चन्द्रदीप्तला म्हणाला—"अजूनही आपला निर्णय बदलायला तुला अवधि आहे. वेष बदलून येऊन माझ्या मुलीने युद्धात तुला हरवलं आहे. माझा जावई होण्याचे कबूल करत असलास तर माझ्या मुलीसह माझं राज्यही तुझंच होईल. माझी अजूनही तयारी आहे याला."

यावर चन्द्रदीप्त बोलला —"माफ करा महाराज! विवाहाच्या बाबतीतला माझा निर्णय मी पूर्वीच आपल्याला सांगितला आहे. अजूनही त्यात बदल होणे अशक्य!"

पित्याकडून चन्द्रदीप्तचा हा निश्चय ऐकून कीर्तिचन्द्रिका फारच निराश झाली.

इकडे मनोज्ञमालेच्या पित्याला—राजा सोमवर्माला जेव्हा कळले की सूर्यकेतु चन्द्रदीप्तला कैद करून घेऊन गेला आहे, तेव्हा त्याने सूर्यकेतुशीं युद्ध करायची घोषणा केली. ते ऐकून सूर्यकेतु आपल्या कन्येला बोलवून घेऊन म्हणाला—"सोमवर्माची युद्धाची घोषणा ऐकून तुला काळजीत पडण्याचे काहीच कारण नाही. आपल्या सैन्यापुढे त्याचे सैन्य नक्कीच निष्प्रभ ठरेल. आपल्या सेनापतीला ससैन्य पाठवून मी त्याचा सहज पाडाव करून टाकीन."

परन्तु आतापर्यंत जे काही घडले त्याबद्दल नीट खोलवर विचार करून कीर्तिचन्द्रिका आपल्या पित्याला म्हणाली-"बाबा, पण मीच आपला निर्णय आता बदलला आहे. स्वतः समोर राहून चन्द्रदीप्त व मनोज्ञमालेचा विवाह करून द्यायची माझी इच्छा आहे."

सूर्यकेतुनेही यावर स्वीकारात्मक आपली मान हलवली. मन्त्र्याच्या हातून त्याने विश्वक्रान्तकडे असे पत्र पाठवले की, "माझ्या मुलीने तुझ्या मुलाला मन्त्राच्या साह्याने जिंकलेले आहे, स्वतःच्या शक्तीनें नव्हे. तेव्हा तुला आपला पराभव झाला असे मानण्याची गरज नाही. तुझं राज्य तुझंच राहील. तुला उगीचच त्रास दिल्याबद्दल मी तुझी क्षमा मागतो." यानन्तर कीर्तिचन्द्रिकेसमक्ष चन्द्रदीप्त व मनोज्ञमाला यांचा विवाह झाला.

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला-"राजा, कीर्तिचन्द्रिकेचं चन्द्रदीप्तवर खरोखरींच खूप प्रेम होते यात काही शंकाच नाही. चन्द्रदीप्तने तिचा अव्हेर केल्यावर मुनीच्या मन्त्रप्रभावाने तिनें त्याला युद्धात हरवून त्याचं हृदय जिंकायचा प्रयत्न केला. पण युद्धात जय होऊनही ती त्याचे हृदय जिंकू शकली नाही. अशा परिस्थितीत चन्द्रदीप्तचा सूड उगवायचा विचार न करता तिने मनोज्ञमालेचा त्याच्याशी विवाह का करवून दिला? तिचं हे सर्व वागणं अविवेकीपणाचं अन् अर्थहीन नाही वाटत? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही देण्याचं तू टाळलंस तर तुझं मस्तक भेदून जाईल!"

तेव्हा राजा विक्रम उत्तरला- "कीर्तिचन्द्रिका मुळातच सात्त्विक स्वभावाची होती. चंद्रदीप्तवरील आपलं प्रेम ती विसरू शकत नव्हती. युद्धामुळे होणारी हानीही तिला पसन्त नव्हती; त्यामुळेच तर गुरूची मदत घेऊन तिने द्वन्द्वयुद्धाचा निर्णय घेतला. पण द्वन्द्वयुद्धात हारल्यानन्तर चन्द्रदीप्त जेव्हा राज्याला मुकायलाही तयार झाला, तेव्हा त्याचे मनोज्ञमालेवरचे उत्कट प्रेम तिच्या लक्षात आले. अशा परिस्थितीत स्त्रीसुलभ सहनशीलता व त्याग हे आपले गुण प्रकट करून कीर्तिचन्द्रिकेने स्वतःच चन्द्रदीप्त व मनोज्ञमाला यांचा विवाह लावून दिला. यात अविवेक किंवा अर्थहीनता यांचा जराही लवलेश नाही."

अशा तऱ्हेने मौनभंग झाल्यामुळे वेताळ राजा विक्रमाच्या खांद्यावरून अदृश्य होऊन पुन्हा त्याच झाडाच्या फांदीवर लटकू लागला. (कल्पित)



# अतिशहाणा

सोमनाथला वाटे, की आपला मुलगा सुनन्द हा मोठा बुद्धिमान मुलगा आहे. त्याने सुनन्दला शिक्षण द्यावे म्हणून शहरात नेले आणि निर्मलानन्द नावाच्या गुरूकडे ठेवले.

काही दिवसांनी सोमनाथला काही कामा निमित्त शहरात जायचे होते. तो निर्मलानन्दकडे ही गेला. त्याला पहाताच निर्मलानन्द म्हणाला–"तुझा मुलगा अतिशहाणा आहे; त्यामुळे त्याला शिकवणं फार कठीण काम आहे."

पण सोमनाथला ते काही पटेना. तो म्हणाला–"माझा मुलगा तर चांगला चलाख अन् खूपच बुद्धिमान आहे. मला असं वाटतं की आपणच त्याच्याकडे नीटसं लक्ष देत नसावेत."

हे उत्तर ऐकून निर्मलानन्दला फारच वाईट वाटले. त्याने सुनन्दला जवळ बोलावले व म्हटले–"हे बघ सुनन्द! जुन्या काळी आपल्या देशात इतके अद्भुत कलावान विणकर असत की त्यांनी विणलेली एक एक साडी काडेपेटीत सहज मावू शके! तुझ्या लक्षात आलं ना मी काय सांगतोय ते?"

सुनन्दने होकारात्मक मान हलवली.

"ठीक आहे, सांग बरं काय समजलं तुला?" गुरूने सुनन्दला विचारले.

"असंच की, त्या काळात काडेपेटया इतक्या मोठाल्या असत की त्यात एकेक साडीही सामावू शके! बरोबर ना?" सुनन्द झटकन उत्तरला.

आता सोमनाथला शहाणपणा अन् अतिशहाणपणा यातला फरक कळून चुकला! 'आपण फटकन् काहीतरी बोललो', म्हणून त्याने निर्मलानन्दची क्षमा मागितली, आणि 'काहीही करून सुनन्दला नीट मार्गावर आणेन' असे त्याच्याकडून वचन घेऊन सोमनाथ घरी परतला.





## महान् स्वप्नदर्शी भारत

## भारताची अंतरचेतना कोणती?



विपिनचन्द्र पाल (१८५८-१९३२) एक श्रेष्ठ स्वतंत्रता-सेनानी होते. आजच्या बंगला देशातील सा़इहेल गावी त्यांचा जन्म झाला. ते एक अद्‌भुत संघटक आणि प्रभावी वक्ते होते. असहयोग चळवळीतील ते एक आदर्श सैनिक होते आणि ब्रिटिश राज्यकर्त्यांनी त्यांचा अनेक प्रकारे छळ केला. भारतातील नवजागरणाच्या स्पर्शाने ते अभिभूत झाले होते. या महान् आत्म्याचे स्वप्न काय होते, ते आपण त्यांच्याच शब्दात जाणून घेऊ या.

"या पवित्र कार्यात भाग घेण्यासाठी देश, सर्व पुढारी नि मजूर, विद्वान् नि तत्त्वज्ञ, संघटक नि कार्यकर्ते यांना म्हणजेच प्रत्येकाला पाचारण करीत आहे. देश सर्वांना निमंत्रण देत आहे आणि ते स्वीकारणाऱ्या प्रत्येकाने महान् आत्मत्यागाची तयारी करायची आहे. आजपर्यंत जे लोक आपला फुरसतीचा वेळ आणि निरुपयोगी साचलेले धन देशाला अर्पण करीत होते, त्यांच्याकडून देश आता अधिक तोला-मोलाची मागणी करीत आहे. आता त्यांनी आपली मेहनतीची सर्व कमाई आणि आपलं सर्वस्व देशासाठी अर्पण करायचं आहे."

या महान् विभूतीच्या देशभक्ति नि त्यागातील कितपत अंश आपल्या ठिकाणी आहे आणि या देशभक्ताची मागणी आपण कितपत पूर्ण करीत आहोत याचा आपण आपल्या मनाशी आता नीट विचार करायला हवा.

## तुम्हाला माहीत आहे?

१. सर्वप्रथम हृदयारोपणाची शस्त्र-क्रिया कोणी केली?
२. ज्या रोग्यावर ही हृदयारोपणाची शस्त्र-क्रिया केली, तो कोण होता?
३. येशू ख्रिस्ताला जेव्हां सुळावर चढवलं, तेव्हां रोमन सम्राट कोण होता?
४. अति विशालकाय माकडाच्या जातीचे नाव काय?
५. विसाव्या शतकातील कोणत्या सम्राटाने प्रकटपणे जाहीर केले की त्याच्यात दैवी शक्तीचा अंश मुळीच नाही?
६. हे त्याने कोणत्या संदर्भात जाहीर केले?

[पान ३६ पहा]

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. शिपायांच्या बंडांतील घटनांचे आपल्या डोळ्यांनी पाहिलेले वर्णन लिहिणारा इंग्रजी पत्रकार कोण ?

२. तो कोणत्या वृत्तपत्राचा प्रतिनिधि होता ?

३. वाल्टेरने लिहिलेली प्रसिद्ध व्यंगात्मक कादंबरी कोणती ?

४. २,२०० नाटके लिहिणारा नाटककार कोण ?

५. बौद्ध धर्माचे ग्रंथ कोणत्या भाषेत लिहिलेले आहेत ?

## उत्तरावली

**तुम्हाला माहीत आहे ?**

१. डॉ. क्रिश्चियन बर्नार्ड.
२. लुई वाषकन्स्की.
३. टाइबीरियस.
४. मॉण्ड्रिल.
५. जपानी सम्राट हिरोहिटो.
६. दुसऱ्या विश्वयुद्धात झालेल्या जपानच्या पराभवाच्या वेळी.

**साहित्य**

१. विलियम होवर्ड रसेल.
२. लंडनचे 'दि टाइम्स'.
३. कॅनडाइड.
४. लोप डी वेगा ऑफ स्पेन (१५६२-१६३५).
५. पाली.



### जगातल्या पौराणिक कथा—१

## ड्रॅगॉनच्या दातांची पेरणी

टॉयरचा राजकुमार कॅडमस याला एकदा एक अशी दिव्यवाणी ऐकू आली की, काही विशेष अशी चिन्हें धारण केलेली गाय दिसली तर त्याने तिच्या मागे जावे आणि ती जेथे बसेल तेथेच एक शहर वसवावे. त्या वर्णनाची गाय कॅडमसने एकदा पाहिली आणि तो तिच्या मागे चालू लागला.

जनसमुदायापासून खूप दूर एका जंगलात ती गाय घुसली आणि एका जागी बसली. राजकुमाराने ओळखले की आपल्याला इथेच एक नगर निर्माण करायचे आहे आणि गाय बसलेली जागा हा त्या नगराचा केन्द्रबिंदु असावा, म्हणून कॅडमसने त्या जागी खूण करून ठेवली व तो तेथून निघून गेला.





काही लोकांना बरोबर घेऊन राजकुमार पुन्हा त्या जागी पोचला. कोणत्याही नगराची सुरुवात करण्यापूर्वी तिथे जाऊन रहाणाऱ्या लोकांनी पाण्याची सोय पहावी लागते, यासाठी कॅडमसने प्रथम आपल्या लोकांना आसपास पाण्याचा प्रवाह कोठे असेल, तर पाहून काढायला सांगितले.



राजकुमाराच्या त्या अनुयायांनी थोडा वेळ इकडे-तिकडे शोधले तेव्हा त्यांना कुठूनसा पाण्याचा खळखळ आवाज ऐकू आला. मोठ्या आनन्दाने ते त्या दिशेला धावले. परंतु ते जेव्हा ते पाणी पिऊ लागले, तेव्हा अचानक त्या धारे मागून एक राक्षसाकार प्राणी बाहेर पडला.

त्या राक्षसी ड्रॅगॉनने काही लोकांना पकडले. त्या बिचाऱ्यांनी त्याच्या पकडीतून सुटायचा खूप प्रयत्न केला, पण व्यर्थ ! ड्रॅगॉनने त्यांना मारूनच टाकले ! त्यांच्या मरणकाळच्या किंकाळ्यांनी कॅडमसला तेथे आकर्षून नेले.





राजकुमार कॅडमसने देवी अथेनची प्रार्थना केली आणि तिचा आशीर्वाद प्राप्त करून घेऊन त्याने ड्रॅगॉनवर हल्ला केला. मोठ्या धैर्याने व शौर्याने लढून शेवटी कॅडमसने ड्रॅगॉनला धराशायी केले.

लढताना ड्रॅगॉनचे दात इकडे तिकडे विखरून पडलेले होते. ते सर्व एकत्र करून राजकुमारने ते एका जागी एकत्र पुरून टाकले. हे सर्व त्याने देवीच्या सल्ल्यानेच केले. तसे केले नसते, तर त्या दातांमुळे खूपसे नुकसान झाले असते.





जिथे ते दात पुरले होते, तेथून अचानक सैन्याची एक पुरी तुकडी बाहेर पडली. ते सैनिक खूप राग़ीट आणि जो पुढे येईल त्याला मारायला उद्यत असल्या-सारखे दिसत होते. ते सर्व पाहून राजकुमार एका खडकाआड दडून बसला.

खडकामागून राजकुमाराने एक दगड त्या ड्रॅगॉन सैनिकांमध्ये फेकला. दगड कोणी फेकला हे त्या सैनिकांना कळलेच नाही. एका योद्धयाने दुसऱ्याला रागाने विचारले—"तू फेकलास दगड ?" तो योद्धा म्हणाला—"मी ? नाही, नाही."





अशा प्रकारे तू-तू, मी-मी करत त्या सैनिकांमध्ये भांडण सुरु झाले. प्रत्येकजण दुसऱ्यावर आरोप लादू पहात होता. 'दगड आपण फेकला' असे कबूल करायला कोणीच तयार नव्हता, कारण तो खरं तर कॅडमसनेच फेकला होता. पण त्यामुळे भांडण विकोपाला जाऊन ते सैनिक आपापसातच लढले आणि मेलेही !

शेवटी त्यांच्यातले फक्त पाचच सैनिक जिवन्त राहिले. त्या पाचांनीही कॅडमसला आपला नायक बनवले. तेथे बनणाऱ्या नगराच्या बांधणीत सहाय्य करायचेही त्यांनी कबूल केले. त्यामुळे राजकुमाराला खूपच आनन्द झाहे !





अशा तऱ्हेने ग्रीसमध्ये थेब्स शहर निर्माण झाले. थेब्सच्या राजपरिवाराचे पूर्वज व संस्थापक ते पाच योद्धेच बनले. अनेक शतकांनन्तर महान् सम्राट शिकन्दर याने हे शहर नष्ट केले. तो प्रान्त आता थिपाइ नावाने ओळखला जात आहे.



# रुपयांचे दान

सीताराम एक नंबरचा कंजूस होता.

एक दिवशी तो काही कामासाठी शेजारच्या गावी गेला आणि काम झाल्या-बरोबर जंगलातील रस्त्याने आपल्या गावी परत येऊ लागला. इतक्यात त्याला एका झाडाखाली एक म्हातारा दिसला. बिचारा खोकत-कण्हत हैराण झालेला होता. सीता-रामला पाहून म्हाताऱ्याने गयावया केली– "महाराज, मी तहानेने व्याकुळ झालो आहे. थोडं पाणी पाजून मला जिवदान द्या."

म्हाताऱ्याचं बोलणं ऐकून सीताराम थोडा थबकला नि म्हणाला–"तू मला ओळखत नाहीस. मी आहे एक नंबरचा कंजूस ठाऊक आहे तुला?

म्हाताऱ्याने अमळ विचार केला. एक चांदीचा रुपया सीतारामला दिला नि त्याच्या लोट्यातील पाणी घटाघट पिऊन आपली तहान भागवली. मग तो सीता-रामला म्हणाला–"महाराज, मी पण तुमच्या बरोबर तुमच्या गावी येतो. तुम्ही मला मदत केली. त्या बदल्यात मी तुम्हाला शेकडो रुपये मिळवून देईन."

"तू तर कंगाल भिकारी, तू कसली मला मदत करणार?" सीताराम म्हणाला.

हे ऐकून म्हातारा जरा सुद्धा निराश झाला नाही. मोठ्या आत्मविश्वासाने तो सांगू लागला–"माझ्या बुद्धीची ताकत अशी-तशी समजू नका. मी उद्या आपल्या घरा-समोर उभा राहून दान मागेन! आपण मला एक रुपया दान द्यायचा. बस, पहा कमाल होईल, मी आपल्याला पैसाच पैसा देईन!"

चिडून सीताराम म्हणाला–"काय म्हणतोस, रुपया! नाही बाबा, एक फुटकी कौडी सुद्धा मी तुला देणार नाही."

"आहो, तुम्ही असे घाबरताय काय? मी काय म्हणतो आहे, ते नीट समजून तरी



द्या. आपण मला दान दिलं तर लोकांना वाटेल माझ्यात काही तरी महिमा आहे. आपण मला मदत केलीत तर मी आपल्याला रोज हजार रुपये देत जाईन!" म्हाताऱ्याने आपली योजना समजावून सांगितली.

"रोज हजार रुपये देणार ही तुझी योजना तर मोठी आकर्षक आहे. पण तुझा काय भरोसा? एखाद्या वेळी माझा रुपया ही जाणार नाही कशावरून?" सीतारामने आपली शंका प्रदर्शित केली.

"इतका संशय असला, तर आताच मी तुम्हाला हा रुपया देतो. उद्या हाच मला तुम्ही दान म्हणून द्या. मग तर झालं!" असं म्हणत म्हाताऱ्याने एक रुपया सीतारामच्या हाती दिला. आता सीताराम दान द्यायला तयार झाला.

सीताराम बरोबर म्हातारा ही त्याच्या गावी आला. दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे सर्व काही झाले. गावात सगळीकडे वार्ता पसरली की सीतारामने एक रुपया दान दिला. गावातल्या लोकांना वाटलं की ज्या अर्थी सीताराम सारख्या कंजूस माणसाने एक रुपया दान दिला त्या अर्थी या म्हाताऱ्यात जरूर काही विशेषता असली पाहिजे. सामान्य माणसे ही म्हाताऱ्याचा शोध घेऊन येत आणि एकेक रुपया देऊन जात.

अशा प्रकारे एका दिवसात म्हाताऱ्याजवळ दहा हजार रुपये जमा झाले. म्हाताऱ्याने ठरल्याप्रमाणे एक हजार रुपये सीतारामला दिले आणि म्हणाला–"उद्या ही तुम्ही मला असाच एक रुपया दान द्यायचा. विसरायचं नाही हं!"

सीतारामने पुन्हा शंका प्रदर्शित केली–"आता हे एक हजार रुपये माझे झाले. उद्या तुला रुपया दिला, अन् तो घेऊन तू पळून गेलास तर? माझं निष्कारण नुकसान होईल एक रुपयाचं!"

म्हाताऱ्याने पुन्हा एक रुपया सीतारामच्या हाती दिला नि तो निघून गेला.

दोन आठवड्यात सीतारामला रोज हजार हजार रुपये देऊन ही म्हाताऱ्याजवळ



आता एक लाख रुपये जमले. या रकमेतून म्हाताऱ्याने एक छान घर खरेदी केलं. स्वयंपाक करण्यासाठी नि घरातील इतर कामासाठी म्हाताऱ्याने दोन नोकर ठेवले. जमा झालेली रक्कम व्याजाने देऊन तो आरामात जीवन जगू लागला. तरी ही सीताराम कडून म्हातारा रोज एक रुपया दान घेत राहिला.

जे लोक म्हाताऱ्याला रोज दान करीत, त्यांच्या मनात एक शंका निर्माण झाली. म्हाताऱ्याच्या रोजच्या कामांवर बारकाईने नजर ठेवण्याचे काम त्यांनी एकावर सोपवले. दोन दिवसांत त्या गुप्तचराकडून वस्तुस्थितीची जाणीव त्यांना झाली. मग त्यांनी सीताराम आणि म्हातारा यांना दोषी ठरवून त्यांच्या विरुद्ध न्यायालयात फिर्याद केली. सीताराम नि म्हाताऱ्याला न्यायाधीशाने बोलावून घेतले आणि त्यांचे काय म्हणणे आहे ते विचारले.

म्हातारा जरा ही घाबरला नाही. त्याने धैर्याने न्यायाधीशाला सांगितले-"महाराज, जे काही घडलं त्यात सीतारामने कोणाला धोका दिलेला नाही. माझ्यावर विश्वास ठेवून तो मला दान देत राहिला. ज्या अन्य लोकांनी मला दान दिलं, त्यांना मी काही वचन दिलं नव्हतं. ते आपण होऊन माझ्याकडे आले आणि त्यांनी मला दान



दिले. अशा रीतीने माझ्याजवळ पुष्कळ पैसा जमला. दान घेणं यात तर काही चूक नक्कीच नाही. माझ्यामुळे या गावातल्या कोणाचं ही दहा-पंधरा रुपयांहून अधिक नुकसान झालेलं नाही. जे दिलं, ते ही त्यांनी स्वखुषीने दिलं आहे. सीतारामने दान दिल्यामुळे माझा खूप फायदा झाला, म्हणून मी सीतारामला रोज एक हजार रुपये देत राहिलो."

तक्रार करणारांनी निवेदन केलं–"ही सगळी याने रचलेली गोष्ट आहे. खरं म्हणजे सीताराम नि म्हाताऱ्याने मिळून आम्हांला लुटायचा एक कट रचला. यांना असंच सोडलं तर हे गावोगाव जाऊन असंच

लोकांना फसवतील. यांना कडक शिक्षा दिली पाहिजे !"

तेव्हां हात जोडून म्हातारा न्यायाधीशाला म्हणाला–"महाराज, मी पंचवीस वर्षांचा होतो, तेव्हाच ही युक्ति मला सुचली होती. ही कल्पना घेऊन मी अनेक गावातून फिरलो. पण कुठेच माझी डाळ शिजली नाही. शेवटी म्हातारपणी या इथे मला यश मिळालं !"

"तुझ्या बोलण्यावर आमचा विश्वास नाही. या गावात तुला जर यश मिळालं, तर तसंच अन्यत्र का न मिळावं ?" न्यायाधीशाने विचारले.

म्हाताऱ्याने समजावून सांगितलं– "त्याचं एक खास कारण आहे. इतर ठिकाणचे लोक सीताराम सारख्या कंजूस माणसाचा अनादर करीत. तो करील तसे ते करीत नसत. म्हणून त्या गावात माझी योजना सफळ झाली नाही. इथली गोष्ट मात्र वेगळी आहे. सीताराम जे करील, त्याप्रमाणे करून आपला फायदा करून घ्यावा, असं मानणारे निदान इथे दहा हजार लोक तरी निश्चित आहेत. म्हणूनच माझ्या योजनेला इथे प्रचंड प्रतिसाद मिळाला. मला वाटते, संपूर्ण जगात असं दुसरं गाव नाही."

म्हाताऱ्याने आपल्या बुद्धीच्या साह्याने दाखवून दिलं की या गावातले लोक कसे स्वार्थी आहेत, आणि जे दान देतात ते ही स्वार्थ-भावनेनेच देतात. तक्रार करणाऱ्यांच्या ही लक्षात आलं की म्हाताऱ्याला यश मिळालं याचं कारण लोकांचा स्वार्थीपणा आहे, यात म्हाताऱ्याची काही धोकेबाजी नाही. मग म्हातारा नि सीताराम दोघांना सोडून देण्यात आले.

आता सीतारामला ही म्हाताऱ्याच्या म्हणण्यातील मख्खी समजली. त्यामुळे त्याच्या ही विचारात चांगलाच बदल घडून आला. त्याने आपला कंजूसपणा सोडून दिला नि तो महादानी आणि समाजसेवक बनला. त्यानंतर गावात कोणी ही कंजूस दिसेनासा झाला.





# वीर हनुमान

रामाच्या आज्ञेनुसार लक्ष्मण किष्किंधेला जायला निघाला, त्याच्या खांद्यावर धनुष्य लटकलेलं होतं. सुग्रीवाकडे जाऊन काय बोलायचं, त्यावर तो काय उत्तर देईल, आणि त्यावर आपण काय प्रत्युत्तर द्यायचं वगैरे विचार त्याच्या मनात येत होते. खरं म्हणजे तो जरा चिंतेतच होता. रामाला मदत करण्यासाठी सुग्रीव अजून का आला नाही, त्याच्या मार्गात काही नवीन अडचणी तर निर्माण झाल्या नाहीत ना याबाबत निरनिराळ्या विचारांनीं त्याच्या मनात थैमान घातले होते.

दूर लक्ष्मणाला पाहून प्रथम वानरांना वाटले कोणी शत्रूच येत आहे. म्हणून झाडे, दगड वगैरे घेऊन ते युद्धाला तयार झाले. हे सर्व पाहून लक्ष्मणाचा राग अधिकच भडकला. त्याच्या चेहऱ्यावरील क्रोध पाहून वानर अमळ घाबरले आणि त्यांनी सुग्रीवाकडे जाऊन त्याला लक्ष्मण येत असल्याची वार्ता दिली. पण सुग्रीव यावेळी आपल्या रंग-महालात विलास करीत होता. एक सुंदरी आपल्या सुरेल आवाजात एक राग आलापीत होती नि सुग्रीव तन्मयतेने संगीतानंद लुटत होता. त्याने इकडे लक्षच दिले नाही.

अंगद धावरून लक्ष्मणाला सामोरा आला. लक्ष्मण त्याला म्हणाला–"बाळा, सुग्रीवाला जाऊन सांग की मी आलो आहे. त्याला सांग की माझा भाऊ फार दुःखी आहे, म्हणून मी आलो आहे. रामाने मला



सुग्रीवाला घेऊन येण्यासाठी पाठविले आहे. जर सुग्रीव माझ्या बरोबर न आला तर राम रागावेल नि मग काय होईल हे सांगता येणार नाही. त्याने लवकर मला भेटायला यावे नि माझे म्हणजे ऐकावे असं तू त्याच्याकडे जाऊन सांग."

अंगद ताबडतोब सुग्रीवाकडे गेला आणि अतिशय रागाने लालबुंद लक्ष्मण त्याला भेटायला आल्याचा निरोप सांगितला. यावर सुग्रीव आपल्या मन्त्र्यांना म्हणाला–"मी काही चुकीचं काम केलेलं नाही, किंवा काही चुकीचं बोललो नाही. मग हा लक्ष्मण माझ्यावर का इतका रागावला आहे हे माझ्या लक्षात येत नाही. माझ्या शत्रूंनी माझ्या विरुद्ध त्याचे कान भरलेले दिसताहेत. मी भ्यायलो आहे आहे असं कोणी समजू नये. मला राम-लक्ष्मणांचं कसलं भय? ते दोघे तर माझे मित्र आहेत. त्यांनी अकारण माझ्यावर जे उपकार केलेले आहेत, त्यांची परतफेड मी करू शकेन की नाही याबद्दल मला भीती वाटते. तरी पण त्यांना सर्वतोपरी मदत करण्याची माझी इच्छा आहे, त्यासाठी जे काही करायचे त्याची पूर्वतयारी मी करून चुकलो आहे. मला यश मिळेल की नाही, याबाबत माझं मन सचित आहे."

त्यावेळी सर्व मन्त्र्यांसमक्ष बुद्धिवान हनुमान सुग्रीवाला म्हणाला–"राजन्, रामाने आपल्यावर केलेले उपकार आपण विसरला नाहीत ही फार चांगली गोष्ट आहे. असावधपणे आपण तिकडे लक्ष दिलेले नाही हे मात्र खरे! आता शरद ऋतु सुरू झाला. युद्ध करण्यासाठी हीच वेळ योग्य होय. म्हणूनच लक्ष्मण आला असावा. पत्नी-विरहाने व्याकुळ झालेल्या रामाने लक्ष्मणाकरवी काही कटु गोष्टी ऐकवल्या असल्या तर आता ते आपल्याला सहन केलं पाहिजे. आपण आपले कर्तव्य विसरलो हे विसरून चालणार नाही. लक्ष्मणाला शांत करण्यासाठी काही अन्य उपाय दिसत नाही. तुमच्या कल्याणासाठी मंत्री या नात्याने मी हे सगळं बोललो. आपला मुलगा व अन्य







भाईबंदांसह लक्ष्मणाकडे जा आणि त्याला नम्रतापूर्वक नमस्कार करून हे सगळं सांगा. मग लक्ष्मणाचा पारा खाली उतरेल. रामाला मदत करण्यात आपल्याला यश मिळणार नाही असे का बरे तुम्हाला वाटते ?"

अंगद गेला नि लक्ष्मणाला आपल्या बरोबर घेऊन परत आला. किष्किंधेतील वानर-प्रमुखांची घरे पहात लक्ष्मण सुग्रीवाच्या महालापर्यंत पोचला. सुग्रीवाचं घर म्हणजे जणू इन्द्र-भवन! सुग्रीवाच्या अंतःपुरातून वीणा-वादनाचे सूर ऐकू येत होते. तेथे अनेक सुंदर स्त्रिया विहरत होत्या. सुग्रीव भोग-विलासात दंग झालेला दिसत होता. हे पाहून लक्ष्मणाला अतिशय राग आला. त्याने धनुष्याची प्रत्यंचा ओढली, तो ध्वनि सर्वत्र दुमदुमला.

तो भयानक आवाज ऐकताच लक्ष्मण आल्याचं सुग्रीवाला समजलं. इतकंच नाही तर भीतीमुळे त्याचं ऊर धडधडू लागलं. गळा सुकून गेला. तो ताराला म्हणाला– "तारा, हा लक्ष्मण तर मोठ्या सौम्य स्वभावाचा आहे. त्याला आता का बरे इतका राग यावा? मी असं काय त्याचं त्याचं घोडं मारलंय? तू थोडी पुढे चल, त्याचा राग शमविण्याचा प्रयत्न कर. मी मागून लगेच येतोय!"

तारा लक्ष्मणापाशी आली नि म्हणाली– "लक्ष्मणा, आपल्या मित्र सुग्रीवावर असं क्रोधित होणं तुला शोभतं का? त्याची तुझं काम करण्याची मनापासुन इच्छा आहे. या कामी अमळ विलंब झाला हे खरं आहे. तुझ्या सारख्या महापुरुषाने यःकश्चित् सुग्रीवावर असं रागावूं नये. लक्ष्मणा, तू सुग्रीवाला माफ कर."

मग लक्ष्मणासह तारा महालाच्या अंतर्भागात निघून गेली. सुग्रीव स्वर्णभूषणें लेवून पुष्पमाला धारण करून सुवर्णसिंहासनावर आरूढ झालेला होता. त्याच्या अवतीं-भवती अप्सरांसारख्या काही सुंदर युवती वावरत होत्या. हे सर्व पहाताच लक्ष्मणाच्या तळपायाची आग मस्तकाला गेली.





लक्ष्मणाला पहाताच सुग्रीव आपल्या सिंहासनावरून उतरून खाली आला. आसपासच्या सर्व सुंदर स्त्रिया उठून उभ्या राहिल्या.

नम्रपणे लक्ष्मणाला त्याने अभिवादन केले. लक्ष्मण त्याला म्हणाला–" रामाने तुझं काम तर केलं, आता रामाचं काम तू करायला नकोस का? तू कृतघ्न नि खोटं बोलणारा आहेस. सीतेचा शोध करण्याचं काम तू अजून का सुरू केलं नाहीस? तू असा कृतघ्न असशील असं रामाला अगोदरच माहीत असतं, तर त्याने तुला मदत केलीच नसती! तू अशा रीतीने वानरांचा राजा बनला असतास का? मी आता तुला आपल्या बाणांनी वालीकडे पाठवू शकतो!"

सुग्रीवाची बाजू घेऊन तारा म्हणाली– "लक्ष्मणा, सुग्रीव द्रोही नाही, नि दुष्ट ही नाही. त्याला कृतघ्न का म्हणतोस? अनेक वर्षे त्याने हाल-अपेष्टात काढली, आता कुठे थोडं सुख त्याच्या वाट्याला आलेलं दिसतंय! तुझ्या सारख्या मित्राने याबद्दल त्याला क्षमाच केली पाहिजे नाही का? रामासाठी सुग्रीव मला आणि रूमालाच काय, सगळं काही सोडून देऊ शकतो. सीतेचा शोध करून तो तिला रामापर्यंत निश्चित घेऊन येईल. हे काम करण्यासाठी तो रावणाशी ही युद्ध करील. या कामासाठीच त्याने सर्व वानरांना तावडतोब इकडे यायला फर्मावलं आहे. सर्व वानर आता इकडे येतच असतील. ते आजच इथे पोचतील. म्हणून लक्ष्मणा, राग सोडून दे, शांत हो."

आता लक्ष्मणाच्या रागाचा पारा थोडा उतरला. मग सुग्रीवाला ही जरा हलकं वाटलं. तो लक्ष्मणाला म्हणाला–" लक्ष्मणा, मला क्षमा कर. काम सुरू करायला मला थोडा उशीर झाला. जगात कोणाच्या हातून चूक घडत नाही बरं?"

प्रेमपूर्वक सुग्रीवाकडे पहात लक्ष्मण म्हणाला–" रावणाशी युद्ध करण्यासाठी तुझी मदत मिळाली, की आणखी काय

पाहिजे आम्हाला ? तू आता माझ्या बरोबर चल, नि दुःखी रामाला आश्वासन देऊन त्याचं सांत्वन कर."

जवळच उभ्या असलेल्या हनुमानाला सुग्रीवाने आज्ञा दिली–"जगातील सर्व वानरांना बोलविण्यासाठी सर्वत्र आपले दूत पाठव. मी अगोदरच काही दूत पाठवलेले आहेत. आळशी बनून कोणी जाऊ इच्छित नसेल, तर त्याला माझ्याकडे पाठवून दे. दहा दिवसात जे वानर येथे पोचणार नाहीत त्यांना मृत्युदंड मिळेल अशी ही घोषणा कर."

सुग्रीवाच्या आज्ञेनुसार हनुमानाने किष्किंधेतील सर्व वानरांना दाही दिशांत पाठवून दिले.

सुग्रीवाने एक सोन्याची पालखी मागवून घेतली. पालखीत आपल्याबरोबर लक्ष्मणाला बसवलं आणि मोठ्या दिमाखाने आपल्या परिवारासह रामाकडे जायला निघाला. सुग्रीव लक्ष्मणासह पालखीतून खाली उतरला नि हात जोडून उभा राहिला. मग तो रामाला साष्टांग नमस्कार करायला निघाला. इतक्यात रामाने त्याला प्रेमभावाने आलिंगन दिले. आता सर्व जण बसले.

युद्धाची वेळ आल्याची रामाने सुग्रीवाला आठवण करून दिली. सुग्रीव म्हणाला–"रामा, कोटयवधि प्रतापी वानर तुला साह्य करण्यासाठी येत आहेत. रावणाचा सपरिवार अंत करून, ते सीतेला तुझ्यापर्यंत पोंचवतील !"



सुग्रीवाने आपल्यासाठी जी पूर्वतयारी केली आहे ती पाहून रामाला आनन्द झाला. तो म्हणाला–"हे सुग्रीव, तुझ्या मदतीने मी जरूर शत्रूचा अंत करीन असे मला वाटते."

याच वेळी आकाशात धूळ उडालेली दिसली. वानरांच्या झुंडीच्या झुंडी येताना दिसल्या. नदीच्या किनाऱ्यावरून, समुद्रतटावरून नि डोंगरातून कोटयावधि वानर येत असलेले दिसले. काही पांढरे होते, काही तांबडे तर काही भुरकट रंगाचे. शतवली नावाचा एक वानर श्रेष्ठ अनेक वानरांना घेऊन येत होता. ताराचे वडील सोनेरी वर्णाचे महावीर सुषेण कोटि-कोटि वानरांसह येताना दिसले. गवाक्ष आणि धूम्र वानर नि भल्लूक सेनेनिशी आले. नील काळ्या वानरांना घेऊन आला. गवय आपल्या बरोबर कोटयवधि वानर घेऊन आला. दरीमुख, मैंद, द्विविद, गज हे ही अनेक वानरांच्या सह घेऊन पोचले. जांबवान दहा कोटि भल्लूक-सेना घेऊन आला. गंधमादन आणि अंगद हे ही बहुसंख्येने वानरांना घेऊन आले. अशा रीतीने जगातील सर्व वानरवीर किष्किंधेला येऊन पोचले. त्यांच्या कोलाहलाने आकाश नि पृथ्वी दुमदुमून गेली.

सर्व वानर-प्रमुख सुग्रीवाजवळ आले आणि त्यांनी भक्ति-भावाने सुग्रीवाला नमस्कार केला. सुग्रीवाने सर्वांना रामाच्या हवाली केले आणि सांगितले–"तुम्ही सर्व



जण आपापल्या सेनांना वनात नि नदी-किनाऱ्यावर नीट बसवा, त्यांना जे पाहिजे ते सर्व द्या."

नंतर सुग्रीव रामाला म्हणाला–"तुझ्या आज्ञेनुसार पुढे जाण्यासाठी कोटि-कोटि संख्येने वानर आलेले आहेत. त्यांच्यात कामरूप, पर्वतशरीरधारी, कामगमन करणारे असे अनेक भयानक पराक्रमी-प्रतापी वीर आहेत. तू आपल्या इच्छेप्रमाणे यांना आज्ञा दे. या वानरांनी काय करावं हे मी चांगलं जाणतो. तरी पण तूच आज्ञा द्यावीस हे बरं!"

रामाने आनंदाने सुग्रीवाला आलिंगन दिले आणि म्हणाला–"सुग्रीव, सीता जिवंत तर आहे ना? रावण कोठे आहे? मला सगळं नीट माहीत असलं पाहिजे. सीता जिवंत आहे हे खात्रीपूर्वक समजलं म्हणजे मग काय करायचं त्याची योजना आखू. म्हणून माझ्या इच्छेनुसार वानरांना आज्ञा देण्याचं काम तूच करावंस हे योग्य, असं मला वाटतं!"

विनत आणि पर्वताकार यांना बोलावून लाख वानरांना पूर्व दिशेला जाण्याची आज्ञा सुग्रीवाने दिली. रावणाचं निवासस्थान आणि त्याने सीतेला ठेवल्याची जागा शोधून काढण्याची आज्ञा त्यांना देण्यात आली. हा सर्व तपास करून परत येण्यासाठी त्यांना एक महिन्याची मुदत देण्यात आली.

त्याचप्रमाणे सुग्रीवाने काही वानरांना दक्षिण दिशेला पाठवले. दक्षिणेकडे निघालेल्या या वीरात नील, हनुमान, जांबवान, सुहोत्र, शरारी, शरगुल्म, गज, गवाक्ष, गवय, ऋषभ, मैंद, द्विविद, विजय, गंधमादन, उल्कामुख, अनंग, अंगद इत्यादि वीर होते. त्यांच्या मागे विशाल वानरसेना होती.

यानंतर सुग्रीवाने ताराचे वडील सुषेण यांना अनेक वानर-वीरांसह पश्चिम दिशेकडे पाठवले आणि एक लाख वानरांसह शतवलीला उत्तर दिशेकडे रवाना केले.





# डिसेम्बर फुले

खूप जुनी गोष्ट आहे. रशियातल्या एका गावात एक श्रीमन्त माणूस रहात असे. त्याच्या मुलीचं नाव होतं सोनिया. सोनियाची आई वारली अन् तिच्या बापाने दुसरं लग्न केलं. या दुसऱ्या बायकोला जी मुलगी झाली, तिचं नाव होतं नटाशा.

नटाशा जसजशी मोठी होऊ लागली तसतशी सावत्र आई सोनियाचा अधिकाधिक द्वेष करू लागली. दोघी मायलेकी मिळून बिचाऱ्या सोनियाला तऱ्हेतऱ्हेने छळत असत.

सोनिया दिसायला खूप सुन्दर अन् स्वभावाने खूप शान्त आणि सहनशील होती. सावत्र आईने कितीही छळलं, कितीही काम सांगितली, तरी ते सर्व हसतमुखाने सहन करी. घरातली सर्व कामं आनन्दाने करून टाकी. हे सर्व डोळ्यांनी पाहूनही, कजाग बायकोमुळे सोनियाचा बाप काही बोलू शकत नसे.

त्या मायलेकींनी एकदा ठरवलं की सोनियाला कायमचंच घरातून काढून लावावं! त्यासाठी त्यांनी असं ठरवलं की, तिला एकादं असं असाध्य काम सांगावं की सोनिया जंगलातच भटकत राहील.

डिसेम्बर महिना चालू होता, थंडीचे दिवस! रशियात हिवाळा फार कडक असतो, सगळी जमीन बर्फाने झाकून जाते. एकादं छोटं झुडूपसुद्धा अशा वेळी कुठे उगवत नाही.

सावत्र आईने सोनियाला जवळ बोलावून म्हटले–"हे बघ सोनिया! वैद्याला औषधासाठी डोंगरावर उमलणारी काही फुलं हवी आहेत. कितीही त्रासदायक असलं, तरी हे काम तुला करायलाच हवं. जाऊन फुलं घेऊन ये. लवकर जा!"

सोनिया मोठ्या आनन्दाने फुलं आणायला निघाली. तिला जाताना पाहून दोघी मायलेकी खूप खूष झाल्या. त्यांना वाटलं



की आता काही ही परत येऊ शकणार नाही!

सोनिया घरातून निघून सरळ जंगलात पोचली. तिथे फिरता फिरता ती एका डोंगराळ भागात गेली. डोंगरावर सर्वत्र बर्फच बर्फ पसरलेला होता! कुठे एकादी लहानशी पायवाटही दिसत नव्हती. दूरून तिला एका ठिकाणी प्रकाश चमकताना दिसला. सोनिया त्या प्रकाशाच्या दिशेने चालू लागली.

ती जसजशी पुढे जात राहिली, तसतसा तो प्रकाश मोठा-मोठा होत गेला. सोनियाला याचं मोठं आश्चर्य वाटलं! शेवटी ती प्रकाशाच्या जवळ जाऊन पोचली. तिथे एक आग जळत होती. थंडीपासून रक्षण करण्यासाठी लाकडं पेटवून काही माणसं भोवताली बसलेली होती. सोनियाने बेधडक त्या लोकांना तिथे प्रणाम केला.

तिथे बसलेले ते पुरुष संख्येने अकरा होते. जवळच मोठ्याशा सिंहासनावर त्यांचा म्हातारा राजा बसलेला होता. त्याच्या डोक्यावर मुकुट आणि हातात राजदंड होता! सोनियाच्या अभिवादनाचा त्याने स्वीकार केला.

त्या अकरा जणांपैकी एकाने तिला विचारलं–"कोण आहेस बाळ तू? इतक्या थंडीत, अंधाऱ्या रात्री तू मानवांना दुर्गम अशा या मुलुखात कशी काय आलीस? असं काय काम पडलं, म्हणून तू असलं साहस केलंस?" नंतर तो माणूस आपली माहिती सांगू लागला–"आम्ही सर्व एकेका महिन्याचे राजे, आम्ही बाराजण आहोत! अन् जानेवारी, फेब्रुवारी, मार्च, एप्रिल अशी आमची नावं आहेत. एकेक महिना पाळी पाळीने त्या सिंहासनावर बसून आम्ही राज्य करतो. त्या सिंहासनावर बसले आहेत ना, ते डिसेम्बर महाराज."

सोनियाने लगेच वळून डिसेम्बर महाराजांकडे पाहिले. त्या आगीच्या प्रकाशात सोनिया सोन्याच्या पुतळ्यासारखी चमकताना दिसू लागली. डिसेम्बर महाराजांनी तिच्याकडे पाहिले. तिच्या चेहऱ्यावर स्मितहास्य दिसत होतं, तरीही त्या हास्यामागे भोळ्या भावाबरोबरच एक प्रकारचा उदासपणाही जाणवत होता.

सोनियाने त्यांना आपली रामकहाणी सांगितली. ती ऐकून डिसेम्बर महाराजांनाही फार वाईट वाटलं. त्यांनी तिचे सान्त्वन करून 'जून-महाराजांना' सिंहासनावर येऊन बसायला सांगितलं, अन् स्वतः ते सिंहासनावरून उठून खाली आले.

जून राजा सिंहासनावर जाऊन बसला, आणि राजदंड हातात घेऊन तो काही पुटपुटू लागला. ताबडतोब डोंगरावरचा सारा बर्फ विरघळून त्याचं पाणी झालं. पाहता-पाहता सगळी जमीन हिरवीगार दिसू लागली. रोपं उगवली! पिकं डोलू लागली!! फुलझाडांवर फुलं फुलली!!! झाडांवर फळंही दिसू लागली!!!!

राजाच्या परवानगीने सोनियाने झग्यात मावतील तेवढी फुलं तोडून घेतली. राजाने तिला वरदान दिलं की–'घरी पोचेपर्यंत फुलं सुकणार नाहीत.' अशा तऱ्हेने सोनियाची इच्छा पूर्ण करून जून राजा पुन्हा सिंहासनावरून उतरून शेकोटीपाशी जाऊन बसला. पुन्हा डोंगरावर दाट बर्फ जमलं अन् सर्वत्र धुकं पसरलं!

त्या बाराही राजांना सोनियाने नमस्कार केला, अन् तिथून ती घराकडे निघून गेली. सोनियाला परतलेली पाहून तिची आई आणि बहीण दोघीही दचकल्या! फार आश्चर्य वाटलं त्यांना!



सोनिया परत येऊच शकणार नाही असं त्या मायलेकींना वाटलं होतं, पण ती परत आली. इतकंच नाही, तर तिने फुलांचे दिवस नसतानाही फुलं पैदा केली होती! यावर त्या दोघींच्या मनात तिच्याबद्दल ईर्ष्या जागृत झाली.

"ही फुलं तुला कशी मिळाली सांग?" आईने रागावून विचारले. सोनियाने घडलेली सर्व हकीकत अगदी जशीच्या तशी सांगून टाकली. अशी पूर्वी कधी न पाहिलेली फुलं आणायला आता नटाशाही घराबाहेर पडली. मोठ्या कष्टाने ती त्या डोंगराळ भागात पोचली. तिलाही डोंगरावरचा तो शेकोटीचा प्रकाश अन् नन्तर त्याच्या चारी बाजूंना बसलेले महिन्यांचे राजे दिसले.

त्यातल्या एका राजाने नटाशाला पाहून तिची विचारपूस केली. नटाशा उत्तरली– "चला, तुम्ही आपापली कामं करा. तुम्हाला माझी काय पंचाईत?" आणि ती तिथून जायला निघाली. ती चार पावलं सुद्धा चालली नसेल इतक्यात राजाने हातातला दंड हलवला! तावडतोब कडकडाट झाला अन् एकदम बर्फाचे थर तिच्यावर कोसळले! अशा प्रकारे नटाशा बर्फाखाली दबून गेली.

मुलीची खूप वाट पाहून शेवटी तिची आईही तिला शोधायला निघाली. तीही त्या पहाडी मुलुखात पोचली. शेकोटीजवळच्या राजाने विचारलेल्या कुशल प्रश्नांना तिने दुरुत्तरे केली. त्यामुळे नटाशासारखीच तिच्या आईचीही अवस्था झाली.

आई अन् बहीण परत येत नाहीतसं पाहून बिचारी सोनिया व्याकुळ झाली. ती तावडतोब त्या महिन्यांच्या राजांकडे गेली. त्यांच्याकडून तिला त्या दोघींबद्दल सर्व काही कळले. पण त्या राजांच्या खूप काकुळतीनं विनवण्या करून सोनियाने त्यांच्या मनात स्वत:बद्दल दया निर्माण केली अन् आपल्या आई व बहिणीला पूर्वरूप प्राप्त करून दिले.

जूनमधे जी फुलं उमलायची, ती डिसेम्बरमधेच उमलली, म्हणून राजाने त्यांना 'डिसेम्बर फुलं' असं नाव दिलं.





# निर्णयबदलला

कनकाम्बर हा एक गरीब शेतकरी होता. लक्ष्मीपुरचे सर्व लोक त्याला गावच्या प्रमुखासारखा मान देत. आपसात काही भांडण, तक्रार असेल, कसली अडचण असेल तर लोक कनकाम्बरकडे जात. कनकांबरही त्यांच्या अडचणी जाणून निर्णय देते असे. त्यामुळे सर्व लोक त्याला बुद्धिमान व न्यायप्रिय माणूस असे म्हणत असत.

हळूहळू कनकाम्बरचे वय झाले, तो म्हातारा झाला. त्यामुळे गावच्या अडचणी ऐकून त्यांचा निवाडा करण्याचे काम आता त्याला मुलगा वल्लभ याच्यावर पडले. तोच आता आपल्या बापाच्या जागी गाव-प्रमुख बनला. कनकाम्बरने नाव चांगले कमावले होते, पण इस्टेट नव्हती कमावली! त्यामुळे वल्लभला आपल्या तीन एकर जमिनीत मेहनत करूनच कुटुम्बाचे पोट भरावे लागे.

एक दिवस रामदेव नावाचा एक म्हातारा आणि त्याचा त्याचा मुलगा किशन हे त्यांच्यातल्या काही भांडणाचा निवाडा करून घेण्यासाठी वल्लभकडे आले. प्रथम रामदेव वल्लभला सांगू लागला–"हे पहा बेटा वल्लभ, मी तर आता म्हातारा झालो, थकून गेलो. या वयात आता मेहनत करून काही कमवू शकत नाही मी. माझा हा किशन म्हणतोय की–मी काही तुम्हाला भाकरी देऊ शकणार नाही. माझा तर हा एकच लेक. आता हाच असं म्हणू लागला, तर माझ्या खाण्या–कपड्याची व्यवस्था मी स्वत:च कशी करू शकेन?"

यावर किशन म्हणाला–"माझा हा बाप जेव्हा खूप कमवत होता, तेव्हा त्याने पाण्यासारखा पैसा खर्च केला. स्वत:च्या वाईट सवयींमुळे बापजाद्यांकडून आलेली संपत्तीही नासून टाकली. आता मी कशी-

तरी मेहनत-मजुरी करून पोट भरावे असे दिवस माझ्यावर आलेत. मग आता मीच आपल्या बापाचाही खर्च चालवावा– हे कसं शक्य होईल, तुम्हीच सांगा बरं?"

दोघांचे बोलणे ऐकून वल्लभ जरा वेळ चुप राहिला. नंतर त्याने आपला निर्णय जाहीर केला–"रामदेवकाका! तुमचा किशन जी कमाई करतो, त्यात त्याचं स्वतःचंच पोट भरत नाही. मग अशा परिस्थितीत तो तुम्हाला कसं खायला-प्यायला घालू शकेल? हे त्याच्या आवाक्यातलं काम नव्हे." अशा तऱ्हेने वल्लभने किशनच्या बाजूने न्याय दिला.

काही दिवस निघून गेले. वल्लभचा म्हातारा बाप कनकाम्बरचा मृत्यु झाला. वल्लभला एक मुलगा झाला, अन् तो हळूहळू मोठा होऊ लागला. मुलाचे नाव होते पिताम्बर. वल्लभ त्याचे मोठ्या प्रेमाने लालनपालन करी.

एक दिवस वल्लभकडे सुमीत नावाचा म्हातारा अन् त्याचा विशाल नावाचा मुलगा असे दोघे जण आले.

सुमीत वल्लभला म्हणाला–"बेटा वल्लभ! तुला माहितच आहे की हा विशाल माझा एकटाच मुलगा! अनेक अडचणी सहन करून मी याला वाढवला. आता मी म्हातारा झालोय. विशाल म्हणतोय की, तो काही आता माझा भार वाहू शकणार नाही. सध्याच्या माझ्या अवस्थेत काही कष्ट करून मी आपलं पोट भरू शकत नाही.



मला आता एकच मार्ग उरलाय–भीक मागण्याचा! तूच न्याय कर बाबा आता!"

वल्लभ विशालकडे पाहू लागला, तेव्हा विशाल म्हणाला–"वल्लभदादा, मला मोठा करायला बाबांना किती त्रास झाला हे माहित आहे मला. पण या मधल्या काळात माझं लग्न झालं, मला मुलं झाली. माझं उत्पन्न मात्र पूर्वी होतं तितकंच राहिलंय. माझ्या बायकामुलांशिवाय आणखी एक पोट संभाळणं शक्य नाही मला! नाइलाज आहे माझा!"

पण विशालचे बोलणे मधेच तोडत वल्लभ म्हणाला–"नाही, नाही, तू असं म्हणू नकोस! बापाचं ऋण चुकवणं कुणालाच शक्य नाही. तुझा बाप मरेपर्यंत त्याला पोसणं, हे तुझं कर्तव्य आहे. तुला कित्ती मुलं झाली तरी, तू जे काही खाशील त्यातला तुझ्या पित्याचा हिस्सा त्याला मिळालाच पाहिजे. ही तर जगाची रीतच आहे." अशा तऱ्हेने वल्लभने सुमीतच्या बाजूने न्याय जाहीर केला.

त्याच गावात भूषण व सोहन नावाचे दोन म्हातारे रहात असत. ते कनकाम्बरचे नातेवाईकही होते. ते दोघं तलावाच्या किनारी बसून गप्पा मारत होते. भूषण म्हणाला–"सोहन! हल्ली जे लोक न्याय मागायला वल्लभकडे जातात, त्यांना वल्लभ कसाकसा निर्णय ऐकवतो पाहिलंस ना! एकाच प्रकारच्या भांडणात एकदा बापाच्या विरुद्ध अन् एकदा मुलाविरुद्ध निर्णय कसा



काय दिला त्याने ? हीच गोष्ट मला मोठी विचित्र वाटतेय !" भूषण म्हणाला.

यावर जरा विचार करून सोहन म्हणाला–"भूषण ! न्याय देणारा माणूसही शेवटी माणूसच असतो ना ? त्याच्या निर्णय देण्यातून त्याच्या स्वत:च्या जीवनाचं प्रतिबिम्ब थोडं डोकावलं, तर त्यात आश्चर्य वाटायचं काय कारण ? न्यायाधीशाचं स्वत:चं जीवन आणि तो देत असलेला न्याय यात एकमेकाचं प्रतिबिम्ब उमटणं ही एक क्षुल्लक गोष्ट आहे. वल्लभही याला अपवाद नाही, इतकंच काय ते !"

"म्हणजे काय ? मी नाही समजलो ! जरा स्पष्ट सांग ना, म्हणजे कळेल तरी मला ?" भूषण बोलला.

"ठीक आहे, सांगतो ऐक. वल्लभनं रामदेवचा मुलगा किशन याच्या बाजूनं जेव्हा न्याय दिला, तेव्हा वल्लभ स्वत: किशनच्याच परिस्थितीत होता. म्हणजेच त्यालाही आपला म्हातारा बाप कनकांबर याचं पालनपोषण करणं जडच जात होतं. त्याला आपल्या बापाच्या बाबतीत जो त्रास वाटत असे, तो त्याने आपल्या निर्णयात दाखवून दिला. त्याने रामदेवच्या विरुद्ध निकाल दिला." सोहन म्हणाला–"त्याला अगदी साहजीकच किशनबद्दल सहानुभूती वाटली असणार !"

"ठीक आहे, ही गोष्ट खरी मानायला तयार आहे मी ! मग आता त्याने दुसऱ्या भांडणात बापाची-म्हणजे सुमीतची बाजू का घेतली ?" भूषणने विचारले.

"त्याचं ही असंच कारण आहे. या वेळेपर्यंत वल्लभचा बाप मरून गेला होता, आणि त्याला एक मुलगाही झाला होता. त्यामुळे आता बापाच्या नात्याने त्याला स्वत:च्या भविष्याची काळजी वाटू लागली. म्हणूनच त्याने यावेळी बापाच्या बाजूने न्याय दिला." सोहनने आपला तर्क सांगितला.

आता कुठे भूषणच्या लक्षात आले की माणूस स्वत:च्या अनुभवांच्या आधारेच इतरांना नीति-वचने शिकवित असतो.





# लांडग्यावरील प्राणसंकट

एका जंगलाजवळ एका शेतकऱ्याचा मळा होता. शेतकऱ्याने आपल्या मळ्यात खूप मेहनत करून भाजी-पाला तयार केला होता. पण एका सशाला रोज तेथून भाजी-पाला खाऊन मळ्याची नासाडी करायची सवय लागली होती. अशा तऱ्हेने रोज होणारी चोरी शेतकऱ्याच्या नजरेतून थोडीच सुटणार ? अखेर हा भाजी चोर पकडण्यासाठी त्याने दोरीचा फास लावून ठेवला.

नेहमीप्रमाणे उत्तररात्री ससा भाजी खायला आला. अंधारात त्याला फास दिसला नाही, अन् तो बरोबर फासात अडकला. खूप धडपड करूनही बिचारा स्वत:ला सोडवू शकेना.

सकाळ झाली. शेतकरी मळ्यात आला. अन् ससा अडकलेला पाहून म्हणाला–"हंऽऽऽ ! तर तू माझ्या भाज्या खाणारा चोर काय ? थांब, आता पाहतो."

ससा बेचैन होऊन विचार करू लागला–"हाय, हाय ! कसा सुटू आता ?"

इतक्यात तिकडून एक लांडगा आला. त्याला पाहून ससा गालातल्या गालात हसू लागला.

"अरे जावईबुवा ! तुम्ही इथे काय करताय ? तुमच्या पायात ही दोरी कसली ?" लांडग्याने विचारले.

ससा जोरजोरात हसायचे सोंग करत म्हणाला–"फार गडबड झाली हो मामा ! मुलांची तब्येत ठीक नाही, म्हणून देशी वैद्याकडे जाऊन कस्तुरीच्या गोळ्या आणायला घराबाहेर पडलो. वाटेत गाय-आत्या भेटली. ती म्हणायला लागली की, 'माझ्या मुलीचं लग्न आहे, तुला यायलाच हवं.' मी म्हटलं की, 'अग मी जरा महत्त्वाच्या कामाला निघालोय, मला सोडून दे.' तिनं मला इथं बांधून

ठेवलं. मला यातून सोडवा न मामा! पोरांना लवकर औषध मिळालं नाही तर फार तळमळतील बिचारी! तुम्हाला लग्नाला जायचं असलं, तर मी तुम्हाला इथे बांधून ठेवतो. ते लोक आले की तुम्हाला घेऊन जातील."

सशाचे बोलणे खरे मानून लांडगा म्हणाला–"बरं, सोडवतो मी तुम्हाला. मला त्याऐवजी बांधून ठेवा इथे जावईबुवा! मला कधीच कुणी लग्नाबिग्नाला बोलवत नाही. बरी आयती संधी चालून आलीय."

सशाने लांडग्याला आपल्या जागी बांधले आणि म्हटले–"मी आता वैद्याकडे जातो. लग्नघरातून थोड्याच वेळात येईल कुणीतरी." नन्तर ससा जवळच्या झाडीत लपून पुढील गंमत पहायला थांबला.

थोड्याच वेळात चिंचेचा फोक घेऊन शेतकरी तिथे आला, लांडग्याला सशाच्या जागी पाहून म्हणाला–"अरे, भाजी खाणारा चोर जाऊन त्याऐवजी माझ्या कोंबड्या खाणारा चोर बरा आपला चालून आला! आता थांब, तुझीच चामडी सोलून काढतो चांगली!" आणि मग शेतकऱ्याने लांडग्याला छान बडवून काढले.

नंतर आपले कुत्रे घेऊन येण्यासाठी शेतकरी तेथून निघून गेला. तो गेल्यावर ससा पुन्हा तिथे आला अन् लांडग्याला विचारू लागला–"अरे, मामासाहेब! अजून तुम्ही इथेच? लग्नाला नाही गेलात?"

लांडगा रडत उत्तरला–"मला पटकन् या फासातून सोडव कसा!"

परन्तु सशाने त्याला लगेच सोडवले नाही. त्याच्याशी गप्पा मारण्यातच वेळ घालवला. लांडगा बिचारा भीतीने थरथर कापत होता!

थोड्याच वेळात दुरून येणाऱ्या शेतकऱ्याच्या कुत्र्यांचे भुंकणे कानावर आले. त्याबरोबर सशाने भरकन दोरी सोडून लांडग्याला मुक्त केले. कुत्रे त्यांच्या मागे लागणार इतक्यात लांडगा एका बाजूला पळाला अन् ससा दुसऱ्याच दिशेने धावला. दोघांनीही आपापला जीव वाचवला.



## व्हेलचा फवारा



व्हेल माशाच्या बाबतीत आपला असा समज आहे की तो पाण्याचा फवारा सोडतो, पण हे खरं नाही. तो वाफ सोडतो. पाण्यात संचार करीत असताना व्हेल आपल्या फुफ्फुसांतील गरम हवा एका नाकपुडीवाटे बाहेर सोडतो. ही गरम हवा बाहेरच्या थंड हवेच्या संपर्कात आली म्हणजे घनीभूत होते आणि आपल्याला फवाऱ्यासारखी दिसते.

## बाउअर पक्षी

न्यूगिनी आणि ऑस्ट्रेलियात आढळणारा बाउअर पक्षी गवत आणि सुक्या काड्या जमवून एक विशाल धनुष्याकृति बनवतो. इतकंच नाही तर रंगी-बेरंगी वस्तूंनी ती सजवितो. पण हे सगळं कशासाठी? पक्षिणीला आपल्याकडे आकर्षित करण्यासाठी!



## धोकेबाज कीटक



युद्ध नि अपघात सोडून दिले, तर साधारण मृत्यूंपैकी शेकडा ५०% मृत्यु मलेरियाच्या डासांमुळे घडतात. ही गोष्ट आजच नव्हे, पाषाण युगापासून चालत आलेली आहे. आफ्रीका नि आशियात दर वर्षी सुमारे दहा लाख लोक डासांच्या चावण्यामुळे मृत्यु-मुखी पडतात.




# सुरिनामशी आपला संबंध

रामसेवक शंकर! आपल्याला हे नाव भारतीयच वाटतं नाही? पण हे अगदी काल-परवापर्यंत सुरिनामचे अध्यक्ष होते. दक्षिण अमेरिकेच्या उत्तर-पूर्वी समुद्र किनाऱ्यावरील सुरिनाम हा एक स्वतंत्र देश आहे. मग एक भारतीय माणूस या देशाचा अध्यक्ष कसा होऊ शकेल?

त्याचं कारण असं की सुरिनामची एक-तृतीयांश जनता भारतीय आहे. नीग्रो आणि मुळाटो (गोरे नि नीग्रो यांपासून संकरित बनलेली जाति) मिळून एक-तृतीयांश भाग आहे. बाकीची एक-तृतीयांश जनता विविध जाती-जमातींची आहे. या तिसऱ्या भागात इंडोनेशियन लोक अधिक आहेत. डच, हिंदी, स्रनांतांगो आणि जावा भाषा सुरिनाम मध्ये बोलल्या जातात.

पूर्वी सुरिनाम नेदरलँडची वसाहत होती. सन १९७५ मधे सुरिनामला स्वातंत्र्य मिळाले.

पारामारिबो सुरिनामची राजधानी आहे. या देशाचे क्षेत्रफळ १,६३,८२० चौरस किलो मीटर आहे. याची लोकसंख्या जवळ जवळ चार लाख आहे. शेतीवाडी नि खनिज संपत्ति यांनी हा देश समृद्ध आहे.

इतिहास-पूर्व काळापासून सुरिनामचा भारताशी संबंध असावा असे दिसते.





कर्नल बाउटर्स

रामसेवक शंकर

मेक्सिकोच्या सरकारने मेक्सिकोचा जो इतिहास प्रकाशित केला आहे त्यात असा उल्लेख आहे–"नंतर ज्याला अमेरिका म्हटले गेले त्या या महाद्वीपात भारताच्या पूर्वेकडील काही लोग सर्वात अगोदर रहाण्यासाठी आले. ही भारतीयांची संख्या हळू हळू वाढत गेली."

प्रवासी बनून सुरिनाम मध्ये काही भारतीय आले, ही फार प्राचीन गोष्ट नाही. ही अलीकडच्या काळातील घटना आहे. सुरिनाम सरकारमधे अनेक मोठ-मोठया पदावर भारतीय लोक आहेत. रामसेवक शंकर अगदी काल-परवा पर्यंत सुरिनामचे अध्यक्ष होते. आणखी एक भारतीय जगरनाथ लछमन 'नॅशनल असेम्बली' चे अध्यक्ष आहेत.

सुरिनाम एक स्वतंत्र देश आहे, येथील संसदेत ५१ सभासद आहेत. या देशाची सुरक्षा-सेना अधिक प्रभावशाली आहे. नवीन वर्ष सुरु होण्यापूर्वी काही दिवस अध्यक्ष शंकर यांनी राजीनामा दिला. ते आपल्या निवेदनात म्हणतात–"सैन्याच्या दबावाखाली येऊन मी राजिनामा दिला." सुरक्षा-विभागाचे अध्यक्ष आहेत कर्नल बाउटर्स. सेनाधिकाऱ्यांचे म्हणणे आहे की अध्यक्षांच्या राजीनाम्याशी आमचा काही संबंध नाही. एकंदरीत, सर्व गोष्टी अधिक स्पष्ट व्हावयाच्या आहेत.



# आवडती गोष्ट

जुनी गोष्ट आहे. धर्मसेन नावाचा एक राजा होता. त्याला तीन मुलगे होते. थोरला तर चांगला सुयोग्य व बुद्धिमान होताच, पण त्याच्या पेक्षा धाकटे दोघे अधिकच चलाख होते. विद्याभ्यास पूर्ण करुन त्यांनी जेव्हां तारुण्यात पदार्पण केले, तेव्हां तिघांच्याही मनात आपणच राजा व्हावे अशी इच्छा उत्पन्न झाली. दरबारी लोकांच्या जेव्हां हे ध्यानात आले, तेव्हां त्यांच्यातही तीन गट पडले. अन् ते आपापल्या आवडत्या राजपुत्राचे कान भरू लागले.

हे सर्व पाहून धर्मसेन दुःखी झाला. राजकाज व कुटुंब कबिला सोडून आपलं उर्वरित आयुष्य एकाद्या जंगलात जाऊन शान्तीने व्यतीत करायचे त्याने ठरवले. आपल्या मुलांना नीट मार्गावर आणायचे काम राणी पार पाडू शकेल–असा राजाने विचार केला. जंगलात रहायला गेल्यावर राजाला तेथे बासव नावाचा एक गृहस्थ भेटला. तो आपल्या परिवारासह जंगलात निघून आलेला होता. व जंगलात मिळणारी कंदमुळे आणि फळे यांवर आपली गुजराण करीत असे.

बासवची गोष्ट ऐकून चकित होत धर्मसेनने त्याला विचारले–"पण असं जंगलात तरी तुम्ही लोक किती दिवस राहू शकाल? इथलं आयुष्य तुम्हाला कंटाळवाणं नाही वाटत?"

"प्रत्येक माणूस आपल्या परिवारासह राहू इच्छित असतो. माझा परिवार तर इथे माझ्याबरोबरच आहे, मग मला कंटाळा कसा येईल?" बासव उत्तरला.

धर्मसेन यावर म्हणाला–"पण मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे. तुमची मुलं-बाळं मोठी होतील तेव्हा समाजाच्या रीति-भाती आणि प्रथा वगैरे बाबत ती अनभिज्ञच राहतील.



एक न एक दिवस त्यांना समाजात इतर लोकांबरोबर जाऊन रहावं लागेलच नं?"

"समाजाच्या रीती-भाती अन् प्रथा-संप्रदाय, वगैरे बाबतीतलं विशेष वर्णन देणाऱ्या काही गोष्टी मी लिहिल्या आहेत, अजूनही माझं लिखाण चालूच असतं. माझ्या मुलांचं शिक्षण म्हणजे हेच. माझ्याजवळ राहून हे शिक्षण पूर्ण करून माझी मुलं जेव्हा मानव-समाजात जातील, तेव्हा ती आपलं आयुष्य यशस्वीपणे जगू शकतील अशी खात्री आहे माझी, आणि या विपरीत घडलं तर जंगलातल्या या आयुष्याचीही त्यांना सवय असल्याने ती केव्हाही इथं परतू शकतात!" वासवने स्पष्टीकरण दिले.

धर्मसेनने नन्तर वासवने लिहिलेल्या हजार गोष्टी ऐकल्या, आणि त्याला नमस्कार करून म्हटले—"राजश्री, तुम्ही कोणी सर्वसामान्य माणूस नव्हेत. आपल्या गोष्टी खरोखरीच अत्यंत व्यवहार्य अशा आहेत. आता आपल्या गोष्टींच्या आधारे मी स्वतःच्या समस्या दूर करू शकेन. माझी इच्छा आहे की, आपण एकदा माझ्या राज्यात जरूर येऊन माझा पाहुणचार घ्यावा."

यावर हसून वासव म्हणाला—"महाराज, आपल्या अडचणींना आवश्यक अशी उत्तरं आपणाला माझ्या गोष्टींवरून मिळाली, म्हणून तुम्हाला त्या आवडल्या. पण खरोखरच माझं साहित्य इतकं काही महान् नव्हे. केवळ स्वतःच्या अनुभवांच्या आधाराने, मी त्या लिहिल्या आहेत. त्यांच्यावरून इतरांना काही संदेश वगैरे मिळावा अशी मी अपेक्षा केली नव्हती. तरीही, मी 'स्वान्तःसुखाय' लिहिलेल्या या गोष्टींचा आपल्याद्वारे प्रचार झाला तर मी ते आपलं भाग्य मानेन. पण, अजून एक वर्षभर मला गोष्टी लिहायच्या आहेत. ते ध्येय पूर्ण झालं, की मी नक्की आपल्या राज्यात आपल्या दर्शनार्थं येईन."

यानन्तर धर्मसेन आपल्या राज्यात परतला. वंशपरंपरागत राज्य-पालनाची प्रथा रद्द करून, धर्मसेनने एका नव्याच



पद्धतीचा पायंडा पाडला. या पद्धतीप्रमाणे प्रजेनेच आपला भावी राजा निवडावा अशी योजना होती. त्यामुळे आपणाला राज्य मिळावं म्हणून आपल्याशी तोंडपुजेपणा करणाऱ्या लोकांच्या आहारी न जाता राजकुमार जनतेची सेवा करणं जरुरी आहे हे ओळखून आता योग्य मार्गाने चालू लागले.

एक वर्षानन्तर, राजाला दिलेल्या वचनाप्रमाणे वासव धर्मसेनला भेटायला त्याच्या राज्याकडे निघाला. त्याच्याबरोबर त्याची बायकामुलंही होतीच. प्रथम त्या राज्याच्या एका नगरात पोचल्यावर वासव सहकुटुंब तेथल्या एका धर्मशाळेत उतरला. तेथे त्याची समीर नावाच्या एका तरुणाची ओळख झाली.

वासव कोण व तो इथे का आला आहे वगैरेंबाबत समीरने चौकशी करून घेतली अन् मग त्याला नमस्कार करून तो म्हणाला—"काकाजी, अनुभवांच्या आधाराने गोष्टी लिहायची मलाही सवय आहे. अशा पद्धतीने मी आजपर्यंत एकशे एक गोष्टी लिहिल्या आहेत. आपण त्यांच्याबद्दल आपला अभिप्राय सांगावा अशी माझी फार इच्छा आहे."

वासवने याबाबत समीरला मान्यता दिली आणि समीरने आपल्या शंभर गोष्टी त्याला वाचून दाखवल्या. त्या सर्व गोष्टी



ऐकून समीरची स्तुति करत वासव म्हणाला—"अरे बेटा, अनेक वर्षांचा अनुभव घेऊन गोष्टी लिहिण्याची जी कला मी आत्मसात केली, ती तर तू अगदी लहान वयातच प्राप्त करून घेतलीस. तुझ्यासारख्याला जर राजाचं प्रोत्साहन मिळाल तर प्रजेचं नक्कीच कल्याण होईल. तुझ्याबद्दल राजा धर्मसेनजवळ जरूर बोलेन मी!"

यावर आनन्दित होऊन समीर म्हणाला—"काका, महाराजांकडून मला प्रोत्साहन मिळावं अशी काही माझी इच्छा नाही. मी त्या केवळ स्वान्तःसुखाय लिहिल्या आहेत. माझ्या गोष्टी आपल्याला आवडल्या ही मोठी आनन्ददायक बाब आहे. आजपर्यंत



मी ज्या गोष्टी लिहिल्या, त्यातील माझी सर्वात आवडती गोष्ट मी आता आपणाला वाचून दाखवतो. त्या गोष्टीवरही आपला अभिप्राय आपण मला सांगावा."

समीरकडून ती गोष्ट घेऊन वासवने वाचली. नंतर तो म्हणाला—"बेटा! ही गोष्ट मला मुळीच समजत नाहीये. यात बरीच गुन्तागुन्त आहे. तूच जरा नीट सांग ना स्पष्ट करून?"

हे ऐकून मात्र समीरचे मन खट्टू झाले. तो वासवला म्हणाला—"काका, आपल्याला गोष्ट आवडली नाही, असं स्पष्ट सांगितलंत तरी मला वाईट नाही वाटणार!"

यावर वासवलाही वाईट वाटले. तो म्हणाला—"अरे बाबा, तुझी गोष्ट मला आवडली नाही, असं कुठे म्हटलं मी? तुला तसं का वाटलं?"

"मी तर तुम्हाला म्हटलं होतं ना, की माझ्या सगळ्या गोष्टीतली हीच माझी सर्वात आवडती गोष्ट आहे! म्हणजे माझी हीच सर्वात श्रेष्ठ अशी गोष्ट आहे. ही वाचून, तुम्ही मला स्पष्ट करून सांगायला सांगत आहात, म्हणजे माझंच म्हणणं बरोबर की नाही?" समीरने दुःखाने विचारले.

यावर काबून वासव म्हणाला—"अरे, पण मी तुझ्या एकशे एक गोष्टी वाचल्या अन् त्यातल्या शंभर मला समजल्या, आवडल्याही. मग फक्त एकच नीट समजली नाही, अन् स्वतः लेखक तू जवळ होतास म्हणून मी तुझ्याकडे स्पष्टीकरण मागितलं. तुझ्या बाकीच्या शंभर आवडल्या नसत्या, तर या एकीबद्दल काहीच विचारलं नसतं मी तुला! तेव्हा आता उगीच वाद न घालता सांग नं, की तू काय हेतूने ही गोष्ट लिहिली आहेस?"

हे ऐकून दुःखाने समीरने विचारलं—"का बरं, प्रत्येक गोष्टीत काही संदेश मिळालाच पाहिजे असं थोडंच आहे?"

"मी गोष्टी काही यासाठी नाही लिहीत की जनतेला यातून काही शिकायला मिळावं! मी फक्त स्वतःचे अनुभव सुन्दर शब्दात लिहून लोकांपर्यंत पोचवू इच्छितो." समीरने आणखी स्पष्टीकरण दिले.



वासव आता भानावर येत म्हणाला—"मी गोष्टीच्या सन्देशाबद्दल तर काहीच बोललो नव्हतो. मी फक्त म्हणालो, की लिहिण्यामागचा हेतु निराळा असतो अन् संदेश निराळा! खरं म्हणजे प्रत्येक गोष्टीला कारण तर काहीतरी असतंच ना? मुद्दाम घटना ओढून ताणून जमवून केवळ संदेश देण्यासाठी लिहिलेली गोष्ट ही श्रेष्ठ गोष्ट नव्हेच—असं माझंही मत आहे. उदाहरणार्थ बाललीला आणि खोड्या यांमुळे कृष्ण यशोदेला रंजीस आणी, त्या खोडकर-पणाच्या सुंदर गोष्टीतून कुठे संदेश मिळतो? पण त्या खोडकर कृष्णाच्या गोष्टी वाचून पोरं खूष होतातच ना? तेव्हा लहान मुलांच्या खोड्यांचं वर्णन करणं इतकाच त्या गोष्टींचा उद्देश असतो."

आता कुठे समीरने ती गोष्ट लिहिण्या-तला उद्देश सांगितला—"एक प्रसिद्ध मन्दिर बनवण्यासाठी काही शिल्पकार काम करत होते. त्यातल्या एका तरूण शिल्पकाराच्या मूर्ति मोठ्या अद्भुत बनत. पण तरीही त्यातला प्रमुख शिल्पकार त्याला नावं ठेवी, अन् मन्दिराच्या अधिकाऱ्यांनी त्या मूर्ति पाहू नयेत म्हणून वाटेत अडचणी आणी. यावर तो तरूण शिल्पकार बिचारा वैतागून गेला आणि आपण बनवलेल्या सर्व मूर्ति मोडून टाकून, जन्मभर विरक्त होऊन कुठे तरी निघून गेला."



इतके सांगून समीरने विचारले—"आता सांगा, कशी वाटली माझी गोष्ट?"

यावर किंचित हसत वासव म्हणाला—"हेच सर्व तू सुरुवातीला सांगितलं असतंस, तर इतका वाद घालायची जरूरच नसती पडली ना? काही असो, आता काही मी तुला माझं मत सांगू शकत नाही, कारण माझं शुद्ध मन आणि प्रामाणिकपणा यावर तुझा विश्वास नाही राहिला."

नंतर वासव आपल्या परिवारासह राजाकडे गेला.

"महाराज, आपल्या राज्यातले कवि, कथालेखक हे सर्व मोठे अहंकारी अन् घमेंडखोर आहेत. साहित्यावर हा एक

प्रकारे डाग आहे. जनतेच्या मनोविकासाला यामुळे प्रतिबन्ध येतो." असे म्हणून वासवने समीरबद्दल आपल्याला आलेला अनुभव राजाला सांगितला.

हे ऐकून राजा धर्मसेनला मोठे आश्चर्य वाटले. तो म्हणाला–"पण वासवजी, समीर काही कोणी महान् लेखक नव्हे, मी तर त्याचं नावही ऐकलेलं नाही. अशा अगदी सामान्य लेखकाच्या अनुभवावरून माझ्या राज्यातल्या सर्व कवि-कथालेखकांवर ताशेरे झाडून तुम्ही त्यांचा अपमान करणे योग्य नव्हे."

यावर जरासं हसून वासव म्हणाला–"समीर सामान्य लेखक नाही महाराज! एक महान् कथालेखक आहे. अशा महान् लेखकाची आपणाला काहीच माहिती नसावी हीच अपमानकारक बाब आहे. अशा मोठ्या लेखकांना पुढे येण्यापासून कोण रोखत आहे, हे ओळखून काढणं ही आपलीच जबाबदारी आहे. मी समीरच्या गोष्टींची स्तुति केली, तेव्हा मी त्याची चेष्टा करतो आहे असं वाटलं त्याला! त्याच्या मनात आलं की, राजाकडून गौरव प्राप्त झालेला लेखक आहे मी. अन् त्याच्या मनात तर या गोष्टीने पक्कं मूळ धरलंय की मोठी माणसं श्रेष्ठ वस्तूंचं कधी कौतुक करत नाहीत, त्यांच्या सृजनकर्त्याची फक्त चेष्टा–मस्करीच करतात. त्याचं कारण एकच असलं पाहिजे की आपल्या राज्यातले नाव मिळवलेले कवि-कथालेखक वगैरे लोक नवोदित कवि-कलाकारांशी अहंकारपूर्ण व्यवहार करतात, अन् त्यांचा अपमान करतात. समीरसारख्याला असं वाटायला हवं की, प्रसिद्ध कवि-कथालेखकांच्यातच विनयगुणही असतो, आणि आपण साहित्याचा आदर करावा–इतकीच माझी आपणाला विनन्ति आहे."

धर्मसेनने समीर सारख्या नवोदित साहित्यिकांची परिस्थिती ओळखली आणि वासवजवळ आपली कृतज्ञता प्रकट केली. एक 'साहित्य राजा' म्हणून तो प्रसिद्ध पावला.





# डाकू युवराज

[ १८ ]

[हुकुमशाहा वीरसिंहाचा एकामागून एक पराभवच होत राहिला. शंकरवर्माकडून जबरदस्तीने उचलून आणलेली कनकदुर्गेची सोन्याची मूर्तीही तो वाचवू शकला नाही. राजकुमारी सुकन्येशी विवाहाचा विचार केला, तर सुकन्येचे माकडात रूपान्तर होऊन गेले! राजवाड्यात मिळालेले अमूल्य जड-जवाहीर पारध्यांनीच लुटून नेले. –पुढे वाचा]

"मी आता माझ्या नातवाला भेटायला आसुसलो आहे." अमृतपुरीचा राजा सत्यसेन म्हणाला. तो राजा शान्तिदेवचा सासरा होता आणि आता तो वसन्तशी बोलत होता.

"महाराज! युवराज सन्दीपने अशी शपथ वाहिली आहे की आपल्याला भेटण्या पूर्वी त्याला आपल्या पित्याचं राज्य परत मिळवायचं आहे. आता आम्ही सरळ-सरळ वीरसिंहाच्या सैन्याला समोरासमोर सामना द्यायलाही तयार आहोत." वसन्तने मोठ्या आनन्दाने सत्यसेनला सांगितले.

राजा सत्यसेनने ताबडतोब आपला मन्त्री व सेनापती यांना बोलावून घेतले. चारही जणांनी बराच वेळपर्यंत गुप्त-मसलतीच्या खोलीत बसून विचार-विमर्श केला.



"आणखी एक चमत्कार घडला महाराज!" वीरसिंहचा प्रमुख गुप्त हेर त्याला मुजरा करत म्हणाला.

"काय झालं?" डोळे रोखत वीरसिंहने विचारले.

"माकडाचं पुन्हा सुकन्येत रूपान्तर झालं!" गुप्तचर उत्तरला.

"काय म्हणालास? अगदी खरं हे? कुठे आहे ती?" अधीरतेने आपल्या जागेवरून टण्कन उसळत वीरसिंहने विचारले.

"जयनगरला, आपल्या पित्याबरोबर." गुप्तचराने सांगितले.

"काय? जयनगरमधे? पण...अजूनपर्यंत शंकरवर्माने मला ही बातमी का पोचवली नाही?" वीरसिंहच्या स्वरात चिडकेपणा स्पष्ट कळत होता. त्याने ताबडतोब एका वडीलधाऱ्या दरबारी अधिकाऱ्याला बोलावून घेऊन त्याला दूत म्हणून जयनगरला जायची सूचना दिली आणि म्हटले—"शंकरवर्माशी कठोर वर्तन करावं असं मला वाटत नाही. मी तर काहीही करून त्याच्या मुलीशी विवाह करू इच्छित आहे. त्याला जाऊन सांगा की, मी स्वत: राजकुमारी सुकन्येला घेऊन जायला येईन. यावेळी मी स्वत: सारा वेळ तिच्याबरोबर राहीन आणि बरोबर एका जादुगारालाही बाळगीन, म्हणजे पुन्हा कोणी तिला माकड करून टाकणार नाही."

खरोखरीच स्वत:ला जादुगार म्हणवून घेणारा एकजण येऊन दाखल झालेला होता. तो दिसायलाही मोठा आकर्षक होता.

दूत जयनगरला पोचला आणि त्याने वीरसिंहचा निरोप अगदी जसाच्या तसा शंकरवर्माला कथन केला. आणि तो जेव्हा वीरसिंहकडे परत आला, तेव्हा त्याची मान खाली गेलेली होती. तो हताश स्वरात बोलू लागला—"महाराज, माझा तिथे अपमान झाला. म्हणजे त्यांनी आपणाबद्दल अपमानजनक शब्द वापरले."

"काय म्हणालास? अपमानजनक शब्द? कोणी अशी हिंमत केली? काय शब्द होते ते?" वीरसिंहने विचारले.

"प्रथम शंकरवर्मा तर मला भेटायलाच तयार नव्हता. एक युवक तेथे स्वत:ला शंकरवर्माचा सल्लागार म्हणवतो. तो म्हणाला की...." पण दूत बनलेल्या त्या दरबारी माणसाला पुढे बोलायचे धैर्य होईना!

"काय म्हणाला, सांग ना, सांग!" वीरसिंह वेड्यासारखा ओरडला.

"तो म्हणाला की....कि....सुकन्येचं कुठे माकडात रूपान्तर झालं? हां, कोणाला तसं वाटलं असेल, पण त्यावर विश्वास ठेवणारा वीरसिंह हा स्वत:च एक माकड आहे, माकड! समजलास? खरं म्हणजे सुकन्या तेथून पळून गेली, राजकुमारीच्या वतीने त्या माकडाने वीरसिंहच्या गालावर एक थप्पड मारली! बस, इतकंच सांगायचं आहे आम्हाला. असंच अगदी बरोबर वीरसिंहला जाऊन सांग. असंच बोलला तो महाराज!" दूत बोलला.

"त्या दोन कवडीच्या शंकरवर्माची इतकी हिंमत?" असे म्हणून वीरसिंह आपादमस्तक थरथर कापू लागला—"त्याला पायाखाली तुडवून टाकीन. त्या सुकन्येचे ही तलवारीने दोन तुकडे करून टाकीन



मी! मला आता असा संताप आलाय, की कुण्णालाही सोडणार नाही मी!"

"आपलं बोलणं शंभर टक्के बरोबर आहे हुजूर!" दूत बोलला.

नंतर त्याने सर्पदन्त व आपल्या काही अनुयायांना बोलावून म्हटले—"आपण आता ताबडतोब जयनगरवर हल्ला करू या-काय होईल ते होवो!"

"काय होईल? जयच होईल आपला! अन् जयनगर सुमेध राज्याचाच एक भाग होऊन जाईल, दुसरं काय? महाराज, आपल्याला कशाला भ्यायची गरज नाही, या विजयामुळे आपल्या सैनिकांचं आत्मबळ वाढेल!" सर्पदन्त फुशारक्या मारू लागला



"हां, तुझं म्हणणं अगदी बरोबर आहे. नाहीतरी बरेच दिवस आपलं सैन्य पगार घेऊन नुसतंच खात बसलं आहे. पण त्यांनी काही बचतही करून ठेवलेली नाही. जयनगर वर हल्ला करू तेव्हा त्यांना दिसेल ते त्यांनी खुशाल लुटावं. पण दागिने, सोनं-चांदी, हिरे-जवाहीर आणि रोकड पैसा आपल्याला परत करावा -समजलं ?" वीरसिंह बोलला.

"होय महाराज!" सर्पदन्तने मान डोलवली.

खरे म्हणजे जयनगर मधे त्यांचं सैन्य नव्हतंच. पण लोभात पडून सर्पदन्त ही गोष्ट पार विसरून गेला होता. जयनगर-मधे जर एकही सैनिक नव्हता, तर मग युद्ध तरी काय होणार? युद्धच झाले नाही, तर जय काय मिळणार; अन् सैनिकांचा आत्मविश्वास मग कसला वाढणार? म्हणजे सरळ स्वच्छ बाब अशी, की हे युद्ध नसून केवळ लूटमारच होणार!

अन् वीरसिंहचीही अक्कल चालली नाही, की जयनगरजवळ स्वत:चे सैन्य नसले तरी शंकरवर्मा अमृतपुरीहून सैन्य, सरदार वगैरे बोलावून घेऊ शकतो! पण त्यानेही काही विचारच केला नाही. सर्पदन्त तेथून निघून गेला.

पण वीरसिंहच्या लवकरच लक्षात आले की अमृतपुरीची सेना जयनगरच्या मदतीला नक्की येईल. जवळ उभ्या असलेल्या मान्त्रिकाला त्याने विचारले–"काय रे, तू असा काही उपाय सांगू शकशील का, कि ज्यामुळे आमचे सैनिक शत्रूला पाठ दाखवणार नाहीत, शत्रूशी चांगला लढा देतील?"

"होय महाराज, आपले सैनिकच नव्हे, तर घोडेही त्यांना पाठ दाखवणार नाहीत असा उपाय मी करू शकेन; घोड्यांना जो चारापाणी दिला जाईल, त्याच्यावर मी मन्त्रजल शिंपडीन. तो चारा खाल्ला की घोडे शत्रुसैन्यालाच काय, पण आगीच्या ज्वाळांनाही भिणार नाहीत. अन् घोडेच मागे फिरले नाहीत, तर त्यांवर बसलेले सैनिक तरी कसे माघार घेतील?" हसत हसत आपली लांब दाढी कुरवाळत मान्त्रिक बोलला.

"शाब्बास!" वीरसिंह आनंदाने चीत्कारला.

दुपारी सैन्य तयार झाले. सर्पदन्त व मान्त्रिक यांना बरोबर घेऊन वीरसिंह स्वत:च सैन्याचे नेतृत्व करू लागला. संध्याकाळपर्यंत ते जयपुरीच्या सीमेवर पोचले. आता मान्त्रिक म्हणाला–"महाराज, आज रात्री आपण इथेच मुक्काम करू. मन्त्रजल शिंपून आपण इथेच घोड्यांना चंदी देऊ या. सकाळ होता होता, एका घोड्यात पाच पाच घोड्यांची ताकद येऊन राहील."

"ठीक आहे. असंच करू या. पहाटेच आपण जयपुरीवर हल्ला करू." वीरसिंहने मान्त्रिकाचे म्हणणे मान्य केले.

त्या रात्री अनेक मन्त्रांचा उच्चार करत मान्त्रिकाने कमंडलुसारख्या एका पात्रातले पाणी अभिमन्त्रित केले. नंतर ते पाणी चाऱ्यावर शिंपडून मान्त्रिकाने तो चारा घोड्यांना चारला.

सकाळ झाली. आपल्या घोड्यावर स्वार होऊन वीरसिंह आपल्या सैनिकांना म्हणाला–"आता आपल्या घोड्यांच्यात अपूर्व शक्ती आलेली आहे. आपला शत्रु



कितीही शूर असला तरी जय आपलाच होणार. तुम्ही सर्वजण वीरश्रीने पुढे चला."

पण तो स्वत: ज्या घोड्यावर बसला होता, तो पाऊलभरही पुढे सरकेना अन् त्याला काबूत ठेवणंही जड जाऊ लागले. वीरसिंहला वाटले की घोड्याची ताकद वाढली आहे, पण तो विचार क्षणभरच टिकला, कारण घोडा पुढचे दोन खूर हवेत उचलून जोराने खिंकाळू लागला आणि तो अडून राहिला! त्याने मागे वळून पाहिले, तो त्याचा संशय खराच निघाला! सर्वच सैनिक आपापले घोडे ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न करीत असलेले दिसून आले त्याला!



"पुढे चला." वीरसिंहने हुकूम दिला. मोठ्या कष्टाने ते अडलेले घोडे पुढे सरकू लागले. आणि ते सैन्य अखेर जयपुरीच्या राजवाड्याजवळ पोचले. पण त्याला वेढा देण्यासाठी सैनिक घोड्यांना पुढे नेण्याचा प्रयत्न करू लागताच पुन्हा एकदा ते मागल्या पायांवर उभे राहून तेथेच अडून राहिले, आणि भयानक आवाजात खिकाळत पुढे जायला प्रतिबन्ध करू लागले. शिपाई एक एक करून खाली पडू लागले. काही शिपाई तर रिकिबीत पाय अडकून जमिनीकडे तोंड करून लोंबू लागले आणि घोडे आपापल्या जागी थयथयाट करू लागले!

"सर्पदन्त! हे सगळं काय चाललंय? मान्त्रिकाने हे काय करून ठेवलंय?" वीरसिंहही किंचाळू लागला.

केवळ वीरसिंह आणि सर्पदन्तच काय ते महामुष्किलीने आपापल्या घोड्यावर बसून होते!

"वीरसिंहा, दुष्टा! इकडे पहा!" एक गंभीर आवाज हवेत उमटला!

आवाजाच्या दिशेने वीरसिंह आपले मस्तक उचलून पाहू लागला. राजभवनाच्या छतावर तो मान्त्रिक उभा होता! त्याने आपली नकली दाढी व मस्तकावरचे नकली केस काढून आपले खरे रूप प्रकट करीत वीरसिंहला विचारले–"मला ओळखलं नाहीस वीरसिंहा?"

"तू....तू....शान्तिदेवचा हेर मान्त्रिक वेषात माझ्याकडे येऊन मला फसवणारा तूच ना? इतकी हिंमत तुझी?" वीरसिंह हुंकारत त्याला विचारू लागला.

"होय, होय! मीच फसवलं तुला! तुझ्या सर्व घोड्यांना मी वेडं केलंय, मीच पिसाळवलंय त्यांना! सरळ मनाच्या शान्तिदेवला तू फसवलंस, त्यापुढे माझी ही फसवेगिरी काहीच नाही! आता मुकाट्याने आपल्या सैन्यासह शरण ये. नाहीतर तुम्हापैकी एकाचेही प्राण वाचणार नाहीत." म्हाताऱ्या मांत्रिका आव्हान दिले.



"काय, मला धमकी देत आहेस? तू आणि तो म्हातारा शंकरवर्मा मिळून काय सुमेधच्या सैन्याबरोबर आलेल्या आम्हाला सहजपणे मारू शकाल!" त्याची चेष्टा करत वीरसिंहने विचारले.

"अरे मूर्खा! डोळे उघडून इकडे बघ!" वृद्ध मन्त्रि कडकून बोलला.

तावडतोब शेकडो सैनिकांची डोकी किल्ल्याच्या तटावर दिसू लागली! सर्व सैनिक सशस्त्र होते!

ते दृश्य पाहून वीरसिंहचे हृदय धडधडू लागले! त्यावेळी वृद्धमन्त्र्याच्या शेजारी उभा रहात शंकरवर्मा म्हणाला–"वीरसिंह! रक्तपात थांबवण्यासाठीच आम्ही तुला चेतवून अशा तऱ्हेने ससैन्य इथे यायला लावले. धर्मात्मा प्रभु शान्तिदेवचा पुत्र, युवराज सन्दीपच्या सूचनेनेच हे सर्व घडत आहे! प्राण वाचवायची इच्छा असेल, तर तावडतोब हत्यारे टाकून आमच्या हवाली हो आणि युवराजाकडे क्षमायाचना कर. तुझ्या सैन्याला अमृतपुरीच्या सैन्याने घेरलं आहे. आता तरी अक्कल वापर आणि आमच्या हवाली हो! शान्तिपुरचा राजवाडाही आम्हा बंडखोरांचा नेता वसन्त याने ताब्यात घेतलेला आहे."

वीरसिंहने एकदा चहूकडे नजर फिरवली. त्याचे शिपाई खाली पडले होते आणि



काही जख्मी झालेले होते! सर्वच कण्हत-कुथत होते!

"हे सुमेधच्या शिपायांनो! इकडे पहा, तुमचा खरा राजा शान्तिदेव याचा पुत्र युवराज सन्दीप इथे उभा आहे! हाच आता तुमचा राजा!" शंकरवर्मा ओरडून बोलला.

त्याच वेळी युवराज सन्दीप येऊन शंकरवर्माजवळ उभा राहिला.

"युवराज सन्दीपचा जयजयकार असो!" सर्व सैनिक जयजयकार करू लागले.

"शाब्बास! आता मी समजून चालत आहे की तुम्ही सर्व आमच्या हवाली होत आहात. शस्त्रे टाकून सर्वजण एका बाजूला उभे रहा. तुम्हाला माफ करून सुमेध

राज्याच्या सैन्यात सामिल करून घेण्यात येईल." असे हळू म्हणून शंकरवर्मा आता वीरसिंहाकडे वळला आणि म्हणाला– "वीरसिंह, तुलाही आमचं हेच आव्हान आहे. मुकाट्याने युवराज सन्दीपला शरण ये आणि प्रजेसमोर आपला गुन्हा कबूल करायला तयार हो! नाहीतर आता तुझ्या प्राणांची खैर नाही!"

वीरसिंह आता उदास झालेला होता, काहीतरी विचार करत होता तो. इतक्यात त्याचा घोडा एकाएकी मागील पायांवर उभा होऊन त्याने वीरसिंहला खाली पाडले आणि तो पळून गेला!

तावडतोब शंकरवर्माच्या शिपायांनी तेथे पोचून त्याला अटक केली आणि त्याला घेऊन ते कारागृहाकडे निघाले.

सर्पदन्तने दोन्ही हात उचलून स्वतःला युवराज सन्दीपच्या हवाली केले. त्यावेळी त्यालाही शिपायांनी अटक केली.

युवराज सन्दीपला पाहून त्याचा आजोबा, अमृतपुरीचा राजा सत्यसेन यांच्या डोळ्यातून आनन्दाश्रु वाहू लागले! दुष्ट वीरसिंहच्या अत्याचारांचा अन्त झाला आणि सुमेधची जनता आनन्दित झाली.

जयानन्द मुनींच्या समक्ष युवराज सन्दीप सुमेधच्या सिंहासनावर बसला. मोठ्या समारंभाने त्याला राज्याभिषेक करण्यात आला. सर्व लोकांसह तो समारंभपूर्वक जंगलातल्या आपल्या आईवडिलांच्या समाधीजवळ गेला! आणि मोठ्या श्रद्धेने सर्वांनी तिला नमस्कार केला! नन्तर तेथे त्यांचे मोठे स्मारक बनवण्याची घोषणा केली गेली.

यानन्तर सन्दीप व सुकन्या यांचा मोठ्या धामधुमीने विवाह केला गेला. दुसरे कोणी वारस नसल्यामुळे अमृतपुरी व जयपुरी ही राज्येही–सुमेध राज्यालाच जोडली जाऊन त्यांचे एक विशाल व बलशाली राज्य बनले.

राजा सन्दीप व राणी सुकन्या यांच्या शासनाखाली ते विशाल राज्य सुमेध बराच काळपर्यंत सुखशान्तीने नान्दले. (समाप्त)





# बहादूर

आपल्या निश्चयाबद्दल अटळ असणाऱ्या राजा विक्रमादित्याने झाडाजवळ जाऊन, त्याच्या फान्दीवर लटकणारे प्रेत खाली उतरवले, आणि ते आपल्या खांद्यावर लादून नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाची वाट चालू लागला. राजा थोडा पुढे होतो, तोच प्रेतातला वेताळ बोलू लागला–"या मध्यरात्रीच्या वेळी, अशा काळोखात, या भयानक स्मशानात तू हे जे कष्टाचे काम करीत आहेस, ते कुणा सामान्य माणसाच्या आटोक्यातले काम नव्हे पण कधी-कधी असे शूर वीरही वेळ-अवेळ लक्षात न घेता अविवेकाने आपला मान-सन्मान घालवून बसतात. याबाबतीत तुला सावधगिरी बाळगायला उपयोगी पडू शकेल अशी श्रीकान्तची गोष्ट आहे. तुला आपले श्रम कमी भासायलाही उपयोग होईल, म्हणून

## वेताळाच्या गोष्टी



ती गोष्ट तू आता ऐकच." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला–

कीर्तिकामी राज्यात किशनगंज हे एक लहानसे खेडेगाव होते. तेथे श्रीकान्त नावाचा एक तरूण रहात असे. त्याला आईबाप, बहीणभाऊ कोणीच नव्हते. श्रीकान्त अत्यन्त धीट व साहसी होता. त्याची शारीरिक शक्तीही इतकी होती की वेळ पडल्यास एकाच वेळी दहा लोकांना तो भारी पडे.

एकदा जवळच्या जंगलातला एक वाघ नरभक्षक बनून त्या गावात अधूनमधून येऊ लागला. एक दिवस दुपारी श्रीकान्त जंगलात एका झाडावर चढून वाळलेल्या फान्द्या तोडत होता. इतक्यात एक मुलगी आरडा-ओरडा करीत धावत त्या झाडाकडे येऊ लागली. वाघ तिच्या पाठीस लागला होता.

झाडावरून हे दृश्य पाहून जराही न भिता श्रीकान्तने ठीक त्या दोघांच्या मध्येच उडी मारली. अचानक आपल्यासमोर आलेल्या माणसाला पाहून वाघ घाबरून परत फिरला. पण इतक्यात श्रीकान्तने मोठ्या चपळाईने वाघाच्या मानेवर हातातल्या कुऱ्हाडीचा घाव घातला. यामुळे जखमी झालेल्या वाघाने चिडून आपल्या प्रतिस्पर्ध्यावर हल्ला करण्यासाठी तोंड फिरवले. वाघाशी लढता लढता स्वतः श्रीकान्त जखमी होऊन रक्ताने माखला. शेवटी तो त्या रक्तपिपासू वाघाला मारून टाकण्यात सफल झाला. इकडे वाघ मरून पडला अन् तिकडे आपल्या शरीराला झालेल्या जखमांमुळे व खूप दमल्यामुळे श्रीकान्तही बेहोश होऊन पडला.

मधल्या अवधीत त्या मुलीने पळत जाऊन गावात वर्दी दिल्यामुळे लोकही तेथे येऊन पोचले. त्यांनी श्रीकान्तला उचलून गावात नेले आणि औषधोपचार व चांगली सेवाशुश्रूषा करून त्याला बरे केले.

श्रीकान्तच्या धाडसाची कहाणी राजा अभिसार याच्या कानी गेली आणि त्याने श्रीकान्तला बोलावून घेऊन आपल्या सैन्यात शिपायाची नोकरी दिली.

काही दिवसांनी अगदी अचानक जवळच्या सुमगंध राज्याचा राजा कालकेतु याने अभिसारशी युद्ध करण्याची घोषणा केली. दोन्ही राज्यांचे राजे समोरासमोर आले आणि दोघात लढाई सुरू झाली. इतक्यात शत्रुपक्षाच्या एका शिपायाने राजा अभिसारच्या घोड्याच्या पुठ्ठ्यावर भाला फेकला. त्यामुळे घोडा दचकून जोरात खिकाळला व मागच्या दोन पायांवर उभा राहून थयथयाट करू लागला. राजा अभिसार तोल जाऊन खाली पडला व तावडतोब त्याच्या मस्तकावर वार करण्यासाठी कालकेतुने आपली तलवार उगारली. पण अगदी योग्य वेळी श्रीकान्त तेथे पोचला अन् त्याने विजेच्या वेगाने राजा कालकेतुची तलवार आपल्या तलवारीने दूर उडवून दिली व लगेच त्याला घोड्यावरून खाली खेचले. त्याच्या गळयाला आपल्या तलवारीचे टोक भिडवून श्रीकान्त गरजला– "राजा, आपला पराजय कबूल कर!" कालकेतु कैदी झाला.

युद्धकलेचे जराही ज्ञान नसलेल्या श्रीकान्तने केवळ आपल्या साहसाच्या बळावर कालकेतुला तोंड दिले आणि राजा अभिसारचे प्राण त्याने वाचवले. राजाने



खूष होऊन त्याला अमूल्य उपहार देऊ केला.

पण मोठया नम्रतेने राजाच्या पुरस्कार नाकारत श्रीकान्त म्हणाला–" महाराज, कोठल्याही प्रकारचा त्याग व बलिदान करून आपल्या राजाचे प्राण वाचवणे, हे प्रत्येक शिपायाचे कर्तव्यच असते."

अभिसारला आता श्रीकान्तची राजभक्तीही कळून चुकली! त्याने श्रीकान्तची आपला 'अंगरक्षक' म्हणून नेमणुक केली.

यानन्तर दोन वर्षांनी राज्यात मुळीच पाऊस न पडल्याने कीर्तिकामी देशात मोठा दुष्काळ पडला. काय करावे हे राजालाही सुचेना.



अशातच विशालाक्ष नावाचा एक प्रसिद्ध ज्योतिषी राजाला येऊन भेटला आणि तो म्हणाला–"महाराज, आपल्या राज्याच्या दक्षिणेला एक जुनें काली-मन्दिर आहे. त्यात एक शिलालेख आहे. यावर असं लिहिलेलं आहे की कोणी आपला जीव द्यायला तयार होऊन काही नवस बोलला, तर देवी त्याची इच्छा पूर्ण करते."

हे ऐकून श्रीकान्त ताबडतोब राजाला म्हणाला–"महाराज, मी स्वतः मोठ्या आनन्दाने प्राणत्याग करायला तयार आहे. मी कालीमातेला नवस करीन की माझे प्राण घेऊन तिने आपल्या राज्यात पाऊस पाडायची कृपा करावी!"

इतके बोलून श्रीकान्त सरळ काली-मन्दिराकडे चालू लागला. देवीच्या प्रतिमेच्या हातात एक त्रिशूळ होता. श्रीकान्तनें मान लववून देवीला प्रणाम केला आणि म्हणाला–"हे जगज्जननी! मला कृतार्थ कर. माझ्या प्राणत्यागामुळे माझ्या देशात पाऊस पडू दे आणि त्यावरची दुष्काळाची प्रेतछाया दूर होऊ दे. कृपा कर माते!" अशी प्रार्थना करून श्रीकान्तने तेथील त्रिशूळ उचलला आणि तो स्वतःच्या छातीत भोसकण्याचा प्रयत्न केला.

पण इतक्यात स्वतः कालीमातेच्या मूर्तीतून आवाज प्रकटला–"थांब श्रीकान्त, तुझ्यासारख्या त्यागी माणसाचें बलिदान मला नको. तुझे राज्य हिरवें होईल आणि लोक आनन्दाने जगू लागतील."

दुसऱ्याच क्षणी मुसळधार पाऊस सुरू झाला!

श्रीकान्त राजधानीत परत आला आणि कालीमातेच्या मन्दिरात काय काय घडले ते त्याने राजाला निवेदन केले.

राजा अभिसारने श्रीकान्तची खूप तोंड भरून स्तुति केली आणि म्हटले–"श्रीकान्त, केवळ तुझ्यामुळेच माझी प्रजा दुष्काळाच्या भयानक जबड्यातून वाचली आहे. तू मागशील त्या प्रान्ताचा मी तुला सामन्त करतो. बोल, कोणता प्रान्त देऊ तुला?"



यावर श्रीकान्त म्हणाला–"महाराज, आपला सेवक म्हणून मी आपले कर्तव्य केले. एकादा सामंत-राजा किंवा महाराजाही बनायची माझी इच्छा नाही. मी पूर्वीसारखाच आपला सेवक म्हणून राहू इच्छितो, बस! मला असाच राहू द्या!"

राजा आता अधिकच प्रसन्न झाला. राणीशी बोलून त्याने राणीच्या मुख्य सखीशी श्रीकान्तचा विवाह करून दिला. तीन वर्षे काय गेली, अन् श्रीकान्त दोन मुलांचा बापही बनला.



यानंतर काही दिवसांनी कीर्तिकामी राजावर पुन्हा संकटांचा पहाड कोसळला. राज्याच्या सीमेवरील जंगलात त्रिजट नावाचा एक राक्षस कुठूनसा येऊन राहू लागला. वाटसरूंना पकडून नेऊन फस्त करायचा त्याने सपाटा लावला. राजालाही बातमी मिळाली की तो मोठा भयानक व रक्तपिपासू राक्षस आहे.

दरबार भरवून राजा अभिसार बोलू लागला–"या राक्षसावर मोठे सैन्य पाठवून त्याचे पारिपत्य करायचा प्रयत्न आपण करू शकू. पण यात मोठी प्राणहानि होईल. म्हणून मला वाटतं की आपण त्याच्याकडे एक दूत पाठवून त्याला निरोप कळवावा, की त्याला रोज शाही पाकशाळेतून जनावरांपासून बनवलेले स्वादिष्ट आणि मसालेदार भोजन पाठवण्याची व्यवस्था आपण करू, पण त्याने अशी माणसे मारणे बन्द करावे. पण यातही एक अडचण आहे! दूत म्हणून जाणाऱ्या दूतालाच याने खाऊन टाकले तर? तेव्हा अशा परिस्थितीत त्या राक्षसांकडे दूत म्हणून जायला आता कोण तयार होईल?"

दरबारात सर्वांची नजर श्रीकान्तकडे वळली. त्यांच्या मनातली गोष्ट जाणून राजा श्रीकान्तला उद्देशून म्हणाला–"श्रीकान्त, आजपर्यंत आपले प्राण पणाला लावून तू अनेक धाडसी कामे करून प्रजेचे रक्षण केले आहेस. प्राणत्यागालाही तू भ्यायला नाहीस. तुझ्यापेक्षा बहादूर असा

माणूस माझ्या दरबारात कोणीही नाही. तेव्हा याही वेळी हे आव्हान तू स्वीकारशील अशी आला मला आहे. तुझं यावर काय म्हणणं आहे श्रीकान्त ?"

तेव्हा श्रीकान्त उठून म्हणाला–"क्षमा असावी महाराज ! पण त्या राक्षसाकडे दूत बनून मी जाऊ इच्छित नाही !"

आपली गोष्ट इथेच थांबवत वेताळ म्हणाला–"विक्रमराजा ! श्रीकान्त तर अजोड असा साहसी वीर होता. युद्धकला माहीत नसतानाही शत्रुराजा कालकेतुवर त्याने तलवार उगारली होती, देशाला दुष्काळाच्या तडाख्यातून सोडवण्यासाठी कालीमातेच्या पायावर आपले बलिदान करायलाही तो उद्युक्त झाला होता. मग त्रिजट राक्षसाच्या बाबतीतच मात्र तो जसा वागला, ती त्याची वागणूक असमंजस-पणाची आणि अविवेकाची वाटत नाही काय ? तो असा का वागला ? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस, तर तुझ्या मस्तकाचे फुटून तुकडे होतील."

यावर राजा विक्रम उत्तरला–"मान-वाची जीवन-पद्धतीच त्याच्या समस्या, त्याच्या मनोभावना आणि वागणूक यात सुधारणा व बदल घडवून आणत असते. प्राण संकटात घालायची वेळ आली, तर त्या बाबतीत एकटा एक सडाफटिंग माणूस व एक विवाहित, मुलाबाळांचा धनी असणारा माणूस यांची वागणूक निर-निराळ्या प्रकारची असेल. श्रीकान्त आता विवाहित व दोन मुलांचा बाप झालेला होता. स्वतःच्या जिवन्त राहण्यावर आता त्याची बायको व मुलं यांचं जीवन अवलंबून होतं. त्याच्या प्राणांवर आता या सर्वांचाही हक्क होता; त्यामुळे आता पूर्वीप्रमाणे तो स्वतःच्या जिवाशी खेळू शकत नव्हता. म्हणूनच त्याने राक्षसाकडे जायला नकार दिला. त्याचा निर्णय अविवेकपूर्ण किंवा त्याच्या पूर्वीच्या कीर्तीला कमीपणा आणणारा आहे असे मुळीच नाही."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग झाले; व वेताळ पुन्हा झाडावर लटकू लागला.





# रताळे

एक गरीब शेतकरी एका राजाचा मित्र होता. शेतकऱ्याची झोपडी जंगलाच्या अगदी जवळच होती, आणि राजा जेव्हां जेव्हां शिकारीला जाई, तेव्हां तेव्हां तो आपल्या शेतकरी मित्राकडे जरूर जाऊन रहात असे. शेतकऱ्याची बायको रताळी भाजून राजाला देई आणि राजा मोठ्या आनन्दाने ती खाई.

एक दिवस शेतकरी काही कामासाठी राजधानीकडे जायला निघाला. तेव्हां काही रताळी त्याच्या हातात देत बायको म्हणाली–" राजेसाहेबांना ही रताळी फार आवडतात. अनायसे जातच आहात तर ही नेऊन द्या ना त्यांना."

"अग वेडे ! असली भेट पाहून राजाला काय वाटेल !" शेतकरी बोलला.

"काही नाही वाटणार ! इतक्या लांबून मुद्दाम त्यांच्यासाठी रताळी नेल्याचा आनन्दच वाटेल त्यांना उलट ! ते नक्की खातील पहा ही. काही विचार करू नका. माझं ऐका. घेऊन जा ती." बायकोने आग्रह धरला.

बायकोचा आग्रह मानून ते रताळ्यांचे गाठोडे डोक्यावर घेऊन शेतकरी राज-धानीकडे निघाला. चालता चालता तो एक एक लहान रताळे कुरतडून खात राहिला. गाठोड्यात फक्त एकच रताळे राहिले ! पण ते रताळे मात्र खूपच मोठे होते.

"हे चांगलंच मोठ्ठं रताळं आहे. राजाने कधी इतकं मोठ्ठं रताळं पाहिलंही नसेल. मी हेच रताळं राजाला भेट म्हणून देईन." शेतकऱ्याने मनात विचार केला.

आपल्या शेतकरी मित्राला पाहून राजाला फार आनन्द झाला. गाठोड्यातले रताळे काढून राजाला देत शेतकरी

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

म्हणाला–"हे मी खास आपल्यासाठी आणलं आहे. राजेसाहेब!"

मोठ्या आनन्दाने त्या रताळ्याचा स्वीकार करत, जवळ उभ्या असलेल्या शिपायाला राजा म्हणाला–"हे घेऊन जाऊन खजिनदाराच्या हाती सोपव अन् त्याला सांग की हे आपल्या खजिन्यात सुरक्षित ठेव. हां, खजिन्दाराकडून एक हजार मोहोरा आणून या शेतकऱ्याला बक्षिस दे."

नन्तर राजा शेतकऱ्याला म्हणाला–"चल, आपण भोजन करून घेऊ."

राजवाड्यात सर्वांना बातमी कळली की कोणी एक अगदी सामान्य असा शेतकरी एक क्षुल्लक असे रताळे राजेसाहेबांसाठी भेट म्हणून घेऊन आला, अन् त्या बदल्यात त्यांनी त्याला एक हजार मोहोरा बक्षिस दिल्या!

'आपला राजा जर इतका दानशूर असेल तर आपणही का फायदा करून घेऊ नये?' असा विचार करून एका दरबारी अधिकाऱ्याने एक उत्तम जातीचा घोडा खरेदी केला आणि तो राजाला नजर करीत अधिकारी म्हणाला–"महाराज, हा एक उत्तम जातीचा घोडा मी आपणाला भेट देत आहे. कृपा करून स्वीकार व्हावा."

आता इतर उत्सुक होऊन वाट पाहू लागले.

हे सर्व राजाच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. त्याने जवळ उभ्या असलेल्या शिपायाला बोलावून त्याच्या कानात हळूच सांगितले–"खजिन्यात सुरक्षित ठेवलेलं रताळं घेऊन ये."

ताबडतोब ते मोठे रताळे शिपायाने आणून राजाच्या हाती दिले. ते त्या दरबारी अधिकाऱ्याच्या हाती देत राजा म्हणाला–"या रताळ्याची किंमत एक हजार मोहोरां इतकी आहे. तू मला घोडा भेट दिलास म्हणून मी तुला हे रताळं बक्षिस देत आहे."

अशा तऱ्हेने त्या अधिकाऱ्याच्या आशेवर पाणी पडले! त्याच्या लक्षात आले की, आपल्या लोभीपणाबद्दल राजाने आपल्याला चांगलाच धडा शिकवला! इतर दरबारी लोकही हे सर्व समजून चुकले.



चांदोबा पुरवणी–२८

# महान् स्वप्नदर्शी भारत

## समाईक वारसा

पंडित गोविन्द वल्लभ पन्त यांचा जन्म उत्तर प्रदेशातील अल्मोडा जिल्ह्यात झाला होता. भारताला स्वतन्त्र करण्यासाठी ज्या देशभक्तांनी लढा दिला, त्यात पं. गोविन्द वल्लभ पन्त यांचेही स्थान उच्च आहे. भारताला स्वातन्त्र्य मिळाल्यानन्तर शासनाच्या प्रमुख आधारस्तम्भांपैकीही ते एक होते. १९५५ पासून १९६१ पर्यंत त्यांनी 'गृहमन्त्री' हे पद सांभाळले होते.

२१ डिसेंबर १९४६ रोजी अलाहाबाद विश्वविद्यालयाच्या पदवीदान समारंभाच्या वेळी त्यांनी भारताबाबत हे उद्‌गार काढले होते:–

"भारताचा इतिहास हा भारतात जन्मलेल्या प्रत्येकाच्या वाट्याला आलेला वारसा आहे. या महान् देशातल्या वैभवपूर्ण इतिहासाचा अभिमान बाळगण्याचा हक्क इथे जन्मलेल्या प्रत्येक नागरिकाला आहे, मग तो हिन्दू असो वा मुसलमान! त्यांचे धर्म निरनिराळे असले तरी त्यांच्या नसानसातून भारतीय रक्त वहात आहे. कारण अनेकातील एक असणाऱ्या प्रत्येकाचा जन्म या धरतीवरच झालेला आहे. भारताच्या इतिहासात अनेक राजनैतिक वादळे आणि उलथापालथी या धर्मांमुळे झालेल्या आहेत, तरीही सर्व लोकांच्या निर-निराळ्या विश्वासांबद्दल सहनशीलतेचे धोरण स्वीकारणे हे भारतीय समाजाचे प्रमुख तत्त्व बनून राहिले आहे."

## तुम्हाला माहीत आहे?

१. सायकलीचा शोध कोणी लावला आणि केव्हां?
२. पहिल्या सर्कशीचा व्यवस्थापक कोण होता? केव्हां?
३. पहिला फिल्म स्टुडिओ कोणी बनवला? केव्हां? स्टुडिओचे नाव काय होते?
४. आजच्या नव्या सिंगापुरच्या स्थापनेचे श्रेय कुणाला मिळाले आहे? याची स्थापना केव्हां झाली?
५. भारताच्या सर्व राज्यात व केन्द्रशासित राज्यात मिळून सर्वात छोटे राज्य कोणते? त्याची लोकसंख्या किती? व तेथील भाषा कोणती?

[पान ३६ पहा]

# दुर्गामाता



भारताची संस्कृति ऋषिमुनींनी घडवली आहे. त्यांचे व्यक्तिमत्व महान होते. आपले पार्थिव डोळे जे काही पाहू शकतात, त्याही पेक्षा खूप दूरचे काही पहाणारे द्रष्टे होते ते! याच अद्भुत शक्तीमुळे त्यांना आपण 'सिद्धपुरुष' म्हणतो.

त्यांनी असे पाहिले की भक्तांची इच्छा व गरजेनुसार दैवी शक्ती अनेक रूपात प्रकट होते. अशा अनेक रूपांपैकीच एक आहे दुर्गामातेचे रूप! या प्रकट रूपाशिवाय तिची दुसरीही काही रूपे आहेत. परन्तु त्यात जास्त प्रचलित रूप दुर्गेचेच आहे. कामाक्षी, कन्या, मूकांम्बा आणि भगवती आदि रूपात, भारतातील काही प्रमुख मन्दिरातून तिची पूजाअर्चा केली जाते.

दुर्गेला शिवाची पत्नी मानले जाते. पार्वती, सती हेही तिचेच अवतार.

दुर्गेला चार हात असतात. त्यातील वरच्या हातांत भगवान विष्णूचे शंख व चक्र असतात. तिच्या दुसऱ्या अनेक रूपात (उदा. महिषासुरमर्दिनी) तिच्या हातांच्या दोनांहून अधिक जोड्याही दाखवल्या जातात.

दुर्गेचे वाहन आहे वाघ!

दुर्गा आपल्या भक्तांना पथभ्रष्ट होण्यापासून वाचवते आणि त्यांच्या अडचणी दूर करते. तिच्या भक्तांना आपल्या कुकृत्यांबद्दल पश्चात्ताप झाला, तर ती त्यांना क्षमा करते. ती साऱ्या विश्वाची 'जननी'– जगज्जननी – आहे. आणि तिची आपल्या सर्व अपत्यांवर समान दयादृष्टि आहे.

दसरा व नवरात्र यावेळी तिचा उत्सव मोठ्या धुमधडाक्याने साजरा केला जातो.

## चांदोबाच्या बातम्या



### मजबूत फुफ्फुसेवाला माणूस!

चालल्या आगगाडीच्या अवाजाहून अधिक जोरदार आवाज काढायच्या एका चढाओढीत ३६ वर्षाच्या एका जपानी युवकाने सिद्ध करून दाखवले की त्याची फुफ्फुसे सर्वांत अधिक मजबूत आहेत. "तुम्हाला युद्ध हवं असेल तर जा." अशा अर्थाचे वाक्य योशिटिको कटोने ओरडून बोलून दाखवले. या त्याच्या ध्वनीचे पंजीकरण ११५.८ डेसिमल इतके झाले. एका खुल्या रुळांच्या लाइनीवर एकादी आगगाडी जात असताना जो आवाज उत्पन्न होईल, त्याच्या १५ टक्के इतका हा आवाज अधिक आहे.

### संगीताद्वारा रोगचिकित्सा!

रोग-चिकित्सा करायला संगीताची मदत होऊ शकते ही गोष्ट तुम्हाला कदाचित माहीत असेल. मॉस्कोतील एका संगीतज्ञ, डाक्टर्स व मनोविकारतज्ञांच्या समितीचे असे म्हणणे आहे की संगीतामुळे रोग प्रतिबंधक शक्तीही चांगलीच वाढते. इतकेच नव्हे तर त्यांनी असेही सिद्ध केले आहे की खेडोपाड्यातून जे लोकसंगीत गायले जाते त्यामुळे तेथील पाळीव जनावरे व पक्ष्यांचे स्वास्थ्यही सुधारत असते.



# साहित्य सोनियाचिया खाणी

१. इजिप्त देशातील कोणत्या लेखकाला नोबेल पारितोषिक मिळाले? केव्हां?
२. भारतातील सर्व भाषांवर आपला प्रभाव पाडणारी भाषा कोणती?
३. दक्षिणेकडे कोणत्या भाषेवर तिचा जास्तीत जास्त प्रभाव पडलेला आढळतो?
४. संस्कृतशिवाय भारतातील दुसऱ्या कोणत्या भाषेचे व्याकरण २,५०० वर्षांपूर्वीच लिहिले गेले होते?
५. जम्मू व काश्मीरमधे कोणती भाषा बोलली जाते?
६. संस्कृतमधील सर्वात जुना ग्रन्थ कोणता?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे?

१. कीर्क पॅट्रिक मॅकमिलनने. १८३९ मधे.
२. फिलिप ॲास्टले नावाचा एक भूतपूर्व ब्रिटिश सेनेशी संबंधित माणूस. १७६९ मधे.
३. थॉमस एडिसनने. ५ फेब्रुवारी १८९३ रोजी. त्याचे नाव होते 'ब्लॅक मरिया'.
४. सर स्टॅमफोर्ड रॅफलसला. १८१९ मधे.
५. लक्षद्वीप. लोकसंख्या ४० लाखांहून अधिक. भाषा-मलयाळम्.

### साहित्य

१. नागिब महफौज.
२. संस्कृत.
३. तेलुगु.
४. तमिळ. व्याकरणाचे नाव आहे तोलकापियम्.
५. डोगरी.
६. ऋग्वेद.



जगातल्या पौराणिक कथा–३

## अप्रत्यक्ष वरदान

अर्गोसमधे देवी जूनोचे एक सुप्रसिद्ध मन्दिर होते. जूनो ही प्रसिद्ध कृषिदेवता सॅटर्नची कन्या व स्वर्गाचा देव ज्युपिटर याची पत्नी मानली जाते. या देवीच्या मन्दिराच्या प्रमुख पुजारिणीचे नाव होते सिडाइप्पे.

सिडाइप्पेचे क्लियोबिस व बायटन नावाचे दोन पुत्र होते. दोघेही तरुण, धष्टपुष्ट व सुदृढ होते. खेळ व शारीरिक शिक्षणाशी संबंधित सर्व चढाओढीत ते नेहमीच आपल्या साथीदारांना हरवत असत. पुजारिण असलेल्या आपल्या आईवर–सिडाइप्पे-वर त्यांची खूप भक्ती होती, तिला खूप मान देत असत ते.





एकदा आपल्या आईला बरोबर घेऊन, एका रथात बसून ते दोघे, बऱ्याच दूरच्या गावी आपल्या भावाला भेटायला गेले. तेथे पोचल्यावर दुर्दैवाने त्यांच्या रथाचे दोन्ही घोडे मरून गेले.



आता परत फिरायची वेळ येऊन ठेपली, तेव्हा कोठून तरी दोन घोडे मिळवण्याचा दोन्ही भावांनी खूप प्रयत्न केला. पण कोणाकडेच अनावश्यक घोडे नव्हते, त्यामुळे त्यांना घोडे मिळेनात. दोघेही फार निराश झाले.

संध्याकाळ झाली. दुसऱ्या दिवशी त्यांच्या आईला - त्या पुजारिणीला मन्दिरात हजर रहाणे आवश्यक होते; कारण त्या दिवशी मन्दिरात काही खास पूजा होती. इतक्या दूर चालत जाण्याइतकी ताकत तर सिडाइप्पेच्या पायात नव्हती !





दोघा भावांनी ही अडचण निवारण्याबद्दल काही खल केला आणि ते एका निर्णयावर आले. आईजवळ जाऊन ते म्हणाले–"आई, तू रथावर चढ बरं !" आईला वाटले की आपल्या मुलांनी घोड्यांची काही व्यवस्था केली असावी !

पण आईने रथात चढून पाहिले, तर रथ ओढायच्या जागी घोड्यांऐवजी, आपले दोघे मुलगेच हजर आहेत ! आईने खूप प्रयत्न करूनही ती आपल्या मुलांना रोखू शकली नाही. दोन तरुण मुले घोड्यांसारखा रथ ओढत आहेत–हे दृश्य विचित्र तर नक्कीच होते !





क्लियोबिस आणि बायटन यांना कधी चढ चढतानाही रथ ओढत पळावे लागले, तर कधी पावसात भिजतही धावावे लागले. पण ते कुठेही थांबले नाहीत. मंदिरात पूजेची वेळ जवळजवळ येत चालली तसतसे ते अधिकच वेगाने धावू लागले.

मन्दिरातलं शुभकार्य सुरू होण्याच्या अगदी थोड्याच अगोदर ते आपल्या आईला घेऊन शहराच्या हद्दीत पोचलेही ! लोकांनी ते दृश्य पाहिले अन् त्यांना त्याचे कारणही कळून चुकले. दोघा भावांच्या या कर्तृत्वाबद्दल व मातृभक्तीबद्दल लोकांनी त्यांची खूप स्तुति केली. रथ ओढत ते थकले-भागलेले व घामाने डबडबून गेलेले दोघे भाऊ थेट मन्दिराच्या पायऱ्यांजवळ येऊनच थांबले !





उत्सव समाप्त झाल्यावर पुजारिणीने देवीची विशेष प्रार्थना केली, की तिने आपल्या दोन्ही मुलांना या जगर-हाटीच्या सर्व दु:खांपासून दूर ठेवावे आणि त्यांना असा वर द्यावा कि ज्यामुळे कोणत्याही व्यक्तीला खूप हर्ष होईल ?

इकडे दोन्ही भाऊ आई रथातून उतरल्याबरोबर तेथेच मन्दिरात आडवे झाले अन् झालेल्या श्रमांमुळे झोपून गेले. दिवस, आठवडे, महिने आणि वर्षेही गेली. पण ते दोघे झोपेतून जागेच झाले नाहीत. मरेपर्यंत ते झोपेतच राहिले.





त्या दोघा भावांनी जीवनात कधी कसले दु:ख अनुभवले नव्हते आणि आता आईची प्रार्थना अशी सफल झाली ! अर्गोसच्या लोकांनी त्या भावांच्या गौरवार्थ एका विशाल शिळेतून त्या आदर्श पुत्रांची मूर्ति घडवून आपल्या नगरात उभी केली.



# स्वाभिमान

कल्याणपुरमधे सुधर्म नावाचा एक मजूर रहात असे. खूप कष्ट करून तो काही ना काही मिळवी, अन् जे मिळेल त्यातच सुखा-समाधानाने आपल्या कुटुंबाचा उदर-निर्वाह चालवी. एखाद्या दिवशी काम न मिळाले तर आपल्या परिवाराह तो खुशाल उपाशी राही, पण पैशांसाठी तो कुणापुढे हात पसरत नसे.

गावच्या सर्व लोकांना ठाऊक होते की सुधर्म गरीब आहे, पण तो अभिमानीही आहे. परन्तु काही लोक त्याच्या या अभिमानी वृत्तीला त्याचा 'गर्व' किंवा 'घमेंड' म्हणत.

त्याच गावात श्रीपती नावाचा एक व्यापारी रहात असे. हमाल, मजूर अशा कष्टकरी लोकांना तो गरजेनुसार कर्ज देई अन् भरपूर व्याजही वसूल करी. पण सुधर्म कधीही उधारीसाठी श्रीपतीकडे जात नसे. त्यामुळे श्रीपतीला वाटे की सुधर्म गर्विष्ठ आहे.

एकदा शेजारच्या गावाहून श्रीपतीचा व्याही रमानाथ त्याच्यांकडे आला. एकदा बोलता बोलता त्याला अचानक कसलीशी आठवण आली. त्याने श्रीपतीला विचारले–"या गावात सुधर्म नावाचा एक मजूर रहातो. त्याला एकदा जरा बोलावून घ्याना!"

"सुधर्म! आपलं त्याच्याशी काय काम आहे व्याहीबुवा ?" श्रीपतीने विचारले.

"सुधर्म मजूरी करण्याठी खूपदा आमच्या गावी येतो. आपला त्याच्याबाबत नक्कीच काही गैरसमज झाला असावा. तो घमेंड-खोर नाही. पण त्याच्यात आत्मविश्वास आणि स्वाभिमान हे गुण मात्र नक्कीच दिसून येतात." रमानाथ आग्रहाने बोलला.

यावर हसून श्रीपती म्हणाला–"पण इथे सर्वजण त्याला गर्विष्ठच म्हणतात."

अशोक नवाथे

रमानाथही यावर हसून म्हणाला– "सर्वजण त्याला गर्विष्ठ मानोत न मानोत, पण तुम्ही तर त्याला नक्कीच घमेंडखोर म्हणता ना? मला तर असं वाटतं की तुम्हाला घमेंड आणि स्वाभिमान यातला फरकच समजत नसावा!"

"बरं, ते असो. तुम्हाला त्याच्याशी काय काम आहे?" श्रीपतीने विचारले.

"आमच्या गावात त्रिनाथ नावाच्या शेतकऱ्याकडे खळयात पीक पसरण्याचं काम सुधर्मने केलं होतं. त्याची मजूरी त्रिनाथने माझ्या हाती पाठवलीय." रमानाथ उत्तरला.

श्रीपतीने ताबडतोब आपल्या नोकराला सुधर्मला बोलावून आणायची आज्ञा दिली. तेव्हा सुधर्मचा स्वाभिमान श्रीपतीला दाखवून देण्याच्या इराद्याने रमानाथ त्या नोकराला म्हणाला–"अरे थांब जरा. मी इथे आलेलो आहे, हे तू सुधर्मला सांगू नकोस. त्याला फक्त एवढंच म्हण, की आपल्या मालकाने तुला बोलावलं आहे."

सुधर्म आपल्या घरासमोर दोरी वळत बसलेला होता. श्रीपतीच्या नोकराचे बोलणे एकून सुधर्म म्हणाला–"मी आत्ता कामात आहे. माझं काम उगीचच मधे कशाला थांबवू? तुझ्या मालकाशी माझं काहीही काम नाही. अन् त्यांचं जर माझ्याशी काम असेल, तर त्यांनीच एकदा इथे यावं – असं सांग तुझ्या मालकाला."

जवळ बसलेला म्हातारा सुधर्मला म्हणाला–"अरे बाबा! श्रीपती बडा माणूस आहे. त्यांनी बोलावलं, अन् त्यांनाच इकडे यायला सांगावंस – हे बरं नाही दिसत!"

यावर हसून सुधर्म म्हणाला– 'तो कसं भारी व्याज घेतो, मला छान माहिती आहे. पैशानेच फक्त मोठा आहे तो."

सुधर्म काय म्हणाला, हे श्रीपतीच्या नोकराने परत येऊन त्याला सांगितले. यावर रागावून श्रीपती रमानाथकडे पाहून म्हणाला–"पाहिलंत किती घमेंडखोर आहे तो?"

त्याला शान्त करत रमानाथ म्हणाला– "आपण बोलावल्यावर ताबडतोब निघून यायला, तो काही आपला नोकर नाहीये. आपण हीच मुख्य गोष्ट विसरताय, होय नं?"

"तरीही काय झालं? माझा मान राखण्यासाठी तरी यायला हवं होतं की नाही त्यानं?" श्रीपतीचा राग अजून धुमसतच होता.

थोडा वेळ गप्प राहून रमानाथ पुन्हा बोलला–"एक गोष्ट लक्षात घ्या व्याही-बुवा, तुमचा निरोप ऐकून, जे ताबडतोब येऊन तुमच्यासमोर हात जोडून उभे राहतील, ते एक तर तुमचे देणेकरी किंवा तुमच्याकडून काही मदतीची आशा बाळगणारेच असणार. परंतु सुधर्म त्या प्रकारातला माणूस नाही. तो एक स्वाभिमानी गृहस्थ आहे."





हे ऐकून श्रीपती गप्पच राहिला. अर्थात त्याला रमानाथचे बोलणे रुचले, असे नव्हे! हे रमानाथच्याही ध्यानात आले, म्हणून तो मोठ्या आत्मविश्वासाने म्हणाला–"मी आत्ताच सिद्ध करून दाखवतो कि सुधर्म स्वाभिमानी आहे, पण घमेंडखोर नक्कीच नाही." नन्तर त्याने नोकराला बोलावून म्हटले–"अरे, जरा पुन्हा सुधर्मकडे जाऊन त्याला सांग की आपले मालक आजारी आहेत अन् त्यांना ताप आलेला आहे. एकदा त्याने स्वतःच यावं, कारण जरा महत्त्वाचं काम आहे.

श्रीपतीच्या नोकराचा निरोप ऐकून सुधर्म तावडतोब श्रीपतीकडे आला. श्रीपती आणि रमानाथ यांना नमस्कार करून तो म्हणाला–"मला आत्ताच कळलं की आपली तब्येत बरी नाही."

"माझ्या तब्येतीचं काही विशेष नाही. खरं म्हणजे माझ्या व्याहीबुवांनाच तुला भेटायचं होतं." श्रीपती हसत म्हणाला. रमानाथ सुधर्मला पैसे देत म्हणाला–"अरे, हे पैसे त्रिनाथने तुला देण्यासाठी माझ्या हाती दिले आहेत. तुला त्यांनी मजुरीचे काही पैसे द्यायचे होते म्हणे ते आहेत हे."

सुधर्मने ते पैसे घेतले आणि श्रीपती व रमानाथ यांना नमस्कार करून तो निघून गेला. आता रमानाथ श्रीपतीला म्हणाला–"सुधर्म घमेंडखोरच असता तर दुसरा निरोप मिळूनही तो आला नसता इथे. पण तुम्ही आजारी आहात असं कळल, तेव्हा त्याला वाटलं की तुम्हाला त्याची काही गरज आहे म्हणून तो तावडतोब निघून आला. त्याच्यात जी सहानुभूतीची भावना आहे, त्याचाच पुरावा आहे हा! काय?"

उत्तरादाखल डोके हलवून श्रीपती म्हणाला–"माणसांचा स्वभाव ओळखण मोठं कठीण काम आहे. आजपर्यंत तर मी त्याला घमेंडखोरच मानत होतो. पण आता कळून चुकलं की तो दुसऱ्यांना सहानुभूति दाखवणारा एक चांगला माणूस आहे. स्वाभिमानी असावं, कोणाकडे काही मागू नये ही चांगलीच गोष्ट आहे."





# वीर हनुमान

## ९. संपातीची कथा

स्वयंप्रभेच्या मदतीने बिळाबाहेर पडलेल्या वानरांना उंच उंच लाटा उसळून गर्जना करणारा विशाल सागर आपल्या समोर दिसला. विंध्य पर्वताच्या नैऋत्येकडील एका डोंगरावर फळ-वृक्षांखाली बसलेले वानर मोठ्या चिंतेत पडले–सुग्रीवाने दिलेली मुदत तर संपली. त्यांना आता अशी भीति वाटली की सुग्रीव आपल्यावर खूप रागावणार!

या वेळी युवराज अंगद वानरांना सांगू लागला–"मित्रांनो, आपण ऋक्षबिळांत होतो, तेव्हांच सुग्रीवाने आपल्याला दिलेली मुदत संपली. प्रथम हनुमानाच्या सांगण्यावरून सुग्रीवानें आपल्याला पंधरा दिवसांसाठी बोलविले होते. ही आश्वयुज महिन्यातील गोष्ट आहे. मग लक्ष्मण रागावून परतू लागला, तेव्हा सुग्रीवाने आणखी दहा दिवसांनी आपली मुदत वाढवली. नंतर आपल्याला परत यायला एक महिन्याची मुदत दिली गेली, आता ती पण संपली. विचार केला पाहिजे आता आपण काय करायचं? आपल्याला अजून सीता सापडली नाही. सीतेचा शोध करण्यासाठी आपण आपल्या प्रयत्नात काही ही कसर केलेली नाही. तरी ही अजून आपल्याला तिचा पत्ता लागलेला नाही ही गोष्ट तर खरीच. दोन्ही बाजूंनी आपण सुग्रीवाचा आज्ञा-भंग केलेला आहे. सुग्रीव तसा मोठा क्रूर आहे, तो आपल्याला ठार करील. तिथे जाऊन मृत्यु-मुखी



पडण्यापेक्षा इथेच प्रायोपवेशन करून प्राण सोडावा हे बरे! माझ्याबद्दल सुग्रीवाचे मन चांगले राहणार नाही. मला युवराज बनवले रामाने, सुग्रीवाने नाही. म्हणून संधि मिळाली तर सुग्रीव मला मारून टाकायला कचरणार नाही. आपल्या लोकांना दुःख-सागरात टाकून मी किष्किंधेत का मरावं? त्यापेक्षा इथेच अनशन करून या सागर-तीरावर प्राण सोडलेला बरा!"

हे ऐकून वानर-वीरांना अतिशय दुःख झालं. ते म्हणाले–"जर आपण सीतेला शोधून काढू शकलो, तरच सुग्रीवाकडे जाऊ. नाही तर इथेच मरून जाऊ. आपल्यावर सोपवलेली कामगिरी अर्धवट सोडून परत जाणे आपल्याला शोभत नाही. आपण प्रयत्नांची शर्थ केलेली आहे. पण दैव आपल्याला अनुकूल दिसत नाही."

तार म्हणाला–"आपण मरायचं कशासाठी? या बिळात जाऊन आपण तिथेच सुख-शांतिपूर्वक राहू. आपण काळजी करण्याचं काय कारण आहे? या बिळात आपल्यापर्यंत कोणी पोचू शकणार नाही. तिथे खायला-प्यायला भरपूर आहे. आपल्याला रामाचं भय नाही, नि सुग्रीवाचं ही नाही!"

हनुमान हे सर्व ऐकत होता. तो मनातल्या मनात विचार करू लागला–सुग्रीवाच्या वानर-राज्यावर अंगद एक दिवस जरूर ताबा मिळवील. वालीचा हा मुलगा अंगद मोठा बुद्धिमान आहे. देश-कालानुसार काय करायचं ते याला चांगलं समजतं!

पण अंगदाला तो म्हणाला–"अंगद, तू युद्धात आपल्या वडिलांना हरवू शकणार नाहीस. हे चपळ वानर नेहमीच काही तुझ्या बरोबर असणार नाहीत. यांना ही मुलं-बाळं नि परिवार आहे. जांबवान नि या वानर-वीरांना सुग्रीवापासून अलग करून मला आपल्या बाजूला करून घेणं तुला जमणार नाही निश्चित! लक्ष्मणाचे बाण या ऋक्षबिळावर ही आक्रमण करू





शकतील, आणि सहज ते नष्ट करून टाकतील. सुग्रीवाशी शत्रुत्व करून तू जर या बिळात राहिलास तर हे वानर तुला सोडून जातील, नि मग तुला एकट्याला इथं कोणी विचारणार नाही. राम-लक्ष्मण तुला जिवंत सोडणार नाहीत. सुग्रीव एक न्यायी व धर्मनिष्ठ वानर-प्रमुख आहे. तुझ्यावर त्याचं प्रेम आहे. तुझ्या आईबद्दल त्याच्या मनात अपूर्व आदर आहे. तो तुला आपल्या मुलासारखं मानतो."

हनुमानाचं हे सर्व बोलणं पसंत न करीत अंगद म्हणाला–"छे, छे! असं मुळीच नाही. सुग्रीवात एक ही सद्गुण नाही. गुंफेच्या द्वारावर पहारा करण्याचं काम सोपवून मोठा भाऊ जेव्हा शत्रूशी लढायला गेला, तेव्हा सुग्रीवाने दुष्ट बुद्धीने गुंफेचं दार मोठा दगड लावून बंद केलं माहीत आहे? रामाने केवढे उपकार केले याच्यावर! पण प्रत्युपकाराची गोष्ट हा विसरून गेला. शेवटी लक्ष्मणच्या भीतीने हा आता सीतेचा शोध करीत आहे. मोठ्या सद्बुद्धीने करीत आहे असं नाही. आज मी जे काही बोलत आहे, ते त्याच्यापर्यंत पोचल्यावर तो काय मला जिवंत राहू देईल? मी नाही किष्किंधेला परत येणार, मी इथेच प्रायोपवेशन करीन. तुम्ही सर्व जण किष्किंधेला जा. राम-लक्ष्मणांना माझा नमस्कार सांगा."

आता अंगदाला आपल्या आई–ताराची आठवण आली नि तो फार दुःखी झाला. त्याने जमिनीवर दर्भ पसरले आणि त्यांवर आडवा झाला. हे पाहून सर्व वानर आक्रोश करू लागले. अंगद आपला निर्णय बदलणार नाही हे त्यांच्या लक्षात आलं. म्हणून समुद्रस्नान करून त्यांनी ही दर्भ आंथरून त्यांवर बसले. रामाचा वनवास, सीतेचं अपहरण नि जटायूचा मृत्यु, वालीचा वध आणि सीतेचा शोध वगैरे विषयांवर ते आपापसात बोलू लागले.



वानरांचा आक्रोश ऐकून गुंफेतून एक गिधाड बाहेर आलं. सहज त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले–"वा! आता आपल्याला पोटभर जेवण मिळणार!" हे ऐकून वानर खूपच घाबरले.

अंगद हनुमानाला म्हणाला–"हा गिद्ध म्हणजे सूर्याचा मुलगा संपाति होय. रामासाठी रावणाशी लढून जटायूने कसे प्राण सोडले हे आपल्याला माहीतच आहे. असंच राम-कार्यासाठी आपण ही प्राण दिले तर केवढी आनंदाची गोष्ट होईल!"

हे सर्व ऐकून संपाति संतापून ओरडला–"माझा छोटा भाऊ जटायु मेल्याची आठवण करून देऊन मला दुःखी करणारा कोण हा दुष्ट? जटायु नि रावण यांच्यात कशासाठी लढाई झाली? फारा दिवसांनी जटायूचं नाव ऐकतो आहे मी!"

यानंतर संपाति वानरांना म्हणाला–"वानरांनो, सूर्यकिरणांच्या प्रखर उष्णतेने माझे पंख जळून गेले. मी या पर्वतावरून उतरून खाली येऊ शकत नाही. तुम्ही मला खाली उतरवाल?"

संपातीच्या बोलण्यावर वानरांचा विश्वास नव्हता. कारण प्रथम वानरांना पाहून संपाति म्हणाला होता–"आता आपल्याला पोट भर जेवण मिळणार!" मग त्यांनी असा विचार केला की आपण तर मरायला तयार आहोत. आता संपातीला कशासाठी घाबरायचं?

अंगद डोंगरावर चढला, त्याने संपातीला खाली उतरवलं. आणि मग आपली गोष्ट सांगितली–

"इक्ष्वाकु वंशांतील राजा दशरथाचा मुलगा राम आपल्या वडिलांनी दिलेलं वचन पाळण्यासाठी छोटा भाऊ लक्ष्मण व पत्नी सीता यांना घेऊन वनवासासाठी दंडकारण्यात आला. तो जंगलात रहात असताना रावणाने सीतेला जबरदस्तीने पळवून नेले. रावण जेव्हा आकाश-मार्गा-तून चालला होता, तेव्हा दशरथाचा मित्र जटायु याने रावणाचे हे कुकर्म पाहिले.





सीतेला रावणाच्या तावडीतून सोडवण्या-साठी जटायूने रावणाशी युद्ध केले. या प्रयत्नात रावणाने जटायूला मारून टाकले. रामाने जटायूचा दाह-संस्कार केला. आमच्या या प्रांतात येऊन आमच्या काकांना मदत करण्यासाठी रामाने वालीचा वध केला नि सुग्रीवाला वानरांचा राजा बनवले. सुग्री-वाच्या आज्ञेनुसार आम्ही सीतेचा शोध करीत इथे आलो. आम्हाला अजून तरी सीता सापडली नाही. जर आम्ही असेच परत गेलो तर रामाकडून वा सुग्रीवाकडून आम्हाला चांगलेच शासन होईल."

तेव्हा संपातीने मोठ्या अभिमानाने सांगितले–"हे वानर, रावणाने ज्या जटायूचा वध केल्याचे तू सांगत आहेस, तो माझा धाकटा भाऊ होय. मी तर आता म्हातारा झालो आहे. मला आता पंख ही नाहीत. म्हणून रावणावर सूड उगवणे मला शक्य नाही. आता मी काय करू? वृत्रासुराचा वध करण्याच्या वेळी आम्ही दोघे भाऊ उडत सूर्याच्या खूप जवळ पोचलो. जेव्हा सूर्य अगदी डोक्यावर आला, तेव्हा जटायूला त्याच्या उष्णतेचा फारच त्रास होऊ लागला. त्याला वाचविण्यासाठी मी आपल्या पंखांनी छाया दिली. पण या खटाटोपात माझे पंख जळाले, आणि मी या विन्ध्य पर्वतावर येऊन आदळलो. तेव्हां पासून मी इथेच रहातो आहे. मला आपल्या धाकट्या भावाची काहीच खबर मिळाली नाही."

हे ऐकून अंगदाने संपातीला विचारले–"तो राक्षस राजा रावण कुठे रहातो हे तुला माहीत आहे का?"

संपाति सांगू लागला–"हे वानर वीरा, रावण एका सुंदर स्त्रीला आपल्या बरोबर घेऊन गेला, हे मी जाणतो. ती त्याच्या तावडीतून सुटण्याचा प्रयत्न करीत होती. ती 'हे राम! हे लक्ष्मण!' असे ओरडत होती. तो सीताच असावी असं आता मला वाटतं. लंका नावाच्या नगरीत तो रावण राहतो. तो विश्रवसूचा मुलगा आणि



कुबेराचा छोटा भाऊ आहे. इथून सुमारे १०० कोसांच्या अंतरावर समुद्रात एक बेट आहे. त्या बेटावरच ही लंकानगरी आहे. तुम्ही जर समुद्र पार करून त्या लंका-नगरीत पोचू शकलात तर तेथे तुम्हाला रावण नि सीता दिसतील. तुम्ही लोक जर रामाकडून रावणाचा वध करवू शकलात, तर माझ्या मनांतील सूडाग्नि शांत होईल. समुद्र पार करून जाण्याची आपली योजना तुम्ही तयार करा."

यानंतर वानरांनी संपातीला समुद्र-किनारी पोचवलं. तेथे संपातीने आपल्या धाकट्या भावासाठी जलतर्पण केलं. सीतेचा पत्ता लागला म्हणून वानर खूश झाले.

जांबवानने वानरां तर्फे संपातीला विचारलं–"सीतेच्या अपहरणाची कथा आपण आम्हाला अमळ विस्तारने सांगाल?"

संपाति सांगू लागला–"पंख जळून मी या विंध्य पर्वतावर पडलो, तेव्हां पासून मी इथंच राहू लागलो. म्हातारा झालो होतो. माझा मुलगा सुपार्श्व मला भोजन आणून देई. एक दिवशी सूर्यास्तापर्यंत तो आलाच नाही. आणखी काही वेळ गेला, तरी आला नाही. अगोदरच मी म्हातारा, त्यात भुकेने व्याकुळ झालो होतो. मी त्याच्यावर खूप रागावलो. तेव्हा मला शांत करण्यासाठी जे घडलं ते सारं त्याने मला सांगितलं. माझं भोजन आणण्यासाठी खरं म्हणजे तो योग्य वेळी महेन्द्र पर्वतावर गेला होता. तेथे त्याने पाहिलं की एक काळा माणूस एका रूपवती स्त्रीला घेऊन चालला आहे. भोजनासाठी त्या दोघांनाच पकडण्याचा विचार करून माझा मुलगा तेथे पोचला. तो काळा माणूस नम्रतापूर्वक सुपार्श्वला म्हणाला–"तू बाजूला हो, मला जाऊ दे." त्याची नम्रता पाहून सुपार्श्वने त्याला सोडून दिले. तो त्यांच्या मार्गावरून बाजूला झाला. यानंतर तो तीव्र गतीने आपल्या देशी निघून गेला. सुपार्श्वने आकाशातील भूतांना विचारून हे जाणून घेतलं की तो काळा माणूस राक्षसांचा राजा





रावण होता नि 'राम-लक्ष्मणा' ना पुकारणारी ती स्त्री सीता होती. अशा रीतीने माझ्या मुलाला समजलं की रावण बळजबरीने सीतेला पळवून घेऊन गेलेला आहे. भोजन न घेता उशीरा आल्याचं कारण सुपार्श्वने अशा रीतीने मला सांगितले."

यानंतर वानरांनी संपातीला उचलून पुन्हा पर्वतावर ठेवून दिले. तिथे बसून संपातीने आपले आणखी काही अनुभव वानरांना सांगितले.

"माझे पंख जळून मी जेव्हा या विन्ध्य पर्वतावर पडलो, तेव्हा इथे एक आश्रम होता. त्या आश्रमात निशाकर नावाचा एक मुनी रहात असे. ही सर्व आठ हजार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. पर्वतावर पडल्यावर येथील खडकाळ भागातील लहान-मोठे दगड पार करीत मी महर्षींच्या दर्शनासाठी निघालो. एका झाडाखाली उभा राहून मी महर्षींची वाट पाहू लागलो. तेव्हा मला एक विचित्र दृश्य दिसलं. महर्षि स्नान करून दक्षिणेकडून येत होते, नि त्यांच्या मागे अस्वल, हरिण, वाघ, सिंह, हत्ती, साप वगैरेंचा थवा येत होता. जेव्हा महर्षि आश्रमातील आपल्या कुटीत शिरले, तेव्हा सर्व जनावरे आपापल्या मार्गाने निघून गेली. निशाकर महर्षींनी आत जाताना मला पाहिलं होतं. ते थोड्या वेळात बाहेर आले नि मला म्हणाले–"गिधाडांचे राजे समजले जाणारे दोन भाऊ मला माहीत आहेत. त्यातला मोठा भाऊ संपाति तू न? तुझाच धाकटा भाऊ जटायु नाही का? कधी कधी मनुष्य रूप धारण करून तुम्ही मला नमस्कार करीत होता! तू आता आजारी आहेस का? तुझ्या पंखांना हे काय झालंय? तुला कोणी शिक्षा तर केली नाही?"

मी जे जे घडलं ते सर्व महर्षींना सांगितलं. कैलास पर्वतावर ऋषींच्या समोर मी व माझ्या छोट्या भावाने शपथ घेतली की सूर्यास्त होईपर्यंत आम्ही दोघं सूर्याच्या मागे उडत राहू. पृथ्वीवरील शहरे

आम्हाला गाडीच्या चाकांसारखी छोटी दिसू लागली. रस्त्यात आम्हाला वेदांचे मन्त्रोच्चार ऐकू आले. लाल वस्त्रे परिधान केलेल्या गात चाललेल्या स्त्रिया आम्हाला दिसल्या. आम्ही आणखी अधिक उंच जाऊन उडू लागलो. आम्हाला जंगलं छोट्या दगडासारखी व मोठमोठ्या नद्या धाग्यासारख्या दिसू लागल्या. आम्ही खूप दमलो. भीतीमुळे बुद्धिभ्रम झाला. बेशुद्ध होणार की काय असं वाटू लागलं! आम्हाला दिशा कळेनाशा झाल्या. डोळ्यांना दिसेनासं झालं. त्या उंचीवर सूर्य नि पृथ्वी सारख्याच आकाराची दिसली.

एवढ्यात जटायु मूर्च्छित होऊन खाली पडू लागला. मी पण त्याच्या बरोबर खाली आलो आणि आपल्या पंखांनी त्याला छाया केली. त्यावेळी सूर्याच्या उष्णते-पासून जटायु तर वाचला, पण माझे पंख जळून गेले. जटायु लोकवस्तीत पडला असावा. हे सर्व मी निशाकर महर्षींना सांगितलं आणि म्हणालो–'आता मी जिवंत राहू इच्छित नाही, म्हणून पर्वता-वरून उडी मारून जीव देतो."

त्यावेळी महर्षींनी मला भविष्य काळात घडणाऱ्या काही घटना सांगितल्या. ते म्हणाले–'सीतेचा शोध करीत तुम्ही इथं याल आणि मग मी तुम्हाला मदत करीन. त्याच वेळी मलां नवे पंख फुटतील.' महर्षींच्या बोलण्यावर विश्वास ठेवून मी तुमची वाट पहात राहिलो."

हे सर्व सांगत असतानाच संपातीला नवे पंख फुटले. हे सर्व वानरांनी पाहिलं. त्याच्या पंखावरील रोम लाल लाल होते. आपल्याला पंख आलेले पाहून संपातीला खूप आनन्द झाला. तो म्हणाला–"निशाकर महर्षींनी भविष्य-वाणी केल्याप्रमाणे मला नवे पंख आले. पहिल्या सारखी शक्ति मला आता प्राप्त झाली आहे. तुमच्या प्रयत्नात तुम्ही यशस्वी होणार असं मला वाटतंय. मी आता आपल्या पंखांची ताकत आजमावून पहातो." असं म्हणून संपाति आकाशात उडाला.





# चांदीचे सुळे

एका गावात पूरन नि केशव नावाचे दोन मित्र रहात असत, दोघे बिचारे अनाथ, असहाय्य होते. त्यांना कोणी नातेवाईक नव्हते. त्यांच्यावर प्रेम करणारी कोणी मित्र-मंडळी नव्हती. रहायला एकादी छोटी मोडकी-तोडकी झोपडी पण नव्हती त्यांच्या-जवळ. दिवसभर गावात हिंडून मिळेल ते मोल-मजुरीचे काम करीत आणि जे मिळेल त्यातून डाळ-तांदूळ खरेदी करून संध्याकाळी गावा बाहेरच्या एका वडाच्या झाडापाशी येत.

त्या वडाच्या बुंध्यात एक मोठी ढोली होती. त्यात आपली स्वयंपाकाची भांडी व कपडे ते लपवून ठेवीत. त्या झाडाखालीच तीन दगड मांडून आपला स्वयंपाक करीत नि जवळच्या झऱ्यावर जाऊन आंघोळ करीत. जेव्हा स्नान करून येत, तेव्हा चांगले भुकेले असत. झाडाखाली आपलं पोतं टाकून गरम गरम भात-आमटीवर ताव मारीत. दुसऱ्या दिवशीच्या सकाळसाठी काही भात शिल्लक ठेवीत आणि निश्चित-पणे पोत्यावरच झोपी जात. अशा रीतीने त्यांचं सर्वस्व या वडाच्या झाडाखालीच असे.

पूरन आणि केशव दोघांच्या ही मनात बरेच दिवस एक स्वप्न होतं. या झाडा-खालीच एक छोटेखानी झोपडी बनवावी. दोघांनी ही लग्न करून आनंदात रहावे यासाठी दोन्ही मित्रांनी थोडी माया पण जोडून ठेवली.

एक दिवशी संध्याकाळी आपलं काम संपल्यावर दोघांनी डाळतांदूळ, मीठ-मसाला सगळं खरेदी केलं नि वडापाशी आले, भोजनाच्या तयारीला लागले. त्यांनी एक चमत्कार पाहिला. वडाच्या ढोलीतून दोन लांब हात त्यांना आपली भांडी देऊ लागले. पूरन आणि केशवला मोठं आश्चर्य

विजया आठवले



वाटलं. त्याच वेळी मोठया पसरट चेहऱ्याचं एक भूत बाहेर डोकवू लागलं. दोघांना उद्देशून भूत म्हणालं–"मित्रांनो, तुमची परवानगी न घेता मी तुमच्या ढोलीत शिरलो, म्हणून रागावू नका माझ्यावर हं!"

आता त्यांना वाटलेली भीती थोडी कमी झाली. आकडून ते म्हणाले–"तुझं एवढं धाडस की आमच्या गैरहजेरीत सरळ ढोलीत शिरलास नि आम्हाला मित्र म्हणवतोस? अगोदर बाहेर ये, चांगली खोड मोडतो तुझी!"

भुताने ढोलीतून पटकन उडी मारली आणि केशव नि पूरनच्या पायांवर लोटांगण घातलं. म्हणाले–"जर तुम्ही मला स्वीकारलं नाही, तर मी कुठे जाऊ बिचारा तोंड लपवायला? माझ्या सहकाऱ्यांनी मला घराबाहेर काढलं आहे. तुम्ही दोघे पण मोठे सुस्वभावी आहात हे मला कळून चुकलं. म्हणून मी तुमच्या आश्रयास आलो आहे."

भुताची व्यथा जाणून दोघांना त्याची दया आली. त्यांनी विचारलं–"आपल्या सहकाऱ्यांसह तू राहू शकत नाहीस याचं काय बरं कारण?"

भुताने मोठा आ वासून आपलं तोंड उघडून दाखवलं आणि मोठ्या दुःखाने म्हणालं–"पहा, माझे सुळे उखडून गेले आहेत. मला दुसऱ्या भुतांनी अशाकरता बाहेर काढलं की माझ्यासारखा कोणी त्यांच्यात असला तर त्यांचा अपमान होईल तुम्ही मला तुमच्या बरोबर राहू द्याल, तर मी तुम्हाला मदत करीन. तुम्ही जे काही खाल, त्यांतलचं थोडंसं मला दिलं कीं पुरे!"

केशव काही बोलणार, एवढ्यात पूरनने त्याला गप्प बसविले नि भुताला म्हणाला–"तुझे सुळे कसे पडले हे तू सांगितलंच नाहीस?"

पूरन कडे पहात भूत सांगू लागलं–"ती एक लांब गोष्ट आहे...!" तो पुढे काही सांगणार, एवढ्यात केशव रागावून म्हणाला–"अरे, पूरन, याचे सुळे कसे





उखडले हे जाणून आपल्याला काय करायचंय बरं? चल."

भूत रडत सांगू लागलं–"असं का म्हणता तुम्ही? माझे सुळे पडून गेल्यामुळे मी आता काही कमवू शकण्याच्या योग्यतेचा राहिलो नाही. अशा परिस्थितीत जिवंत राहण्यात काय हाशील आहे? यापेक्षा तर मरून गेलेलं बरं!" असं म्हणून भूत वडाच्या बुंध्यावर डोकं आपटून घेऊ लागलं.

केशवला भुताची दया आली. तो म्हणाला–"बरं तर, ठीक आहे. तू आता काळजी करू नकोस. तुझं मरण माझ्याच्याने पाहवणार नाही. तू इथंच रहा, पण तुला इथं शिस्तीत रहावं लागेल हे लक्षात ठेव."

भुताने नम्रपणे दोन्ही मित्रांपाशी कृतज्ञता प्रकट केली. पूरनने पुन्हा एकदा विचारलं–"पण तुझे सुळे कशामुळे पडले ते तर सांग."

एक दीर्घ श्वास सोडून भूत सांगू लागलं–"वेळ आली म्हणजे सगळं काही सांगेन. आता उशीर झाला आहे, भोजनाच्या तयारीला लागलं पाहिजे ना?" भुताने हा हा म्हणतां स्वयंपाक तयार केला. पूरन आणि केशव सह भूत ही जेवायला बसलं. भुताने तयार केलेले पदार्थ दोन्ही मित्रांना खूप आवडले. भोजन करून सर्व जण तृप्त झाले.

दुसऱ्या दिवशी सकाळी पूरन नि केशवच्या आधीच भूत झोपेतून जागं झालं. झाडाखाली पडलेली सुकी पानं, वडाची फळं सर्व उचलून स्वच्छतेचं काम केलं. तलावावर जाऊन दोघांचे कपडे असे स्वच्छ धुवून आणले की ते चमकू लागले. नंतर स्वयंपाकासाठी लागणारी सुकी लाकडं गोळा करून घेऊन आलं. भुताची कामं करण्याची पद्धत पाहून दोघे मित्र अतिशय खुश झाले.

पूरन आणि केशव यांनी आता अधिक मेहनत करून कमाई करायला सुरुवात केली. कारण आता आपल्या बरोबर त्यांना भुताला ही जेवणखाण द्यायचं होतं.



तोंडाने जरी ते मूठ भर अन्न म्हणत असलं तरी प्रत्यक्षात खूपच अन्न लागायचं त्याला!

संध्याकाळी मजुरीचे पैसे देताना शेटजींनी हसत विचारलं—"काय रे पूरन आणि केशव, मला न सांगता तुम्ही दोघांनी लग्न उरकलं की काय? नेहमी पेक्षा अधिक मजुरी मिळविण्याचा प्रयत्न करीत आहात?"

हसत हसत शेटजी असं विचारीत होते, तेव्हा त्यांचा चमकणारा सोन्याचा दात दोघांना दिसला.

रस्त्यात पूरन केशवला म्हणाला—"अरे केशव, माणसाचे दात पडले तर सोन्याचे दात बनवून लावता येतात न? तसेच आपल्या भुताला सोन्याचे सुळे लावले तर काय होईल बरं?"

केशव आश्चर्याने म्हणाला—"सोन्याचे सुळे? नको, चांदीचे सुळे भुताला बनवून देऊ या आपण. सोन्याचे आपल्याला पर्वडणार नाहीत! सुळे सोन्याचे काय नि चांदीचे काय, त्यात काय फरक पडणार? सुळे बसविले की भुतात पहिल्यासारखी ताकत येईल, आणि मग आपण मागू ते ते आपल्याला आणून देईल! कृतज्ञतापूर्वक आपलीच सेवा करीत राहील ते. आपण भुताला हे सांगितलं तर खुश होऊन जाईल नाही ते?"

दुसऱ्या दिवशी पूरन आणि केशव यांनी भुताला आपला विचार सांगितला, आणि जमवलेली सर्व रक्कम घेऊन त्यांनी शहराचा रस्ता धरला. भुताच्या डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागले.

शहरात पोचले तेव्हा दोन्ही मित्रांच्या मनात एक प्रश्न निर्माण झाला. सोन्या-चांदीचे दागिने बनवणाऱ्या सोनाराकडे जाऊन त्यांनी विचारलं तेव्हा ते दोघांकडे अशा नजरेने पाहू लागले की जणू ते दोघे भूतच आहेत!

थोडा विचार करून दोघे जण हेमांश नावाच्या सोनाराकडे गेले. नि त्याला म्हणाले—"आमची एक नाटक कंपनी आहे. आम्हाला राक्षसाचं काय करायचंय. म्हणून चांदीचे सुळे पाहिजेत. द्याल तेवढे बनवून?"



हेमांशने दोन्ही मित्रांकडून पैसे घेतले आणि एक आठवड्याने त्यांना यायला सांगितले. एक आठवडा संपताच दोघे जण सोनाराकडे आले. हेमांश जवळ सात वर्षांचा एक मुलगा चांदीचे सुळे इकडून-तिकडून पहात बसला होता, नि हेमांशला अनेक अनेक प्रश्न विचारीत होता.

पूरन आणि केशव यांना पाहताच हेमांश सोनार म्हणाला—"सुस्वागतम्! अगदी वेळेवर आलात." मुलाकडे बोट दाखवीत तो म्हणाला—"हा माझा मुलगा कंचन. चांदीच्या सुळ्यांबाबत निरनिराळे प्रश्न विचारून याने मला सतावून सोडलं आहे."

कंचनने आश्चर्याने दोन्ही मित्रांकडे पाहिले आणि विचारले—"ओह, तर चांदीचे सुळे बनवून घेणारे आपण तर? एका नाटकात तुम्ही भुताचं काम करणार म्हणे. ती गोष्ट मला सांगाल? भुताला चांदीचे सुळे कशाला लावायला लागतात? तुम्हीच मला ते समजून सांगू शकाल!"

पूरनने केशवकडे पाहिले की आता काय उत्तर द्यावे. केशवने अमळ विचार केला नि म्हणाला—"ती गोष्ट?—ती अशी आहे! एका मांत्रिकाने एक बाटलीत एका भुताला बंद करून ठेवलं. ते भूत नुसतं आळशीच नव्हतं, मोठं धीट आणि दंगेखोर होतं. मांत्रिकाने काही दिवस त्याचा रंग पाहिला, अन मग त्याचे सुळे उपटून त्याला सोडून दिले. ते भूत एका गरीब माणसाकडे गेलं नि त्याला आपल्यावर आलेलं संकट सांगितलं. त्या गरीबाला त्याची दया आली. त्याने आपल्या जवळची सगळी शिल्लक खर्च करून त्या भुतासाठी चांदीचे सुळे बनविले. भुताला फार कृतज्ञता वाटली आणि ते त्या गरीबाची सर्व प्रकारे सेवा करू लागलं."

ही गोष्ट ऐकून कंचन जोरजोरात हसू लागला. दोन्ही मित्रांना मोठं आश्चर्य



वाटलं, ते कंचनकडेच पाहू लागले. कंचन म्हणाला–"तुमच्या गोष्टीत एक चूक आहे. आळशी नि दंगेखोर भूत माणसाला कशासाठी मदत करील? सुळे मिळाले की ते धूम ठोकील!"

कंचनचे बोल ऐकून पूरन नि केशव दोघे ही थोडे घाबरले. विचार करू लागले. चांदीचे सुळे घेऊन दोघे ही परतले. रस्त्यात केशवने पूरनला विचारलं–"कंचन म्हणतो त्याप्रमाणे चांदीचे सुळे मिळाल्यावर हे भूत आपल्याला धोका देऊन पळून तर नाही ना जाणार?"

पूरनने आपला विचार सांगितला– "मला तरी आपलं हे भूत चांगलं वाटतंय! तरी पण आपण त्याच्याबद्दल चांगली नीट चौकशी करू."

ते दोघे वडापाशी आले. भुताला सगळं सांगून त्यांनी विचारलं–"तो मुलगा म्हणतो तसं तर नाही ना घडणार? तसं झालं तर आम्ही तुला त्या तलावात बुडवून टाकू. समजलं?"

अश्रू गाळीत भूत म्हणालं–"माझे सुळे कसे गेले हे मला आता तुम्हांला सांगितलंच पाहिजे." नि भुताने आपली गोष्ट सांगायला सुरुवात केली–

"ज्याने पकडून मला बाटलीत बंद करून ठेवलं होतं, त्या भूतवैद्याचं नाव प्रेतनारायण भूतशर्मा. त्याचा एक मित्र आहे पिशाचप्रिय भूतनाथ. त्याने पण एका भुताला पकडलं होतं. या दोन्ही मांत्रिकांनी आपापल्या भुताच्या चांगुलपणाबाबत खूप चर्चा केली. आम्हा दोन्ही भुतात ते निरनिराळ्या चढाओढी लावीत. ताडाचं झाड उपटून ते खांद्यावर घेऊन एक-दोन फर्लांग पळत जाणे, नदीत उडी मारून मगरीशी लढणे नि त्यांना मारून किनाऱ्यावर आणणे– अशा प्रकारच्या चढाओढी आमच्यात होत.

एकदा त्या दुष्टांच्या मनात एक भलताच विचार आला. दोन मोठमोठ्या दगडांना त्यांनी दोर बांधले. हे दोर दातात पकडून ते दगड एक फर्लांग अंतरावर असलेल्या टेकडीवर ओढत घेऊन जाण्याची स्पर्धा त्यांनी योजली. या चढाओढीत आपल्या दातांनी तो दगड ओढीत असताना माझे सुळे बाहेर आले. माझा पराजय झाला. प्रेतनारायणने माझ्यावर रागावून मला मारपीट केली नि पळवून लावलं. यानंतर मी तुम्हा दोघांच्या आश्रयाला आलो."

हे सर्व ऐकून पूरन आणि केशव दोघांना ही खूप आनंद झाला. दोघांना ही वाटलं असं शक्तिशाली भूत सुळे लावल्यावर तर आपल्याला खूपच उपयोगी पडेल. एखादा गाडलेला खजिना ही ते खोदून आपल्याला काढून देईल. त्या दोघांच्या मनात आशा उत्पन्न झाली की असं झालं तर आपण छान इमारत बांधू, लग्न करू आणि आनंदात आपले दिवस घालवू.

मग पूरन आणि केशव यांनी भुताच्या तोंडात चांदीचे सुळे लावून दिले. ते त्याला तलावापाशी घेऊन गेले. नि म्हणाले– "बघ एकदा पाण्यात, कसे छान दिसत आहेत हे सुळे तुला!"

भुताने तलावातल्या पाण्यात आपलं प्रतिबिंब पाहिलं. मोठ्या उत्साहाने ते म्हणालं–"वा! चांदीचे सुळे! फारच छान! माझ्या मूळच्या सुळ्यांपेक्षा ही हे चांदीचे सुळेच अधिक सुंदर दिसताहेत!" पूरन आणि केशव त्याला काही विचारणार एवढ्यात भूत पाहता पाहता पळून गेलं.

दोन्ही मित्र निराश होऊन वडाकडे परत आले. पूरन केशवला म्हणाला– "अरे केशव, कोणी वयाने लहान असला म्हणून काय झालं? त्या छोट्या कंचनने भुताच्या बुद्धीबद्दल किती बरोबर अंदाज केला होता नाही? त्या मुलाजवळ जेवढं ज्ञान आहे, तेवढं ही आपल्याजवळ नाही. भुताच्या म्हणण्यावर विश्वास न ठेवता आपण त्याला तेव्हाच पळवून लावलं असतं तर आपली सगळी शिल्लक रक्कम अशा रीतीने नष्ट झाली नसती."

केशवला समजेना की आता काय उत्तर द्यावं. त्याने पूरनचं म्हणणं कबूल केलं नि चूप बसला.





# अन्याय कोणी केला?

गोष्ट खूप जुनी आहे. बगदादमधे अली नावाचा एक न्हावी रहात असे. बगदादमधले मोठ-मोठे शाही नोकर व श्रीमन्त माणसे त्याच्याकडून हजामत करून घेत.

एकदा अलीच्या घरातलं सरपण संपलं म्हणून एकादा लाकुडतोड्या पहात तो आपल्या घरासमोर बसून राहिला. थोड्या वेळाने तिकडून एक लाकुडतोड्या आपल्या गाढवावरून लाकडांची मोळी घेऊन जात असलेला त्याला दिसला. अलीने त्याला बोलावून म्हटले—"मला तुझ्याशी भावाची घासघीस करायची नाही, माझ्याकडे तेवढा वेळही नाही. या गाढवावरची सारी लाकडं पाच रुपयात दिलीस तर पहा, नाहीतर पुढे चालू लाग!"

लाकुडतोड्या म्हाताराही होता, म्हणून लवकर लाकडे विकून टाकून त्याला घरी जायचे होते. त्याने अलीच्या मागणीला होकार दिला आणि गाढवावरची सारी लाकडे उतरवून ठेऊन आपले पैसे मागितले.

"अरे, मी तर गाढवावरची सारी लाकडं पाच रुपयात मागितली होती, पण त्या गाढवावरचं लाकडी माकण आहे त्याचं काय?" अलीने मुद्दा काढला.

"आँ! ते कसं काय?" लाकुडतोड्याने आश्चर्याने विचारले.

"कसं काय, काय? ते माकणही लाकडाचंच आहे ना? मी तर 'गाढवावरही सारी लाकडं' असं म्हटलं होतं. तेव्हा तेही मला मिळायला हवं!" अली जरबेने बोलला.

"ही कसली खरेदी हुजूर? मी मुळीच असलं काहीं ऐकणार नाही." म्हातारा लाकुडतोड्या म्हणाला.

हे ऐकून अलीने रागाने लाकुडतोड्याच्या थोबाडीत मारली, गाढवावरचे माकण काढून घेतले आणि त्याला हाकलून लावले.

लाकुडतोड्याला फार वाईट वाटले. त्याने रडत-रडत काजीकडे जाऊन ही सर्व हकीकत सांगितली. पण काजीचा न्हावीही अलीच होता, म्हणून त्याने बिचाऱ्या म्हाताऱ्याचे काही ऐकून घेतले नाही.

लाकुडतोड्या त्याहीपेक्षा वरच्या अधिकारी-काजीकडे गेला, पण तेथेही त्याची डाळ शिजेना. कारण त्याला आपली हजामत करून घ्यायला अलीच लागे. म्हातारा आता अगदी हताश झाला.

वाटेत लाकुडतोड्याला पाहून दुसऱ्या एका ओळखीच्या म्हाताऱ्याने विचारले—"काय झालं बाबा? चेहरा उदास का दिसतोय एवढा?" यावर लाकुडतोड्याने त्याच्यापुढे आपले रडगाणे गाऊन दाखवले.

"अरे!! सरळ खलीफाकडे जा ना! तुला नक्कीच न्याय मिळेल तिथे!" त्या दुसऱ्या म्हाताऱ्याने लाकुडतोड्याला सुचवले.

झाले, म्हातारा लाकुडतोड्या लगेच खलीफाकडे गेला व कायकाय घडले, ते त्याने सविस्तर सांगितल.

जरा विचार करून खलीफाने म्हटले—"एक सांगतो, तसं केलंस तर तुला न्याय मिळू शकेल." अन् म्हाताऱ्याच्या कानात काहीसे सांगितले.

लाकुडतोड्याने ते ऐकून हसत हसत खलीफाला सलाम केला अन् तो घरी निघून गेला.



अरबी लोककथा

थोडे दिवस गेल्यावर एकदा तो म्हातारा अलीकडे गेला. अन् त्याने विचारले– "माझी अन् माझ्या मित्राची हजामत करायची आहे. काय घेशील?"

"दोन रुपये." अली म्हणाला.

"ठीक आहे. अगोदर माझी हजामत कर." असे म्हणून म्हाताऱ्याने न्हाव्याच्या हातावर दोन रुपये ठेवले.

अलीने म्हाताऱ्याची हजामत संपवली अन् विचारले–"तुझा मित्र कुठाय?"

"बाहेर आहे." असे म्हणून लाकूडतोड्या बाहेर गेला अन् आपल्या गाढवाला पकडून आत घेऊन गेला, अन् अलीला म्हणाला– "हं, हा माझा दोस्त. कर याची हजामत."

"काय म्हणालास? गाढवाची हजामत करू मी? चालता हो, आत्ताच्या आता इथून!" अलीने संतापून म्हटले.

लाकुडतोड्याने जाऊन खलीफाकडे तक्रार केली. खलीफाने ताबडतोब शिपायांना बोलावून सांगितले–"त्या अली न्हाव्याला ताबडतोब आपला वस्तरा घेऊन इथे हजर करा. अलीला त्याप्रमाणे दरबारात आणले गेले.

"तू आधी कबूल करून याच्या मित्राची हजामत करायला नकार का दिलास?" खलीफाने रागाने अलीला विचारले.

वाकून वाकून खलीफाला कुर्निसात करत अली म्हणाला–"खाविन्द! आपण ऐकलं ते खरं तर आहेच, पण माणसाचा मित्र गाढव असेल, अन् त्या गाढवाची हजामत कुणी केलीय असं आपण तरी कधी ऐकलंय का?"

"जळाऊ लाकडांबरोबर लाकडाचं मालकही घेतल्याचं आम्ही कुठे ऐकलेलं नाही! तेव्हां आता मुकाट्याने या गाढवाची हजामत कर आमच्यासमोर!" खलीफा त्याला गुरकावत म्हणाला.

आता अलीला कुठेच पळवाट दिसेना! गाढवाला साबण लावून लावून त्याची हजामत करू लागला अली. त्यानन्तर मात्र आपली हजामत करण्याकरता अलीकडे जाणे सर्वांनी बन्द केले.





## विशालकाय शार्क



अजोर्समध्ये १९७८ मध्ये पकडला गेलेला पांढरा शार्क हा आजपर्यंत सापडलेल्या शार्क माशांमध्ये सर्वात मोठा शार्क मानला जातो. तो २९ फूट ६ इंच, म्हणजेच ९ मीटर लांब होता आणि त्याचे वजन १०,००० पौण्ड म्हणजे ४,५३६ किलोग्रॅम होते.

जानेवारी १९८३ मध्ये पॅसिफिक महासागरात झालेले वादळ इतके शक्तिशाली होते की त्यामुळे पृथ्वीच्या भ्रमणाची गति काही दिवस नेहमीच्या गतीपेक्षा एका मिलिसेकन्दाचा पाचवा भाग इतकी कमी झाली! आणि वातावरणातील हवेचा दाब जास्त झाला.



वादळ! ज्यामुळे पृथ्वीची गति कमी झाली!

## हत्तीचे सर्वात जास्त लांबीचे दात



न्यूयॉर्कच्या झुऑलॉजिकल सोसायटीने प्रदर्शनात ठेवलेली. एका हत्तीच्या दातांची जोडी, आजपर्यंत नोन्दल्या गेलेल्या हत्तीच्या दातात, सर्वात अधिक लांबीची आहे असे मानले जाते. यातील उजव्या दाताची लांबी ११ फूट ५ १/२ इंच, म्हणजे ३.४९ मीटर व डाव्या दाताची लांबी ११ फूट, म्हणजे ३.३५ मीटर इतकी आहे.

# इस्राईलवर हल्ला का झाला?

इराकने आपल्या शेजारील स्वतन्त्र देश कुवेत यावर अतिक्रमण करून तो आपल्या ताब्यात घेतला. यामुळे मध्यपूर्व आशियात 'खाडी युद्ध' या नावाने युद्ध सुरू झाले. कुवेत सोडून देण्याबाबत अमेरिकेने इराककडे मागणी केली, परंतु इराकने ती मानली नाही. परिणामत: बहुराष्ट्रीय सेना एकत्र झाल्या आणि त्यांनी इराकशी युद्धाची घोषणा केली.

ज्या देशांनी इराकशी युद्ध करण्यासाठी आपापल्या सेना पाठवल्या, त्यात इस्राईल हा देश नव्हता. तरीही इराकने इस्राईलवरही काही मिसाइल्सच्या साह्याने हल्ला केला. असे का बरे घडले?

इस्राईल हा आहे यहुदी लोकांचा देश. हे यहुदी शेकडो वर्षे आपल्या मातृभूमीला वंचित झालेले होते. दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या वेळी तर यहुद्यांची परिस्थिति फारच गंभीर होती. हिटलरच्या आज्ञेने नाझी लोकांनी लाखांच्या संख्येने यहुदी लोकांची मोठ्या अमानुषपणे कत्तल केली होती. ते युद्ध संपत गेले, आणि अमेरिकेने पॅलेस्टाइनमधे यहुदी लोकांचे राज्य आणि अरब राज्य स्थापायला परवानगी दिली. त्यांच्या सरहद्दीही निश्चित करून देण्यात आल्या होत्या. अशा प्रकारे १४ मे १९४८ रोजी इस्राईल राज्याची स्थापना झाली. त्याच्या दुसऱ्याच दिवशी इजिप्त, इराक, जॉर्डन, लेबेनॉन आणि सीरिया यांनी इस्राइली भूमीवर हल्ला चढवला. परंतु या नवजात इस्राईलने आपली आश्चर्यकारक अशी क्षमता दाखवून, मोठ्या धडाडीने या हल्लेखोरांना तोंड दिले. त्यांनी या हल्लेखोरांना केवळ नसतेच पळवून लावले नाही, तर अरब राज्यांसाठी म्हणून ठरवून देण्यात

# इस्त्राईलवर हल्ला का झाला ?

इराकने आपल्या शेजारील स्वतन्त्र देश कुवेत यावर अतिक्रमण करून तो आपल्या ताब्यात घेतला. यामुळे मध्यपूर्व आशियात 'खाडी युद्ध' या नावाने युद्ध सुरू झाले. कुवेत सोडून देण्याबाबत अमेरिकेने इराककडे मागणी केली, परंतु इराकने ती मानली नाही. परिणामत: बहुराष्ट्रीय सेना एकत्र झाल्या आणि त्यांनी इराकशी युद्धाची घोषणा केली.

ज्या देशांनी इराकशी युद्ध करण्यासाठी आपापल्या सेना पाठवल्या, त्यात इस्त्राईल हा देश नव्हता. तरीही इराकने इस्त्राईलवरही काही मिसाइल्सच्या साह्याने हल्ला केला. असे का बरे घडले ?

इस्त्राईल हा आहे यहुदी लोकांचा देश. हे यहुदी लोकशे वर्षे आपल्या मातृभूमीला वंचित झालेले होते. दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या वेळी तर यहुद्यांची परिस्थिति फारच गंभीर होती. हिटलरच्या आज्ञेने नाझी लोकांनी लाखांच्या संख्येने यहुदी लोकांची मोठ्या अमानुषपणे कत्तल केली होती. ते युद्ध संपत गेले, आणि अमेरिकेने पॅलेस्टाइनमध्ये यहुदी लोकांचे राज्य आणि अरब राज्य स्थापायला परवानगी दिली. त्यांच्या सरहद्दीही निश्चित करून देण्यात आल्या होत्या. अशा प्रकारे १४ मे १९४८ रोजी इस्त्राईल राज्याची स्थापना झाली. त्याच्या दुसऱ्याच दिवशी इजिप्त, इराक, जॉर्डन, लेबेनॉन आणि सीरिया यांनी इस्त्राइली भूमीवर हल्ला चढवला. परंतु या नवजात इस्त्राईलने आपली आश्चर्यकारक अशी क्षमता दाखवून, मोठ्या धडाडीने या हल्लेखोरांना तोंड दिले. त्यांनी या हल्लेखोरांना केवळ नुसतेच पळवून लावले नाही, तर अरब राज्यांसाठी म्हणून ठरवून देण्यात

आलेला काही भागही आपल्या घशात घातला. अन् त्याचवेळी इस्राईलने थोडा भूभाग जॉर्डनसाठी आणि 'गाझा स्ट्रिप' इजिप्तसाठी सोडून देऊन नुकसानही सोसले.

१९६७ मध्ये इजिप्तने इस्राईलवर आक्रमण करायची तयारी केली होती. जॉर्डन व इराकही त्यात इजिप्तला मदत करू इच्छित होते. परंतु त्यांनी काही पाऊल उचलण्यापूर्वीच अचानक इस्राइलने जॉर्डन, सीरिया व इजिप्त यांच्या ताब्यातील भूभागावर आक्रमण केले. या युद्धात इस्राईलने सिनाई द्वीपकल्पातून इजिप्तच्या सैन्याला पळवून लावले आणि सीरियाचा गोलन हाईट्स व जॉर्डनचा जॉर्डन नदी तटवर्ती प्रान्त हे आपल्या ताब्यात घेतले.

ज्या देशांनी पूर्वी इस्राईलशी युद्ध केले होते त्यांच्याकडून या नुकत्याच झालेल्या युद्धात इराकला मदत मिळाली नाही. वास्तविक इराकच्या अशा तऱ्हेने जबर-दस्तीने कुवेत ताब्यात घेण्याच्या भूमिकेचे मध्यपूर्वी देशांनी मुळीच समर्थन केले नव्हते. तसे पाहता इराकचा इस्राईलवर हल्ला हा युद्धतंत्राचा एक भाग मानावा लागेल. इस्राईलने युद्ध पुकारले तर आपल्या शेजारची राज्ये आपल्याला मदत करतील, कारण त्यांचे इस्राईलशी जुने शत्रुत्व आहे—अशीच इराकला आशा होती. खरोखरीच असे घडले असते तर या युद्धाचे स्वरूप बदलून जाऊन ती फारच भयानक घटना सिद्ध झाली असती.






# सावकार

तेजपुर एक छोटंसं गाव होतं. रतनलाल त्या गावातला सर्वात गब्बर सावकार. त्याला वाटे, की लोकांशी धाक धपटशा केला म्हणजेच सावकारी चांगली चालू शकते. तसा तो रहात असे तेजपुरामधे, पण त्याचा धन्दा जास्त करून आसपासच्या गावांतून अन् शहरात चाले.

एकदा आसपासच्या गावातनं चार-पाच देणेकऱ्यांकडून जवळजवळ दहा हजार रुपयांची वसूली करून रतनलाल तेजपुरकडे यायला निघाला. त्यावेळी रात्र व्हायला आली होती. कोणी गाडीवानही मिळेना, त्यामुळे त्याला नाइलाजाने पायीच निघावे लागले.

रात्रीच्या वेळी अंधारात त्या खाबडखुबड रस्त्यातून चालता-चालता रतनलाल जवळची कपड्यात लपेटलेली पैशांची थैली सारखा चाचपडून पहात राहिला. अचानक त्याला एका गोष्टीची आठवण झाली. जवळपासच्या गावातून नेहमी लूटमार करणारा डाकू देबू नुकताच एक आठवड्या-पूर्वी तुरुंगातून कैद भोगून बाहेर आलेला होता! तो रहात असे तेजपुरजवळच्याच एका लहानशा वस्तीत. त्याला जर कळलं, की रतनलाल एवढी मोठी रक्कम घेऊन निघाला आहे, तर झालंच! तो जीव घ्यायलाही कमी करायचा नाही! बास, या विचारानेच सावकार घाबरून गेला.

घाबरत-घाबरत तो थोडासा पुढे झाला, इतक्यात कुणीसं मागून विचारलं—"कोण ते? जरा थांबा बरं!"

दचकून रतनलाल त्या अंधारात डोळे फाडून पाहू लागला! उंचशी एक आकृति सावलीसारखी अंधारातून पुढे येत होती. "हा डाकू देबू नव्हे?" सावकार थरथर कापु लागला!



इतक्यात तो ऊंच माणूस रतनलालजवळ येऊन पोचला अन् त्याला ओळखून खांद्यावरची कुऱ्हाड डाव्या खांद्यावर बदलत म्हणाला–"अरे तुम्ही? मी आपला किशनु रतनलालशेट! आता शेतावरून घराकडे चाललोय जी!"

"ओह! किशनू...!" सुटकेचा निश्वास सोडत रतनलाल म्हणाला–"सकाळपासून देणेकऱ्यांची घरं फिरत राहिलो. पण कुठे एक छदामसुद्धा वसूल झाला नाही! इथल्या आपल्या कमलपूरहून निघता निघताच रात्र झाली बघ."

इतक्यात नाल्याच्या दुसऱ्या बाजूने एक कडक आवाज ऐकू आला–"कोण आहात तुम्ही लोक?"

आवाज ओळखायला रतनलालला वेळ लागला नाही–देबूचाच आवाज तो! लगेच तो किशनूच्या कानात म्हणाला–"किशनू, मी तुला खोटंच सांगितलं होतं! पण आज माझी दहा हजाराची वसुली झाली आहे. ते सारे पैसे या थैलीत आहेत बघ. तूच तिचं आता रक्षण करू शकशील. आता तुझ्याजवळ ठेव ही थैली!" असं म्हणून रतनलालने थैली किशनूच्या हाती दिली.

रतनलालला धीर देत किशनूने त्याला घाबरून न जायला सांगितलं अन् वचन दिलं की, आपण पैसे नीट संभाळू. मग दोघं नाला ओलांडून पलीकडे पोचले.

डाकू देबूने रतनलालच्या चेहरा ओळखला, अन् त्याला खूप आनन्द झाला! रतनलालजवळ येऊन त्याने त्याच्या कपड्यांवरून चाचपून पाहिलं अन् चिडून तो ओरडला–"अरे हट! पैसे कुठे लपवून ठेवलेस, बोल!" लगेच रतनलालचा गळा दाबत देबू त्याच्याकडून सत्य जाणायचा प्रयत्न करू लागला.

तडफडत रतनलाल जोराने ओरडला–"किशनू, वाचव रे मला!"

एवढ्यात हातातली कुऱ्हाड उगारत मागून पुढे येत किशनू बोलला–"अरे, मला माहीत आहे की तूच तो डाकू देबू! जिवाची पर्वा असेल तर मुकाट पळ इथून!"

किशनूचा आडदांड देह आणि तो आवेश पाहून देबू घाबरला आणि तेथून निघून गेला. नंतर किशनूने रतनलालला त्याच्या घरापर्यंत सुरक्षित नेऊन सोडलं आणि घराशी पोचल्यावर त्याची पैशांची थैलीही त्याच्या हाती सोपवली.

एक महिना उलटल्यानन्तर देबू एक दिवस रतनलाल सावकाराकडे गेला अन् दुःखी चेहरा करून म्हणाला–"सरकार, मला थोडीशी मदत हवी आहे तुमच्याकडून!"

"मदत? कसली मदत?" खरं तर त्याला पाहूनच सावकार हादरून गेला होता, पण उसनं अवसान आणून त्याने विचारलं.

"सरकार, माझ्या लेकीचं लगीन काढलंय! एक हजार रुपये हवेत. सहा महिन्यांनी मुद्दल परत करीन. आणि दर महिन्याला व्याजही आणून देईन व्यवस्थित." देबू म्हणाला.

नाइलाजाने पैशांवर पाणी सोडून रतनलालने देबूला पैसे दिले.

देबू निघून गेल्यावर थोड्याच वेळात किशनू रतनलालकडे आला अन् त्याला नमस्कार करून रडव्या आवाजात म्हणाला–"शेठजी, माझी बायको आजारी आहे हो! गेल्या आठ दिवसात अंथरुणातून उठलीही नाही बघा ती! तिला दाखवायला शहरात





न्यायला हवी, पण माझ्या हातात तर सध्या फुटकी कवडीही नाही. यावेळी आपण दया केलीत, तरच तिला वाचवायची आशा! शंभर रुपये द्या शेठजी कर्जाऊ. लवकरच व्याजासह परत करीन सगळे पैसे!" खरोखरच त्या धिप्पाड माणसाचे डोळे भरून आले होते हे सांगताना!

त्याचं बोलणं ऐकून रतनलाल रागेजला. आत्ताच थोड्या वेळापूर्वी देबूकडे गेलेले हजार रुपये त्याला आठवले, आणि चिडून तो म्हणाला–"अरे, माझ्याकडे काय पैशाचं झाड आहे की काय, मागेल त्याला पैसे उसने द्यायला? आत्ता तासाभरापूर्वी देबू आला होता, आणि पोरीचं लग्न आहे म्हणत हजार रुपये घेऊन गेला! आता तू आलायस उरावर बसायला!"

रतनलालचं हे बोलणं ऐकून किशनूने मोठ्या प्रयासाने पुन्हा तोंड उघडले. तो म्हणाला–"एक वेळच दया करा ना शेठजी!"

"हे बघ किशनू, मी खरंच सांगतोय, रागावू नकोस. देबूला मी कर्ज दिलं, कारण तो वेळ आली तर कुणाचं घर लुटूनही माझी रक्कम परत करू शकेल. पण तुझा काय भरोसा? बोल! दिवसभर मजुरी करतोस, तेव्हा कुठं एक वेळचं पोट भरू शकतोस तू! माझं कर्ज कसं बरं फेडू शकशील तू? हं, हे दहा रुपये घे हवे तर! परत करायचीही जरूर नाही हे!" असं म्हणत रतनलालने किशनूसमोर दहाची नोट धरली.

पण ते दहा रुपये न घेताच किशनू मुकाट्याने तिथून निघून गेला.

असेच दोन महिने निघून गेले. एका रात्री रतनलालकडे चोरी झाली. गावभर बातमी पसरली की रतनलालचे रोख पंचवीस हजार रुपये आणि घरातले सारे दागदागिने चोराने लांबवले!

या घटनेनंतर सात दिवसांनी, एकदा किशनू आपल्या शेतात पाणी देत असताना देबू तिथे आला, अन् विचारू लागला–"तेजपुरचा किशनू तूच ना?"



हा देबू आपल्याकडे कशासाठी आलाय हे किशनूला समजेना! गोंधळून उभा रहात तो म्हणाला–"होय मीच तो किशनू! अन् मला हे ही माहीत आहे की तू कोण आहेस! बोल, काय हवं तुला माझ्याकडून?"

"मला काही नकोय तुझ्याकडून. काही दिवसापूर्वी तू त्या कंजूष, निर्दयी सावकार रतनलालकडे कर्ज मागायला गेला होतास ना? अन् तुला त्यानं रिकाम्या हातांनी परत पाठवलं! मी ही थैली तुला द्यायला आलोय बघ! यात दोनशे रुपये आहेत नगद! हे पैसे त्या रतनलालचेच आहेत, तेव्हां हे पुण्य त्यालाच मिळेल बघ!" असं म्हणून देबूने ती थैली शेताच्या बांधावर ठेवली अन् किशनूला काही बोलायची संधी न देताच तिथून निघूनही गेला तो!

ती थैली घेऊन किशनू सरळ रतनलालकडे गेला आणि त्याने सारी हकीकत त्याला सांगितली. ते पैसे सावकारासमोर धरत तो म्हणाला–"शेठजी, देबू म्हणाला होता की या थैलीत दोनशे रुपये आहेत! मी काही ते मोजून-बिजून पाहिले नाहीत. आपणच तपासून पहा."

पण रतनलालने थैली किशनूच्या हातून घेतली नाही. तो फक्त इतकंच म्हणाला की–"मला क्षमा कर किशनू! त्या दिवशी मी म्हणालो, की देबू कुणाचं घर लुटूनही माझे पैसे परत करील. पण तो असं माझंच घर लुटेल, असं माझ्या मनातही आलं नव्हतं? तुझ्या उपकारांची मी परतफेड केली नाही. उलट तुझा अपमान करून मी आपली घमेंड दाखवली तुला! मला योग्य अशीच शिक्षा झाली! हे दोनशे तूच ठेव आपल्याला! तू त्या रात्री माझा जीव वाचवला होतास – वाटलं तर त्याची परतफेड समज! आता लाथाडू नकोस ते!" इतकं बोलून तो आपल्या डोळ्यात जमलेलं पाणी पुसू लागला.

हात जोडून किशनूने रतनलालला नमस्कार केला आणि ती थैली घेऊन तो आपल्या घराकडे चालू लागला.



# भुक्तभोगी

जुनी गोष्ट आहे. एका जंगलात दोन मुनि तप करीत असत. त्यांची नावं होती बदरी आणि केदार. दोघांचे आश्रम जवळजवळच होते. दोघंही प्रौढ वयाचे होते.

एक दिवशी बदरी केदारकडे जाऊन म्हणाला–"काही दिवस हे जंगल सोडून शहरात जाऊन यायचं मनात आहे माझ्या. गेले काही दिवस ही इच्छा एकसारखी माझ्या मनात येत आहे; ती दाबून ठेवणं आता मला अशक्य वाटू लागलंय!"

हे ऐकून केदार दोन क्षण गप्प राहिला. नंतर तो म्हणाला–"बदरी, तुझी ही इच्छा विचित्र खरीच! पण तुझी इच्छा आहे ती, तू मनात आलंय तेच कर."

दुसऱ्या दिवशी बदरी ते जंगल सोडून जवळच्या शहराकडे निघून गेला. शहरातलं सौन्दर्य, तिथली झकपक – वगैरे सर्व बदरीला खूप आकर्षक वाटलं. आवडीने तो तिथे राहू लागला. पण एका महिन्याभरातच शहरातली फसवणूक, कपटीपणा, कारस्थानं, भांडणं, मारझोड वगैरेचा जिवन्त अनुभव मुनि बदरी घेऊन चुकला; आणि शहरी जीवनाला तो कंटाळून गेला. तो शहर सोडून आपल्या जंगलातल्या आश्रमात परत आला.

बदरी परत आलेला पाहून केदारला खूप आनन्द वाटला. मग बदरी आपले शहरातले अनुभव सांगू लागला, तेव्हा केदारने ते बोलणं ऐकलं न ऐकलंसं केलं. ते जाणून बदरी त्याला विचारू लागला–"शहरी जीवनाबद्दल तू अगदीच अनासक्त वाटतोस केदार! काय बरं कारण याचं? तुला अशी भीती वगैरे वाटते का, की त्यामुळे तुझ्या ध्यानधारणेत बाधा येईल?"

यावर थोडंसं हसत केदार म्हणाला–"शहरी जीवनाबद्दल माझ्या मनात कसलीच भीती नाहीय. त्याबद्दल मला फक्त अनासक्ति आहे. मला वाटतं की मुनि बनून इथे जंगलात येण्यापूर्वी तू शहरी जीवनाचा मुळीच अनुभव घेतलेला नव्हतास. एकाद्या क्षणिक आवेगात निर्णय घेऊन तू विरागी बनून इथे आलेला असावास; म्हणूनच तुझ्या मनात त्या जीवनाची आसक्ति निर्माण झाली, अन् तुला त्याची ओढ वाटत राहिली. आता तू भुक्तभोगी बनला आहेस, तेव्हा मुनीला आवश्यक अशी एकाग्रता तुला आता प्राप्त होईल!"

आणि त्याप्रमाणेच घडले. बदरीला ध्यानात आता पूर्ण एकाग्रता प्राप्त झाली.





# साहसी मुहूर्त

सूर्योदय होत होता. मुनीने एकवार पूर्वेकडील उज्ज्वल होणाऱ्या आकाशाकडे पाहिले आणि तो स्वतःशीच पुटपुटू लागला–"परमेश्वराने किती सुन्दर सृष्टि निर्माण केली, त्याने मानवाचे सृजन केले. मानवांना शिकून आपली प्रगति करून घेण्याची शक्ति दिली. काय करावे, काय करू नये हे आपले आपण जाणण्याइतके बुद्धिशाली बनवले. जर माणसं केवळ स्वतःच्याच सुखाचा विचार न करतील किंवा फक्त स्वतःच सर्व सुखं लुटायचा प्रयत्न न करतील, तर ही पृथ्वी आजच्यापेक्षा कितीतरी पटींनी अधिक चांगली होऊ शकेल. पूर्णतः उत्तम गुणांनी युक्त असणारी व दुसऱ्यांशी कधीही निर्दयतेने न वागणारी अशी एकादी जात निर्माण होण्याची काहीच शक्यता नाही काय?"

अशा प्रकारच्या विचारांनी बराच वेळपर्यंत मुनीला हैराण केले. निसर्गाची अनेक रहस्ये जाणून घेऊन, अनेक प्रयोग करून त्याने एक असे तन्त्र प्राप्त करून घेतले की, त्या तन्त्राच्या सहाय्याने काही अद्भुत व असामान्य अशी सिद्धि मिळवता येईल! इतक्यात एका शिष्याने गुहेबाहेर येऊन मुनीला आठवण करून दिली,–"गुरुजी, तो शुभ मुहूर्त जवळ येऊन ठेपला आहे."

"होय सोहम! यज्ञातल्या शेवटच्या आहुतीचीच ही वेळ आहे." मुनी म्हणाला.

दोघेही त्या विशाल गुहेत पोचले. गुहेच्या दोन्ही बाजू उघड्याच होत्या;



मध्यावर एक अग्निकुंड धगधगत होते. मुनी यज्ञकुंडाजवळ जाऊन बसला आणि आपल्या शिष्याला तो म्हणाला–"सोहम, आता माझ्याकडे लक्ष दे आणि अग्नीच्या ज्वाळां-वर नजर ठेव. ज्वाळा अशाच उठत राहिल्या पाहिजेत. आपल्याला आता जय मिळतो, का पराजय, हे पाहू या आपण!"

शिष्य मुनीच्या मागे सावधचित्ताने उभा राहिला. एक तासभर मुनी ध्यानमग्न राहिला आणि नन्तर तासभर तो काही मन्त्रोच्चार करत राहिला. यानन्तर त्याने अग्निकुंडात तूप, काही फुले व समिधा टाकून आहुती द्यायला सुरुवात केली.

आता त्या ज्वाळांमधे एक आकार जन्म घेऊ लागला. ते पाहून ज्वाळांच्या प्रकाशात दिसणारा मुनीचा चेहराही चमकू लागला! हळूहळू त्या आकाराचे एका सुन्दरशा बालकात रूपान्तर झाले. त्या बालकाने ज्वाळांबाहेर येऊन मुनीला वन्दन केले. बालकाचे शरीर सुदृढ व सुन्दर होते, पण त्याचे शरीर आकारने फारच लहान होते.

"मी कोण आहे?" त्या नवजात बालकाने विचारले.

"तू एक मानव आहेस–पण जरासा निराळा–निराळ्या प्रकारचा! निसर्गाच्या पाच तत्वांच्या मिश्रणापासून एकदम अवतरलेला मानव आहेस तू! यज्ञामुळे हे शक्य झाले. जन्मतःच बुद्धि, ज्ञान आणि बोलण्याची शक्ति प्राप्त आहे तुला - यामुळेच तू इतर मानवांपेक्षा भिन्न आणि वैशिष्ठ्य-पूर्ण आहेस. बरे-वाईट, करुणा-हिंसा यातील भेद व सत्य-असत्य यांविषयी तुला पूर्ण ज्ञान आहे. यामुळेच कुणाचं वाईट चिंतणं, निर्दयीपणा आणि खोटेपणा याबद्दल तुझ्या मनात चीड आहे. सामान्य माणसं लोभामुळे केवळ आपला स्वार्थ साधायच्या मागे लागतात. पण तू मात्र अन्यायाविरुद्ध आवाज उठवणारा आणि न्यायासाठी स्वतः प्रेरित होऊन काम करणारा आहेस!





म्हणाला–"अरेरे! मला हा कसला आवाज ऐकू येतोय? दीन-दुःखी लोकांचा आर्तनादच असला पाहिजे हा! अरे! हे काय पाहतोय मी! आगीच्या ज्वाळा! जळणारी घरं?"

"पण मला तर काही असं ऐकू येत नाहीय, अन् दिसतही नाहीय!" मुनि-शिष्य सोहम आश्चर्याने उद्गारला.

मुनि यावर म्हणाले–"होय सोहम, अपूर्व जे पाहू शकतो किंवा ऐकू शकतो, ते सर्वसामान्य माणसाला शक्य नाही. अपूर्व तर खूप दूरचे आवाज ऐकू शकतो, दूरची दृश्य पाहू शकतो–सारं अगदी सहजपणे! सामान्य माणसाच्या मानाने अपूर्व खूप वेगाने धावूही शकतो!"

"बाबा, आता मला आज्ञा द्या. काय चाललंय ते ताबडतोब जाऊन पहावंसं वाटतंय मला!" अपूर्व आतुरतेने बोलला.

"हां बेटा! तू जा आता!" आशीर्वाद देत मुनि अपूर्वला म्हणाला.

अपूर्व ताबडतोब तेथून पळत सुटला! वेगाने, खूऽप वेगाने! तो जसजसा दूरदूर जात राहिला, तसतसा तो लहान लहान होत गेला अन् शेवटी एकाद्या ठिपक्या-सारखा होऊन तो अदृश्यच झाला!

"हे काय झालं गुरुजी? अपूर्व अदृश्यच झाला की!" आश्चर्याने शिष्याने आपल्या गुरूला विचारले.

"जेव्हां एकाद्या वस्तूची गति खूप वाढते, तेव्हा ती प्रकाश आणि वायूमधे विरघळून जाते! आपला अपूर्वही आत्ता असाच प्रकाश व वायूचा एक अंशच बनून गेला आहे." मुनीने सोहमला समजावले.

* * *

"जमीनदारांसाठी नवीन इमारत बांधण्याच्या कामात आता तुम्ही लोक भाग घेणार नाही आहात, तेव्हा यापुढे तुम्हाला आपापल्या घरात रहाण्याचा हक्कही रहाणार नाही. कळलं?" जमीनदाराचे विश्वासू सेवक ओरडू लागले अन् त्याबरोबरच त्या गरीब बिचाऱ्या असहाय शेतकऱ्यांच्या झोपडीवजा घरांना आगी लावू लागले!



तेथील सर्व लोक अगदीच गरीब व कमजोर होते. जमीनदाराला ते नेहमीच भिऊन असत. ते बिचारे केवळ आपल्या करुण आवाजात त्यांच्याजवळ दयेची भीक मागत होते. "आम्ही आजपर्यंत जमीनदारा-साठी काय थोडे कष्ट केले का? पण रोजच आम्ही केवळ त्यांचंच काम कसं करू शकणार? तसं केलं, तर आमची शेतं कोण पिकवेल?"

त्यांच्या या करुण प्रश्नांना उत्तर द्यायचा त्या क्रूर सेवकांनी प्रयत्नही केला नाही. उलट ते त्यांच्या घरांना आगी लावतच राहिले!

मग अचानक त्या आगीवर पाणी फवारले जाऊ लागले! पावसाची शंका येऊन जमीन-दाराचे सेवक आकाशाकडे पाहू लागले. हे पाणी आलं कोठून? त्यांच्या या शंकेचे काही उत्तर सापडण्यापूर्वीच कानठळ्या बसवणारा भयानक आवाज ऐकू येऊ लागला आणि सेवक दचकून इकडे तिकडे पाहू लागले! त्या गावाला लागूनच एक नदी वहात होती; अन् त्या नदीत गुडघ्याइतक्या पाण्यात उभा असणारा एक हत्तींचा घोळका त्यांना दिसला. ते हत्तीच इतके सारे पाणी आपापल्या सोंडेत भरून घेऊन त्या घरांवर फवारत होते. आपल्या या प्रयत्नात त्यांना जय मिळाला! अन् थोड्याच वेळात त्या साऱ्या शेतकऱ्यांच्या घरांना लागलेली आग विझून गेली! नंतर ते हत्ती दुष्ट जमीनदाराच्या नोकरांवर जोराने पाणी उडवत त्यांच्याकडे धावून जाऊ लागले. ते नोकर घाबरून सैरावैरा धावू लागले अन् मागील बाजूने त्यांना कुणाच्याशा हसण्याचा आवाज ऐकू येऊ लागला! नोकरांनी मागे वळून पाहिले; तो इतर हत्तींना आपल्या मागोमाग घेऊन येणाऱ्या हत्तीवर बसलेला एक छोटासा माणूस त्यांना दिसला! कोण बरं असावा तो? एकादं भूत–प्रेत तर नव्हे?

असे विचार मनात आल्यावर तर ते जमीनदाराचे नोकर आणखीच घाबरून, जीव मुठीत घेऊन धावत सुटले!

(क्रमशः)



# विद्वान पंडिताचा सल्ला

गोष्ट जुनी आहे. कान्यकुब्ज राज्यात पुष्यमित्र नावाचा एक महान कवि रहात असे. श्रीधर नावाच्या पंडिताने एकदा सहज या पुष्यमित्राच्या काही कविता वाचल्या. त्या कवितांमुळे प्रभावित होऊन श्रीधर त्याला म्हणाला–"अरे पुष्यमित्र, तुझ्या इतक्या सुरेख कविता जर राजाने ऐकल्या तर तुझं जन्माचं दारिद्र्य फिटेल बघ. तू शक्य तितक्या लवकर राजाच्या दर्शनाला जावेस असं मला वाटतं."

हे ऐकून जराही वेळ न घालवता पुष्यमित्र राजाला भेटायला गेला. आपले काव्य त्याने राजाला ऐकवले. ते ऐकून राजा खरोखरच फार खूष झाला. पुष्यमित्रला केवळ बक्षिस देऊनच गप्प न बसता राजाने त्याला आपल्या दरबारात नोकरीही दिली.

थोड्या दिवसांनी पुष्यमित्र पंडित श्रीधर याला भेटायला गेला आणि त्याला म्हणाला–"दरबारात जाण्यापूर्वी मी ज्या कविता लिहीत असे, त्याहून मी सध्या लिहीत असलेल्या कविता मला खूपच खालच्या दर्जाच्या वाटतात! ही गोष्ट इतरही काही लोकांनी माझ्या निदर्शनास आणून दिली आहे. असं का घडत आहे, हे आपण सांगू शकाल काय?"

यावर जरासे हसून श्रीधर म्हणाला–"मित्रा, त्यावेळी तुझ्या कवितांचं मूल्य ओळखून राजाने तुला बक्षिस दिलं होतं. पण तू तर आता राजाकडून मिळणाऱ्या भेटी मनात ठेवून कविता करू लागला आहेस. ही तुझी पद्धत तू बदललीस तर आजही तू 'उत्तम काव्य प्रसवू शकशील!"

त्या विद्वान पंडिताच्या सल्ल्याचा मतितार्थ ओळखायला पुष्यमित्राला जराही वेळ लागला नाही. त्या दिवसापासून मिळणाऱ्या बक्षिसाचा विचार सोडून देऊन तो कविता लिहू लागला आणि त्याने एक 'उत्तम कवि' म्हणून नावलौकिक मिळवला!





# वाघाशी चर्चा

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा एकदा त्या झाडाकडे गेला, फान्दीवरून शव उतरवून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. चालता चालता प्रेतातला वेताळ बोलू लागला–"राजा, इतक्या रात्रीच्या अन्धारात तुला असं काम करताना पाहून मला मोठं आश्चर्य वाटतंय, आणि त्याबरोबरच मनात एक शंकाही येतेय् की, इतका त्रास सोसून काम पुरं झाल्यावर त्याच्या फळाची आसक्ति तर तुझ्या मनात असेल, की नाही? जरा जास्त स्पष्ट करण्यासाठी मी तुला एक गोष्ट सांगतो. बऱ्याच लोकांना माहीत आहे त्याप्रमाणे तुलाही कदाचित् या गोष्टीचा पहिला भाग माहीतही असेल. गोष्ट आहे तीन भाऊ अन् एका वाघाची. गोष्टीचा जितका भाग तुला माहीत नसेल, तितका जाणून घेण्यासाठी

## वेताळाच्या गोष्टी



मी आता तुला सर्वच गोष्ट सांगतो, ती तू लक्षपूर्वक ऐक. म्हणजे तुला कष्टही जाणवणार नाहीत" आणि वेताळ गोष्ट सांगू लागला–

खूप जुनी गोष्ट. दिव्यानन्द नावाचा एक योगी गुरुकुल चालवत असे. त्याच्या आश्रमाच्या एका बाजूस जंगल, तर दुसऱ्या बाजूस डोंगर होते. जवळून एक नदीही वहात असे. नदीचे पाणी पिऊन जंगली श्वापदे आपली तहान भागवीत.

एकदा तीन राजपुत्र शिष्य म्हणून त्या गुरुकुलात आले. त्यातला ज्येष्ठ राजकुमार त्या देशाचा भावी राजा होता. तिघंही बुद्धीने यथायथाच होते! फारसं काही समजण्याची त्यांच्या बुद्धीची कुवत नव्हती. त्यांचं सामान्य ज्ञान ही अगदी बेताचंच होतं. काही प्रश्न विचारला की ते एकमेकांच्या तोंडाकडे पहात! तरीही खूप कष्ट घेऊन दिव्यानन्द त्या तिन्ही राजपुत्रांना त्यांच्या भविष्यात उपयोगी पडेल असे शिक्षण देऊ लागला.

तिन्ही राजपुत्रांना मन्त्र-तन्त्र विद्येबद्दल खूप कुतुहल होतं, पण गुरु तर त्यांना असलं काही मुळीच शिकवत नसे. तरीही दिव्यानन्दजवळ मन्त्र-तन्त्र विद्येबद्दलची बरीच ताडपत्रं वगैरे होती. गुरु जेव्हा आश्रमाबाहेर असत तेव्हा हे राजपुत्र त्या पोथ्या चोरून वाचीत असत, अन् त्यातले मन्त्र पाठ करून ठेवत. अशा रीतीने राजपुत्रांनी बरेच मंत्र पाठ करून ठेवले.

गुरुकुलात गोविन्द नावाचा एक विद्यार्थी होता. तो चांगला बुद्धिमान, तरतरीत, तीक्ष्ण आणि विवेकी होता. गुरूजवळ तो योग-विद्या शिकत असे. विद्याभ्यास पूर्ण केल्यावरही योगी बनून गुरूजवळच रहायची त्याची इच्छा होती. दिव्यानन्दचं या गोविन्दवर भारी प्रेम! त्यांना ही गोष्ट चांगली माहीत होती की आपल्या पश्चात् गुरुकुलाची चांगली काळजी कोणी घेईल तर तो गोविन्दच! आपल्या अन्य शिष्या इतक्यात योग्यतेचा कोणी दुसरा शिष्य त्यांना अजून पर्यंत तरी सांपडला नव्हता. पण गुरूनं हे ही ओळखलं होतं, की गोविन्दचं मन अजून पुरेसं परिपक्व नाही, आणि त्याचं धनसंपत्ति व समाजात मिळणारं नाव, प्रतिष्ठा, या गोष्टींवरही चांगलंच प्रेम आहे.

एकदा राजपुत्रांना बातमी मिळाली की– आपल्या वडिलांची तब्येत बरीच ढासळलेली आहे! तसं त्यांना बोलावून नेण्यासाठी राजधानीतून कोणी आलं नव्हतं. पण त्यांनाच आपलं वाटत होतं, की पिताजींना भेटायला आपण होऊनच जावं. तिघांनी आपली ही इच्छा गुरुसमोर अमळ भीत भीत व्यक्त केली.

गुरु दिव्यानन्द त्यांना म्हणाले–"होय, तुमचा विद्याभ्यास आता पूर्ण झाला आहे. आता तुम्ही हवं तर गुरुकुल सोडून राजधानीला आपल्या घरी जाऊ शकता. वाटेत सोबत म्हणून कोणी राजसेवक इथे येई-पर्यंत तुम्ही थांबलात तर बरं होईल. पण तुम्हाला जर लगेच निघायच असेल तर तुम्हाला सोबत म्हणून गोविन्दला पाठवावं असं वाटतं मला. तो तुमचा चांगला मित्र आहे ना! वेळ पडली तर तो तुमचा सल्लागार आणि रक्षणकर्ता या भूमिकाही उत्तम प्रकारे पार पाडू शकेल.

यावर मोठा राजकुमार आनन्दाने म्हणाला–"असंच करा गुरुजी. आपल्याला



माहितच आहे की आमचं गोविन्दवर खूप प्रेम आहे अन् अभिमानच वाटतो आम्हाला त्याचा!"

"तू माझ्या म्हणण्याला मान देतोस याचाच मला फार आनन्द वाटतो. मला तर असंही वाटतं बेटा, कि तू राजा बनून जेव्हा सिंहासनावर बसशील, तेव्हा तुझा सल्लागार आणि मन्त्री गोविन्द व्हावा. पण हां, हे सर्व गोविन्दला सम्मत असेल तरच!" मोठ्या राजपुत्राकडे पहात दिव्यानन्द म्हणाला.

"गुरुजी, माझी या गोष्टीला पूर्ण संमति आहे. मी गोविन्दला केवळ सल्लागार म्हणूनच नव्हे, तर मन्त्री म्हणून



मान देऊ इच्छितो." थोरला राजपुत्र म्हणाला.

नन्तर गुरुजींनी गोविन्दला एकान्तात या सर्व गोष्टी सांगितल्या आणि म्हटले– "गोविन्द, माझी खात्री आहे की, जे लोक तुझ्यावर विश्वास टाकतील, त्यांचं रक्षण करण्याची ताकत तुझ्यात नक्कीच आहे. हे राजकुमार मनाने खूप चांगले आणि कोमल आहेत. फक्त बुद्धीने असावे तितके तरतरीत नाहीत. तेव्हा तू हे कधीही विसरू नकोस, की त्यांचं हितरक्षण करण्यात काही कमतरता पडू नये."

सर्व गोष्टी ऐकून गोविन्द म्हणाला– "गुरुजी, पण विद्याभ्यास संपल्यावरही आपलं शिष्यत्व पत्करून इथेच आश्रमात रहायची माझी इच्छा आहे."

यावर थोडं हसत दिव्यानन्द म्हणाले– "गोविन्द, तू माझा प्रिय शिष्य आहेस. सुखसोयी आणि कीर्ति प्रतिष्ठा असणाऱ्या जीवनाबद्दल तुझ्या मनात काहीशी ओढ आहे हे मी ओळखलं आहे. सत्य व धर्म यांना न डावलता एक 'समर्थ मन्त्री' म्हणून नाव कमावणं, ही गोष्टही काही कमी महत्त्वाची नव्हे. तेव्हा मी तुला एक उपाय सुचवतो, ऐक. मंत्रीपदापासून विरक्त होऊन तुला जेव्हा आश्रम-जीवनाबद्दलच आवड निर्माण होईल, तेव्हा तुझा पुन्हा 'आश्रमार्थी' म्हणून स्वीकार करायला मी नेहमीच आनन्दाने तयार असेन. आता तू निश्चिन्त मनाने राजकुमारांबरोबर जायला नीघ!"

दुसऱ्या दिवशी सर्व राजकुमार व गोविन्द राजधानीकडे जायला निघाले. दुपारी ते जंगलातल्या एका झऱ्याकाठी पोचले. तिथे त्यांनी बरोबर आणलेले पदार्थ खाऊन जेवण उरकले. तिथून पुन्हा उठणार, इतक्यात लहान राजकुमाराला समोर थोड्याच अंतरावर पडलेली काही हाडं दिसली. तो एकदम हरकून म्हणाला–"अरे, ही तर वाघाची हाडं दिसताहेत! आपल्या मन्त्रशक्तीच्या जोरावर ही सारी हाडं



जुळवून मी पुरा सापळा बनवू शकेन. अगदी नक्कीच!"

"तू जर हे करू शकलास, तर मलाही एक असा मन्त्र माहीत आहे, की ज्याच्या साह्याने त्या सापळ्यावर रक्त-मांस आणि कातडं चढू शकेल–" दुसरा राजकुमार आनन्दाने म्हणाला.

"अरे तुम्ही दोघांनी निष्प्राण शरीर तयार केलेत, तर त्यात प्राण भरायचा मन्त्र मलाही ठाऊक आहे म्हटलं." मोठा राजकुमार आत्मविश्वासाने बोलला.

"थांबा, थांबा! असं नका रे करू बाबांनो, आपल्याच प्राणांवर बेतेल ना अशानं!" गोविन्दने तिघांना सावधगिरीचा इशारा दिला.

पण राजकुमारांनी गोविन्दच्या सावधगिरीची दखलच घेतली नाही. ते तर मूर्खासारखे पुढचाही विचार करायला लागले की – आपण त्या वाघावर बसूनच राजधानीला जाऊ. लोकांना किती पण कौतुक वाटेल आपलं! गोविन्दने पुन्हा एकदा त्यांना सावध करायचा प्रयत्न केला, पण राजकुमारांनी बेपर्वाईने एक एक करून आपापला मन्त्र जपायला सुरुवातही केली. नाइलाज होऊन गोविन्द स्वतः एका झाडावर चढून बसला.



काही मिनिटातच सर्व हाडं मिळून सापळ्याचा आकार घेऊ लागली. त्यावर रक्त-मांस, कातडं वगैरे चढतंय, तोच तो वाघ सजीव होऊन उठून उभा राहिला! मान झटकून त्याने एक जोरदार डरकाळी फोडली. त्यावरोबर तीन्ही राजकुमार भयाने थरथर कापू लागले.

पुन्हा एकदा डरकाळी फोडून वाघाने त्यांच्यावर झडप घालायचा पवित्रा घेतला, इतक्यात जोराने ओरडून त्याला थांबवत गोविन्द म्हणाला–"हे वाघोबा, जरा थांबा."

गोविन्दला पशु-पक्ष्यांची भाषा येत असे. आज्ञा ऐकून वाघाने मान वळवून



त्याच्याकडे पाहिले. "महाराज, आपण काय आपल्याच प्राणदात्यांना मारून टाकणार? हा कुठला हो न्याय?".

हे ऐकून वाघ शान्तपणे म्हणाला—"मला कसं माहित असणार की यांनीच मला जिवन्त केलंय? काही असो, यांनी मला जगवून माझी भूकही जागवली आहे. ही भूक काही दिवसांचीच नव्हे, तर कदाचित् काही शतकांचीही असेल."

गोविन्द आणि वाघ यांच्यात बोलणं सुरू झालेलं पाहून तीन्ही राजकुमार तिथून सटकले. दोघं वादविवाद करू लागले, न्याय-अन्याय आणि धर्म—अधर्म यावर विचार-विमर्श सुरू झाला.

शेवटी वाघ म्हणाला—"माझ्या प्राण-दात्या राजकुमारांना मी सोडून द्यावं हे मुळीच मान्य नाही मला! जीव हा सर्वात मूल्यवान असतो, तेंव्हा तो वाचवण्यासाठी मला तावडतोब आपली भूक भागवली पाहिजे इतकंच जाणतो मी! एखाद्या जनावराची शिकार करून खायला आता तितका वेळही नाही, मी मरतोय भुकेनं. आत्ता माझ्यासमोर तयार भोजन म्हणजे हे राजकुमारच!"

"मग तुमची भूक भागवायचं काम मीही करू शकेन की! मी आत्ता उतरतो खाली. खा मला!" गोविन्द म्हणाला.

तेव्हा गोविन्दला थांबवत वाघ म्हणाला—"थांब रे माणसा, माझ्या एका लहानशा प्रश्नाचं उत्तर दे अगोदर. खरोखरीच प्राण्यांच्या जिवन्त रहाण्यामागे कोणतं बरं कारण दडलेलं असतं?"

पळभर थांबून गोविन्द म्हणाला—"जीवन-गतीत वृद्धि व्हावी म्हणून! अर्थात—अज्ञान रूपी अन्धारातून बाहेर पडून ज्ञान-रूपी प्रकाश दाखवून देण्या-साठीच!"

यावर वाघ म्हणाला—"मनुष्यप्राण्या, कोणती वस्तु मागावी अन् कोणती मागू नये हे तू मला शिकवलंस. राजकुमारांनी मला प्राणदान दिलंय, ही गोष्ट तू मला





सांगितली नसतीस तर केव्हांच खाऊनही टाकलं असतं मी त्यांना. तेव्हां मला ज्ञानोपदेश देणारा तू माझा गुरूच आहेस. आता तुला मी कसं बरं खाऊ? माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे. भुकेनं मी मरून जावं, असा काही उपाय आता तूच मला सांग."

"तुझं बोलणं स्तुत्यच आहे. पण मी राजकुमारांचा रक्षक आहे. तेव्हां तू मलाच खा." गोविन्द पुन्हा म्हणाला.

इतक्यात तेथून निघून गेलेले राजपुत्र दोन धडधाकट, धनुर्धारी शिकाऱ्यांना घेऊन त्या ठिकाणी परत आले. गोविन्द त्यांना थांबवणार, इतक्यात शिकाऱ्यांनी वाघावर बाण सोडलेही! वाघ जखमी होऊन खाली पडला अन् तडफडून मरूनही गेला.

ते पाहून राजकुमारांना खूप आनन्द झाला. गोविन्द झाडावरून उतरून खाली आल्यावर थोरल्या राजपुत्राने त्याला नमस्कार करत म्हटले—"आम्ही तुझे फार आभारी आहोत. तुझ्यावर विश्वासणाऱ्यांचे रक्षण तू चांगल्या प्रकारे करू शकतोस!"

"नाही, नाही! मी नाही करू शकत!" गोविन्द बोलला.

"असं नव्हे. आपली स्तुतीही सहन नाही होत तुला! खूपच विनयी आहेस तू! ठीक आहे, आता आपण निघू या! मी तुला



आपला प्रधानमन्त्री करणार आहे. इतकंच नव्हे तर खुद्द राजा सोडला, तर या राज्यातला सर्वात श्रीमन्त माणूसही तूच असशील! तीन-तीन राजपुत्रांचं रक्षण करणं ही काही क्षुल्लक बाब नव्हे!"

यावर गोविन्द त्यांना म्हणाला—"नको बाबा, तुम्ही देत असलेल्या धनामुळे मी सर्वांत दरिद्री माणूस ठरेन. या शिकाऱ्यांच्या सोबतीने आता तुम्ही सुरक्षितपणे राज-धानीला जा. मी आपला गुरुजीकडे परत जात आहे." असं म्हणून गोविन्द दिव्या-नन्दकडे परत गेला.

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विक्रमला विचारले—"राजा, वाघाचं भक्ष्य होण्या-

पासून गोविन्दने राजकुमारांना वाचवलं. मग आपणावर विश्वासणाऱ्यांचं रक्षण आपण करू शकत नाहीं, असं तो का म्हणाला? धन-संपत्तीचा त्याला मोह आहे, ही गोष्ट तर खरीच, तरीही राजकुमारांकडून मिळणाऱ्या धनामुळे आपण अत्यन्त दरिद्री ठरू असं तो का म्हणाला? या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही देण्याचं टाळलंस तर तुझं मस्तक फुटून जाईल."

राजा विक्रम उत्तरादाखल म्हणाला—"भुकेल्या वाघापासून गोविन्दने राजपुत्रांचं उत्तम प्रकारे रक्षण केलं हे तर खरंच. पण त्यांच्यापेक्षाही वाघाचा विश्वास त्याच्यावर अधिक होता. पण वाघाचं रक्षण करणं मात्र गोविन्दला जमलं नाही. त्यामुळेच तो म्हणाला, की आपणावर विश्वासणारांचं रक्षण आपण करू शकणार नाही. प्राण्याच्या जिवन्त रहाण्यामागचं कारण वाघानं विचारलं, तेव्हां अज्ञानांध:कारापासून, ज्ञानरूपी प्रकाशात येणं हेच कारण आहे असं तो म्हणाला होता. तेव्हा त्यालाही हे पटलं की आपल्या स्वत:च्या जीवनाचं प्रयोजनही तेच असायला हवं. धन-संपत्तीवर त्याचं प्रेम होतं हे खरं. पण तो स्वत: आपल्यातल्या गुण-दोषांची पारख करणारा माणूस आहे. त्यामुळे त्याने पक्कं ओळखलं की मन्त्री बनून सर्व सुख-सोयी उपभोगताना मूल्यवान अशी मानवतेची लक्षणं विसरली जातील. राजा जनकासारखा लोकविलक्षण माणूसच केवळ भोग-विलासाच्या वातावरणात राहूनही योग्याचं जीवन जगू शकतो. आपल्यासारख्या सर्वसामान्य—येरागबाळाचं—हे काम नव्हे. त्यामुळे मन्त्री बनण्यापेक्षा योग्याचं जीवन घालवणंच श्रेयस्कर हे जाणून तो आपल्या गुरूकडे परत गेला."

अशा प्रकारे उत्तर देण्यामुळे राजाचे मौन भंग होऊन वेताळ प्रेतासह अदृष्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन लटकू लागला. (कल्पित)

[आधार—मनोज दास यांची एक कथा]



चांदोबा पुरवणी—२९

# महान् स्वप्नदर्शी भारत

## आपण एकजुट करून एकात्मता साधावी

भारतातल्या महान अशा राजनीतिज्ञांपैकी डॉ. राजेन्द्रप्रसाद हे एक होत.

यांच्या जन्म १८८४ मध्ये बिहार प्रान्तात झाला होता. एके काळी त्यांची वकिली खूपच जोरदार चालू होती, दोन्ही हातांनी पैसा गोळा करीत होते ते! असे असूनही भारताच्या स्वातन्त्र्य-संग्रामात भाग घेण्यासाठी त्यांनी आपली वकिली सोडून दिली. स्वतन्त्र झाल्यानन्तर १९५० मध्ये भारताचे पहिले अध्यक्ष म्हणून डॉ. राजेन्द्रप्रसाद यांचीच नेमणूक झाली होती.

डॉ. राजेन्द्रप्रसादांनी १६ ऑगस्ट १९६६ रोजी मदुरेत दिलेल्या आपल्या व्याख्यानात असे म्हटले होते की—

"३६०० लाखांहूनही अधिक लोकसंख्या असलेला आपला भारत जगात आज आपली जबाबदारी उत्तम रीतीने संभाळत आहे. आपण जर पुन्हा विभाजित झालो—'एक भारत' च्या जागी अनेक स्वतन्त्र राज्ये स्थापन होऊन आपण पुन्हा एकमेकांपासून निराळे झालो तर काय होईल, याचा जरा विचार करा. कलियुगात 'एकता' हेच मोठे बळ आहे असे मानले जाते. म्हणून आपली ३६०० लाख जनता 'एक मानव' बनून आपण एकात्मता साधावी. 'एकात्मता' याचा अर्थ 'सर्वसाधारण एकरूपता' असा मुळीच नव्हे. 'भिन्नतेत एकता' हेच आपल्या देशाचे वैशिष्ठ्य आहे—ही गोष्ट आपण कधीच विसरू नये."

## तुम्हाला माहीत आहे?

१. भारत, ब्रिटन, जपान, अमेरिका आणि रशिया यांच्या संसदांची नावे काय आहेत?
२. जगातील सर्वात मोठे राज्य कोणते?
३. ते बृहत् राज्य कोणत्या खंडात आहे? युरोपमध्ये की आशियात?
४. दुसऱ्या क्रमांकाचे मोठे राज्य कोणते? ते कोणत्या खंडात आहे?
५. तिसऱ्या, चौथ्या, पाचव्या, सहाव्या आणि सातव्या क्रमांकावर असणारी मोठी राज्ये कोण-कोणती आहेत?

[पान ३६ पहा]

## गणपती



एकाद्या मंगल धार्मिक-संस्काराची सुरुवात असो, अथवा देवाची पूजा, अगोदर गणपतीची पूजा करावी लागते. गणेश किंवा विनायक या नावांनीही गणपती ओळखला जातो. या तीन्हीं नावांवरून कळून येते की तो गणांचा नायक आहे. गण म्हणजेच दैवी गुणांनी युक्त असे सेवक. त्यांना चिनश्वर परलोकवासी मानले जाते, आणि त्यांच्यावर गणपतीची हुकुमत चालते. गणपतीला विघ्नेश्वर म्हणजेच 'विघ्नेसंकटे दूर करणारा' असेही मानले जाते.

माता पार्वतीपासून याचे सृजन झाले, म्हणून त्याला शिव व पार्वती यांचा पुत्र मानले जाते. मस्तकाच्या जागी याला हत्तीचे शिर आहे. यामागचे रहस्य सांगणाऱ्या अनेक कथा प्रचलित आहेत. त्यातलीच एक म्हणजे – शनी देवाने जेव्हा प्रथम याच्याकडे पाहिले तेव्हा त्याचे शिर अदृश्य झाले. पण शनीची तशी इच्छा मुळीच नव्हती. त्यामुळे ताबडतोब सापडलेले एक हत्तीचे मस्तकच याच्या धडावर चिकटवले गेले. या गोष्टींच्या मागचे रहस्य काहीही असो, पण गणपती आपल्या या खास रूपामुळेच विशेष आकर्षक वाटतो हे खरे!

गणपती 'सिद्धि' (जय) आणि 'बुद्धि' (अक्कल) देणारा देव असल्यामुळे, या दोघी त्याच्या पत्नी म्हणून दाखवल्या जातात.

## चांदोबाच्या बातम्या





### खूप लहान टेलिफोन

जपानने खूपच लहान व अगदी हलका असा टेलिफोन शोधून काढला आहे. या टेलिफोनचे वजन दहा औंस (सोडे-बावीस तोळे) इतकेच आहे. हा अगदीच लहान असला तो त्याचा आवाज मात्र चांगला मोठा असतो, म्हणजेच आपला आवाज हा टेलिफोन मोठा करून ऐकवतो.

### पांढरा-सफेत वाघ

हे वाघ दिवसाच्या प्रकाशात सफेत कांतीमुळे चांगले चमकून दिसतात. जगातल्या या विशिष्ट जातीचे सफेत वाघ ओरिसाच्या प्रख्यात 'नन्दन-कानन' या प्राणिसंग्रहालयात पहायला मिळतात. या पार्कमधून आपण गाडीतून फिरू शकतो आणि एका मिनारावर उभे राहून हे वाघ पाहू शकतो.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. 'इतिहासाचा जनक' म्हणून कोण ओळखला जातो? त्याला ही पदवी कोणी दिली?

२. इंग्रजी साहित्यांत मोठ्या लोकांसाठी व्यंग्य म्हणून लिहिले गेले, पण तेच लहान मुलांसाठी एक श्रेष्ठ साहित्य बनले असे पुस्तक कोणते?

३. अधिकृत रीत्या स्वीकृत अशा भारतीय भाषा किती आहेत?

४. त्या कोणकोणत्या?

५. सर्वात अधिक लोकांकडून बोलली जाणारी भारतीय भाषा कोणती? तिच्या खालोखाल स्थाने ग्रहण करणाऱ्या चार भाषा कोणत्या?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे?

१. लोकसभा व राज्यसभा, हाऊस ऑफ कॉमन्स व हाऊस ऑफ लॉर्ड्स, डाइएट, काँग्रेस, सुप्रीम सोविएत (क्रमशः)

२. यु. एस. एस. आर. (रशिया)

३. युरोप व आशिया या दोन्ही खंडात याचा विस्तार आहे.

४. उत्तर अमेरिकेत कॅनडा.

५. चीन, अमेरिका, ब्राझील, ऑस्ट्रेलिया व भारत.

### साहित्य

१. इ. स. पू. पाचव्या शतकात असणारा ग्रीक इतिहासकार हेरोडोटस. इ. स. पू. पहिल्या शतकातला उत्तम वक्ता व रोमचा तत्त्वज्ञ सिसेरो असे म्हणत असे.

२. 'जोनाथन स्विफ्ट' याचे 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स.'

३. पंधरा.

४. असामी, बंगाली, गुजराथी, हिन्दी, कानडी, काश्मिरी, मल्याळी, मराठी, उरिया, पंजाबी, संस्कृत, तमिळ, तेलुगु, उर्दू आणि सिन्धी.

५. हिन्दी. यानंतर तेलुगु, बंगाली, मराठी आणि तमिळ अशा भाषा येतात.



जगातल्या पौराणिक कथा–४

## साहसी बेल्लेरोफन

बेल्लेरोफन नावाचा एक राजकुमार अर्गोसचा राजा प्रोइटस याच्याकडे पाहुणा म्हणून आला. बेल्लेरोफन दिसायला मोठा रुबाबदार होता. त्यामुळेच प्रोइटसला त्याच्याबद्दल असूया वाटू लागली. प्रोइटसने शेवटी बेल्लेरोफनचा निकालच लावून टाकायचे ठरवले.

मनात घातक विचार ठेवूनच प्रोइटसने बेल्लेरोफनला विचारले—"तरुणा, तू खूप वेगाने घोडा दौडवू शकतोस? माझा एक निरोप माझा मामा—लिसियाचा राजा जोबेटस—याच्याकडे पोचवू शकशील काय?" नवजवान बेल्लेरोफनने हे काम करायचे कबूल केले आणि तो निरोप घेऊन निघाला.





त्या पत्रात असा सन्देश होता की—'राजा जोबेटसने पत्र घेऊन येणाऱ्या युवकाचा कोणत्याही प्रकाराने अन्त करून टाकावा?' जावयाचे पत्र पाहून जोबेटस विचारात पडला. त्या काळात एका पर्वतावर चिमाइरा नावाचा एक विचित्र राक्षस रहात असे.



राजा जोबेटस बेल्लेरोफनला म्हणाला– "या चिमाइरा राक्षसाने माझ्या प्रजेला त्रस्त करून सोडले आहे तू या राक्षसाला मारून टाकण्यात मला मदत केलीस तर माझ्यावर तुझी मोठीच मेहरबानी होईल." बेल्लेरोफनने हे कामही मान्य केले आणि तो राक्षसाचे निवासस्थान असलेल्या त्या पर्वताकडे जायला निघाला.

चिमाइरा हा एक विचित्र प्राणी होता. त्याच्या राक्षसी मस्तकाच्या दोन बाजूंना दोन डोकी होती. एक होते सिंहाचे आणि दुसरे होते बकऱ्याचे ! त्याच्या तोंडातून भयानक अशा आगीच्या ज्वाळा बाहेर पडत असत. जो कोणी त्या ज्वाळांच्या मार्गात येई, तो जिवन्तच जाळला जाई !





आता या राक्षसापुढे जावे तरी कसे – हे बेल्लेरोफनला समजेना. त्यामुळे तो आपल्या इष्टदेवीचे – मिनर्व्हाचे – स्मरण करून ध्यान लावून बसला ! त्याच्या भक्तीने प्रसन्न होऊन देवी त्याच्या समोर प्रत्यक्ष उभी राहिली. तिने पेगासस नावाचा एक पंख असणारा, उडणारा घोडा बेल्लेरोफनला बक्षिस दिला.

ती एक मोठी अद्भुत भेट होती ! पेगासस घोडाच होता, पण तो उडूही शके. घोडा खूप वेगवान आणि साहसी होता. त्याला पाहून बेल्लेरोफनला धीर आला. आणि तो राक्षसाला तोंड द्यायला सिद्ध झाला !





उडणाऱ्या घोड्यावर बसून बेल्लेरोफन पुढे झाला व त्याने मोठ्या शौर्याने चिमाइराशी युद्ध केले. घोडा उडू शकत असल्याने तो आगीच्या ज्वाळांपासून आपले रक्षण करून वरून हवेतून त्या राक्षसावर हल्ला करत होता.

शेवटी चिमाइरा राक्षसाला आपला पराभव कबूल करावा लागला. अशा तऱ्हेने विजयी होऊन बेल्लेरोफन जोबेटस राजाकडे परत आला. जोबेटसने या राजकुमाराचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. नंतरही अशी अनेक धोक्याची कामे त्याने राजा जोबेटससाठी केली.





या अवधीत जोबेटसच्या धाकट्या मुलीचे बेल्लेरोफनवर प्रेम बसले. ही गोष्ट जोबेटसच्याही लक्षात आली. बेल्लेरोफनच्या साहसीपणामुळे व शौर्यामुळे राजा जोबेटस खूष झालेला होता; म्हणून त्यालाच आपली मुलगी देऊन खूष करावे असे राजाच्या मनात आले.

जोबेटसने हा विवाह मोठ्या थाटा-माटाने घडवून आणला. विवाहासाठी आर्गोसहून आलेल्या प्रोइटसच्या मनाची काय अवस्था झाली असेल? ज्याचा मत्सर करून मृत्यु घडवून आणण्यासाठी आपण इथे पाठवले, त्याचाच राजकुमारीशी विवाह होत होता.





जोबेटसला मुलगा नसल्यामुळे काही काळाने बेल्लेरोफनच लिसियाच्या सिंहासनावर बसला. बरीच वर्षे त्याने लिसियावर राज्य केले.



# योग्य धडा

चन्दनपुर गावचा पाटील वीरसिंह मोठा बदमाश माणूस होता. अडाणी अन् नडलेल्या लोकांना सतावण्यात त्याला मोठा आनन्द वाटे.

त्याच गावात किशन नावाचा एक भोळाभावडा तरूण रहात असे. त्याला वीरसिंह एकदा म्हणाला–"अरे किशन, तू जर रोज माझ्याकडे येऊन माझ्या घरची कामं केलीस तर देव तुला लवकरच एक मोठा माणूस बनवेल बघ!"

भोळा किशन खरोखरच हे सर्व सत्य मानून वीरसिंहच्या घरची कामे करू लागला. अगदी फुकट!

चन्दनपुरचा वैद्य शिवनाथ हा एक प्रामाणिक, सज्जन माणूस होता. वीरसिंह वैद्याची चेष्टामस्करीच करी. तो म्हणे–"बिच्चारा हा वैद्य मागल्या जन्मी नक्कीच मोठा पापी माणूस असला पाहिजे. लोकांकडून कर्ज घेऊन त्यानं ते चुकवलं नाही; म्हणूनच या जन्मी ते तो असं फेडतो आहे!"

अशा तऱ्हेने वीरसिंह सर्वांचीच टिंगल-टवाळी करी अन् स्वत:ची करमणूक करून घेई. त्या गावात एक राममन्दिर होते. त्याचा पुजारी होता गोपाळ शर्मा. एकदा या पुजाऱ्याकडे त्याचा गोविन्द नावाचा नातेवाईक पाहुणा आला होता. घराबाहेरच्या कट्ट्यावर ते दोघे एक दिवस गप्पा मारत बसलेले होते. काहीतरी विनोदी बोलून ते मोठ्याने हसतही होते. एवढयात त्या रस्त्याने जाणाऱ्या वीरसिंहचे त्यांच्याकडे लक्ष गेले.

"अरे पुजारी! असं कोणतं मोठं संकट कोसळलं म्हणून तू असा दु:खी आहेस? मला सांग; मी मदत करीन तुला." वीरसिंह गोपाळ शर्माला म्हणाला.

अशोक साने



हे बोलणे ऐकून गोविन्द तर चमकलाच! त्याने वीरसिंहला विचारले–"आमचा गोपाळ चांगला हसतोय, तुम्ही तर म्हणताय की तो दुःखी आहे! मला तर काही कळलं नाही तुमचं बोलणं! कोण आहात तुम्ही?"

"ओहो! मी तर विसरूनच गेलो. हा गोपाळ हसत असला, तरी वाटत की तो रडतोच आहे! हे मी विसरूनच गेलो होतो हं!" असे म्हणून वीरसिंह तेथून निघून गेला.

वीरसिंहच्या या उत्तराने आश्चर्यचकित होऊन गोविन्दने गोपाळला विचारले–"हा माणूस आहे तरी कोण एवढा?"

पुजारी यावर म्हणाला–"हा या गावचा पाटील वीरसिंह! त्याचा स्वभावच असा आहे. त्यामुळे आम्हा या गावच्या लोकांना त्याच्या असल्या बोलण्याची सवयच झाली आहे. आम्ही कोणी विशेष लक्ष देत नाही तिकडे!"

"लक्ष देत नाही? पण असं कसं चालेल! त्याला नीट धडा शिकवला नाही, तर तो आणखीनच आगाऊपणा करत राहील ना! लवकरच काहीतरी युक्ति काढली पाहिजे त्यासाठी!" गोविन्द म्हणाला.

त्या गावात एक विचित्र प्रथा होती. एक विशेष पर्वाच्या दिवशी रात्री गावचे सर्व मोठे, वडीलधारे पुरुष गावाबाहेर चावडीवर जमत आणि एक विशिष्ट असे मादक पेय पीत. ते प्यायल्याने वर्षातले सारे कष्ट विसरून पुढील दिवस आनन्दात जातात अशी त्यांची समजूत होती.

चारच दिवसांनी तो पर्व-दिवस आला आणि गावचे सारे प्रतिष्ठित लोक चावडीवर जाऊन ते पेय पिऊ लागले. त्यांच्यात गोपाल शर्मा अन् त्याचा नातेवाईक गोविन्द हेही होते. गोविन्द पाटलाच्या अगदी जवळच बसून ते मादक पेय पीत राहिला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच गोविन्द वीरसिंह पाटलाकडे जाऊन म्हणाला– "पाटील, काल रात्री त्या मादक पेयाच्या परिणाम होऊन मी एक चूक केली. मी



तुम्हाला शिव्या दिल्या. त्यामुळे आता तिथे जमलेल्या सर्व लोकांसमोर मला तुमची माफी मागायची आहे. कृपा करून त्या सर्वांना तुम्ही बोलावून घ्या."

वीरसिंहला वाटले, ही बरी संधी मिळाली गंमत करायला! त्याने ताबडतोब सर्वांना चावडीवर बोलावून घेतले. त्या सर्वांसमक्ष वीरसिंहसमोर उभा राहून गोविन्द बोलू लागला. "किशनसारख्या भोळ्या माणसाकडून तुम्ही फुकट चाकरी करून घेता, म्हणून एक ना एक दिवस तुम्हीच त्याचा नोकर बनाल–असं म्हटलं मी रात्री तुम्हाला. नंतर प्रामाणिक वैद्य शिवनाथला 'पापी' म्हणून त्याची मस्करी केलीत, तुम्ही खरोखर एक काविळीचे रोगी आहात असं बोललो मी. आणखी पुढे जाऊन मी असंही बोललो की, मुलांना शिकवणाऱ्या गुरुजींना तुम्ही 'पिशाच्च' म्हणालात, म्हणून तुम्हीच एक राक्षस आहात. अशी मी तुमची निन्दा केली."...अशा प्रकारे वीरसिंहच्या सगळ्या वाईट कर्मांचा पाढा वाचून गोविन्दने त्याला भरपूर शिव्या देऊन तोंडसुख घेतले; अन् पुढे तो म्हणाला, "महाराज, असं सगळं बोलल्याची मला आता लाज वाटतेय. पण त्या सगळ्या नशेतल्या गप्पा झाल्या! आपण अशा शिव्या खाण्यासारखे व्यक्ती नव्हेत! मी क्षमा मागतो तुमची!"

तेव्हा एक प्रतिष्ठित माणूस उठून गोविन्दला म्हणाला–"अरे तू का उगीच हैराण होतोस? आम्ही सगळे होतो ना तिथे! तू असं काहीच बोलला नाहीस. तुला उगीचच संशय येतोय स्वतःचा! नशेच्या भरातच तुला वाटलं असावं, की तू शिव्या दिल्यास. माफी मागायची काही जरूरच नाही तुला!"

मनासारखे सगळे ओकून घेतल्यामुळे गोविन्द स्वतःवर खूपच खुष होता अन् वीरसिंहची मान मात्र शरमेने खाली गेली होती. यानन्तर वीरसिंह कधीही कोणाचा अपमान करू धजला नाही. गोविन्दची मात्र सर्वांनीच खूप तारीफ केली.



# वाक्-पटुची प्रशंसा

विशाल देशावर राजा कीर्तिवर्मा राज्य करत होता. एकदा प्रहास नावाचा एक वाक्-पटु माणूस शेजारच्या देशातून त्याच्याकडे आला. त्याला असे दिसून आले की विशाल देशात सर्वत्र सुख-समृद्धि नान्दत आहे.

राजाची भेट झाल्यावर प्रहास त्याला म्हणाला–"महाराज! आपल्या राज्यात सर्वत्र सुख-समृद्धि व समाधान नान्दत आहे. परंतु, मला अशी शंका आहे की, आपल्या राज्यात मूर्खांची संख्या वाढत आहे. मी हिशोब केला मूर्खांची एकूण संख्या एकशे बारा आहे.

क्षणभर विचार करून राजा कीर्तिवर्मा म्हणाला–"राजधानीच्या आसपास एकूण एकशे बारा गावं आहेत. म्हणजेच एकेका गावात एकेक निर्बुद्ध माणूस आहे." तो एकदम प्रहासला म्हणाला–"हेच सांगायचंय न तुला?"

"होय महाराज, आपल्या राज्यात कुठेच भांडणं किंवा दंगे होत नाहीत. त्यामुळे सान्याच्या सान्या एकशे बारा पाटलांची बुद्धि बोथट होऊन चाललीय न?" प्रहास म्हणाला.

तेव्हा कीर्तिवर्मांचा दरबारी विदुषक विकटहास राजाला म्हणाला–"प्रभु, याचा हिशोब चूक आहे. आता आपल्या देशातल्या मूर्खांची संख्या एकशे तेरा झालेली आहे."

"हा नवा मूर्ख कोण बुवा?" राजाने आश्चर्याने विचारले.

"हा प्रहासच तो एकशे तेरावा मूर्ख आहे महाराज! आपण प्रशंसेमुळे हुरळून जाणार नाही हे माहीत असूनही तो तसं करायला कमी करत नाहीय. बक्षिसाच्या आशेने तो बकबक करीतच सुटला आहे!" विकटहास उत्तरला.

विकटहासच्या या टिंगलीमुळे जराही विचलित न होता प्रहास म्हणाला–"मी बक्षिसाच्या आशेने इथं आलोय की नाही हा निराळा मुद्दा आहे. आपण बक्षिस दिलंत, तर ते माझ्या वाक्-पटुतेवर खूष होऊनच द्याल, मी केलेल्या प्रशंसेने हुरळून नव्हे; ही गोष्ट मला पूर्णपणे माहीत आहे. सुख-समृद्धि व समाधान यांनी संपन्न असं आपलं राज्य पाहूनही, जर कोणी प्रशंसा केली नाही, तर तो मूर्ख ठरेल; प्रशंसा करणारा नव्हे! म्हणून मी नम्रतेने सांगू इच्छितो, की माझा हिशोब बरोबरच आहे."

ही बोलणी ऐकून राजा कीर्तिवर्मा जोरजोरात हसला. "तुझं बोलणं वाक्पटुतेचं म्हणायचं की प्रशंसेचं, हे मला तरी काही कळत नाहीय्. काहीही असो; तू बक्षिसपात्र आहेस, हे मात्र खरं!" असे म्हणून राजाने आपला सुवर्णाहार प्रहासला बक्षिस दिला.





# वीर हनुमान

संपाती कडून सीतेचा पत्ता लागल्यावर सर्व वानर आनंदाने उड्या मारू लागले, सिंह-गर्जना करू लागले. लंकेला जाण्यासाठी ते समुद्राच्या किनान्यावर आले. विशाल सागर पाहताच मात्र त्यांना निराशा वाटू लागली. खवळलेला समुद्र त्यांना मोठा भयानक भासला. समुद्रात अनेक भयानक प्राणी होते. समुद्र कोठे कोठे प्रशान्त दिसला, तर अनेक ठिकाणी प्रचंड लाटा त्यांना घाबरवून सोडीत होत्या. समुद्राच्या पलीकडे त्यांना काहीच दिसलं नाही.

"आता काय करायचं?" ते एकमेकांना विचारू लागले.

समुद्राकडे पाहून वानर भेदरले आहेत हे अंगदाच्या लक्षात आलं. म्हणून तो त्यांना समजावू लागला–"या समुद्राला पाहून तुम्ही भिऊ नका. भिऊन आपल्याला काय मिळणार? शेवटी भयच आपल्याला खाऊन टाकील. आपला पराक्रम दाखवण्याची नामी संधि आपल्याला मिळालेली आहे. धाडस केलं नाही तर आपल्याला काय मिळणार? या समुद्रा पलीकडे असलेल्या लंकेत सीतेचा शोध घेण्यासाठी कोणाला तरी पाठवलंच पाहिजे. जर कोणीच जाऊ शकलं नाही, तर आपण परत जाऊन काय करणार?"

त्या रात्री सर्व वानर समुद्र किनान्यावरच राहिले. दुसन्या दिवशी सकाळी अंगदाने सर्व वानर-सेनेला एकत्र बोलवलं. अशा रीतीने त्यांना एकत्र आणण्याची

१०. हनुमानाचे लंकेकडे प्रस्थान



ताकत फक्त अंगद वा हनुमानाच्या ठायीच होती.

सर्व वानरांना उद्देशून अंगदाने निवेदन केले–"आपल्यापैकी कोण महावीर आता पुढे येऊन हा समुद्र पार करून जाईल नि सीतेला पाहून येईल? सुग्रीवाच्या आज्ञेचे पालन करून आपणा सर्वांना संतोष मिळावा एवढीच माझी इच्छा आहे. असा पराक्रमी वानरश्रेष्ठ वीर कोण? लंका इथून शंभर कोस अंतरावर आहे. जो हे अंतर पार करून लंकेला जाईल, तोच आपल्याला आपापल्या घरी जाण्याचं भाग्य मिळवून देईल! त्याच्यामुळेच आपण आपल्या मुलाबाळांसह सुखाने जीवन जगू शकू. आपण परत जाऊन राम-लक्ष्मणाला आपलं तोंड अभिमानाने दाखवू शकू–असं पुण्य-कर्म आपल्या पैकी कोण करील? शंभर कोस अंतरावर समुद्र पार करून जाणारा तुमच्या-पैकी कोण आहे? बोला, कोणाच्या पराक्र-माने आपण सर्व चिंतामुक्त होऊन जाऊ?"

कोणीच काही बोलेना. सर्व जण दगडा-सारखे स्वस्थ बसून राहिले. प्रत्येक जण आपल्या शक्ति बाबत विचार करू लागला. समुद्रातील शंभर कोस अंतर पार करून जाणं मोठं साहसच होतं! कोण हे साहस करायला तयार होणार?

हे पाहून अंगद पुन्हा म्हणाला–"तुम्हा सर्वांजवळ अपूर्व शक्ति आहे. तुम्ही महान कुळात जन्मलेले लब्धप्रतिष्ठ लोक आहात. तुमच्यात अद्भुत गमन-शक्ति आहे. निदान एवढं तरी सांगा कि तुम्ही किती अंतर पार करून जाऊ शकता?"

यावर काही वानरवीर आपल्या शक्ती-बाबत सांगू लागले–

गज म्हणाला की तो दहा कोसांवर उडी मारू शकतो. गवाक्ष म्हणाला की तो वीस कोसांवर उडी मारू शकेल. गवयाने सांगितले की आपण तीस कोसांवरच उडी मारू शकू. याहून जास्त नाही. शरभ म्हणाला की तो चाळीस कोसांवर उडी मारू शकेल. नंतर गंधमादन, मैंद, द्विविद व सुषेण यांनी क्रमशः आपली शक्ति पन्नास, साठ, सत्तर नि ऐंशी कोस पर्यंत मर्यादित असल्याचे सांगितले.

यावर जांबवान म्हणाला–"उडी मारण्यात पूर्वी मी खूप कुशल होतो. पण आता मी म्हातारा झालो आहे. तरी पण श्रीरामाच्या या पवित्र कार्यासाठी अज्ञात संकटाच्या भीतीने मी आपले संरक्षण करू इच्छित नाही. तुम्ही सर्वांनी सांगितलं तर मी नव्वद कोसांवर उडी मारू शकेन!"

सर्वांचं बोलणं ऐकून आता अंगद म्हणाला–"हे शंभर कोसांचं अंतर मी उडी मारून पार करू शकतो, पण मला एक शंका आहे की मी परत येऊ शकेन की नाही?"

यावर जांबवान म्हणाला–"वा, तुझ्या शक्तीची आम्हां सर्वांना चांगलीच कल्पना आहे. शंभरच काय, हजार कोसांवर ही तू उडी मारू शकतोस! आणि तसंच तुला परत ही येता येईल याबाबत काही ही शंका मला नाही. पण तू आहेस युवराज, म्हणून तुला पाठवणं योग्य होणार नाही. तू आमच्यापैकी कोणाला ही पाठवू शकतोस. तू स्वतः जाणं बरोबर नाही. तुला सुरक्षित ठेवणं हे आम्हा सर्वांचं कर्तव्य आहे. तू जर लंकेत गेलास, तर इथे आमची खबर कोण



घेणार? नायकावाचून आम्ही इथे काय करू शकू?"

अंगद विचारात पडला. त्याने जांबवा-नाला विचारले–"समुद्र मी पार करायचा नाहीं, तुमच्या पैकी कोणी हे काम करू शकत नाही! मग काय आपण सर्वांनी इथंच प्रायोपवेशन करायचं? काही झालं नाही, तर आपण किष्किंधेला परत कसे जाऊ? गेलो तर आपले प्राण वाचतील याचा काय भरवसा? तो सुग्रीव आपल्याला ठार मारील. आमच्यात सर्वात मोठा तू! म्हणून तूच सांग की या वेळी आपण काय करावं!"

तेव्हां जांबवान अंगदाला म्हणाला–"काम होणारच! का नाही होणार? ही



कामगिरी यशस्वीपणे करू शकणारा एक इथंच आहे. ये, दाखवतो मी तुला." एका बाजूला गुपचुप बसलेल्या हनुमानाजवळ जाऊन जांबवान पुढे म्हणाला–

"हे हनुमान, सर्व वानरवीरात तू श्रेष्ठ! सर्व शास्त्रांचे ज्ञान प्राप्त केलेला तू पंडित! मग तू इथं असा मुकाटयाने का बरे बसला आहेस? त्या गरूडाच्या पंखात जी शक्ति आहे तीच तुझ्या बाहूत आहे. पराक्रमाच्या बाबतीत तू सुग्रीव नि लक्ष्मण यांच्याहून कमी नाहीस. मग इतरांशी तुझी तुलनाच कसली करायची? आणि ही गोष्ट काय तुला माहीत नाही? जन्म घेताच सूर्याला एक फळ समजून त्याला मिळवण्यासाठी तू आकाशात उड्डाण केलं नव्हतस? उडी मारण्यात तुझी बरोबरी कोण करू शकेल? आता तू आपली ताकद आम्हा सर्वांना दाखव. समुद्र पार करून जा."

हे सर्व ऐकून हनुमानाचं शरीर अद्भुत गतीने स्थूल रूप धारण करू लागलं. हनुमान समुद्र पार करायला तयार झाला नि त्याचं शरीर अधिकाधिक स्थूल होऊ लागलं. ते पाहून सर्व वानर संतोषाने नाचून आरडाओरडा करू लागले.

आणि हनुमानाचं शरीर आकाराने वाढू लागलं. शरीरा बरोबर त्याचा बल-पराक्रम ही वाढू लागला. त्याचं तोंड लाल होतं, बिनधुराच्या अग्नीसारखं!

आता हनुमान आपल्या जागेवरून उठला. वयोवृद्ध वानरांना नम्रपणे नमस्कार करून तो म्हणाला–"मी इतक्या सहजपणे सागर पार करीन, जे केवळ वायूलाच शक्य आहे. मध्ये कोठे ही न थांबता मी लंकेत पोचेन. मी उदयाद्रीच्या सूर्याबरोबर निघून त्याच्या पूर्वी अस्ताद्रीवर पोचेन नि परत फिरून सूर्याची गाठ घेईन. मी आकाशातून अशा वेगाने जाईन की समुद्र माझ्या मागे धावू लागेल. मी जेव्हा समुद्र पार करीन तेव्हा आकाशातले ढग अस्तव्यस्त होतील, पर्वतांचा थरकांप होईल. मी सीतामाईला पाहूनच परत येईन. मला सर्व शुभ शकुन





होत आहेत. आवश्यकतेनुसार मी सर्व लंका उखडून माझ्या खांद्यावर वाहून आणीन."

हनुमानाचं हे बोलणं ऐकून वानरांना आनंदाबरोबर अतिशय आश्चर्य ही वाटलं. जांबवान हनुमानाला म्हणाला–"प्रिय पुत्रा, तू आम्हा सर्वांची चिंता दूर केलीस. आम्ही सर्व जण परमेश्वराला प्रार्थना करतो की तुला आपल्या प्रयत्नात संपूर्ण यश मिळावं. आमचे सर्वांचे तुला आशीर्वाद. आता हे हनुमान, तू सागर पार करून जा. हे विसरू नकोस की आता आमचे प्राण तुझ्या हाती आहेत."

"मी जेव्हा उड्डाण करीन तेव्हा माझ्या पायांचे धक्के धरती सहन करू शकणार नाही. म्हणून मी महेन्द्र पर्वतावरूनच उड्डाण करीन!" असं म्हणून हनुमान महेन्द्र पर्वतावर चढला.

पर्वतावर पोचल्यावर हनुमानाने आपल्या हातां-पायांनी पर्वत चांगला हलवला. नेहमी अचल असणारा पर्वत थरथर कापू लागला. त्या पर्वतावरील सर्व झाडांची फुले गळून पडली. अनेक शिळा गडगडत खाली आल्या. गुंफातून राहणारी श्वापदे भयाने आरडा-ओरड करू लागली. पर्वतावर राहणारे मुनि व विद्याधर विचार करू लागले–आता हा पर्वत डगमगून कुठे जाणार? या विचाराने ते अतिशय भयभीत झाले. विद्याधर आपल्या बायकांसह आकाशात उडाले. त्यांनी महाकाय हनुमानाला दुरून पाहिले.

आकाशात उड्डाण करण्यापूर्वी हनुमानाने एकदा आपली शेपूट झटकली, हात-पाय ताणून एकदा जोरात श्वास घेतला. आपल्या आकाश मार्गाकडे एकदा नजर टाकून हनुमान वानरांना म्हणाला–

"मी आता लंकेकडे निघालो. जर मला तेथे सीता सापडली नाही, तर मी सरळ स्वर्गाचा रस्ता धरीन. जर तिथे ही मला सीता दिसली नाही तर मी रावणाला बांधून आणीन. किंवा रावणा समेत लंकेलाच इथं घेऊन येईन!"



असं म्हणून हनुमान आकाशात उडाला. त्याच्या बरोबर अनेक वृक्ष हवेत उडाले. त्याच्या सर्व शरीरावर नि समुद्रात पुष्प-वृष्टि झाली. त्याचे पसरलेले बाहु पाच डोक्यांच्या नागासारखे दिसले. त्याच्या डोळ्यांकडे पाहून असा भ्रम होऊ लागला की सूर्य व चन्द्र एकाच वेळी उदय पावले आहेत. त्याची शेपूट हवेत ताठ झालेली दिसली.

हनुमान जेव्हा वायु-वेगाने आकाशातून जाऊ लागला तेव्हा त्याच्या हाताखालून जाणारी हवा मेघगर्जनेसारखी भासली. लंकेसाठी अशुभकारक असा जणू पुच्छल ताराच होता तो! त्याची सावली सागरावर त्याच्या बरोबर चालू लागली. तो ज्या दिशेने जात राहिला, त्या दिशेला सागरात उंचच उंच लाटा उसळू लागल्या.

अशा रीतीने उड्डाण करणाऱ्या हनुमानाला पाहून समुद्राने विचार केला—"मी या हनुमानाला मदतच केली पाहिजे. इक्ष्वाकु वंशी रामाला मदत करण्यासाठी हा निघालेला आहे. माझा उद्धारकर्ता सगर हा इक्ष्वाकु वंशातीलच होता, त्याच्याच नावावरून माझं नाव पडलं सागर! म्हणून या हनुमानाला वाटेत थोडा आराम मिळवून देण्याची मला व्यवस्था केली पाहिजे."

असा विचार करून समुद्र मैनाक नावाच्या पर्वताला म्हणाला—"हे मैनाक, राक्षसांना पाताळातून बाहेर येता येणार नाही अशी व्यवस्था करायला इन्द्राने तुला सांगितलं होतं ना? आता तुला समुद्रातून वर आलं पाहिजे. हनुमान याच बाजूने तुझ्या वरून उडत चालला आहे. तो तुला पार करून पुढे जाण्यापूर्वीच तू झटपट समुद्रातून वर ये. तुझी सोनेरी शिखरं पाण्याच्या वर येऊ देत. माझी अशी इच्छा आहे की तुझ्या शिखरांवर बसून हनुमानाने थोडा आराम करावा."

तावडतोब मैनाक पर्वत पाण्यातून बाहेर आला. पूर्वेकडील समुद्रातून वर येणाऱ्या सूर्यासारखा तो दिसला. आपल्या मार्गात



वर येताना पाहून हनुमानाला वाटलं की हा आपला रस्ता आडवण्याचा प्रयत्न करीत आहे. या गैरसमजामुळे हनुमानाने जोरात हुंकार भरून त्या पर्वत शिखराला आपल्या छातीने धडक दिली आणि त्याला खाली पाडले.

अशा अपूर्व पराक्रमी हनुमानाला पाहून मैनाकाने अत्यंत आनंदाने मनुष्य-रूप धारण केले नि तो हनुमानाचे दर्शन करून त्याला म्हणाला—"हे हनुमान, तुझी शक्ति अपूर्व आहे. तू ज्या प्रकारे समुद्र उल्लंघून चालला आहेस, ते सामान्यपणे कुठल्या ही प्राण्याला शक्य नाही. सतत बराच वेळ समुद्रावर उडत राहून ही तुझी शक्ति पूर्ववत् आहे आणि तू मला अगदी सहज पाडून टाकलंस! थोडा वेळ तू माझ्या शिखरावर विश्रांति घे. रामाचा वंशज सगर आणि त्याच्या पुत्रांमुळे सागराचे खूपच कल्याण झाले. आता तू रामाच्या कामगिरीवर चालला आहेस, तेव्हा तुझा सत्कार करून सगर वंशाबाबत आपली कृतज्ञता प्रकट करण्याची माझी इच्छा आहे. म्हणून थोडा वेळ इथे आराम करून मग तू पुढचा मार्ग धरावास अशी मी तुला प्रार्थना करतो."

मैनाक हनुमानाला पुढे म्हणाला—

"तू भगवान वायूचा सुपुत्र आहेस, म्हणून ही तुझा सत्कार करणं माझं कर्तव्य आहे. कृतयुगात पर्वतांना पंख असत. ते जेव्हा हवेत उडू लागले, तेव्हा खाली राहिलेले देव व ऋषि यांना भय वाटू लागलं की आपण पडून तर जाणार नाही! म्हणूनच देवेन्द्राने आपल्या वज्रायुधाने अनेक हजार पर्वतांचे पंख कापून टाकले. देवेन्द्र जेव्हा माझे पंख कापायला तयार झाला, तेव्हा भगवान वायूने ते पाहिलं आणि मला वाचवण्यासाठी दूर समुद्रात ढकलून दिलं. अशा रीतीने भगवान वायूने मला वाचवलं, म्हणून मी त्याचा अत्यंत कृतज्ञ आहे. म्हणून मी तुझा आदर-सत्कार करू इच्छितो. तुला पाहून मला अत्यंत आनंद झाला आहे."





# शंकराची कृपा

नन्दीगाव नावाच्या एक लहानशा गावात नरसिंह नावाचा एक नारळांचा व्यापारी रहात असे. नुकतंच लग्न झालं होतं त्याचं. त्याच्या बायकोचं नाव होतं नर्मदा. ती एका गरीब कुटुम्बातली मुलगी होती.

नवऱ्याच्या घरी आल्याच्या दुसऱ्या दिवशी नर्मदा त्याला म्हणाली—"आज संध्याकाळी जरा लवकर याना घरी. आपण दोघं महादेवाच्या देवळात जाऊ."

यावर रागाने नरसिंह म्हणाला—"मला काय आपल्या पदराला धरून चालणारा समजतेस तू? मी लवकर येईन, नाहीतर उशीरा येईन! तुला काय करायचंय? वेळच्या वेळी स्वयंपाकपाणी करणं अन् आपलं घर संभाळणं एवढंच तुझं काम समजलं?" असं म्हणून चिडचिड करत तो निघून गेला.

नवऱ्याच्या या अवतारामुळे नर्मदा आश्चर्याने जागीच खिळली! आपलं काय चुकलं हेच कळेना बिचारीला! त्या दिवशी न जेवताखाता ती नुसतीच अश्रु ढाळत बसून राहिली.

एक पंधरवडा निघून गेला, तोवर नर्मदेला आपल्या नवऱ्याचा स्वभाव कळून चुकला. ताठरपणे बोलणं अन् कडक शिस्तीने रहाणं इतकंच त्याला आवडे. बायकोला जास्त प्रेम दाखवलं तर ती लगेच लाडावून आपल्या डोक्यावर बसेल—अशी त्याची समजूत होती. आपल्या मनात असेल तेच घडलं पाहिजे, कुठल्याही परिस्थितीत समोरच्या माणसाने हूं की चूं करू नये अशी त्याची अपेक्षा असे.

एके दिवशी सूर्यास्ताचे वेळी महादेव-काका त्यांच्या घरी आले. ते नर्मदेच्या वडिलांचे मित्र असून त्यांच्या गावाबाहेरील डोंगरावर असलेल्या शिवमन्दिराचे पुजारी होते. आपल्या बायकोच्या आजारामुळे ते

प्रतिभा बर्वे



झाला. तो डावीकडच्या रस्त्यावरल्या पिंपळासमोरच्या कौलारू घरासमोर पोचला, तोपर्यंत पावसाने खूप जोर धरला होता.

नरसिंहने दोन-तीन वेळा दरवाजा खटखटावला. हातात लहानसा दिवा घेऊन एक म्हातारा आला अन् त्याने दार उघडलं. नंतर त्याने विचारलं–"कोण पाहिजे बेटा तुला?"

"हे महादेव पुजाऱ्याचं घर ना?" शंका येऊन नरसिंहने विचारलं.

"त्याचं घर शेजारच्या गल्लीत आहे. पण तू खूप भिजलेला दिसतोयस. आत ये न?" म्हातारा म्हणाला.

नरसिंह घरात शिरला. अचानक त्याच्या मनात आलं, महादेवकाका प्रथम आपल्या घरी आले, तेव्हा आपण त्यांचा मुळीच पाहुणचार केला नाही. आता त्यांच्या घरी जाऊन त्यांचा पाहुणचार घेणं बरं नाही दिसणार.

हा विचार मनात आल्याबरोबर तो म्हाताऱ्याला म्हणाला–"आता इतक्या पावसातून महादेवच्या घरी जायच जमणार नाही मला. आजची रात्र इथेच काढू म्हटलं तर तुमची काही हरकत आहे का?"

यावर म्हातारा म्हणाला–"माझी काहीच हरकत नाही. ती खाट दिसतेय न? तिच्यावर झोप तू. मी या आराम खुर्चीवरच झोपतो. परमेश्वराची लीला काय अगाध आहे बेटा! चार मुलांचा बाप आहे मी, पण असा असहाय्य होऊन हे कोडगं आयुष्य जगतो आहे!" बोलता बोलता म्हाताऱ्याचे डोळे ओले झाले.

मध्यरात्रीपर्यंत आपल्या दुःखी जीवनाची हकिकत सांगून म्हाताऱ्याने आपलं मन मोकळं केलं–'तरूण होतो, तेव्हां मी भारी रागीट होतो. मुलाबाळांशी कठोरपणेच वागलो. तेव्हां मला माझं वागणं शिस्तीचं वाटे. मुलं मोठी झाली, नोकरीधन्द्याला लागली. आणि एकएक करून दूर निघून गेली. बायको गेल्यावर अगदीच एकटा



पडलो मी. मुलांवर कधी प्रेम केलं नाही, म्हणून आई वारल्यावर त्यांनी नातंच तोडून टाकलं."

डोळे पुसत तो पुढे म्हणाला–"ही सारी माझ्याच चुकीची फळं भोगतोय मी! सुखदुःखात साथ द्यायला आलेल्या बायकोची किंवा मोठ्या होत जाणाऱ्या मुलांशी आपण प्रेमानं वागलो नाही, तर म्हातारपणी त्यांच्याकडून प्रेमाची किंवा सोबतीची अपेक्षा करणंही चूकच ना?"

म्हाताऱ्याची ही गोष्ट ऐकून नरसिंहच्या मनातही चलबिचल होऊ लागली. बराच वेळ नंतरही त्याला झोप आली नाही. सकाळ होण्यापूर्वी दोन-अडीच तास त्याला झोप लागली. सकाळीच त्याच्या पाठीवर थापटत त्याला कोणीसं उठवलं, तेव्हां त्याने डोळे उघडले-चांगलंच उजाडलं होतं!

नरसिंह भोवताली पाहू लागला, तर त्याला समोर महादेवकाका दिसले. ते आश्चर्याने म्हणाले–"अरे, रात्रभर डोकं टेकायला तुला काय हे भुताचं घरच मिळालं होय? मला वाटलं, मी घराचा पत्ता सांगताना चुकून उजव्या बाजूऐवजी, डाव्या बाजूला वळायला सांगितलं असावं. रात्री पावसाच्या गदारोळात मी तुला शोधायलाही येऊ शकलो नाही. पहाटेच मी तुला शोधायला निघालो."



आपण राहिलो ते घर भुताने पछाडलेलं आहे, हे ऐकून नरसिंह दचकला! आश्चर्याने तो म्हणाला–"मला तर कोणी भूतपिशाच्च नाही दिसलं इथे! रात्री एका म्हाताऱ्याने मला इथं झोपायला परवानगी दिली."

महादेवकाका यावर म्हणाले–"ज्या म्हाताऱ्याला तू भेटलास, ते म्हाताऱ्याचं भूत होतं हे तुला कसं कळणार? तो एक हडकुळा अन् उंच असा म्हातारा आहे. उजव्या डोळ्याखाली एक काळा मस आहे त्याच्या, होय ना?"

"हां, हां! तोच म्हातारा भेटला होता मला." नरसिंह उत्तरला.



झाला. तो डावीकडच्या रस्त्यावरल्या पिंपळासमोरच्या कौलारू घरासमोर पोचला, तोपर्यंत पावसाने खूप जोर धरला होता.

नरसिंहने दोन-तीन वेळा दरवाजा खटखटावला. हातात लहानला दिवा घेऊन एक म्हातारा आला अन् त्याने दार उघडलं. नंतर त्याने विचारलं–"कोण पाहिजे बेटा तुला?"

"हे महादेव पुजाऱ्याचं घर ना?" शंका येऊन नरसिंहने विचारलं.

"त्याचं घर शेजारच्या गल्लीत आहे. पण तू खूप भिजलेला दिसतोयस. आत ये न?" म्हातारा म्हणाला.

नरसिंह घरात शिरला. अचानक त्याच्या मनात आलं, महादेवकाका प्रथम आपल्या घरी आले, तेव्हा आपण त्यांचा मुळीच पाहुणचार केला नाही. आता त्यांच्या घरी जाऊन त्यांचा पाहुणचार घेणं बरं नाही दिसणार.

ह्या विचार मनात आल्याबरोबर तो म्हाताऱ्याला म्हणाला–"आता इतक्या पावसातून महादेवच्या घरी जायच जमणार नाही मला. आजची रात्र इथेच काढू म्हटलं तर तुमची काही हरकत आहे का?"

यावर म्हातारा म्हणाला–"माझी काहीच हरकत नाही. ती खाट दिसतेय न? तिच्यावर झोप तू. मी या आराम खुर्चीवरच झोपतो. परमेश्वराची लीला काय अगाध आहे बेटा! चार मुलांचा बाप आहे मी, पण असा असहाय्य होऊन हे कोडगं आयुष्य जगतो आहे!" बोलता बोलता म्हाताऱ्याचे डोळे ओले झाले.

मध्यरात्रीपर्यंत आपल्या दुःखी जीवनाची हकिकत सांगून म्हाताऱ्याने आपलं मन मोकळं केलं–'तरुण होतो, तेव्हां मी भारी रागीट होतो. मुलाबाळांशी कठोरपणेच वागलो. तेव्हां मला माझं वागणं शिस्तीचं वाटे. मुलं मोठी झाली, नोकरीधंद्याला लागली. आणि एकएक करून दूर निघून गेली. बायको गेल्यावर अगदीच एकटा





पडलो मी. मुलांवर कधी प्रेम केलं नाही, म्हणून आई वारल्यावर त्यांनी नातंच तोडून टाकलं."

डोळे पुसत तो पुढे म्हणाला–"ही सारी माझ्याच चुकीची फळं भोगतोय मी! सुखदुःखात साथ द्यायला आलेल्या बायकोची किंवा मोठ्या होत जाणाऱ्या मुलांशी आपण प्रेमानं वागलो नाही, तर म्हातारपणी त्यांच्याकडून प्रेमाची किंवा सोबतीची अपेक्षा करणंही चूकच ना?"

म्हाताऱ्याची ही गोष्ट ऐकून नरसिंहच्या मनातही चलबिचल होऊ लागली. बराच वेळ नंतरही त्याला झोप आली नाही. सकाळ होण्यापूर्वी दोन-अडीच तास त्याला झोप लागली. सकाळीच त्याच्या पाठीवर थापटत त्याला कोणीसं उठवलं, तेव्हां त्याने डोळे उघडले-चांगलंच उजाडलं होतं!

नरसिंह भोवताली पाहू लागला, तर त्याला समोर महादेवकाका दिसले. ते आश्चर्याने म्हणाले–"अरे, रात्रभर डोकं टेकायला तुला काय हे भुताचं घरच मिळालं होय? मला वाटलं, मी घराचा पत्ता सांगताना चुकून उजव्या बाजूऐवजी, डाव्या बाजूला वळायला सांगितलं असावं. रात्री पावसाच्या गदारोळात मी तुला शोधायलाही येऊ शकलो नाही. पहाटेच मी तुला शोधायला निघालो."



आपण राहिलो ते घर भुताने पछाडलेलं आहे, हे ऐकून नरसिंह दचकला! आश्चर्याने तो म्हणाला–"मला तर कोणी भूतपिशाच्च नाही दिसलं इथे! रात्री एका म्हाताऱ्याने मला इथं झोपायला परवानगी दिली."

महादेवकाका यावर म्हणाले–"ज्या म्हाताऱ्याला तू भेटलास, ते म्हाताऱ्याचं भूत होतं हे तुला कसं कळणार? तो एक हडकुळा अन् संच असा म्हातारा आहे. उजव्या डोळ्याखाली एक काळा मस आहे त्याच्या, होय ना?"

"हां, हां! तोच म्हातारा भेटला होता मला." नरसिंह उत्तरला.

ओह! त्याला मरून तर दहा वर्षं झाली. स्वत:च्याच लोकांनी लाथाडलेला तो म्हातारा कष्टाने रहात, शेवटी अंथरुणाला खिळला. जशी काही झाली ही शिक्षा कमी झाली म्हणून शेवटी भूत होऊन, याच घरात राहून असाही त्रास सहन करतोय. अनेक लोकांनी याबद्दल मला सांगितलं होतं, पण मी विश्वास ठेवत नसे या गोष्टीवर. पण आज मात्र मला विश्वास ठेवावाच लागतोय, कारण आता तू प्रत्यक्ष तुझाच अनुभव सांगतोयस!" महादेवकाका म्हणाला. आपण रात्रभर एका भुताच्या सान्निध्यात राहिलो, या कल्पनेने नरसिंह आपादमस्तक थरारला!

एका आठवड्यातच नरसिंहचं नवं दुकान चालू झालं, अन् नर्मदेसह तो नव्या घरात रहायला लागला. आता तो तिच्याशी खूप प्रेमाने वागे. नर्मदेलाही हे नवं वातावरण खूप आवडलं. शिवमन्दिराजवळ आल्याबरोबर नरसिंह एकदम शान्त झाला होता. पहिल्यासारखं उगीचच चिडणं, रागावणं, धमकी देणं वगैरे अवलक्षणं कुठल्या कुठे नाहिशी झाली होती!

एक दिवस शिवमन्दिरात गेलेल्या नर्मदेला महादेवकाकांनी विचारलं–"आता तू खुष आहेस नं बाळ? तुझा नवरा खूप प्रेमानं वागतो न तुझ्याशी आता?"

"होय काका, ही सारी शंकराची कृपा!" नर्मदा हसत बोलली.

महादेवकाकांनी दचकून विचारलं–"शंकर? कोण शंकर?"

"कमाल आहे काका! या मन्दिरातला शंकर माहीत नाही तुम्हाला?" शिवाच्या पिंडीकडे इशारा करत नर्मदेने विचारलं.

"होय नर्मदा, तुझं म्हणणं खरंच आहे." एक मोठा श्वास टाकत काका म्हणाले. मनातल्या मनात ते म्हणाले–"शंकराची कृपा खरीच!"

शंकर! शेजारच्या गावातल्या ज्या शंकर नावच्या म्हाताऱ्याला बोलावून आणून काकांनी हे नाटक रचलं होतं, त्याच्याच कृपेनं तर नरसिंह सुधारला होता!





# वाईट स्वप्न

गोष्ट जुनी आहे. ब्रह्मदेशातल्या एक लहानशा गावात लेबसाँग नावाचा एक सावकार रहात असे. केवळ पैसा मिळवत रहाण्यातच त्याला आनन्द वाटे. एकदा तो आजारी पडला अन् त्याला वाटू लागले की, आता काही आपण यातून वाचत नाही! मरण्यापूर्वी देवांच्या अन् त्यांच्या भक्तांच्या गोष्टी ऐकाव्या अशी तीव्र इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली.

ही गोष्ट लेबसाँगने आपल्या नोकराला सांगून, एका मन्दिराच्या पुजाऱ्याला बोलावून आणण्याची आज्ञा त्याला दिली. पुजारी आला अन् मोठ्या अनिच्छेनेच लेबसाँगकडे पहात त्याने विचारले–"एकाद्या देवळात देवदर्शनासाठी जाऊन तुम्हाला किती दिवस झाले?"

"माझ्या नीटसं लक्षात नाही, पंडितजी!" सावकार उत्तरला.

"तुमच्या मनात आजपर्यंत देवाबद्दल कधी भक्तिभावना नव्हती. मग आता देवाच्या लीलांबद्दल कितीही ऐकलंत तरी तुम्हाला त्याचा उपयोग होणार नाही." असे म्हणून पुजारी तेथून निघून गेला.

शेवटी उत्तम वैद्यांकडून औषधपाणी करवून घेऊन लेबसाँग त्या दुखण्यातून चांगला बरा झाला.

एक दिवस तो पुजारी लेबसाँगला रस्त्यात भेटला. त्याने विचारले–"इतक्या भयंकर आजारातून बरे झालात तुम्ही?"

सावकार म्हणाला–"हां पंडितजी, पण एक वाईट स्वप्न पिच्छा सोडत नाहीये."

"वाईट स्वप्न? कोणतं बरं ते?" कुतूहलाने पुजाऱ्याने विचारले.

लेबसाँग सांगू लागला–"त्या स्वप्नात मी मरून स्वर्गात गेलो बरं का. पण तिथल्या पहारेकऱ्यानं मला अडवून विचारलं–'तू

मनोहर राऊत

कधी साधु-संन्यासी किंवा पुजाऱ्यांकडून काही पुण्यकथा ऐकल्या होत्यास का?' तर मी म्हटलं, 'नाही बुवा!' त्यावर चिडून द्वारपाल म्हणाला–'मग थांब इथेच. मी अशा एकाद्या माणसाला आतून शोधून आणतो.''

थोड्या वेळाने तो पहारेकरी परत आला, अन् म्हणाला–''तू भाग्यवान नाहीस इथे पुजारी किंवा साधु-संन्यासी नाहीये.''

सावकाराची ही चेष्टा ऐकून पुजारी चिडला, अन् लगबगीने तेथून निघून गेला.

काही दिवसांनी गावच्या पाटलाला सावकाराच्या या स्वप्नाची हकिकत कळली. त्याचाही त्या पुजाऱ्यावर फार राग होता, म्हणून लेबसाँगला बोलावून घेऊन पाटील त्याला म्हणाला–''अरे, तुझ्या त्या वाईट स्वप्नाबद्दल मला आत्ताच कळलं बघ! तू पुजाऱ्याचा छान सूड घेतलास तू! बरं झालं, त्याला असंच पाहिजे होतं! ते एकच स्वप्न पडलं तुला, की आणखीही एकादं पडलं?''

लेबसाँगला आता त्या पाटलाचीही टर उडवायची लहर आली. तो म्हणाला–

''हो, हो! हल्ली आणखी एक वाईट स्वप्न पडतं मला.''

''खरंच? कोणतं बरं ते?'' आश्चर्याने पाटलाने विचारले.

आता लेबसाँग आपले दुसरे स्वप्न सांगू लागला–''पहिलं स्वप्न संपल्याबरोबर, पुढे मग मी नरकात गेलो. जेंव्हा नरकपुरीच्या वेशीवर मी पोचलो, तेव्हा त्या दरवाजापलीकडून खूपशा पुजारी अन् संन्याशांच्या भांडणाचा आवाज मला ऐकू आला. इतका सगळा प्रवास करून मी थकलो होतो म्हणून तिथे जवळच ठेवलेल्या स्टुलावर जरा टेकावं असा विचार केला मी. स्टुलावर बसायला गेलो, इतक्यात एक यमदूत तेथे आला अन् म्हणाला–''अरे, हे स्टूल तुझ्याकरता नाही ठेवलं, तुझ्या गावच्या पाटलासाठी राखून ठेवलंय ते!–अन् असं म्हणून त्याने मला दूर फेकून दिलं!'' आणि 'ही-ही' करून हसत लेबसाँग तेथून निघून गेला!

पाटलाचं तोंड मात्र पहाण्यासारखं झालं!





# चिरजीवन

स्वर्गात देवेन्द्राचे शासन सुरू झाले, तेव्हा दुसऱ्या सर्व लोकांसाठी जे काही करायला हवे ते त्याने करून टाकले. शेवटी त्याच्या समोर विचार आला पृथ्वी बद्दलचा! तो विचार करू लागला की भूलोकवासी काय केलं म्हणजे सुखी होतील? शेवटी देवेन्द्राने साती नक्षत्रांना आपल्या जवळ येण्याची आज्ञा केली.

सर्व तारे ताबडतोब येऊन देवेन्द्रा समोर ओळीत उभे राहिले. सात ताऱ्यांनी एक स्वरात देवेन्द्राला विचारले–''काय आज्ञा आहे महाराज?'' देवप्रभु इन्द्र म्हणाले–''मी भूलोकवासियांना सुख दान करू इच्छितो, पण सहज प्राप्त झालेल्या वस्तूची किमत कमी होते. म्हणून मी तुम्हाला ज्या वस्तु देतो त्या तुम्ही पृथ्वी वर जाऊन योग्य किमतीला विकाव्यात अशी माझी इच्छा आहे.''

''जशी आपली आज्ञा महाराज! आम्ही तसंच करू.'' नम्रपणे साती तारे म्हणाले.

इन्द्राने पहिल्या नक्षत्राच्या हाती एक सोन्याची डबी देऊन सांगितले–''हा पहा, हा आहे हास्यरस! जो याचे सेवन करील, त्याला संतोष मिळेल. संतोषच मानवाची खरी शक्ति आहे.'' मग दुसऱ्या ताऱ्याच्या हातात आणखी एक सोन्याची डबी ठेवीत देवेन्द्र म्हणाला–''ही आहे सुशीलता! हाच प्राण्यांचा प्राण आहे.'' तिसऱ्याच्या हाती आणखी एक डबी देऊन देवप्रभुने सांगितले–''हे आहे स्वास्थ्य! धडधाकट शरीर हे मानवाचे मोठे भाग्य आहे.'' चौथ्या ताऱ्याच्या हातात एक सोन्याची वाटी देत देवेन्द्र म्हणाला–''हे पहा चिरजीवन! जिवंत असलं तरच माणसाला आपल्या इच्छांची पूर्ति करता येईल ना!'' पाचव्या ताऱ्याच्या हातात एक मंजूषा देत देवराज

म्हणाला–"हिच्यात आहे कीर्ति! माणसांना हिची प्रचंड हाव असते." सहाव्या ताऱ्याच्या हाती आणखी एक सुवर्णपात्र देऊन देवराज म्हणाला–"यात आहे आनंद! ऋषि-महर्षि याकरिताच तर जप-तप करीत असतात" सातव्या नक्षत्राच्या हातात एक सोन्याची डबी देऊन इन्द्राने सांगितले– "हे आहे ऐश्वर्य! जीवनरथ पुढे रेटण्या-साठी इंधन म्हणून याचा उपयोग होतो."

साती ताऱ्यांनी सुंदर स्त्री-रूप धारण केले नि ते पृथ्वी वर उतरले. आपापल्या जवळची वस्तु विकण्याचा ते प्रयत्न करू लागले. पहिल्या तीन ताऱ्यांकडील वस्तु कोणी ही खरेदी केल्या नाहीत. चौथी तारिका गल्ल्या-बोळातून हिंडत पुकारू लागली– "दीर्घजीवन! चिरजीवन!" तिच्या भोवती लोकांनी गर्दी केली नि चिरजीवनाच्या किमती बाबत ते विचारपूस करू लागले.

चौथी तारिका म्हणाली–"माझ्या अन्य बहिणी ज्या चीजा विकत आहेत, त्या ही तुम्ही खरेदी केल्या पाहिजेत! माझ्या सर्वात थोरल्या बहिणीपाशी आहे हास्य-रस, दुसरीच्या जवळ आहे सुशीलता! तिसरी पाशी आहे स्वास्थ्य! पाचवी, सहावी नि सातवी बहीण विकत आहे क्रमशः कीर्ति, आनंद नि ऐश्वर्य! या वस्तु तुम्ही खरेदी केल्या नाहीत, तर माझ्या या चिरजीवनाचा काय उपयोग? त्या वस्तु तुम्हीं खरेदी केल्यात का?"

लोक म्हणाले–"नाही, नाही."

चौथ्या तारिकेने समजाऊन सांगितले– "बंधूनो, जर त्या सर्व वस्तु तुमच्याजवळ नसल्या, तर माझे चिरजीवन निरुपयोगीच नाही का? त्या सर्व वस्तूंच्या उपस्थितीतच माझ्या डबीतील चिरजीवन तुम्हाला सुख देईल!"

नमुन्या दाखल चौथ्या तारिकेने आपल्या डबीतील थोडे चिरजीवन काढले होते, ते जवळच्या झाडावर बसलेल्या एका पोपटाच्या चोचीत पडले. आपल्या चोचीत पडलेल्या एक थेंबानेच पोपटाला तीनशे वर्षांचे चिरजीवन लाभले.











## वाचकांसाठी नम्र निवेदन

'चांदोबा' च्या प्रकाशनासाठी लागणाऱ्या न्यूजप्रिंट कागदाची किंमत अलिकडे भरमसाठ वाढली आहे. तरी पण मासिकाची किंमत न वाढवण्याचा आम्ही भरपूर प्रयत्न केला. आता मात्र 'चांदोबा' च्या सध्याच्या किंमतीत तो प्रकाशित करणं केवळ अशक्य आहे. म्हणून नाइलाजाने आम्हाला पुढील अंकापासून 'चांदोबा' चे मूल्य वाढविणे भाग पडत आहे. जुलई ९१ च्या अंकापासून 'चांदोबा' च्या प्रत्येक प्रतीचे मूल्य ४-०० रु. राहील, आणि वार्षिक वर्गणी ४८-०० रुपये.

या संदर्भात आम्ही वाचकांना विश्वासपूर्वक सांगू इच्छितो की मनोरंजक कथा व उपयुक्त सदरे यांनी 'चांदोबा' अधिकाधिक आकर्षक करण्याचा आमचा सतत प्रयत्न राहील.

आजच्या परिस्थितीचा सहृदयतापूर्वक विचार करून आमचे वाचक व एजंट नेहमी प्रमाणे आम्हास मदत करतील अशी आशा आहे.

—प्रकाशक




खाडी युद्ध समाप्त झाले. यामुळे दिलासा तर मिळाला, पण आनन्द वाटण्यासारखे यात काहीही नाही. जेव्हा दोन देशात मतभेद होतात तेव्हा त्यांना समजाऊन दोघात समेट घडवून आणण्यासाठी, जगात आज अनेक शान्ति प्रस्थापित करणाऱ्या संस्था अस्तित्वात आहेत. तरीही युद्ध झालेच—ही नक्कीच दु:खाची बाब आहे.

अशा प्रकारे शान्ति-समेट घडवून आणणाऱ्या विश्व संघटनांमधे संयुक्त-राष्ट्र-संघ हा सर्वात अग्रेसर मानला जातो. आता या खाडी-युद्धात या संस्थेने आपले कर्तव्य बजावण्याचे कार्य कसे केले, हे पहाण्याची—समजून घेण्याची हीच खरी वेळ आहे.

अंतरराष्ट्रीय सुरक्षा व शान्ति नांदवण्यासाठी २४ ऑक्टोबर १९४५ रोजी संयुक्त राष्ट्र संघाची योजना झाली. सर्व लहान-मोठया राष्ट्रांना याचे सदस्यत्व स्वीकारण्याची मोकळीक ठेवलेली आहे. संयुक्त राष्ट्र संघाची घटना स्पष्ट रुपाने असेच म्हणते की—'ही संस्था भावी पिढ्यांना युद्धाच्या धोक्यापासून वाचवण्यासाठी प्राणपणाने प्रयत्न करीत राहील.'

एका लहानशा, परंतु स्वतन्त्र अशा कुवेतवर आक्रमण करून इराकने त्यावर अधिकार प्रस्थापित केला. संयुक्त राष्ट्र संघाने इराकला कुवेत सोडून देण्याबाबत अनेकदा सांगून पाहिले, परंतु इराकने तिकडे कानाडोळा केला. त्यामुळे शेवटी नाइलाज होऊन बाकीच्या सदस्य राष्ट्रांची विचार घेऊन संयुक्त राष्ट्र संघाने शक्तीचा वापर करायचा मुद्दा डोळ्यासमोर ठेवला. मित्र सेनाचे नेतृत्व करण्याची जबाबदारी अमेरिकेने स्वीकारली. मित्र सेनांच्या या प्रयासाला ३७ देशांनी मदत पोचवली. इजिप्त, फ्रान्स, सौदी अरेबिया आणि इंग्लण्डने आपापले सैन्य पाठवले. कॅनडा व जर्मनीनेही मदत केली.

खाडी युद्धात 'इराकला हरवणे' हा हेतु नसून 'कुवेत मुक्त करणे' हाच प्रधान हेतु होता. एका देशाला आपले स्वातन्त्र्य अबाधित राखण्याचा हक्क प्राप्त करून देण्यासाठी मित्र सेनांनी इराकशी युद्ध केले. शेवटी त्यांचा उद्देश सफल झाला व कुवेत स्वतन्त्र झाले. तरीही हा उद्देश सफल करण्यासाठी रक्त सांडलेच! वातावरण प्रदूषित झाले, अतिशय जास्त प्रमाणात प्राण व वित्तहानी झाली. इराकने सुरुवातीलाच संयुक्त राष्ट्र संघाच्या निर्णयाला मान दिला असता, तर ही सारी हानि टळली असती! इराकही शेवटी संयुक्त राष्ट्र संघाचा सदस्यच होता! इतकेच सत्य या युद्धामुळे जगासमोर आले

की संयुक्त राष्ट्र संघाला अजून शान्तिपूर्ण मार्गांनी आपला हेतु साध्य करण्याचे सामर्थ्य प्राप्त झालेले नाही! या महान विश्व संघटनेच्या सदस्यांना आता आपल्या या दौर्बल्याचा खोलवर विचार करून, ते दूर करण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. एक अमर्याद व उत्तम शक्तिशाली अशी संयुक्त राष्ट्र संघटना इथून पुढे अशा भांडणांना बांध घालील व शान्ति प्रस्थापित करील अशी आशा आपण बाळगू या!










# परोपकारी शिव

सुरतपुरमधे परमेश व पार्वती नावाचे जोडपे रहात असे. त्यांना शिव नावाचा एकुलता एक मुलगा होता. त्यांचा एक छोटासा बगीचा होता. ती फुलबाग हेच त्यांचे सर्वस्व होते. त्याच्या नुसत्या हाताच्या स्पर्शाने वाळल्या झुडुपालाही फुले येत! शिवची आई त्याला म्हणे–"अरे बाळा, ही सर्व आपल्यावर वनदेवीचीच कृपा आहे बरं!"

एकदा शिवची आई आजारी पडली. पण तिच्या औषधपाण्यासाठी हातात एक तांबडा पैसाही नसल्यामुळे शिवचा बाप परमेश कुबेरनाथ नावाच्या सावकाराकडे गेला.

कुबेरनाथने परमेशचा बगीचाच गहाण लिहून घेऊन त्याला शंभर रुपये कर्जाऊ दिले. पण बाप लेकांना दुःखात लोटून ती देवाघरी निघून गेली.

मरण्यापूर्वी शिवला आपल्याजवळ बोलावून घेऊन ती म्हणाली होती–"बाळ शिव, वनदेवी ही फार कृपाळु आणि कोमल स्वभावाची आहे. तिला विसरू नकोस कधी!"

एक वर्ष असेच निघून गेले आणि एके दिवशी कुबेरनाथ येऊन परमेशला म्हणू लागला–"हे बघ परमेश! व्याज अन् मुद्दल मिळून आता पाचशं तू हजर करीपर्यंत तुझी बाग माझ्या हातात राहील; समजलं?" आणि इतके बोलून त्याने परमेशचा बगीचा आपल्या ताब्यात घेतला.

त्या दिवसापासून आपल्या पित्यासह शिवही त्या बगीचात केवळ माळी म्हणून काम करू लागला. आता कुबेरनाथ परमेशला म्हणाला–"तुझा मुलगा तू माझ्याकडे घरकामासाठी ठेवलास, तरच थोडंसं कर्ज फिटायची आशा!" असे म्हणून आता



कुबेरनाथने शिवला आपल्या घरचा नोकर बनवून टाकले.

अशा प्रकारे आणखी एक वर्ष निघून गेले. शिव समजून चुकला, की 'आता आयुष्यभर स्वत: आणि आपल्या बाबांनी मिळून कुबेनाथची कितीही गुलामी केली तरी हे कर्ज काही फिटायचं चिन्ह नाही!' त्याला आईची आठवण झाली आणि त्याने विचार केला की—वनदेवीची आपल्यावर खरोखरच कृपा असेल, तर आपले सारे प्रश्न आपोआप सुटतील आणि त्याच रात्री शिव जवळच्या जंगलात पळून गेला.

ते कडक उन्हाळ्याचे दिवस होते. शिव जंगलात एका झऱ्याजवळ पोचला. तेथे आसपासची झाडे-झुडपे सुकून चाललेली दिसली, म्हणून तो झऱ्याचे पाणी आणून त्या झाडांना घालू लागला. हे काम करता करता एक महीना निघून गेला आणि शेवटी वनदेवीला शिवची दया आली.

शिवसमोर प्रकट होऊन ती म्हणाली—"शिव, तुझ्या सेवेनं मी प्रसन्न झाले आहे. बोल, काय हवं तुला?"

शिवने वनदेवीला भक्तिभावाने प्रणाम केला आणि तिला आपली करूण कहाणी सांगितली. कुबेरनाथने व्याजावर व्याज चढवून आपली फुलबाग कशी हडपली आणि नंतर स्वत:ला आणि आपल्या पित्याला केवळ नोकर म्हणून कसे राबवले वगैरे सर्व काही सांगितले त्याने.

ते सर्व ऐकून शिवकडे सहानुभूतीने पहात वनदेवी म्हणाली—"त्या झाडाच्या फान्दीवर सोन्याच्या फळासारखं एक फळ दिसतंय ना, ते फळ माझ्या महिम्यामुळे तुला एकट्यालाच दिसत आहे. ते जर तू खाल्लंस तर तू कोणाला दिसू शकणार नाहीस. आपल्या अदृश्य रूपाच्या सहाय्याने तू आता आपली अडचण स्वत:च दूर करू शकशील. पण एक गोष्ट नीट ध्यानात ठेव—तुझी अडचण संपल्याबरोबर तावडतोब तू माझ्याकडे आले पाहिजेस. मग मी तुला तुझं रूप परत देईन. तू जराही उशीर केलास तर पुन्हा कधीच मी तुला दिसणार नाही. आणि तुला तुझं सारं आयुष्य अदृश्य रूपातच काढावं लागेल." शिवला अशा तऱ्हेची चेतावणी दिल्यावर वनदेवी अदृश्य झाली.

वनदेवीला नमस्कार करून, शिव त्या झाडाकडे गेला, आणि त्याने ते फळ तोडून खाल्ले. नन्तर सरळ तो आपल्या गावाकडे निघाला. पण तेथे पोचल्यावर शिवला जे दृश्य दिसले, ते फारच दु:खदायी होते! त्याच्या पित्याला, परमेशला एका झाडाला बांधून ठेवून, चिंचेच्या झाडाच्या वेतासारख्या छडीने कुबेरनाथ त्याला झोडपत होता.

ते पाहून अदृश्य रूपात असलेल्या शिवने एकदम मागून जाऊन सावकार कुबेरनाथच्या कमरेत एक जोरदार लाथ घातली. या अचानक हल्ल्याने कुबेरनाथ एकदम जमिनीवर फेकला गेला! परमेशला कुबेरनाथ मारत असल्याचे पहायला जमलेल्या लोकांना हे अचानक काय घडले, हे कळेना! आता तीच छडी उचलून शिवने कुबेरनाथला खूप बडवले आणि नंतर त्याच्या कमरेला लटकणारा किल्ल्यांचा जुडगा काढून घेऊन शिव तेथून सटकला.

केवळ हवेतच हलणारी छडी आणि हवेत तरंगत दूर जाणारा किल्ल्यांचा जुडगा



जेव्हा लोकांनी पाहिला, तेव्हा ते खूप घाबरले. त्यांना सर्वांना ती सर्व एखाद्या भुताचीच करणी वाटली!

किल्ल्या घेऊन शिव सरळ कुबेरनाथच्या खोलीत पोचला. तिजोरी उघडून त्याने सारे कागदपत्र काढून त्यांचा जमिनीवर एक ढीग बनवला आणि त्याला आग लावून दिली! हे दृश्य पाहून कुबेरनाथ वेड्यासारखा रडू-ओरडू लागला. पण कुबेरनाथबद्दल कोणालाच सहानुभूति वाटत नव्हती.

अशा प्रकारे स्वत:ची अडचण दूर होताच शिव तावडतोब वनदेवीला भेटण्यासाठी तेथून निघाला. वाटेतच रात्र झाली.



त्यामुळे एका घराच्या व्हरांड्यात रात्र घालवायचा त्याने विचार केला. पण तेथे पोचताच त्या घरात रडत बसलेल्या पतिपत्नींच्या आपसातल्या बोलण्यावरून त्याच्या लक्षात आले की त्यांनी आपल्या मुलीच्या लग्नासाठी थोडी थोडी करून जमा केलेली सगळी रक्कम त्याच रात्री कोणा चोराने पळवली होती. त्यांच्या बोलण्यावरून शिवला हेही समजले की चोराचे नाव कालूराम असे आहे.

आता शिव विचारात पडला. जन्मभर अदृश्यच रहावे लागण्याचा धोका होता. तरीही या पति पत्नींना मदत करायचा निर्णय त्याने घेतला.

त्या घराबाहेर पडून शिव तेथील रिकाम्या रस्त्यांवरून फिरू लागला. एका ठिकाणी एका घराच्या भिंतीला भोक पाडायच्या उद्योगात असणारे दोन चोर त्याला दिसले. त्याबरोबर मोठ्या आवाजात शिवने त्यांना विचारले—"कोण रे तुम्ही? ही तुमची आजची दुसरी चोरी न?"

अचानक केवळ हवेतूनच आलेल्या या शब्दांमुळे चोर घाबरून तेथून पळून जाऊ लागले. शिव त्यांच्या पाठलागावर राहिला.

आपल्या साथीदारांचे बोलणे ऐकून कालूरामचा चेहरा रागाने लाल झाला. चिडून त्याने विचारले—"काय? केवळ एक हजार रुपयेच मिळाले? सांगायला लाज नाही वाटत तुम्हाला? जरा कोणी ओरडलं, अन् पळून आलात तुम्ही? ठीक आहे. चला आता." इतके बोलून कालूराम जवळच्याच एका धबधब्याकडे चालू लागला.

हीच योग्य संधी साधून शिव गुहेत घुसला. त्या म्हाताऱ्या पतिपत्नींची पैशांची थैली खिडकीतून आत सोडून शिव पुढे निघाला. भरल्या दरबारात बसलेल्या राजा महादेववर्माच्या पायाशी त्याने दुसरी थैली नेऊन ठेवली.

हवेतून अचानक एक थैली येऊन आपल्या पायाशी पडलेली पाहून राजा आश्चर्यचकित झाला. थैलीतले हिरे-जवाहर पाहून इकडे तिकडे पहाणाऱ्या राजाला उद्देशून शिव म्हणाला—"महाराज, कालूराम दरोडेखोराने आपल्या राज्यातून लुटलेलं हे धन आहे. ते आपण ज्यांचं त्यांना परत करावं." नंतर त्याने चोरांचा बरोबर पत्ता सांगून, त्यांना पकडून कैद करायची विनन्तीही राजाला केली.

पण राजाला तर हवेतून फक्त आवाजच ऐकू येत होता! त्यामुळे राजाने आश्चर्याने विचारले—"महात्मन्, माझ्या राज्यावर एवढा मोठा उपकार करणारे आपण कोण आहात? मी आपणाला पाहू शकणार नाही का?"

पण शिव केव्हांच सरळ वनदेवीकडे निघून गेला होता. तो तिला म्हणाला—"माते, मला परतायला थोडासा उशीर झाला, क्षमा कर मला!"

यावर वनदेवी रागाने म्हणाली—"तू माझ्या सांगण्याप्रमाणे बरोबर वागला नाहीस. मी केवळ तुला स्वतःच्या कामासाठीच ती अद्‌भुत शक्ती बहाल केली होती, पण तू तिचा इतर कामासाठीही उपयोग केलास. त्या चुकीचं आता तुला प्रायश्चित्त करावे लागेल."

शिवने यावर वनदेवीला विनन्ती केली—"माते, तू जो दण्ड देशील तो खुशीने भोगीन. मला सारी चिंता आपल्या वडलांचीच आहे. बस, तू फक्त इतकाच मला आशीर्वाद दे, की त्यांचं या पुढील आयुष्य सुखाचं जावं."

आता वनदेवीने त्याला प्रत्यक्ष दर्शन देऊन म्हटले—"बेटा! मी हे फक्त तुझी परीक्षा पहाण्यासाठीच म्हणाले. मी तुला शिक्षा कशी करू?" असे म्हणून तिने त्याला ताबडतोब त्याचे रूप परत दिले.

मुलाला परत येताना पाहून त्याच्या बाबांना खूपच आनन्द वाटला. यानन्तर शिवच्या फुलबागेत सोन्याचे गुलाब फुलले. अशा तऱ्हेने फारच थोड्या काळात तो चांगल्या श्रीमंत लोकांच्यात गणला जाऊ लागला. आपल्या पैशांच्या मदतीने गरीब, गरजू लोकांची सेवा करीत तो 'परोपकारी शिव' म्हणून प्रसिद्ध झाला.



# धंद्याची मेख

शिल्लंगेरी गावचा धर्मनन्द आपल्या बायको व मुलीसह एका प्रसिद्ध पुण्यक्षेत्री देवदर्शनासाठी गेला. तेथे पोचण्यापूर्वी त्यांना एक नदी ओलांडावी लागणार होती.

यात्रेकरूंना पलिकडील किनाऱ्यावर नेण्यासाठी एक नाव नदीकिनारी तयार होती. धर्मनन्दने नावाड्याला विचारले–"पलीकडे नेण्यासाठी माणशी किती पैसे घेतोस तू ?"

नावाडी म्हणाला–"एक रुपया मालक !"

धर्मनन्दला मोठे आश्चर्य वाटले. कारण एकतर नदीच्या पाण्याला चांगलाच वेग होता अन् दुसरे म्हणजे पलीकडला किनारा या बाजुने दिसत नव्हता, इतका दूर होता ! एवढ्या मोठ्या अंतरावर नेऊन सोडण्यासाठी माणशी फक्त एक रुपया म्हणजे अगदीच कमी आहे. काय प्राप्ति होत असेल याला इतके कष्ट करून ? धर्मनन्द बायको व मुलीसह नावेत बसून पलीकडे गेला. देवदर्शन वगैरे उरकून तो परत फिरण्यासाठी पुन्हा नदीकिनारी पोचला. देवळाजवळ कुठे रहाण्यासाठी जागा नव्हती, त्यामुळे यात्रेकरू काळोख होण्यापूर्वीच नदी पार करायच्या गडबडीत होते. सर्वांनाच आपापल्या घरी जाण्याची घाई होती.

धर्मनन्दला पाहून नावाडी म्हणाला–"मालक, गैरसमज करून घेऊ नका; पण आता पुन्हा इकडून नदी पार करण्यासाठी मी माणशी पाच रुपये घेतो. आपण तीन लोकांचे मिळून पंधरा रुपये द्यावेत मला !"

"अरे, सकाळी इकडे आणायला आमच्याकडून तीनच रुपये घेतले होतेस की तू ! मग आता पंधरा का मागतोस ? काही खास कारण आहे वाटतं ?" धर्मनन्दने आश्चर्याने विचारले.

"तसं काही नाही मालक ! आपल्यासारख्यांना काय सांगायला का पाहिजे ? हीच तर आमच्या धन्द्याची मेख !" हळूच गालात हसत तो नावाडी उत्तरला.






[ २ ]

[हिमालयात रहाणाऱ्या सदानन्द मुनीने पृथ्वीच्या मूलतत्वां पासून एका लहानशा मानवाचे सृजन केले. यज्ञाच्या माध्यमातून तयार झालेल्या या उत्तम व साहसी बालकाचे नाव अपूर्व. तो एका बाहुलीएवढा लहान दिसत होता. हत्तीना आज्ञा देऊन, त्यांच्या कडून पाणी फवारून त्याने एका संपूर्ण गावाचे आगीपासून रक्षण केले. –पुढे वाचा]

हत्तींनी जमीनदाराच्या सेवकांचा पाठलाग करून त्यांना पळवून लावले. त्यांच्यातले काही पळता-पळता जमिनीवर पडले. काही जण मैदान ओलांडून गावात जाऊन लपले.

हत्तींनी त्यांच्यापैकी कोणालाही कसल्या प्रकारची दुखापत केली नाही. आपले काम झाल्यावर ते जंगलात निघून गेले.

गावातल्या अभागी, गरीब लोकांना जमीनदाराचे नोकर त्रास देऊ लागलेले पाहून अपूर्वचे मन द्रवले होते. अपूर्वचा या दुनियेशी नव्यानेच परिचय होत होता, तरीही शंभर वर्षांत मिळून एका मुनीनी जेवढा अनुभव प्राप्त केला होता, तेवढ्या साऱ्या अनुभवातून मिळालेले ज्ञान आता अपूर्वशी जोडले गेले होते. त्यामुळे निसर्गाच्या रहस्यमय शक्तींशी त्याचे जन्मतःच नाते जुळून गेले होते. या शक्तींच्या सहाय्यानेच तर त्याने हत्तींच्या कळपाला बोलावून



घेतले होते. हत्तींनी काम उरकल्यावर अपूर्वने मनातच इच्छिले की आता हत्तींनी परत जावे.

ते निघून गेल्यावर अपूर्व पृथ्वीतली सुन्दर दृश्ये पाहून आनंद उपभोगू लागला.

अचानक हवेतून वाहून आलेली एक आर्त किंकाळी अपूर्वच्या कानी आली! सर्वसामान्य माणसाला ती ऐकू येणे अशक्यच होते. पण अपूर्वची गोष्ट निराळी होती. त्याला खूप दूरचे ऐकण्याची व पहाण्याची शक्ति प्राप्त झालेली होती. आवाज न करता मनातल्या मनात कोणी ओरडले, तरी त्याला ते ऐकू येई.

ती किंकाळी ऐकताच अपूर्व त्या दिशेला धावला. जसजसा त्याचा वेग वाढला तसतसा तो अदृश्य होत गेला.

गावच्या दुसऱ्या कोपऱ्याला असणाऱ्या झोपडीपाशी तो पोचला, तेव्हां चहूकडे अंधार दाटला होता.

झोपडीच्या आतून एका स्त्रीचा करुण आवाज ऐकू येत होता–"दया करा माझ्यावर! माझ्या मुलाला सोडून द्या! सारे दागिने अन् पैसे देऊन टाकते मी तुम्हाला! पण माझ्या पोराला नेऊ नका हो!"

अपूर्वने हळूच झोपडीत डोकावून पाहिले. चांगली उंच, धिप्पाड अशी तीन माणसे उभी होती, एक स्त्री जमिनीवर त्यांचे पाय धरायला वाकलेली होती.

त्यांच्यापैकी एकाने एका तरुण मुलाच्या तोंडावर हात दाबून त्याला घट्ट पकडून ठेवले होते. त्या दीन बाईचे बोलणे ऐकून त्या डाकूंचा नायक मोठ्याने हसला. "हे बघ," तो म्हणू लागला–"आम्हाला तुझे पैसे, दागिने वगैरे काहीही नको. ते सर्व तर खूप आहे आमच्याकडे! आम्हाला तुझा हा मुलगाच हवाय. बळीसाठी योग्य अशी सर्व लक्षणं आहेत याच्यात! लपून राहून तीन दिवस आम्ही चांगलं पाहून घेतलंय याला. अशा मुलाला जन्म दिल्याबद्दल तुला अभिमान वाटायला हवा."





"होय, मला खरोखरच नेहमी अभिमान वाटतो ह्याचा! अशा माझ्या मुलाला तुम्ही घेऊन जाऊ पहाल, तर मी कशी गप्प राहू?" रडत रडत ती स्त्री म्हणाली.

"आमच्या कामासाठी तुझाच मुलगा योग्य आहे, याचाही अभिमान वाटायला हवा तुला! याला बळी देऊन आम्हाला आशिर्वाद मिळेल, तसाच तुलाही मिळेल." तो डाकूंचा सरदार म्हणाला.

ती स्त्री आणखीनच रडू लागली. आता मात्र त्या डाकूंचीही सहनशक्ती संपुष्टात येऊ लागली. त्यांनी तिला शेवटची सूचना दिली. "हे बघ, तू अशी ओरडत किंचाळत राहिलीस तर आम्हाला नाइलाजाने तुला मारून टाकावं लागेल. लक्षात ठेव, मी सरदार भैरवमल आहे! माझ्या नुसत्या नावानेच इथला सारा मुलूख थरथर कापतो. तुला आपला जीव वाचवायचा असेल, आपला नवरा सहीसलामत रहावा, असं वाटत असेल, तर एकदम गप्प बस." असे म्हणून ते डाकू चालू लागले.

त्याच मुलाला आपल्याबरोबर ढकलत, खेचत डाकू भरकन् वेगाने जंगलाकडे घेऊन गेले नि काही मिनिटातच दिसेनासे झाले.

ती स्त्री ही रडत ओरडत झोपडीबाहेर आली—"अरे, धावा कोणी! सरदार भैरवमल माझ्या पोराला घेऊन गेला. त्याला ते दुष्ट देवीसमोर बळी देणार आहेत म्हणे! त्याचे बाबा इथे नाहीत असं पाहूनच आले ते. असते तर काय असं सोडलं असतं त्यांनी डाकूंना? आणा रे सोडवून माझ्या लेकराला! माझा बाळ...माझा लाडका..."

अपूर्वने ओळखले की मुलाला सोडवून आणण्याची शक्ती गाववाल्या लोकात नाही. पण काही असले तरी गाववाल्यांबद्दल विचार करायची ही वेळ नव्हे. या विचाराने तो तावडतोब त्या डाकू मागे चालू लागला.

डाकू पाच मैलांचे अंतर तुडवून अखेर डोंगरांनी घेरलेल्या एका लहानशा दरीत पोचले. त्यात एका बाजूला कित्येक गुहा



होत्या. एका खूप मोठ्या गुहेसमोर दहापंधरा दरोडेखोर उभे होते.

"आपल्याला शोधाच फळ मिळालं. बाकी सर्व नीट तयार आहे नं?" त्यांच्या नायकाने विचारले.

"होय सरदार, आपल्या म्हाताऱ्याने मुहूर्त पक्का केला आहे. मध्यरात्री आहे बलिदानाचा मुहूर्त." एकजण उत्तरला.

"आता देवीच्या बाजूला असलेल्या गुहेत याला ठेवा. अन् ते हिरवं औषध देऊन झोपवून टाका त्याला! पण ते औषध अगदी थेंबभरच घाला हं. जास्त पडलं तर मध्यरात्री तो शुद्धीवर यायचा नाही. बलिदानाच्या पूजेच्या वेळी तो जागा असणं आवश्यक आहे." सरदार बोलला.

अपूर्वने पाहिले की एक माणूस गुहेत गेला अन् त्याने एका ग्लासात पाणी घेऊन एका बाटलीतला एक थेंबभर हिरवा द्रव त्यात घातला. ते पाणी त्याने त्या मुलाला प्यायला सांगितले.

"तो सावध असो वा नसो; त्याला नीट बांधून ठेवा समजलं ना? खूप कष्टानं शोधून आणलाय आम्ही त्याला. हा जर सुटून गेला तर..." सरदार बोलू लागला.

पण सरदाराचे बोलणे मधेच तोडत तो साथीदार म्हणाला—"अरे कुठे पळेल



हा पोरगा? दरीतून बाहेर पडायचा रस्ताही सापडायचा नाही..."

"चूप रहा! मी सांगतोय तसंच करायचं! समजलं?" सरदार गुरकावत बोलला.

"जशी आज्ञा सरकार!" दरोडेखोर लवून म्हणाला.

त्या दरोडेखोराने मुलाला लगेच गुहेत नेऊन एका चटईवर झोपवले. झाडीत लपून अपूर्वने हे पाहून घेतले. अपूर्वच्या हालचालीमुळे झाडाची काही पाने हलली. आवाज ऐकून दरोडेखोर चमकून म्हणाला—"कोण आहे तिथे?" यावर तो साथीदार म्हणाला—"अरे असेल एखादा ससा-बिसा!" पुन्हा काही मग कोणी तिकडे लक्ष दिले नाही.



मध्य रात्रीच्या वेळी बलिदानाच्या पूजेच्या कामात सर्व डाकू गुंतून गेले होते. अंधाराचा फायदा घेत अपूर्व आता हळूहळू पुढे सरकला अन् काय-काय चाललंय ते लक्षपूर्वक पाहू लागला. नंतर जिथे त्या बळीच्या मुलाला झोपवले होते त्या गुहेत तो पोचला. त्या मुलाकडे अपूर्वने न्याहाळून पाहिले. आपल्यापेक्षा शरीराने खूप मोठा आहे, हे त्याच्या लक्षात आले. एक हत्तीही उचलता येईल इतकी शक्ती अपूर्वच्या अंगात होती. तेव्हा मुलाला उचलून नेणे त्याला अशक्य नव्हते. पण मग नेहमीच्या वेगाने तो जाऊ शकला नसता. मुलगा अदृश्य होताच ते डाकू एखाद्या वावटळी-सारखे जंगलात पसरले असते; अन् त्या मुलाबरोबरच त्यांनी अपूर्वलाही पकडले असते. आता या परिस्थितीत काय बरे करावे?

गुहेतून विचित्रसा हास्यध्वनी ऐकू येऊ लागला. अपूर्वने तेथे जाऊन पाहिले. देवीच्या मूर्तीसमोर एक दरोडेखोर बसलेला होता; अन् 'देवीची' म्हणवली जाणारी मूर्ती खरी तर 'वाघाची' होती. हा सर्व अपूर्वला एक विनोदच वाटला.

"म्हातारबाबा, तुम्ही तर पुजारी. तुम्हीच आमच्यासारखे पिऊ लागलात तर हात कापेल न तुमचा ऐनवेळी. मग त्या पोराचं शिर एकाच घावात कसं उडवू शकाल? अन् तसं न झालं तर मात्र मी तुमचेच कापून तुकडे तुकडे करीन!" दरोडेखोरांचा मालक पुजाऱ्याला म्हणाला. "हं! आणखी एक गोष्टही लक्षात ठेवा; आपलं काम नीट न करणाराला हा भैरवमल सरदार कधी क्षमा नाही करत, कधीच नाही!"

"सरदार! आपण विश्वास ठेवा. मी पिणार नाही. माझ्यामुळे मी कामाची खोटी होऊ देणार नाही. चला दोस्त लोक! तुम्ही प्या, करा सुरू!" पुजारी म्हातारबाबा बोलला अन् त्या व्याघ्रदेवीच्या डोक्यावर फूल वाहिले.



तेथे जवळच दारूचा एक खूप मोठा घडा होता. एक डाकू त्यातून एक पात्र बुडवून दारू काढत होता अन् इतरांच्या पेल्यातून ओतत होता. सर्व डाकू मोठ्या मजेने दारू पीत होते.

हे सर्व पाहून अपूर्वच्या डोक्यात एक विचार चमकला! तो पटकन् ज्या गुहेत ते हिरवे औषध ठेवले होते, तेथे गेला. त्याजवळच एक पात्रही होते. त्यात ते हिरवे औषध ओतून घेऊन अपूर्व दारूच्या घड्याजवळ पोचला. नंतर तेथल्या एका दगडावर चढून त्याने ते औषध हळूच घड्यात ओतून दिले. जेव्हा सर्व दरोडेखोरांना दुसऱ्यांदा दारू वाटली गेली, तेव्हा ती पिऊन त्यांना गुंगी येऊ लागली, अन् तिसऱ्या पाळीला तर जोरजोरात हसत ते बेहोश होऊन सपाट झाले! दारू वाटणाराही स्वतः पिऊन वाटेतच आडवा पडला.

"हं! आता बलिदानाची वेळ झाली. त्या मुलाला इथे हजर करा बरं!" दरोडेखोरांकडे पहात म्हाताऱ्याने आज्ञा केली. पण सर्वजण दारू पिऊन गप्पगार झालेले पाहून त्याला मोठे आश्चर्य वाटले. "अरे ते सर्व काय झालंय? दोस्तांनो, काय झालं तुम्हाला?" जोरात किंचाळून त्याने विचारले. पण कोणीच उत्तर देण्याच्या स्थितीत नव्हता.



इकडे बन्दीवान केलेला तो मुलगा शुद्धीवर आला. अपूर्वने सर्व दोऱ्या तोडून त्याला मोकळे केले. ते सर्व पाहून मुलाला भारी आश्चर्य वाटले. अपूर्व म्हणाला– "आता आश्चर्य करायला वेळ नाही आपल्याला! चल लवकर. आता आपल्याला एका दरोडेखोराशी सामना द्यावा लागेल."

अपूर्वच्या आवाजात अद्भुत जादू होती. तो मुलगा पटकन अपूर्वच्या मागे निघाला. चालता चालता आपल्याच उंची इतका मोठा असा एक सुरा घेऊन अपूर्व पुजाऱ्याच्या समोर उभा राहिला. अन् त्याने मुलाला एक दारूचा पेला पुजाऱ्याच्या हाती द्यायला सांगितले. पुजाऱ्याला धमकी देत अपूर्व

म्हणाला–"तू मुकाट्याने ही दारू पी; नाहीतर हा सुरा भोसकीन बघ मी तुझ्या पोटात." यामुळे घाबरून पुजाऱ्याच्या तोंडून एक किंकाळी उठली! त्याला अपूर्व एका भुतासारखाच वाटला होता!

"घटकन पिऊन टाक!" त्या मुलानेही आता पुजाऱ्याला धमकावले. नाइलाजाने पुजाऱ्याने ती दारू प्यायली अन् क्षणभरात तोही धराशायी झाला!

"तुझं नाव काय?" अपूर्वने मुलाला विचारले.

"समीर." मुलगा उत्तरला.

"बरं चल आता. आपल्याला लवकर इथून पळायला हवं!" अपूर्व म्हणाला.

आता अपूर्व व समीर पळू लागले. अपूर्व म्हणजे कोणी परमेश्वरच असावा असे समीरला वाटले. दोघेही सकाळपर्यंत समीरच्या गावी पोचले.

राजाच्या सैन्याची एक तुकडी एका शहरातून दुसऱ्या शहराकडे जाताना जेव्हा त्या गावावरून जाऊ लागली, तेव्हां अपूर्वने समीरकरवी त्यांना डाकूंबद्दल सांगितले अन् त्यांना असेही सांगितले की दुपारपर्यंत ते डाकू शुद्धीवर येतील. त्या पूर्वीच त्यांना ताब्यात घेणे आवश्यक आहे. इतके झाल्यावर समीरचा निरोप घेऊन अपूर्व जायला निघाला.

"कृपा करून जरा थांबा ना!" समीरने त्याला विनंती केली.

अपूर्व थांबला, तेव्हा समीर बोलू लागला–"तुमचे आभार कसे मानावे, हेच कळत नाही मला!" अन् त्याच्या गालावरून अश्रू ओघळू लागले.

"आज तू मृत्यूच्या दाढेतून वाचला आहेस. तेव्हा आता लक्षात ठेव की जीवनात तुला खूप मोठी जबाबदारी निभावून न्यायची आहे. तुला कधी माझी जरूर वाटली, तर तू मनात तीव्रतेने इच्छा करून मला बोलवू शकशील. लक्षात ठेव, माझं नाव आहे अपूर्व!" अपूर्व प्रेमाने म्हणाला.

यानन्तर अपूर्व तत्काल तिथून पळून जाऊन अदृश्य झाला. (पुढील अंकात)





# सुकुमारी

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा त्या झाडाकडे गेला. फान्दीवर लटकणारे प्रेत काढून त्याने आपल्या खांद्यावर टाकले अन् पहिल्याप्रमाणेच मौन धारण करून स्मशानाची वाट धरली. अशा प्रकारे राजा जरासा पुढे जातो, तोच त्या प्रेतात निवास करत असलेला वेताळ म्हणाला–"राजा, तुझा प्रयत्न दर वेळी विफल होत असूनही तू आपला हट्ट सोडला नाहीस. त्यामुळे मला तुझं खूप कौतुक वाटतंय. चांगले शिकले सवरलेले आणि बुद्धिमान लोकही आपल्या तर्कटपणामुळे आणि ध्येयहीनतेमुळे काही काही वेळा फारच विचित्रपणे वागतात. तुझी जिद्द अन् तुझं वागणं पाहून मला शंका वाटतेय, की तूही असल्या लोकांपैकीच एक असावास. उदाहरण म्हणून मी तुला विजयपुरीच्या राजकुमाराची गोष्ट सांगतो. तुझं लक्षही जरा दुसरीकडे

## वेताळाच्या गोष्टी



लागेल अन् थोडीशी करमणूकही होईल बघ तुझी, ही गोष्ट ऐकलीस तर. नीट ऐक हं!" आणि वेताळ गोष्ट सांगू लागला–

विजयपुरीचा राजा विद्याधरला बराच काळपर्यंत मूलबाळ झाले नाही. अनेक तीर्थक्षेत्रांना जाऊन आणि खूपशी व्रते-वैकल्ये केल्यानंतरच एकदा राणीला मातृत्व प्राप्त झाले. पण दोन जुळ्या मुलांना जन्म देऊन तिने स्वर्गाची वाट धरली! जय-विजय मोठे होऊन वयात येतायेता सर्व प्रकारच्या विद्या व कलांमधे पारंगत झाले.

विद्याधर राजाचे आता वय झाले होते अन् त्याची तब्येतही आता म्हणावी तशी बरी नसे. त्यामुळे आता लवकरच राज्य-कारभारातून आपण मुक्त व्हावे, असे त्याला वाटू लागले. पण दोघा मुलांपैकी कोणाला गादीवर बसवावे याबाबत त्याला निर्णय घेता येईना, कारण दोघांपैकी कोणीही दुसऱ्यापेक्षा कोणत्याही बाबतीत कमी नव्हता.

राजाने आपल्या खाजगी सल्लागारांशी याबाबत चर्चा केली. मुख्य मन्त्र्याने राजाला सल्ला दिला–"आपले दोन्ही राजपुत्र सिंहासनावर बसायच्या योग्यतेचे आहेत. तरीही थोरल्या मुलालाच राजा बनवणे धार्मिक दृष्ट्या योग्य होईल."

त्याच दिवशी आपल्या दोन्ही पुत्रांना जवळ बोलावून राजा विद्याधर म्हणाला–"तुम्हा दोघांचेही विवाह बरोबरच करून द्यावे आणि जयचा राज्याभिषेक करून द्यावा, अशी माझी इच्छा आहे. माझी तब्येत दिवसेंदिवस खालावत चालली आहे. उर्वरित काळ आपल्या राज्यातल्या पर्वतीय प्रदेशात घालवावा, असं माझ्या मनात आहे. मी आता लवकरच राज्यांतल्या राजकुमारींच्या तसबिरी मागवून घेतो."

हे ऐकून जय म्हणाला–"क्षमा करा, बाबा! पण माझ्यासाठी कुणाची तसबीर वगैरे मागवायची जरूर नाही. आपल्या मुख्य शिल्पाचार्यांच्या मुलीशीच विवाह करायची इच्छा आहे माझी, माझं प्रेम आहे तिच्यावर!"



जयचे बोलणे ऐकून राजाला आश्चर्यच वाटले! आपले राजपुत्र पक्के निश्चयी आहेत हे राजाने ओळखले होते. त्यामुळे तो दुसरा राजपुत्र विजय याला म्हणाला–"तुझं काय म्हणणं आहे विजय?"

"बाबा, माझं मन मी उद्या सांगेन. आता मी जातो." इतके बोलून राजकुमार विजय तेथून निघून गेला.

विजयने दुसऱ्या दिवशी येऊन राजाला सांगितले–"बाबा, जगातल्या सर्वात सुकुमार, कोमल अशा राजकन्येशीच विवाह करायची माझी इच्छा आहे, तेव्हा केवळ अशा प्रकारच्या राजकन्यांच्या तसबिरीच फक्त मागवून घ्या."

एका महिन्याच्या आतच सुकुमार मानल्या जाव्यात अशा काही राजकुमारींच्या तसबिरी येऊन दाखल झाल्या. त्यांपैकी भुवनगिरी, उदयगिरी व चन्द्रगिरीच्या राजकन्यांच्या तसबिरी निराळ्या करीत विजय म्हणाला–"बाबा, या तीनही राज-कुमारींना मी स्वतः प्रत्यक्ष भेटेन. त्यांना काही प्रश्न वगैरे विचारून, एकीला आपली पत्नी बनवून घेऊन येईन. त्या त्या राज्यां-कडे निरोप पाठवा, की मी राजकुमारीला पहायला स्वतःच येत आहे."

विजय प्रथम भुवनगिरी राजकुमारीला पहायला गेला. तिथला राजा विजयला



पाहून खूप झाला. त्याला आपल्या राज-वाड्यात घेऊन जाऊन राजाने त्याचे चांगले स्वागत केले. नन्तर त्याने आपल्या कन्येला लगेच आपल्या महालात येण्याबाबत निरोप पाठवला.

पण थोड्याच वेळात एका दासीने येऊन सांगितले की–"क्षमा असावी महाराज, पण युवराणी अजून झोपल्या आहेत. रात्री पंख्यातलं एक मोरपीस तुटून युवराणींच्या पलंगावर पडलं. ते काही त्यांच्या लक्षात आलं नाही. पण त्यामुळे त्यांना रात्रभर झोप आली नाही. सगळं अंग दुखत राहिलं. आत्ता कुठे त्यांना जरा झोप लागलीय. त्या राजकुमारांना संध्याकाळीच भेटू शकतील."

त्या दिवशी संध्याकाळी विजय राजकुमारीला भेटला. उद्यानात तिच्याबरोबर चालता चालता त्याने तिला विचारले– "आपला विवाह ठरला, तर विवाहाच्या वेळी, मला आवडणारी निळ्या रंगाची साडी नेसाल तुम्ही?"

"नाही. मला लाल आवडते. लालच नेसेन मी!" राजकुमारी म्हणाली.

"बरं, विवाह-समारंभ संपल्यावर तुम्ही प्रथम माझ्या पिताजींना नमस्कार कराल, कीं स्वतःच्या?" विजयने दुसरा प्रश्न विचारला.

"का बरं? मी प्रथम माझ्याच पिताजींना नमस्कार करीन!" राजकुमारी उत्तरली.

"अच्छा? ठीक. मेजवानीच्या वेळी प्रथम माझ्या आवडीची खीर खा – असं म्हटलं तर?"

"मुळीच नाही. मी प्रथम माझ्या आवडीची पुरणपोळीच खाईन!"

इतका संवाद झाल्यानंतर दुसऱ्या दिवशी विजय उदयगिरी राज्यात पोचला.

उदयगिरीचा राजा केवळ नावालाच 'राजा' होता. तेथील सर्व राज्यकारभार राणीच्याच हाती होता. तिने विजयचा उत्तम अतिथिसत्कार केला.

बराच वेळ वाट पाहूनही राजकुमारी आली नाही, तेव्हां विजय म्हणाला–"आता आपण राजकुमारींना बोलावून घ्या ना!"



यावर उदास चेहऱ्याने राणी म्हणाली– "संध्याकाळी भेटवीन मी तिला तुम्हाशी बेटा! सकाळी स्नानाच्या वेळी चन्दन आणि मलई चांगली फेटून दासी अंगाला लावायला गेल्या तर त्यात चुकून राहून गेलेल्या एका लहानशा कणामुळे राजकुमारीच्या गालाला जखम झाली. त्यामुळे स्नानानंतर ती आता वैद्याच्या देखरेखीखाली आराम करीत आहे."

त्या दिवशी संध्याकाली उदयगिरी राजकुमारीशी झालेल्या भेटीच्या वेळीही विजयने तिला भुवनगिरी राजकुमारीला विचारलेले प्रश्नच विचारले. पहिल्या प्रश्नाच्या उत्तरादाखल राजकन्या म्हणाली–"मी तुमच्या आवडीची निळी साडी नेसेन."

दुसऱ्या प्रश्नाला ती म्हणाली–"मी आधी तुमच्या पिताजींपुढेच नमस्कारासाठी वाकेन."

शेवटच्या, तिसऱ्या प्रश्नाला ती उत्तरली– "मी प्रथम तुमच्या आवडीची खीरच खाईन. बाकीचे पदार्थ नन्तर!"

आणि ही सर्व उत्तरे तिने गोड आवाजात, लाजेने चूर होत दिली.

तेथून विजय चन्द्रगिरीच्या राजकुमारीला भेटायला गेला. तेथेही त्याचा भव्य स्वागत–सत्कार झाला. राजा-राणी दोघेही स्वतः सामोरे येऊन विजयला राजवाड्यात घेऊन गेले.

विजयने काही विचारण्यापूर्वीच ते म्हणाले–"बेटा, अन्यथा समजू नकोस.





राजकुमारीची तुझी भेट आज संध्याकाळीच घडवून आणणे शक्य होईल."

विजय हंसत म्हणाला, "आपण कदाचित् तिथि-नक्षत्र वगैरे विचारात घेत असाल नं भेटीसाठी?"

"नाही बेटा, तसं नव्हे. पण आज सकाळी देवीच्या मन्दिराकडून येताना पारिजातकाचे एक फूल वाऱ्यामुळे राजकुमारीच्या डोक्यावर पडले. त्यामुळे तिला असह्य वेदना होत आहेत." डोळ्यातले पाणी पुसत महाराणी बोलली.

संध्याकाळी चन्द्रगिरी राजकुमारीला तिच्या खास महालात भेटून विजयने तेच तीन प्रश्न पुन्हा विचारले.

साडीची गोष्ट येताच राजकुमारी म्हणाली– "साडीच्या रंगाबद्दल माझी काही खास आवड-नावड नाही, मी फक्त इतकंच पहाते की ती अगदी हलक्यात हलकी असली पाहिजे वजनाने! जड साडी मी कधी नेसूच शकत नाही."

नमस्काराबद्दल ती म्हणाली– "आधी कुणाला अन् मग कुणाला हा प्रश्नच येत नाही ना, कारण सर्वांना वाकून वाकून नमस्कार करीत राहीन, तर कंबरच मोडेल नाही! मी आपली सर्वांना मिळून एकच नमस्कार करीन."

जेवणाचा प्रश्न निघाला तेव्हा ती म्हणाली– "आधी काय खायचं, हे माझ्या हाती कुठे आहे? दासी जो पदार्थ तोंडात घालील, तोच खाते ना मी!"

विजय आपल्या राज्यात परतला आणि त्याने राजा विद्याधरला सांगितले की– "बाबा, मी चन्द्रगिरीच्या राजकन्येशी विवाह करू इच्छितो. जगातल्या सर्व राजकन्यांत तीच सर्वात नाजुक आणि कोमल आहे."

आपली गोष्ट इथेच संपवत वेताळ विक्रमला म्हणाला– "राजा, कोणताही पुरुष खरं तर आपल्या भावी पत्नीत विनयीपणा, बुद्धिमत्ता आणि सौन्दर्य शोधायचा प्रयत्न करतो. पण आपली पत्नी केवळ नाजुक अन् कोमलच असावी असं म्हणणं हास्यास्पद नव्हे का? तार्किक बुद्धि, समजूतदारपणा आणि सामान्य माहिती असणारा कोणीही असं वागणार नाही, नाही का? विजयच्या या वागणुकीचं काही खास असं कारण असू शकेल? या माझ्या प्रश्नांची उत्तरं माहित असूनही देण्याचं टाळलंस तर तुझे मस्तक फुटून त्याचे तुकडे तुकडे होऊन जातील."

यावर राजा विक्रम उत्तरला– "केवळ काही मिनिटांनी लहान असल्याने विजयला राज्यप्राप्ति झाली नाही. राजा होणारा मोठा भाऊ राजमर्यादा वगैरे जराही माहीत नसलेल्या एका सामान्य मुलीशी लग्न करीत आहे. अशी गरीब घरातली मुलगी राणी झाली, तर राजघराण्यातल्या विजयच्या बायकोला तिच्याबद्दल असूया वाटणं स्वाभाविकच होईल. त्यामुळे एखाद्या वेळी स्पर्धा अन् त्याहीपुढे जाऊन कारस्थानं वगैरे शिजायची शक्यता आहे. अशा परिस्थितीत आपल्याकडे येणाऱ्या मुलीत असे काही वैशिष्ठ्य असावे की, आपण राणी बनू न शकलो, तरी आपल्यातल्या या वैशिष्टयामुळे तिला आपला अभिमान कुरवाळत बसता येईल. 'दुनियेतली मीच एकटी एक सुकुमार अन् कोमल मुलगी आहे' या भावनेमुळे ती तृप्त राहील. हे तर काही नाही, पण केवळ प्राजक्ताचे फूल डोक्यावर पडल्यामुळे डोकेदुखी सुरू झालेल्या, चन्द्रगिरीच्या राजकुमारीच्यात मुकुट संभाळणं किंवा पुऱ्या राज्याचा संभाळ करण्याची कुवत तरी कशी असेल? आपल्या कुटुम्बात स्वास्थ्य अन् शान्ति नांदावी या इच्छेनेच तर विजयने हा निर्णय घेतला. तार्किक दृष्टीने आणि भविष्यात उपयोगी पडेल अशा हेतूनेच विजयने असे केले."

वेताळाला अशा तऱ्हेने उत्तर देण्यामुळे राजाचे मौन भंग झाले आणी वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्याच झाडावर जाऊन लोंबू लागला.

(कल्पित)



# विचित्र रोगपरीक्षा

बुद्धिशर्मा नावाचा एक वैद्य आपल्या पोटा-पाण्याचा प्रश्न सोडवण्याच्या उद्देशाने कनकपुरी गावात येऊन राहू लागला. तोपर्यंत त्या गावचे लोक आपल्या औषध-पाण्यासाठी शेजारच्या गावी जात. पण आता त्यांचा प्रश्न मिटला अन् थोड्याच दिवसात ते म्हणू लागले–"अरे, या बुद्धिशर्मांचा हातगुण चांगला आहे बरं का!"

माधव नावाचा तेथला एक श्रीमन्त माणूस अगदी पहिल्यानेच बुद्धिशर्माकडे गेला. त्याने आपल्या पोटदुखीच्या व्यथेबद्दल वैद्याला सांगितले.

"केव्हापासून दुखतंय तुमचं पोट?" वैद्याने विचारले.

"आज सकाळपासूनच. पण मग मला सहन होईना, म्हणून गाडी जोडून आत्ता या कडक उन्हाच्या वेळी आलो बघा." माधव बोलला.

"बरं, आज सकाळी काय खाल्लं होतंत?" बुद्धिशर्माने विचारले.

"चार चपात्या खाल्ल्या होत्या. कदाचित नीट भाजल्या गेल्या नसाव्यात त्या!"

एक औषधाची बाटली माधवच्या हातात देत बुद्धिशर्मा त्याला म्हणाला–"रोज सकाळ-संध्याकाळ यातले चार-चार थेंब आपल्या डोळ्यात घालत रहा."

हे ऐकून माधव चिडून म्हणाला–"ही कसली रोगपरीक्षा तुमची? इथं माझं पोट दुखतंय, अन् तुम्हीं डोळ्यात घालायला औषध देताय? चेष्टा करताय होय?"

यावर हसत हसत बुद्धिशर्मा म्हणाला–"चेष्टा? छे, छे; चेष्टा कशी करीन? आपल्या डोळ्यात दोष आहे, म्हणूनच तुम्ही त्या कच्च्या चपात्या खाल्ल्यात. पोटदुखी आपोआप थांबेल. पण आपल्याला खरं तर डोळेच ठीक करून घ्यायची गरज आहे!"

–पुष्पराज जोशी





# महान् स्वप्नदर्शी भारत

## सर्वात प्रथम भारतीय:

दादाभाई नौरोजी (१८२५-१९१७) मुंबईतील पारशी जमातीचे नेता होते, इतकेच नव्हे, तर ते पुढे संपूर्ण भारताचेही नेता बनले. लंडनच्या 'हाऊस ऑफ कॉमन्स'चे सदस्यत्व मिळालेले पहिले भारतीय गृहस्थ तेच होत. १८८६, १८९३ आणि पुन्हा १९०६ मधे 'इंडियन नॅशनल काँग्रेस'चे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली होती. त्यांच्याच अध्यक्षतेखाली काँग्रेसने कलकत्ता अधिवेशनाच्या वेळी प्रथम जाहीर केले की, 'स्वराज्य, म्हणजेच देशाचे स्वातंत्र्य हेच आमचे ध्येय आहे!' १८९३ मधे लाहोरमधे काँग्रेसची जी महासभा झाली त्यावेळी आपल्या अध्यक्षीय भाषणात ते म्हणाले:

"आपण सर्वजण एकाच मातेची अपत्ये आहोत. अन् ती माता म्हणजे आपला भारत! आपल्याला एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवायला हवी की – मी एक भारतीय आहे, आणि मी देशाच्या बाबतीतले माझे कर्तव्य निभावून नेत आहे. मी या भावनेनेच नेहमी आपली काम करत असतो–केवळ हीच भावना असते माझ्या मनात, की मी हिन्दु असेन वा मुसलमान, पारशी असेन किंवा ख्रिश्चन की आणखी दुसऱ्या कुठल्या धर्माचा–पण सर्वात अगोदर भारतीय आहे! आमचा देश आहे भारत अन् आमची राष्ट्रीयता आहे भारतीयता!"

## तुम्हाला माहीत आहे?

१. जगातील सर्वात मोठे व वजनदार जनावर कोणते?
२. लांबीने सर्वात अधिक असणारे जनावर कोणते?
३. आजपर्यंतचा सर्वात वजनदार माणूस कोण?
४. त्याचे वजन किती होते?
५. सर्वात वजनदार स्त्री कोणती?
६. तिचे वजन किती होते?

[पान ३६ पहा]

# कार्तिकेय



तारकासूर नावाच्या राक्षसाने ब्रह्मदेवाकडून अपूर्व असा वर मिळवला, आणि गर्वात फुगून जाऊन देवांना तो अनेक प्रकारे त्रास देऊ लागला. त्याचा त्रास सहन न होऊन अखेर इन्द्रादि सर्व देव महादेवाला शरण गेले. त्यांनी शिवाची प्रार्थना केली की–"हे महादेवा, आमचं या राक्षसापासून रक्षण कर!" परमेश्वराच्या तृतीय नेत्रातून निघालेले तेज अग्निदेवाने गंगा नदीत नेऊन पोचवले. गंगेने ते हरळीने भरलेल्या शरवण सरोवरात पोचवून दिले. तेथे ते तेज एका दिव्य अशा बालकात रूपान्तरित झाले. ती अजब घटना पाहून सहा कार्तिक मातांनी तेथे जाऊन त्याला दूध पाजले. त्यावेळी त्या बालकाला सहा शिरे आणि बारा हात उगवले. त्यामुळे सहा मातांना त्या बालकाला दूध पाजण्याचे आणि त्याचे संगोपन करण्याचे भाग्य प्राप्त झाले. कृत्तिकांनी त्या शिशुचे संगोपन केल्यामुळे त्याला कार्तिकेय हे नाव मिळाले. सहा शिरे असल्याने त्याला 'षडानन' असेही म्हणत. कुमार, स्कन्द, सुब्रह्मण्यम, गुहा आणि शरवण इ० त्याची आणखीही नावे आहेत.

भगवान शिव व माता पार्वती यांनी त्या बालकाचा 'आपलाच पुत्र' म्हणून स्वीकार केला. त्याला देवांचा सेनापती नेमले गेले. त्याने राक्षसाला आव्हान देऊन त्याला हरवले आणि ठार मारले. अशा तऱ्हेने कार्तिकेयाने देवांचे तारकासुरापासून रक्षण केले.

'आपल्या पित्याला प्रणवरहस्य सांगणारा' अशा रूपातही भक्तगण कार्तिकेयाचे गुणगान करतात.

## चांदोबाच्या बातम्या

### विचित्र प्रथा

कर्नाटक राज्यातील धारवाडजवळ गदग प्रान्तात जन्मांध असणाऱ्या पंचाक्षरी गानी नावाच्या एका संगीतज्ञाने १९१४ मध्ये एका संगीत विद्यालयाची स्थापना केली. तेंव्हापासून प्रत्येक पिढीत त्या विद्यालयात शिक्षण घेणारांमधे एक तरी जन्मांध विद्यार्थी असतोच. आजचे सुप्रसिद्ध गायक शिमोगा वेणुगोपाल यांचे संगीतशिक्षण याच विद्यालयात झाले, आणि जन्मान्ध असूनही एक 'प्रतिभासंपन्न गायक' म्हणून ते नावारूपास आले.





### शॉर्टहॅण्डचे रेकॉर्ड

लोकसभेचे रिपोर्टर हरीश्चन्द्र विष्ट यांनी २१ व्या अखिल भारतीय शॉर्टहॅण्ड चॅम्पियनशिप प्रतिस्पर्धेत भाग घेऊन, पहिला नंबर मिळवून एक नवीन रेकॉर्ड प्रस्थापित केले. ही चढाओढ तिसऱ्यांदा यावेळी मिनिटाला २५० शब्द या वेगाने लिहून जिंकली. मागच्या दोन्ही वेळी ही स्पर्धा यांनीच जिंकली होती. १९८० साली त्यांच्या पित्याने हा वेग प्राप्त केला होता. परंतु केवळ २१ वयाचा हा एकच असा आहे, की ज्याने इतक्या लहान वयात हे रेकॉर्ड प्रस्थापित केले.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. उज्जयिनी, स्ट्रॅटफोर्ड-अपान-अवान, ट्रॉय, अयोध्या, मैलापुर – या स्थानांशी संबंधित कवि-लेखक कोण कोण आहेत?

२. जास्तीत जास्त लेखकांच्याच कबरी जेथे आहेत, असे कबरस्थान कोणते?

३. इण्डो-आंग्लियन लेखक कोण?

४. प्राचीन भारतातला संस्कृत भाषेचा महान् व्याकरणतज्ञ कोण होता?

५. त्याचा जीवन-काल कोणता आणि त्याच्या ग्रन्थाचे नाव काय?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे?

१. ब्लू व्हेल.

२. जिराफ.

३. अमेरिकेतला जॉन ब्रॉवर मिनोच (१९४१-८३).

४. ६३५ किलो.

५. अमेरिकेची पर्सी पर्ल (१९२६-७२).

६. २९९ किलो. किंवा ५५० पौंड.

### साहित्य

१. कालिदास, शेक्सपियर, होमर, वाल्मिकी, तिरुवल्लुवर.

२. लंडनचे वेस्ट मिनिस्टर ॲबे.

३. इंग्रजीत लिहिणारा भारतीय.

४. पाणिनी.

५. इ. स. पू. ४ थ्या शतकात. अष्टाध्यायी.



जगातल्या पौराणिक कथा–५

## पर्सिअस व आन्द्रोमेदा

अर्गोसचा शासक राजा अक्रीसियस याला एकदा एक भविष्यवाणी कळली की – आपल्या मुलीच्या मुलाच्या हातून आपले मरण ओढवणार आहे. या वाणीवर विश्वास ठेवून राजाने आपली कन्या दानाई हिला तिच्या नवजात अर्भकासह आपल्या देशातून बाहेर काढून लावले.

मोठ्या निर्दयपणे त्या मायलेकरांना एका नावेत बसवून वादळी सागरात सोडून देण्यात आले! सागरी लाटांनी ती नाव सेरिफोस द्वीपाच्या किनाऱ्यावर आणून सोडली.





सागरकिनाऱ्यावर त्या मायलेकरांना एका कोळ्याने पाहिले व त्याने त्यांना आपल्या राजाकडे नेऊन सोडले. सेरिफोसच्या राजाने त्या दोघांचा मोठ्या प्रेमाने सांभाळ केला. एका मन्दिरात त्यांच्या रहाण्याची व्यवस्था करण्यात आली होती.



वर्षे जात राहिली आणि पर्सियस नावाच्या त्या अर्भकाचे रूपान्तर आता एका साहसी युवकात झाले. तो इतका साहसी होता की, त्या मायलेकरांचा प्रेमाने सांभाळ करणारा स्वत: राजाच आता या तरुण पर्सियसचा हेवा करू लागला.

एकदा राजाने पर्सियसला एका अगदी खास अशा मेजवानीला बोलावणे केले. त्या मेजवानीसाठी ज्या ज्या राजकुमारांना आमन्त्रित केले होते; त्या सर्वांनी राजाला एक एक घोडा बक्षिस द्यायचा अशी प्रथा असे. पण बिचाऱ्या पर्सियसजवळ तर राजाला द्यायला काहीच नव्हते! त्यामुळे अन्य सारे राजपुत्र त्याची टर उडवून त्याला हसू लागले.





“घोड्याच्या ऐवजी मी आपणाला काय द्यावे?” पर्सियसने यजमान राजा अक्रीसियसला विचारले. “मेदुसाचे शीर!” राजा उत्तरला. मेदुसा एका राक्षसीचे नाव होते. ज्याची नजर तिच्यावर पडेल, तो दगड होऊन पडत असे — अशी तिची ख्याती होती! पण साहसी पर्सियसने राजाची मागणी पुरी करण्याचे आश्वासन दिले.

मेदुसा कुठे रहाते, हे सुद्धा पर्सियसला माहीत नव्हते. पण तिच्या तीन्ही बहिणींचे निवासस्थान त्याला चांगले ठाऊक होते. त्या तिघींच्यात मिळून एकच डोळा व एकच दात होता. त्या तिघीही गरजेप्रमाणे आलटून पालटून या वस्तु वापरत असत. पर्सियसने त्या वस्तु ठेवायची त्यांची डबीच पळवली. त्यांच्याकडून मेदुसाचा पत्ता विचारून घेऊनच त्याने ती या बहिणींना परत दिली.





यानंतर प्रथम त्याने देवांची प्रार्थना करून त्यांच्याकडून काही अद्भुत अशा शक्ति मिळवल्या. नंतर तो मेदुसाकडे गेला. तिच्याकडे सरळ पाहिले तर आपण दगड होऊन पडू-ही गोष्ट माहीत असल्याने त्याने फक्त आपल्या ढालीत तिचे प्रतिबिंब पाहिले आणि तिचे मस्तक धडावेगळे केले!

तेव्हा तिच्या त्या मस्तकातून पडणारे रक्ताचे थेंब सापांमध्ये परिवर्तित होऊ लागले. पण त्यांना अजिबात न भिता ते शिर तसेच लोंबते घेऊन तो आपल्या द्वीपाकडे परत आला. या कामात अनेक प्रकारे देवांनीच त्याला मदत केली होती.





इथिओपियाच्या सागरकिनाऱ्यावर पर्सियसने एकदा एका सुन्दर युवतीची दगडी मूर्ति पाहिली. त्या युवतीचे नाव होते आन्द्रोमेदा. एका रक्तपिपासू भयानक सागरराक्षसाने तिला गिळले होते व आईबाप तिचे रक्षण करू शकले नव्हते.



पर्सियसने तावडतोब समुद्रात उडी घेतली आणि समुद्रीराक्षसाच्या उजव्या बाहूवर आपल्या खंजिराने अचानक वार केला. रक्त गोठून जाईल असा आवाज करून तो राक्षस मरून पडला. अशा प्रकारे पर्सियसने आन्द्रोमेदाला मुक्त केले.



आन्द्रोमेदाच्या आईबापांनी मोठ्या आनन्दाने आपल्या आन्द्रोमेदाचा विवाह पर्सियसशी करून दिला. सर्वजण या विवाहामुळे खूप झाले.
(पर्सियसच्या आणखी काही साहस-कथा पुढील अंकात वाचा.)



# यक्ष हसला

यक्षस्थळ नावाच्या राज्यात एक शेतकरी रहात असे. त्याचे नाव होते नन्दू. शेतातली सर्व कामे आणि आपल्या गुरांची देखरेखही तो स्वतःच करी. तो भारी कंजूष होता. सकाळी सूर्योदयापूर्वी जागत असे तो, व तेव्हापासून चांगली रात्र होईपर्यंत तो स्वतःच सारी धावपळ करून खूप काम करी.

एके दिवशी सकाळीच साऱ्या जनावरांचे चारापाणी पाहून नन्दू आपल्या शेताकडे निघाला. वाटेत त्याला कोणाचेसे घोरणे ऐकू आले. अशा तऱ्हेने या झाडाझुडुपात घोरत झोपणारे कोण असावे याबद्दल त्याला कुतूहल वाटले.

त्या राज्यात खूपदा यक्ष दिसत असत, म्हणूनच तर त्या राज्याचे नाव 'यक्षस्थळ' पडले होते. घोरण्याच्या आवाजाचा माग घेत नन्दू थोडा पुढे गेला, तोच त्याला एका कावळ्याच्या छत्रीच्या दाण्ड्याला टेकून बसून झोपलेली एक विचित्रशी बुटकी व्यक्ति दिसली.

तो अजब आकार एका खूपच छोट्याशा मानवाचा होता. बुटकेसे शरीर अन् लाडे-छोटे हातपाय! त्याला पहाताच, तो यक्ष आहे, हे समजायला नन्दूला मुळीच वेळ लागला नाही. नन्दूच्या पिढीच्या काळात यक्ष कधी-कधीच दिसत. पूर्वी ते मानवांशी बोलत, त्यांच्याशी मैत्री करत अन् अनेक प्रकारे त्यांना मदतही करत असत. पण आता काळ बदलला होता. यक्ष कमीच दिसत असत, अन् दिसलेच, तर माणसांना पाहून पळून जात असत. मानवांना भेटणे-बोलणे त्यांना बरे वाटत नसे.

यक्षाला पाहून नन्दूला वाटले की, याला झोपेतच पकडून कैद केले, तर सुटकेच्या बदल्यात त्याच्याकडून एकाद्या गुप्त-धनाचा

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

पत्ता लागू शकेल. म्हणून नन्दूने पटकन जाऊन, त्या घोरत बसलेल्या यक्षाला घट्ट पकडले.

या अचानक हल्ल्याने यक्ष घाबरून गेला. डोळे उघडून त्याने नन्दूला पाहिले अन् त्याच्या पकडीतून सुटण्यासाठी तो धडपडू लागला. तो गयावया करून नन्दूला म्हणाला–"मला का पकडलंस तू? सोडून दे न!"

"अरे, माझं नशीबच म्हणून सापडलास तू मला! चल, छानच झालं फार! आता एकादं चांगलं घबाड मला दाखवीपर्यंत तुला सोडणारच नाही मी! आत्ताच एकाद्या गुप्त-धनाचा पत्ता सांगीनास? सोडतो बघ तुला लगेच!" नन्दू म्हणाला.

"अरे, पण असा कुठे गुप्त-खजिना असल्याचं मला तरी कुठं माहीताय? मग मी कशी मदत करणार तुला? सोडून दे ना मला!" यक्ष याचना करू लागला.

"ठीक आहे! बऱ्या बोलानं ऐकणार नाहीस तर तू! अच्छा, मग मला करायचं ते करीन मी. मुळीच सोडणार नाही तुला. चल आता." असे म्हणून नन्दू त्या यक्षाला घरी घेऊन गेला अन् त्याला एका मोठ्या लाकडी पेटीत ठेऊन, पेटीला कुलूप घातले त्याने.

असाच एक महीना निघून गेला. नन्दू एक दिवस जंगलातल्या रस्त्याने नेहमीप्रमाणे येत असताना त्याला लाकडाचा एक लांबटसा ओंडका दिसला. चारी बाजूंनी तो तासलेला होता. ते लाकूड तिथे कसे आले हे काही त्याला कळेना. तो ओंडका खांद्यावरे टाकून नन्दू गावात आला अन् ते लाकूड भोलाप्रसाद नावाच्या एका सुताराला देऊन नन्दूने त्याच्याकडून चार-पाच रुपये वसूल केले, आणि तो आपल्या घरी निघून आला.



नन्दूने घरात पाऊल घातले आणि पेटीतला यक्ष जोरात हसला! यावर नन्दू यक्षाला म्हणाला–"अरे, महिनाभर मी तुला पेटीत बन्द करून ठेवलं, तरी अजून तुझी बुद्धि ठिकाणी आली नाही वाटतं? मला एकादा खजिना दाखवून आपल्या वाटेनं निघून गेला असतास तर बरं नसतं झालं? आता का उगीचच हसतोयस?"

यक्ष यावर काहीच बोलला नाही. तो फक्त हसतच राहिला.

पुन्हा एक महिना निघून गेला, अन् एक दिवस असेच नन्दूला बाजारात काही खरेदीसाठी जायचे होते. नन्दूने आपला सारा पैसा घरात एके ठिकाणी पुरून ठेवलेला होता. खरेदीसाठी नन्दूने जमीन खोदून घडा बाहेर काढला, काही पैसे काढून घेतले आणि तो पुन्हा पहिल्यासारखा गाडून ठेवून तो बाजारात निघून गेला. पण त्याचा हा उद्योग कुणीतरी लपून पाहून ठेवला अन् नन्दूची पाठ फिरताच सारे पैसे त्याने काढून घेतले आणि निघून गेला.

संध्याकाळी बाजार उरकून नन्दू घरी पोचला आणि पेटीतला यक्ष पुन्हा खदा-



खदा हसू लागला. आता मात्र नन्दू फारच रागावला. त्याने पेटीच कुलूप काढून यक्षाला पकडून बाहेर काढले आणि म्हटले– "हे तुझ रंगढंग मला मुळीच आवडत नाहीत हं! दोन महिने तुला मी इथे पेटीत बन्द करून ठेवलंय. मला मदत तर काही केली नाहीसच, पण या अवधीत तीन वेळा कुचेष्टेने हसलास मात्र! अरे पण का असं? आता जर याचं कारण सांगितलं नाहीस तर गळा दाबून मारून टाकून फेकून देईन बघ मी तुला! समजलं?"

यावर यक्ष म्हणाला–"बरं ऐक तर! तुला जेव्हा जंगलात छानपैकी तासलेलं लाकूड सापडलं तेंव्हा तू पैशाच्या मोहाने ते भोलाप्रसाद सुताराला चार पाच रुपयात विकून टाकलंस न? पण तू अगदी नंबर एकचा बुध्दू प्राणी आहेस बघ! त्या लाकडात लाखो रुपये किमतीचं सोनं आणि हिरे भरलेले होते हे तुला कुठे माहीत? त्या पैशांनी भोलाप्रसाद आज चांगला श्रीमंत बनलाय, मजेनं आपलं आयुष्य घालवतोय तो! त्या दिवशी तुझ्या बिनडोकपणाचं हसू आलं होतं मला!"

"ओहो! असं होय? बरं मग आता का बरं हसलास तू?" रागाने वेडा होत नन्दूने विचारले.

"कारण आजही आपल्या बेअकलीपणाचं छान प्रदर्शन केलंस तू! पुरलेला पैसा बाहेर काढताना काळजी घेतली नाहीस! त्यामुळे नेमक्या एका चोराने ते पाहून ठेवलं! तू गेल्यावर पैसे काढून घेऊन पसार झाला तो!" यक्ष हसतच बोलला.

"का ऽऽ य? माझा सारा पैसा चोरीला गेला?" डोक्यावर वीज कोसळल्यासारखा ओरडून नन्दू पैसे ठेवलेल्या खोलीकडे धावला. खरोखरच एक कवडीही उरली नव्हती तेथे? नन्दूचं वाटोळं झालेलं होतं!

कपाळ बडवत, रडत तो पुन्हा त्या पेटी ठेवलेल्या खोलीकडे आला, पण तोपर्यन्त यक्ष कशाला थांबतोय तिथे? तो तर केव्हाच पसार झाला होता!





# वीर हनुमान

जेव्हा मैनाकाने हनुमानाचे आदरातिथ्य करण्याची आपली इच्छा प्रकट केली, तेव्हा हनुमानाला मोठे समाधान वाटले. तो म्हणाला–"तू बोलून दाखवलंस, हेच तुझं आतिथ्य मला पुरे! मी तुझा आदर-सत्कार स्वीकारीत नाहीं म्हणून नाराज होऊं नकोस. आता थोडा ही उशीर करणं योग्य होणार नाही. मी आपल्या सह-काऱ्यांना शद्ब दिला आहे की सूर्यास्तापर्यंत मी लंकेत पोचेन, मध्येच थांबणं मला प्रशस्त वाटत नाही."

असं म्हणून हनुमानाने मैनाक पर्वताला आपल्या हाताने स्पर्श केला नि तो आकाश मार्गाने पुढे चालू लागला. मैनाक आणि समुद्राने हनुमानाला आशीर्वाद दिला– "तुला आपल्या अंगीकृत कार्यात सफलता मिळो!" मैनाक पर्वताकडे प्रेमभरे पहात हनुमान आकाशात उंच उडाला आणि त्याने लंकेकडे प्रयाण केले.

हे सर्व पाहून देवगण, महर्षि, सिद्ध पुरुष आणि देवेन्द्राने मनातल्या मनात मैनाकाचे कौतुक केले. त्यांच्या मनात विचार आला– "केवळ हनुमानालाच मैनाक सारख्या महान पर्वताचे आतिथ्य स्वीकार न करणे शोभून दिसते. हनुमाना ऐवजी दुसरा कोणी असं करू धजला नसता."

इंद्र मैनाकला म्हणाला–"हे मैनाक, तुला पाहून मला फार आनंद होत आहे. तू काळजी करू नकोस. इथून पुढे माझ्या-मुळे तुझ्यावर कोणते ही संकट येणार

११. समुद्र-उल्लंघन



नाही." इन्द्राचे हे बोलणे ऐकून मैनाकाला आनंद झाला की आता आपल्याला इन्द्रा-पासून धोका नाही.

दरम्यान हनुमान समुद्रावरून बराच दूर गेलेला होता. याच वेळी देवगण नि गंधर्व यांच्या मनात अशी इच्छा निर्माण झाली कि एकदा हनुमानाच्या शक्तीचा चांगला अंदाज घ्यावा. ते सापांची आई सुरसाकडे जाऊन म्हणाले–"महावीर वायुपुत्र हनुमान समुद्रावरून उडत चाललेला आहे बघ. तू पर्वतशरीर राक्षसीचे रूप घेऊन आपल्या लांब दाढा नि लालबुंद डोळ्यांनी त्याचा रस्ता आडव. आम्हाला पहायचंय की तुला पाहून तो भीतो आहे की तुला हरवतोय!"

देवांच्या आज्ञेवरून नागमाता सुरसाने भयानक, विकृत व विशाल रूप धारण केले आणि ती हनुमानाच्या मार्गावर जाऊन उभी राहिली. म्हणाली–"हनुमाना, देवांनी मला इथे पाठवलंय, आज तू माझे भक्ष्य होणार आहेस. मी तुला खाऊन टाकणार आहे. चल शीर पाहू माझ्या तोंडात!" नि तिने आपला जबडा उघडला.

हनुमान जरा ही न घाबरता संतोषपूर्वक हात जोडून म्हणाला–"दशरथाचा पुत्र राम, आपला छोटा भाऊ लक्ष्मण नि पत्नि सीता यांना घेऊन दंडकारण्यात आला. राम काही कामासाठी बाहेर गेला असता, रावणाने सीतेला पळवून नेले. मी रामाचा दूत बनून सीतेकडे चाललो आहे. माझ्या या कामी तू मला मदत कर ना! सीतेचा शोध घेऊन रामाचे काम पूर्ण केले की मग तू मला खुशाल खाऊन टाक. मी वायदा करतो."

हे ऐकून सुरसा म्हणाली–"मला ओलांडून कोणी पुढे जाऊ शकणार नाही. मला तसं वरदानच मिळालेलं आहे मूळि!"

सुरसाचं तोंड उघडं होतं, ते एकाद्या विशाल गुंफेसारखं दिसत होतं. हनुमानाने आपलं शरीर लघु बनवलं, वेगाने तो सुरसाच्या तोंडात शिरला आणि तसाच बाहेर येऊन म्हणाला–"हे दक्षकन्ये, तुला



शतशः नमस्कार, मी तुझ्या तोंडात जाऊन परत आलो. आता मला सीतामाईकडे जाऊ दे ना!"

सुरसाने तत्काळ आपलं राक्षसी रूप सोडून दिलं नि खरं रूप धारण करून म्हणाली–"आता तू सुखी रहा. संतोषपूर्वक जा. तू आपल्या कामात यशस्वी होशील. सीता आणि राम यांची लवकर भेट घडवून आण. जा."

मग हनुमानाने पुनः लंकेकडे उड्डाण केले. त्याला समुद्रावरून उडत जाताना सिंहिका नावाच्या एका राक्षसीने पाहिले. तिला वाटलं–"आज आपल्याला हे चांगलं सावज सापडलंय. याला खाऊन आज आपली भूक भागवावी." हनुमानाच्या छायेला पकडून ती त्याला ओढू लागली.

पुढे जाणाऱ्या जहाजाला जोरदार वादळी वाऱ्याने धक्का देऊन थांबवावं, तसं हनुमानाला वाटलं. त्याने आश्चर्याने खाली पाहिले, तो त्याला समुद्रात एक महाकाय जनावर पोहताना दिसलं. दक्षिणेकडील सागर-प्रांतात एक अद्भुत शक्तिशाली असं जनावर आहे नि ते कोणाची ही सावली पकडून त्याला ओढते असं सुग्रीवाने एकदा हनुमानाला सांगितलेलं होतं. हनुमानाला वाटलं ते जनावर हेच असलं पाहिजे.



त्याने आपले शरीर मोठे करायला सुरुवात केली. हे पाहून सिंहिकेने आपला जबडा हनुमानाच्या शरीराहून मोठा बनवून उघडला नि त्याला गिळून टाकायचा प्रयत्न करू लागली. या वेळी हनुमानाने सिंहिके-कडे निरखून पाहिले. लगेच त्याने लघु रूप धारण केले आणि सिंहिकेच्या तोंडात शिरला. तिची छाती फाडून तो बाहेर पडला. मग त्याने पुन्हा आपले शरीर पूर्ववत् बनविले तेव्हा सिंहिकेचं मृत शरीर समुद्राच्या पाण्यावर तरंगताना त्याला दिसलं.

आता हनुमानाने आपला प्रवास पुढे चालू केला. त्याला समुद्राच्या पलीकडील किनारा आणि तेथील जंगल दिसू लागले.



लंका द्वीप, मलय पर्वतावरील झाडी आणि सागरात विलीन होणाऱ्या नद्यांची पवित्र संगम-स्थाने त्याला स्पष्ट दिसू लागली.

एकाएकी हनुमानाच्या मनात एक विचार आला. आपलं हे विशाल शरीर आणि आपला वेग राक्षसांनी पाहिला, तर काही आपत्तीच येण्याची शक्यता नाही का? म्हणून त्याने आपले लघु रूप धारण केले आणि समुद्र किनाऱ्यावरील एका डोंगराच्या शिखरावर उतरून लंका पाहू लागला, तेव्हा त्याला लंका देवेन्द्राच्या अमरावती सारखी भासली.

लंका नगरी त्रिकूट शिखरावर वसलेली होती. नगरीकडे जाताना पर्वत-शिखरावरील अनेक फुलांनी लगडलेले वृक्ष नि तेथील बागबगीचे तो पाहू लागला. रंगीबेरंगी फुलांनी बहरलेले वृक्ष, निरनिराळे आवाज करणारे पक्षी, नागरी उद्याने व राजोद्याने अशी एकाहून एक सुंदर दृश्ये तो पाहू लागला.

लंका नगरीच्या चारी बाजूंना त्याला खंदक दिसले. त्यांतील पाण्यात कमलाची फुले फुललेली होती. नगरीच्या चारी बाजूंना सोनेरी भिंती बांधलेल्या होत्या. हत्यारबंद राक्षस प्रवेश-द्वारी पहारा करीत होते. अशासाठी की आत कोणी परक्याने प्रवेश करू नये. विशाल रस्त्यांच्या दोन्ही बाजूंना उंच-उंच शुभ्र इमारती त्याला दिसल्या. ठिकठिकाणी बुरूज बांधलेले होते, नि त्यांवर पताका फडफडत होत्या. त्रिकूट शिखरावर वसलेली नगरी आकाशातून अवतीर्ण झाल्यासारखी वाटली. विश्वकर्म्याने तिची निर्मिति केलेली होती.

हनुमान हळून लंका-नगरीच्या उत्तर-द्वारी पोचला नि रावणाच्या शक्तीचा अंदाज घेण्याचा प्रयत्न करू लागला. या नगरीला जिंकणं कोणाला शक्य आहे? एके वेळीं ही कुबेराची नगरी होती. आता कुबेराला ही या नगरीत प्रवेश करणं शक्य नव्हतं. साप जसं एकाद्या गुहेचं रक्षण





करतात, तसे राक्षस या नगरीचे संरक्षण करीत होते. समुद्र कवचाप्रमाणे या भूमीचं रक्षण करीत होता. समुद्र उल्लंघून जाणं कोणाला शक्य होतं? समुद्र पार करून इथं येणं वानरांना ही अशक्य होतं. जरी आले तरी काही फायदा होणार नव्हता, कारण या लंका नगरीला जिंकणं देवतांना ही असाध्य होतं. राम किती ही पराक्रमी असला तरी काय झालं? जिथं प्रवेशच करणं कठीण तिथं राम तरी येऊन काय करणार? तसे हे राक्षस मोठे क्रूर होते. शांततेच्या मार्गाने त्यांना जिंकणं शक्य नव्हतं. ज्यांच्यापाशी भरपूर संपत्ति आहे, त्यांना धनाची लालूच दाखवण्यात काही अर्थ नाही. हे सर्व मोठे बलशाली आहेत, त्यांच्याशी लढून त्यांच्यावर जय मिळवणं कठीणच. समुद्र पार करून येण्याची ताकत केवळ आम्हा चौघात आहे – मी, अंगद, नील नि सुग्रीव. दुसरं कोणी सागर पार करून इथं येऊंच शकणार नाही.

असे विचार करीत असता आता हनुमानाला वाटलं – असल्या या विचारात खरं म्हणजे काही अर्थ नाही. प्रथम आपल्याला हे जाणलं पाहिजे कि सीता अजून पर्यंत जिवंत आहे की नाही. ती जिवंत असली तर हे सर्व विचार ठीक आहेत. अन्यथा या विचारांचा काही उपयोग नाही.

हनुमानाची पहिली अडचण होती–लंका नगरीत प्रवेश करणं. आपल्या विशाल शरीरासह आत गेला तर राक्षस नक्कीच आपल्याला पकडतील. म्हणून हनुमानाने आता असं शरीर धारण केलं की तें फार मोठं ही नाही, आणि अगदी लहान ही नाही. मग रात्री सर्व नगरी भर हिंडायचा त्याने विचार केला. सीतेला पाहण्यापूर्वीच राक्षसांनी आपल्याला पकडलं तर ते इष्ट नाही. असं झालं तर हे राक्षस आपल्याला रावणापुढे नेऊन हजर करतील. दूत म्हणून सोडून देण्याइतका सभ्यपणा रावणात कोठला?



म्हणून हनुमान सूर्यास्तापर्यंत वाट पहात राहिला. नंतर त्याने आपले शरीर मांजरासारखे छोटे बनवले. एकाद्या सामान्य माकडासारखा उड्या मारीत मारीत लंकानगरी जवळ पोचला.

नगरातील सर्व मार्ग मोठे शोभिवन्त होते. उपमार्ग व गल्ल्या पण सुरेख रेखीव होत्या. प्रत्येक घराचा परिसर फुल-झाडांनी फुललेला होता. त्यांचे खांब सोन्या-चांदीचे होते. सोन्याच्या मुलाम्याने खिडक्या चमकत होत्या, सर्व इमारती सात-आठ मजली दिसत होत्या. नगरात सर्वत्र स्फटिक आणि मण्यांचे अलंकार दिसत होते. लंका नगरी एकाद्या गंधर्व नगरी सारखी दिसत होती. भयानक राक्षसांच्या कडक पहाऱ्यातील या लंकेवर वानर कसा जय मिळवू शकतील हे हनुमानाला समजेना. आपण सीतेला शोधण्यासाठी आलो आहोत या संतोषाच्या भरात लंकेवर विजय मिळवण्याची गोष्ट तो थोडा वेळ विसरून गेला.

एवढ्यांत चन्द्रोदय झाला. भयानक स्त्री-रूप धारण करून लंकेने हनुमाना पुढे येऊन विचारले–"तू कोण आहेस? इथे कशासाठी आला आहेस? तुझ्या सारख्या माकडाला लंकेत प्रवेश नाही, समजलं?"

यावर हनुमान म्हणाला–"तू विचारलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरं देतो मी. तू मला



अगोदर सांग की तू कोण? आणि नगरीच्या प्रवेश-द्वारी मला अशा रीतीने का धमकावते आहेस?"

"महापराक्रमी रावणाची मी सेविका आहे. रावणाच्या आज्ञेनुसार मी लंका नगरीचे रक्षण करीत आहे. लढाईत माझा पराभव करून या नगरीत प्रवेश करणं कोणालाही शक्य होणार नाही. मी आत्ता तुला मारून टाकते. माझंच नाव आहे लंका! आता तुला काय सांगायचंय ते तू सांग!" रागारागाने लंका म्हणाली.

हनुमान म्हणाला–"एकदा लंका-नगरीचं दर्शन घेण्याची इच्छा होती. म्हणून मी इथं आलोय."

"मला हरवल्यावाचून तुला लंका-नगरी पाहता येणार नाही." लंकेने सांगितलं.

"मी लंका-नगरी पाहीन आणि आपल्या वाटेने चालू लागेन. मला इथं दुसरं काही ही काम करायचं नाही. नगरीचं दर्शन केलं की मी चालू लागेन. जाऊ दे मला." हनुमानाने विनंती केली.

लंका एकदा किंचाळली नि तिने हनुमानाला एक जोरदार थप्पड मारली. तिच्याहून अधिक भयानक किंचाळून हनुमानाने आपल्या डाव्या हाताच्या मुठीने लंकेला एक गुद्दा घातला. या तडाख्याने लंका जखमी पक्ष्यासारखी जमिनीवर आदळली नि व्याकुळ झाली. ती आरडा-ओरडा करू लागली—मला नको रे मारूस! तू मोठा बलिष्ट आहेस! ब्रह्म-देवाने मला एकदा सांगितलं होतं की एक माकड जेव्हा मला जिंकेल, तेव्हां राक्षसांना निश्चित धोका निर्माण झालेला असेल. रावणाने सीतेला पळवून आणली, म्हणून बहुधा हे संकट येत असावे असे मला वाटते. जा, तुझ्या मर्जीनुसार नगरीत मनसोक्त हिंड."

नंतर हनुमानाने नगर-द्वारातून प्रवेश न करता शत्रूला शोभेल अशा रीतीनें प्राकारांतून उडी मारली. प्रथम त्याने आपले डावे पाऊल नगरीवर ठेवले. तो राजमार्गावर चालू लागला, तसे संगीत वाद्यांचे मधुर स्वर नि मानवांच्या हंसण्याचे आवाज ऐकू येऊ लागले. मणी आणी पुष्प-माळांनी सजवलेले उंच उंच महाल अतिसुंदर दिसू लागले. मद्य-प्राशन केलेल्या स्त्रियांची मनोहर गाणी ऐकू येऊ लागली. काही राक्षसांच्या घरातून वेद-पठणाचे ध्वनि कानांवर येऊ लागले काही राक्षस जोर जोराने किंचाळ्या फोडत होते. गल्ल्या-बोळातून जिकडे-तिकडे राक्षस जमा झालेले दिसले.

आणि हनुमान मनातल्या मनात म्हणाला—"जिथे प्रवेश करायला मनाई होती, तिथे मी प्रवेश तर मिळवला खरा! आता सीतेचा शोध करणं कठिण नाही."





# पंडिताची वागणूक

सीतापुर गावात माधव नावाचा एक श्रीमन्त गृहस्थ रहात असे. शेतीवाडी चांगली चाले त्याची आणि त्यातच भर म्हणून तो सावकारीही करी. पण इतके सारे असूनही माधव बिलकुल गर्विष्ठ किंवा चढेल वृत्तीचा नव्हता. त्याला एकुलता एक मुलगा होता—विद्याधर. लहानपणा-पासूनच त्याचा विद्याभ्यासाकडे कल होता. पण वडिलाच्या शेती किंवा सावकारीच्या व्यवसायाची मात्र त्याला मुळीच आवड नव्हती.

विद्याधर खूपसा गर्विष्ठ ही होता. तो सर्वांशी काही ना काही बोलणे काढी अन् बोलता बोलता त्यांच्या बद्दल तुच्छता दाखवून त्यांची टर उडवी!

माधवने विद्याधरला अनेकदा समजा-वायचा प्रयत्न केला कि—"अरे बाबा जरा सबूर! तुझं हे वागणं बरोबर नव्हे बेटा! गावातल्या लोकांशी असं शत्रुत्व पत्करलंस तर इथं रहाणं कठीण होईल आपल्याला!" पण विद्याधरच्या वागणुकीत काहीही बदल होईना.

आपले समर्थन करीत तो म्हणे—"हे पहा बाबा, पंडित माणसाला आपली विद्वत्ता प्रकट करावीच लागते. विद्वत्ता ही सर्वांना उपयुक्त असते पण तिचं मोल समजेल तेव्हा ना?"

आता यावर काय बोलायचं? काही वाद न करता माधव म्हणाला—"अरे, हे तर ठीकच आहे, मी नाकबूल करत नाही. पण एक विचार कर बाबा, तुझ्यामुळे जर सगळं गाव आपल्या विरुद्ध गेल, तर डोकं लपवायला सुद्धा कुठे जागा रहायची नाही आपल्याला."

यावर हसतच विद्याधर म्हणाला—"मी काय इतका मूर्ख आहे की काय?



आपल्या गावातले सर्वात श्रीमन्त असणारे कनकगुप्त, रत्नसेन अन् मोतीराम या तिघांशी मी मैत्री जोडली आहे. पाटील महानन्द आणि गावातला महाबलशाली पहिलवान मल्ल भीम हे माझ्यावर जिवापेक्षाही जास्त प्रेम करतात. या पाच मित्रांनाच पंच महाभुतं मानतो मी, नि हे सर्व नेहमीच मला मदत करत रहातील."

विद्याधरच्या या समर्थनामुळे दुःखी झालेला माधव म्हणाला–"बेटा, ते तर पाचहीं जण मोठे बदमाश म्हणून प्रसिद्ध आहेत. लोकांना विनाकारण सतावणाऱ्या त्या दुष्टांशी तुझी तरी दोस्ती अशी किती दिवस टिकेल?"

आता खिजून विद्याधर म्हणाला–"बाबा, ते बदमाश-गुंड असतील, नाहीतर दुष्ट-धोकेबाज असतील, पण गावातला एकही माणूस त्यांच्याकडे डोळा वर करून पाहू ही शकत नाही न? त्यांनी मनात आणलं, तर ते आपल्याला ही त्रास देऊ शकतील. म्हणूनच तर मी त्यांच्याशी मैत्री जोडलीय न! माझ्यासारख्या विद्वानाकडून जेव्हा त्यांना आपली खोटी का होईना, पण तारीफ ऐकायला मिळते तेव्हा त्यांना कित्ती आनन्द होतो म्हणून सांगू! त्यांना खूष करण्याकरताच तर मी अशी इतरांची चेष्टा-मस्करी करत असतो."

त्या दुष्टांच्या संगतीमुळेच विद्याधर असा दुष्ट होत चाललाय, हे कळायला माधवला मुळीच वेळ लागला नाही. पण त्यामुळे माधव मात्र फारच बेचैन होता. अशातच त्याचा मित्र प्रबोध, हा त्याच्याकडे काही दिवस रहायला आला. दोनच दिवसात प्रबोधला विद्याधरचे चाळे कळून चुकले.

तो माधवला म्हणाला–"माधव, आपली मोठी मुलगी तुझ्या विद्याधरला द्यावी असं म्हणतोय मी! एक गर्विष्ठपणा सोडला, तर तुझ्या मुलात खूप चांगले गुण आहेत. त्याला एकदा गंगानगरच्या पंडित विष्णुशर्माकडे धाडून दे बघ, सर्व काही आपोआप ठीकठाक होऊन जाईल."





माधवला ही कल्पना आवडली. त्याने काही दिवसातच विद्याधरला बोलावून म्हटले–"गंगानगरमधे विष्णुशर्मा नावाचा एक महापंडित आहे. तू गंगानगरला जाऊन त्याला आपल्या विद्वत्तेने हरवून टाक, आपल्या गावाचं नाव होईल बघ."

विद्याधरने मोठ्या आनन्दाने आपली संमति दाखवली आणि तो लगेचच त्या महापंडिताला भेटायला निघाला. विष्णुशर्माचे घर अगदी साधेसुधेच होते, अन् तो पंडितही तसा अगदी साधा दिसत होता! त्याच्या बायकोच्या अंगावर एकही दागिना वगैरे दिसत नव्हता. अगदीच 'लंकेची पार्वती' होती ती!

मोठी तडक-भडक दाखवत आलेल्या विद्याधरचे प्रेमाने स्वागत करून विष्णुशर्माने त्याच्या येण्याचा उद्देश जाणून घेतला. नंतर अगदी मृदुपणे तो विद्याधरला म्हणाला–"तुझ्या चेहऱ्यावरचं तेजच सांगतंय की तू खूप विद्वान असावास. कोणकोणत्या काव्य अन् व्याकरण-ग्रन्थांचा अभ्यास केलायस तू?"

विद्याधरने तावडतोब त्या ग्रन्थांची नावे सांगून टाकली.

"अरे, इतकं सगळं आत्मसात केलेल्या तुझ्याशी मी रे काय वाद करणार? मी कबूल करतो, की तू महान् आहेस. चार दिवस माझ्याकडे राहून तू जो जो काही अभ्यास केलायस त्याचा मला परिचय करून दिलास तर फार आनन्द वाटेल बघ मला!" पंडित विष्णुशर्मा विद्याधरला म्हणाला.

"नाही, नाही, पंडितजी! स्पर्धा न करताच जय मानणं पसन्त नाही मला! स्पर्धेत मी हारलो, तर आनन्दच होईल मला. पण आपल्याला शास्त्रार्थ हा करायलाच हवा!" विद्याधर हट्टीपणे म्हणाला.

"ठीक आहे. पण तू आता चार दिवस रहाच माझ्याकडे. पाचव्या दिवशी आपण दोघं मिळून शहरात जाऊ. 'दरबारी



पंडित' पदासाठी जमीनदार जगन्नाथ याच्या दरबारात स्पर्धा होणार आहेत. मलाही निमन्त्रण मिळालेलं आहे, माझ्याबरोबर तिथे येऊन तूही स्पर्धेत भाग घे. अशा तऱ्हेने तुझीही इच्छा पूर्ण होईल. काय ?" विष्णुशर्मा बोलला.

हे ऐकून विद्याधर खूष झाला. तेथे तर विष्णुशर्मा बरोबर इतर पंडितांनाही हरवून आपली हुषारी दाखवायची संधि मिळेल असे त्याला वाटले.

विद्याधर चार दिवस विष्णुशर्माच्या घरी राहिला. विष्णुशर्माच्या पत्नीने त्याला आपला धाकटा भाऊच मानून प्रेमाने खायला प्यायला घातले. त्यांच्या घरात दोन लहान मुले होती. त्या दोघांनीही मोठ्या आदराने आणि उत्तम तऱ्हेने त्याची कामं केली. विद्याधर व विष्णुशर्मा रोज साहित्यिक चर्चा करत. त्यावरून विष्णुशर्मा हा खरोखरच कोणी साधासुधा विद्वान नव्हे, ही गोष्ट विद्याधर समजून चुकला. पण विष्णुशर्मा कोणत्याही बाबतीत विद्याधरच्या विधानांचे खंडन करीत नसे, त्यामुळे त्याला वाटले की—"यांची विद्वत्ता कदाचित वरवरचीच असावी, उथळ असावी; नाहीतर वाद घालायची संधी त्यांनी कशी काय घालवली असती ?"

विष्णुशर्माची आणखी एक गोष्ट विद्याधरला समजली नाही. एक दिवस एक एक शेतकरी काही भाजीपाला घेऊन आला अन् विष्णुशर्माला म्हणाला—"माझ्या शेतातली ही भाजी आपल्या भोजनाच्या कामी आली, तर मी स्वतःला धन्य मानीन."

यावर हसून विष्णुशर्मा त्याला म्हणाला—"अरे विद्येने काही माणसाचं पोट भरत नसतं, तुझ्यासारख्या अन्नदात्यांमुळेच जनता जगत असते." आणि वर "अन्नदाता सुखी भव ।" असा आशीर्वाद देऊन विष्णुशर्माने मोठ्या आदराने त्याला रवाना केले.

अशाच प्रकारे विष्णुशर्मा आपणाहून लहान व सामान्य अशा कित्येक लोकांची



स्तुति करी ही गोष्ट विद्याधरला तितकीशी भावली नाही.

ज्या दिवशी त्यांना शहराकडे निघायचे होते त्या दिवशी त्या दोघांचे सामान दोन पोतड्यात भरले गेले. त्या नदीपर्यंत वाहून नेण्यासाठी त्यांनी आगाऊच एक मजूर नक्की करून ठेवला होता. पण ऐन निघायच्या दिवशी तब्येत बिघडल्यामुळे त्याने आपल्या ऐवजी दुसरा एक मजूर पाठवला. हा नवा प्राणी जरा चिडचिड्या स्वभावाचा होता. जरा कुरकुरतच त्याने गाठोडी आपल्या डोक्यावर घेतली आणि पुढे पुढे तो व मागे मागे हे दोघे अशी त्यांची यात्रा सुरू झाली.

नदीकिनारी पोचून पुढे नावेने नदी पार करायची होती. उशीर झाला तर ती नाव निघून जाईल अन् नन्तर दुसरी कुठली नाव मिळायची फारशी शक्यता नसल्याने विष्णुशर्मा मजुराला जरा भरभर पाऊल उचलायला सांगू लागला.

यावर मजुराला एकदम राग आला आणि चिडून तो म्हणू लागला—"अशा चढत्या उन्हाच्या वेळी स्वतःच सामान डोक्यावर घेऊन चला, म्हणजे कळेल, हे किती त्रासदायक काम आहे ते !"

"अरेच्चा ! हा काय फुकट आपलं काम करतो आहे की काय ? या दोन कवडीच्या



माणसात इतकी घमेंड !" असे विद्याधर रागाने बोलणार तोच त्याला गप्प करत विष्णुशर्मा त्या मजुराला शान्तपणे म्हणाला—"होय, तू करतोयस ते काम मोठं कठीण आहे खरंच ! आम्ही तर काही ते नक्कीच करू शकणार नाही. पण उशीर झाला तर तुझे न आमचे सर्वांचेच कष्ट वाया जातील नं ?—एवढ्याचसाठी मी जरा भरभर चालायला सांगितलं मी. माफ करहं मला. तुला त्रास होणार नाही, अशा बेतानेच चाल तू. आमच्या नशिबात असेल तेच होणार नं ?"

आता मात्र त्याला काय वाटले कोणास ठाऊक ! पण मजूर भरभर चालू लागला



अन् त्याने अगदी वेळेवर त्या दोघांना घाटावर पोचवून दिले.

नावाडी विष्णुशर्माला पाहून, हात जोडून म्हणाला–"आपण येणार हे कळलं होतं मला! म्हणून थोडा वेळ मी नाव थांबवून ठेवली पहा तुमच्यासाठी. आत याना!"

"अरे, मी तर तुझ्यापुढेही तुच्छच आहे. तुझ्या विद्येपुढे माझी विद्या काय कामाची?" अशी त्याची स्तुती करून विष्णुशर्मा हसत हसत विद्याधरसह नावेत जाऊन बसला.

एका क्षुल्लक नावाड्याची विष्णुशर्माने अशी तारीफ करावी, हे विद्याधरला खटकलेच! नावेत बसलेल्या अन्य लोकांना विष्णुशर्मा आता विद्याधरची स्तुती करीत म्हणू लागला–"हा मुलगा तर माझ्यापेक्षा चांगला विद्वान आहे."

नाव जेव्हा शहरात पोचली तेव्हा घाटावर जगन्नाथ जमीनदाराचा दिवाण विष्णुशर्माला सामोरा येऊन मोठ्या अदबीने म्हणाला–"पंडितजी, मनात असूनही वेळ नसल्यामुळेच केवळ स्वतः जमीनदार महाराज येऊ शकले नाहीत. आपण त्यांना आपला आशिर्वाद कळवावा."

यावर हसून विष्णुशर्मा म्हणाला–"असं पहा दिवाणजी, माझ्याऐवजी आत्ता स्वतः महाराजच या नावेतून आले असते, तर जमीनदार जगन्नाथ स्वतः त्यांना सामोरे जाण्यासाठी नक्कीच आले असते. माणसा माणसात फरक करणंच फक्त जमीनदार जाणतो. माझ्या सारख्या गरीब पंडिताच्या स्वागताला तो कसा येईल? पण एक गोष्ट मात्र त्याला नक्की सांगा हं–म्हणावं, खरोखरच माझ्या आशिर्वादांची अपेक्षा असेल, तर त्याने स्वतः माझ्याकडे यावं!"

दिवाण निघून गेला. विष्णुशर्माचे बोलणे ऐकून विद्याधर चांगलाच चमकला! दिवाणाने मुकाट्याने त्या दोघांची रहाण्याची व्यवस्था लावून दिली. थोड्या वेळाने स्वतः जमीनदार आले आणि त्यांनी पंडित विष्णुशर्माची क्षमा मागितली.



पण विष्णुशर्माने केवळ डोकं हलवून मुकाट्यानेच त्याला निरोप दिला. जमीनदार निघून गेल्यावर विद्याधरने विष्णुशर्माला मोठ्या आश्चर्याने विचारले–"ज्या अगदी सामान्य व्यक्तींनी आपली तारीफ केली, त्यांची तुम्हीही उलट तारीफ केली. एक क्षुल्लक मजुराने आपला राग राग केला तेव्हा तुम्ही तो मनावर न घेता, उलट त्याचीच माफी मागितली होती. पण आत्ताची ही जमीनदाराबाबतची तुमची वागणूक मात्र मला अहंकारपूर्ण वाटली. इथल्या स्पर्धेत हरायचा विचार आहे कि काय तुमचा?"

यावर नकारात्मक डोके हलवत विष्णुशर्मा म्हणाला–"आपल्या पेक्षा लहान अन् कमजोर असतील, त्यांचा पंडिताने नेहमी मान राखावा. पण जे आपल्यापेक्षा कोणत्याही बाबतीत मोठे असतील, आपल्यावर हुकुमत चालवू शकतील असे असतील, ज्यांचा आपल्याला काही उपयोग होण्यासारखा असेल, अशांना मात्र आपल्या काबूत ठेवण्यासाठी बुद्धिमत्ता हीच पंडिताची शक्ती असते. मी जमीनदाराच्या बाबतीत नम्र आणि भीड बाळगून राहिलो अन् नंतर मी स्पर्धा जिंकली, तरी मला त्या जयाचा आनन्द मिळणार नाही. आपल्या विद्वत्तेच्या बळावर मला जिंकायचं असेल, तर मला असंच केलं पाहिजे ना?"

हे ऐकून विद्याधरला आपला गतकाळ आठवला, आणि तो लज्जित झाला. 'दुर्बळांना नव्हे, तर बलवानांना तोंड दिले तरच एखाद्या पंडिताला प्रतिभावान् मानले जाते. विष्णुशर्माने आपल्याला मान दिला, याचा अर्थ–मी त्याच्या दृष्टीने छोटा होतो–असाच की नाही?' असे विचार त्याच्या मनात येऊ लागले, आणि विष्णुशर्माचा निरोप घेऊन, स्पर्धेत भाग न घेताच तो आपल्या गावी निघून गेला.

आता सीतापुरला पोचल्यावर विद्याधर सर्वांशी आदराने वागू लागला. अशा तऱ्हेने थोड्याच दिवसात तो 'नामवन्त पंडित' म्हणून गाजला.





# निर्बुद्ध

बरीच जुनी गोष्ट आहे. एका गावात एक फारच गरीब शेतकरी परिवार रहात असे. शेतकऱ्याला तीन मुलगे होते. पहिला अन् दुसरा मुलगा दोघेही चांगले हुशार होते. पण तिसरा केपांग मात्र नेहमीच कसल्यातरी विचारात असल्यासारखा दिसे. प्रत्येक कामात त्याची गति फार कमी पडे, अन् तो नेहमीच इतरांच्या मागे पडे दर गोष्टीत!

केपांगाची गोष्ट निराळीच होती! तो कधी स्वत:कडे नीटसे लक्ष देत नसे, पण दीन-दु:खी लोकांना पाहून मात्र त्याला रहावत नसे. थोरल्या भावांनी त्याला घराबाहेर काढले.

केपांग आता घरदार नसलेला एक रस्त्यावरचा माणूस बनला होता, अन् भटक्यासारखा इकडे तिकडे फिरू लागला. अशा तऱ्हेने केपांगचे दिवस जात असताना, केपांगने ऐकले की एका गावी कुठेशा एका डोंगराच्या गुहेत कोणी एक साधुबाबा रहातो अन् त्या साधूला काही अद्भुत अशा शक्ति वश आहेत. त्या साधूला शोधता शोधता केपांग त्या गावात पोचला. त्या गावात त्या वेळी दुष्काळ पडलेला होता. माणसे आणि जनावरे पाण्याअभावी तडफडून मरू लागली होती, शेते वाळून गेली होती, तलाव आणि विहिरीही आटून गेल्या. साधूबाबा भेटले तर त्यांच्या मदतीने या दुष्काळ-ग्रस्त गावाची परिस्थिति सुधारण्याचे केपांगने ठरवले.

वाटेत केपांगला आणखी एक लहानसे गाव दिसले, त्या गावच्या एका टोकाला असलेल्या झोपडीत एक गरीब स्त्री आणि तिची सुन्दरशी पण आंधळी मुलगी, अशा दोघी रहात असत. त्या मायलेकींची दैन्यावस्था पाहून केपांगने ठरवले की, साधुमहाराजांना विनन्ति करून या मुलीला तिची दृष्टि परत मिळवून द्यायची!

काही दिवसांनी शेवटी केपांग साधुबाबांच्या गुहेपाशी पोचला. केपांग कोणत्या उद्देशाने आपणाकडे आला आहे, ते त्यांना कळले. त्याची सद्बुद्धि पाहून साधुमहाराज त्याच्यावर खूप खुष झाले, आपल्या मनातली इच्छा पूर्ण करण्यासाठी काय काय करायला हवे–हे ही साधुबाबांनी केपांगला सांगितले.

नंतर केपांग तेथून निघाला. प्रथम तो त्या दुष्काळ पीडित गावात पोचला आणि त्या आटलेल्या झऱ्याच्या शोधाला लागला. खूप दूर गेल्यावर एका उंच अशा ठिकाणाहून पाण्याची एक बारीक धार खाली पडताना त्याला दिसली. आणखी थोडे पुढे गेल्यावर तेथल्या दृश्याने तो चकितच झाला. त्या डोंगरावरून खाली येणारे पाणी त्या गावाकडे जाऊच शकणार नाही, अशा तऱ्हेने ती पाण्याची बारीकशी धार अडवून कित्येक हत्ती बसून असलेले त्याला दिसले. जणू काही पाणी या बाजूला येऊ नये म्हणून घातलेला बांधच! त्या हत्तींना तेथून पळवून लावण्यासाठी केपांगने अनेक तऱ्हेचे आवाज केले, पण हत्ती आपले ढिम्म बसूनच राहिले. मग केपांगने काही वाळलेली लाकडे काटक्या वगैरे वेचून आणून हत्तींच्या, जवळच एक ढीग बनवला आणि चकमक झाडून त्याला आग लावून दिली.



काही क्षणातच तेथे आगीच्या चांगल्या मोठमोठ्या ज्वाळा उठल्या आणि काळा काळा धूर निघू लागला! तो धूर आणि आग पाहून हत्ती घाबरले आणि तेथून उठून पळून गेले! बस, डोंगरातल्या झऱ्याचे ते पाणी दगडावरून त्या वाळलेल्या झऱ्याच्या जागेतून वाहू लागले. अशा तऱ्हेने दुष्काळ-पीडित गावचा तो झरा पुन्हा पहिल्या-सारखा झुळझुळ वाहू लागला आणि गावचे संकट दूर झाले!

अशा तऱ्हेने वाळलेल्या झऱ्यातून पुन्हा पाणी वाहू लागायची व्यवस्था करून केपांग त्या आंधळ्या मुलीच्या गावाकडे निघाला. "हा मुलगा पुन्हा आपल्याकडे का आला"–याचे मुलीच्या आईला आश्चर्य

ललकारी इनामदार

वाटले. पण केपांग सरळ त्या मुलीजवळ गेला आणि त्याने आपले दोन्ही हात तिच्या डोक्यावर ठेवले. केपांगच्या हातांचा डोक्याला स्पर्श होताच त्या मुलीचे डोळे प्रकाशित झाले अन् आनन्दाने ती एकदम ओरडली–"आई! अग मला दिसू लागलं बघ सगळं!" आता त्या दोघी माय-लेकी सुखी झाल्या.

अशा तऱ्हेने साधुचे म्हणणे खरे झाले. त्याने म्हटले होते की–त्या मुलीचा जो पति बनणार असेल, त्याने तिच्या डोक्यावर हात ठेवताच तिला दृष्टिलाभ होईल. आणि धनसंपत्ति सुद्धा मिळेल. केपांगने तिच्याशी विवाह् करण्याच्या इच्छेनेच तिच्या डोक्याला स्पर्श केला होता.

त्या गरीब स्त्रीने लवकरच आपल्या मुलीचा केपांगशी विवाह् करून दिला आणि त्या जोडप्याला आशीर्वाद देऊन पाठवून दिले. बायकोला घेऊन केपांग स्वत:च्या गावी परतला. ज्याला सर्वजण निर्बुद्ध समजत तो केपांगच आता मोठा बुद्धिमान ठरला होता. त्याच्या या महान् कामांची कीर्ति अगोदरच त्याच्या गावी पोचली होती. त्यामुळे साऱ्या रस्त्याने लोक कौतुकाने त्याच्याकडे पहात होते, त्याचे आगतस्वागत करून खूप मान देत होते!

घरी आलेल्या केपांग व त्याच्या बायकोला पाहून आता त्याचे दोन्ही मोठे भाऊ द्वेषाने मनात जळू लागले अन् त्यांच्याकडे शत्रुसारख्या नजरेनेच पाहू लागले.

केपांगच्या पित्याने हे सर्व ओळखले अन् त्यांना रागावून तो म्हणाला–"तुमचा भाऊच आहे ना तो? आजवर त्याला निर्बुद्ध समजून, त्याला घरातून घालवून देऊन, तुम्ही त्याच्यावर मोठा अन्याय केलात. तुम्ही केवळ आपमतलबी आहात. पण माझा धाकटा मुलगाच प्रामाणिक आणि परोपकारी आहे."

पित्याच्या रागावण्याने दोघा भावांचे मन पालटले, अन् सर्वजण केपांगवर प्रेम करू लागले. त्या सर्वांची सेवा करून केपांगने ही चांगले नाव मिळवले.



निसर्गातील आश्चर्यें :

## आरोहण-कुशल मेंढ्या



लांब शिंगांच्या मेंढ्या उंच पर्वतांची शिखरे ही सहज चढून जाऊ शकतात, कारण त्यांचे खुर टोकदार असले तरी त्यांचे तळवे मऊ असून आत मुडपलेले असतात. त्यामुळे डोंगरांवर कोठे ही त्या खालचा आधार घट्ट पकडून ठेवतात.

## 'लेपार्ड जेको'



'लेपार्ड जेको' नावाच्या पालीच्या गुबगुबीत शेपटीत अन्न नि पाण्याचा साठा असतो. संकटकाळी ही पाल आत्म-रक्षणासाठी आपली शेपटी सोडून देते, आणि लवकरच त्या जागी नवीन शेपूट उगवते.

## भला मोठा मोती

आज तागायत माहीत असलेला मोठ्यात मोठा नैसर्गिक मोती आहे 'लाओद्‌जचा मोती'! त्याची लांबी आहे ९.५ इंच (२४१ मि.मी.) आणि व्यास आहे ५.५ इंच (१४० मि.मी.), याचे वजन आहे १४ पौंड (६.३७ कि.ग्राम). सन १९३६ मध्ये हा मोती एका भल्या मोठ्या शिंपल्यातून निघाला.



## नाइलच्या खालून वाहणारी नदी

सन १९५८ मध्ये रेडिओ आइसोटोप्सच्या साह्याने नाइल नदीच्या खालून वाहणाऱ्या एका नदीचा पत्ता लागला. हिचा अधिकाधिक वार्षिक प्रवाह नाइलच्या प्रवाहाच्या सहा पट मोठा आहे.



# एकतेचे समर्थन



अध्यक्ष गोर्बाचेव यांच्या प्रश्नाला असंख्य सोविएट जनतेने एकमुखाने होकारार्थी उत्तर दिले.

आता इथून पुढे कुठल्याही समस्येवर थेट जनतेकडून जनमत आजमावले जाईल, लोक-प्रतिनिधींच्या द्वारे नाही. अशा रीतीने जनतेचा कौल जाणण्यासाठी 'रेफरंडम' नावाच्या पद्धतीने काम करण्यात येईल. जनतेपुढे प्रश्न मांडून विचारण्यात येईल की हे बरोबर वा चुकीचे? मतदानाच्या साह्याने जनमत प्रकट होईल.

अध्यक्ष गोर्बाचेव यांनी जनते पुढे प्रश्न मांडला होता—"आपली अशी इच्छा आहे काय की समान रूपाने स्वायत्त असलेल्या राज्यांचा संघ असे सोवियत रशियाने स्वरूप रहावे." या प्रश्नाचे उत्तर बहुसंख्य रशियन जनतेने होकारार्थी दिले. अध्यक्ष गोर्बाचेव यांनी जनमताचा जो कौल घेतला त्यातून निष्पन्न झाले की सोवियत राष्ट्र-संघ चालू रहावा अशी अधिकाधिक जनतेची इच्छा आहे.

सोविएट अध्यक्ष गोर्बाचेव यांना शेवटी असा प्रश्न आपल्या प्रजेला का विचारावासा वाटला?

गोर्बाचेव यांनी 'पेरस्त्रोइना', 'ग्लास-वोस्त' नावाच्या काही औदार्यपूर्ण सुधारणा सुरू केल्या. या सुधारणांमुळे प्रथम अधिकारांचे विकेन्द्रीकरण व नंतर धार्मिक स्वातंत्र्याकडे लोकांच्या मनात आकर्षण निर्माण झाले. नंतर याचे काही अनपेक्षित परिणाम दिसू लागले. खाद्य-पदार्थांची टंचाई, मुद्रास्फीति वगैरेंमुळे काही राज्ये संघातून फुटण्याचा विचार करू लागली. वाढत्या फुटीरपणाला आळा घालण्यासाठी काही ठिकाणी बल-प्रयोग करावा लागला. तरी पण समस्या कुठे सुटली? इतके सर्व झाल्यावर गोर्बाचेव यांनी जनमत आजमावण्याचा निश्चय केला.




सार्वमतात जनतेने एकतेचे समर्थन केले. या कार्यक्रमात ६ छोटया राज्यांनी भाग घेतला नाही. पण ज्या ९ राज्यांनी भाग घेतला, त्यांची लोकसंख्या एकूण लोकसंख्येच्या ९० टक्के होती. अशा रीतीने या विशाल जनसमुदायाने संयुक्त सोवियत ंघाचे समर्थन केले.

या सार्वमतामुळे फुटीर गटांची ताकत थोडी कमी होईल. इतकंच नव्हे तर रशियाच्या जनतेने गोर्बाचेव वरील आपला विश्वास अशा रीतीने प्रकट केला. शिवाय शंभराहून अधिक जमाती असलेल्या सोवियत जनतेची स्वतंत्रपणे विचार करण्याची क्षमता यामुळे दिसून आली.



# सासूबाईंचं ताट

बल्लिया गावात शिवदेवचा धान्य-व्यापार होता. एकदा तो काही कामासाठी शहरात गेला आणि आपलं काम संपवून रात्री आपला मेहुणा सुभाष याचं घर शोधत निघाला. सुभाषचं नुकतंच लग्न झालं होतं. चांगलंस घर भाड्याने मिळताच तो आपली बायको भारती हिला घरी घेऊन आला आणि त्यांचं गृहस्थजीवन सुरू झालं.

शहरात आणखी तीन-चार दिवस राहून शिवदेवला आपली कामं तर पुरी करायची होतीच अन् आपल्या मेव्हण्याचा नवा संसार कसा काय चाललाय हे ही त्याला पहायचं होतं. आपलं घर शोधून काढून आलेल्या शिवदेवला पहाताच सुभाष पुढे होत आनन्दाने म्हणाला–"अरे, शिवदेव तुम्ही? या या. बरे बेळेवर पोचलात. आम्ही दोघं आत्ता जेवायलाच बसणार होतो. हातपाय धुवून तुम्हीही आता पानावरच बसा. मग गप्पा मारू."

हातपाय धुवून स्वयंपाकघरात येताच शिवदेवने आश्चर्याने विचारले–"अरे! इथे तर तीन पानं मांडली आहेत. मी येणार असं अगोदरच माहीत होतं की काय?"

"नाही, नाही. असं नाही काही." सुभाष हसत म्हणाला–"ते तिसरं ताट नं, माझ्या आईसाठी वाढलंय."

हे ऐकून शिवदेव आश्चर्यचकित झाला. कारण सुभाषच्या आईला मरून तर पाच वर्षं होऊन गेली होती. मग आता तिचं ताट कसं काय?

शिवदेवची शंका जाणून सुभाष म्हणाला–"अरे, इतकं आश्चर्य काय वाटतं तुम्हाला? माझी आई आमच्याबरोबरच रहात असते. मला नाही दिसत ती, पण

मिहिर हर्षे



भारतीला मात्र रोजच दिसते. एवढंच नाही, तर ती कधीकधी भारतीला सल्लाही देत असते.”

“असं? मग या ताटातलं वाढलेलं सासूबाई केव्हां जेवतात?” शिवदेवने विचारले.

“आम्ही आमचं जेवणखाण उरकून आईचं ताट एका बाजूला झाकून ठेवतो. सकाळी आम्हाला रोज ते ताट रिकामं रिकामं झालेलं दिसतं!” भारतीने सुभाषला दुजोरा दिला.

“अन् मग आत्ता मी हे वाढलेलं अन्न खाल्लं तर आज सासूबाईंचं कसं?” शिवदेवने विचारले.

“तुम्ही काळजी नका करू हो! मी त्यांच्यासाठी पुन्हा अन्न शिजवून ठेवीन.” भारती उत्तरली.

त्या सर्वांनी जेवण उरकून घेतल्यावर भारतीने सासूबाईंसाठी पुन्हा दुसरा स्वयंपाक करून ताट झाकून ठेवलं.

इकडे सुभाष आणि शिवदेवच्या गप्पा-गोष्टी सुरू झाल्या होत्या. बोलता बोलता सुभाष म्हणाला—“मी मोठा भाग्यवान् खरा हं शिवदेव. जिवन्त असणाऱ्या सासूलाही जेवण मिळायची मारामार असणाऱ्या या काळात, मरून गेलेल्या सासूसाठी ही भारती पुन्हा स्वयंपाक करायची उठाठेव करत बसलीय. भारतीचा स्वयंपाक माझ्या आईला फारच आवडत असला पाहिजे.”

त्या रात्री शिवदेवची झोपायची व्यवस्था पुढच्या खोलीत केली गेली होती. तो सूर्योदयापूर्वीच जागा झाला. सुभाष अन् भारती अजून झोपेतच होते. शिवदेव स्वयंपाकघरात गेला. सासूबाईंच्या ताटावरचं झाकण त्याने काढून पाहिलं, तर ताट रिकामं! शिवदेवला मोठं आश्चर्य वाटलं.

त्या दिवशी संध्याकाळी आपलं काम आटोपून घराकडे येत असताना शिवदेवला सुभाष अन् भारती वाटेतच भेटले. सुभाष त्याला म्हणाला—“शेजारच्या घरात किल्ली ठेवलेली आहे. ती मागून घ्या, आणि हां,



जरा चारशे रुपये असले तर द्या ना! पगार झाल्याबरोबर देऊन टाकीन तुमचे.”

शिवदेवने खिशातून चारशे रुपये काढून सुभाषला दिले आणि तो घरी आला. त्या दिवशी सुभाष-भारती जरा उशीरानेच घरी आले. भारतीच्या हातात एक नवी रेशमी साडी होती.

भारती भिंतीशी ठेवलेल्या खुर्चीजवळ गेली अन् म्हणाली—“ही पहा आई, तुम्ही म्हटल्यावरून तुमच्या मुलानं मला ही निळी साडी घेऊन दिली. आवडली तुम्हाला?”

नन्तर आपल्या नवऱ्याकडे वळून बघत ती म्हणाली—“आई म्हणतायत की, साडी तर मीच नेसणार ना, मग मला पसन्त असली की बस!”

यावर सुभाषने आनन्दाने मान डोलवली. रात्री जेवणाच्या वेळी सासूच्या ताटाकडे पहात भारती म्हणाली—“आई, आज तुम्ही असं असं काय सांगताय? घरी आलेल्या जावयाला परत जायला कसं सांगताय? आमच्या तोंडून आम्ही नाही असं काही सांगणार बाई!”

“काय झालं भारती? आई काय म्हणतेय?” सुभाषने आश्चर्याने विचारले.

“सासूबाईंना काळजी वाटतेय की आपली मुलगी तिकडे एकटी कशी रहात असेल! काही असलं तरी आईचं हृदय ते ते! त्यांना असं म्हणायचंय की जावई-बापूंनी उद्याच आपल्या घरी निघून जावं!” भारती उत्तरली.





हे ऐकून शिवदेव हसत म्हणाला– “भारती, सासूबाईंना सांग की मी परवाच जाईन इथून. उद्या संध्याकाळीच माझं इथलं काय आटोपेल.”

त्या रात्री शिवदेवला बराच वेळ झोप आली नाही. मध्यरात्री पाणी पिण्यासाठी तो स्वयंपाकघराकडे गेला, तो तिथलं दृश्य पाहून जागीच खिळून उभा राहिला!

रात्री तर भारतीसुद्धा सर्वजण पोटभर जेवले होते, पण आत्ता पाहतो तर सासूसाठी वाढलेलं अन्न भारती भराभर खात होती! शिवदेव आल्या पावली तसाच परत आपल्या अंथरुणाकडे गेला. दुसऱ्या रात्री सुभाष अन् भारतीबरोबर जेवायला बसलेला शिवदेव एकदम पाना-वरून उठला आणि म्हणू लागला–“अरे आपण मामासाहेब! या, या!”

सुभाषने तिकडे वळून पाहिलं, तर त्याला कोणीच दिसेना! त्याने शिवदेवला विचारले–“कोण आलंय शिवदेव? मला तर कोणीच दिसत नाहीये!” यावर आश्चर्य प्रकट करत शिवदेव म्हणाला– “खरंच नाही दिसत तुम्हाला? सहा वर्षांपूर्वी देवाघरी गेलेले तुमचे वडील, म्हणजेच माझे सासरे आलेत.”

नंतर पुन्हा आपल्या पानावर बसत शिवदेव म्हणाला–“बसा नं मामासाहेब! तुमची लाडकी सून आता तुम्हालाही जेवायला वाढेल.”

विश्वास बसत नसल्यासारख्या मुद्रेनं भारतीही नुसतीच पहात राहिली होती. तिनं मुकाट्याने आणखी एक ताट वाढून आणून ठेवलं. शिवदेवने विचारलं–“हं, कसं काय मामासाहेब? उदास का वाटताय तुम्ही?”

एक-दोन मिनिटांनी सुभाषने शिवदेवला विचारलं–“बाबा काय म्हणाले?” “सुभाष, अरे ते म्हणतायत की सासूबाई इथेच आहेत नं! त्यांना घेऊन जाण्यासाठी आलेयत ते! आणखी म्हणतायत की आता दोघांनीही वरच्या लोकात जायचं ठरवलंय त्यांनी! जायची वेळ झालीच आहे आता. यानन्तर आता सुनेला सासूबाईंचं दर्शन व्हायचं नाही. पण त्यासाठी सुनेनं वाटून घेऊ नये. तुम्हा दोघांना आशीर्वाद देऊन ते आत्ताच निघत आहेत!”

“ओह! असं होय?” जरा काळजी-नेच सुभाष बोलला. “नाही तरी बाबांचा स्वभाव असाच उतावळा आहे पहिल्या-पासून.”

भारतीचा चेहरा मात्र आता अगदीच पडला! ही सर्व घटना नीट समजून घ्यायच्या प्रयत्नात होती ती.

दुसऱ्या दिवशी सकाळीच उठून शिवदेव आपल्या गावी निघून गेला. त्याचं अंथरूण उचलताना भारतीला एक चिठ्ठी सापडली. त्यावर लिहिलं होतं–“तुला आपली सख्खी बहीण मानून ही चिठ्ठी लिहीत आहे. सुभाषच्या आपल्या आईवरच्या प्रेमाचा तू मोठ्या हुषारीनं स्वतःच्या स्वार्थासाठी उपयोग करून घेत आहेस, नवीनच सासरी आलेल्या तुला आपला खादाडपणा लपवायला हे नाटक छान उपयोगी वाटलं असेल. तुझ्या या सासूच्या ढोंगावर पडदा पाडण्यासाठीच मीही सासऱ्याचं नाटक केलं. होय, पण हे सर्व मी तुझ्या भल्यासाठीच केलं. माझ्यावर यासाठी रागावणार नाहीस त्याची खात्री आहे मला! येत्या सणाच्या दिवशी तुम्ही दोघंही नक्की माझ्याकडे या.”

चिठ्ठी वाचल्यावर – आजपर्यंत आपण नवऱ्याशी किती निष्ठुरपणे वागलो हे भारतीच्या लक्षात आलं. इतक्यात सुभाष झोपेतून जागा झाला. त्याने तिला विचारलं–“कसल्या एवढ्या विचारात पडली आहेस ग?”

“काही नाही; आपल्या लग्नानंतर प्रथमच या घरचा जावई आपल्याकडे आला, अन् आपण त्याला काही कापड-चोपडही दिलं नाही – हाच विचार मनात आला माझ्या! येत्या सणाला आपण वन्संसाठी अन् त्यांच्यासाठीही काही कापडचोपड घेऊन जाऊ या त्यांच्याकडे.” भारती आनन्दाने बोलली.



# महामूर्ख

हलकू एक गरीब लाकूडतोड्या होता. दुपारच्या वेळी नदीवर पाणी पिऊन तो परत फिरला, तेव्हा त्याला वाळूत काहीतरी चमकताना दिसलं. ती वस्तु उचलून तो पाहू लागला.

इतक्यात तिकडून आलेल्या एका रत्नपारख्याने हलकूच्या हातातली ती वस्तु आपल्या हातात घेऊन नीट निरखून पाहिली, आणि तो म्हणाला–"हा चमकदार काचेचा तुकडा तू मला देऊन टाक. मी तुला त्याच्या बदली वीस रुपये देतो. बोल, देतोस?"

हलकूच्या मनात आलं की, हा काचेचा तुकडा नक्कीच चांगला उपयुक्त असला पाहिजे, नाहीतर हा माणूस पैसे देऊन तो माझ्याकडे का मागेल? मग त्या रत्नपारख्याला तो म्हणाला–"ना बाबा, वीस रुपये कमी वाटतात. ठीक आहे, तुम्ही तीस रुपये द्या मला."

"अरे वेड्यासारखं काय करतोस? या तुकड्याला तीस रुपये कोण देईल? बरं ठीक आहे, मी पंचवीस देतो तुला." तो पारखी म्हणाला.

पण हलकू तीस रुपयावरच अडून राहिला. त्यानं साफ सांगून टाकलं की–"तीस पेक्षा एक पैसाही कमी घेणार नाही मी!"

रत्नपारख्याच्या मनात आलं की, या निर्जन जंगलात याला कोण दुसरं गिऱ्हाईक भेटणार! म्हणून तो पुन्हा म्हणाला–"हे बघ, जास्त लोभीपणा करू नये! मी आत्ता शेजारच्या गावी जाऊन येतो तासाभरात. पंचवीसच्या वर एक कवडीही देणार नाही मी अरे, तसे तर दहा रुपयेही कोणी देऊ करणार नाही याला." आणि तो पुढे निघून गेला.

एका तासाने तो रत्नपारखी परत आला अन् हलकूला म्हणाला–"हं, केलास विचार? बघ, पंचवीस रुपये देतो मी, देऊन टाक मला तो तुकडा."

"अरे पण मी तर विकूनही टाकला की तो शंभर रुपयात!" हलकू उत्तरला.

एकदम दचकून तो रत्नपारखी म्हणाला–"मूर्खच आहेस रे तू! तो काचेचा तुकडा नव्हता काही; चांगला दहा हजारांचा हिरा होता तो!"

"हां, मी तर अडाणी माणूस, मला कळली नाही किंमत त्याची! पण तुला तर माहीत होतं ना–की तो चांगला मूल्यवान हिरा आहे म्हणून? तेव्हां खरं पाहिलं तर तूच महामूर्ख ठरतोस ना!" तो लाकुडतोड्या हलकू म्हणाला.





# साहसी अपूर्व

[ ३ ]

[ मुनि सदानन्दच्या तपोबळाने यज्ञातून अपूर्व नावाची एक सर्वस्वी भिन्न अशी व्यक्ती उत्पन्न झाली. या अपूर्वने काही हत्तींच्या मदतीने आगीच्या ज्वाळातून गरिबांची घरे वाचवली. नन्तर त्याने देवाला बळी देण्यासाठी पळवून नेलेल्या समीर नावाच्या मुलाला डाकूंच्या तडाख्यातून वाचवले आणि त्याला त्याच्या गावात नेऊन सोडले. –त्यानन्तर ]

समीरला दुरूनच येताना पाहून गावकरी खूप आनन्दले. डोळ्यातून आनन्दाश्रू झरत असलेल्या त्याच्या आईने त्याला प्रेमाने कवटाळले अन् त्याच्या मस्तकाचे चुम्बन घेत ती आनन्दाने म्हणाली–"आलास बाळा!"

गावच्या पाटलाने समीरकडे कौतुक-भरल्या नजरेने पहात विचारले–"त्या बदमाशांच्या तावडीतून कसा सुटून आलास बाळ?"

"वा, वा! आपला समीर तर मोठा बहादुर अन् बुद्धिमान आहे हं!" आणखी एक खेडूत बोलला.

आणि आणखी काही गावकऱ्यांनीही माना डोलावल्या. तरीही समीरने हात जोडून नम्र स्वरात म्हटले–"मी आज असा वाचलो याचं कारण माझं धैर्य किंवा धाडस वगैरे नाही. देवानेच एक दिव्य पुरुष माझ्या मदतीला धाडला, आणि...



फक्त मीच वाचलो तरी असा काय फायदा? ते डाकू रोजच कित्येकांचा जीव घेत असतील नं!"

हे ऐकून पाटीलही उदास झाला—"होय बेटा, तू खरं तेच बोलतो आहेस. पण कमीत कमी तू तरी वाचलास, याचा आनन्द आहे मला! त्या रक्तपिपासू डाकूंना तोंड देणं, आपल्या हातून घडण्यासारखं नाही. खुद्द राजाचे सैनिक देखील त्यांना नमवायला असमर्थ ठरले, त्यांच्यापुढे आपण कुठल्या झाडाचा पाला!"

"पण कोणतीही गोष्ट सुरू झाली, की तिचा अन्तही ठरलेला असतोच! माझ्या मते त्या दुष्टांचा अन्तही अगदी जवळ आलाय. त्यासाठी राजाच्या सैनिकांनी तावडतोब पुढे व्हायला हवं, आत्ता माझ्याबरोबर ते आले, तर मी त्या सर्व डाकूंना पकडून देईन." समीर गंभीर स्वरात बोलला.

त्याचे हे बोलणे ऐकून सर्वजण चकित झाले. विशेषत: सैनिक-दलाचा नायक एकदम दचकलाच! त्याला वाटले की, या समीरला बहुधा वेड लागलं! तो समीरकडे निरखून पाहू लागला. पण गावचा पाटील समीरला चांगला ओळखत होता. म्हणून अगदी प्रेमाने त्याला जवळ बोलावून पाटील म्हणाला—"ते डाकू कुठायत ते तुला चांगलं माहीत आहे समीर? आपण निघालो, तर एवढ्यात ते पळून तर गेले नसतील ना?"

दलनायकाने आणखी शंका काढली—"अन् सगळे चोर तिथे हजर असले, तरी आपण अल्पसंख्य लोक त्यांना कसं पकडू शकू?"

"ते सारे चोर आत्ता एका गुहेत बेशुद्धावस्थेत पडलेले आहेत. हीच उत्तम संधी आहे. आपण आत्ता निघून तिथे पोचलो, तरी अजून ते तसेच पडलेले सापडतील. इतक्यात ते शुद्धीवर येणार नाहीत." समीर अधीरतेने सांगू लागला.

"खरं?" आता मात्र दलनायकाचा चेहरा चमकू लागला. त्याने सैनिकांना



तावडतोब आपणाबरोबर निघायची आज्ञा दिली अन् समीरला बरोबर घेऊन तो जंगलाच्या दिशेने निघाला.

"समीर! बाळा, रात्रभर तू काही खाल्लं नसशील. आता पुन्हा परतायला किती वेळ लागेल कोण जाणे! थोडंसं खाऊन नीघ नं!" समीरची आई त्याला अडवत म्हणाली.

"नको आई, आता हे काम पुरं करूनच आनन्दाने पोटभर जेवेन मी! उशीर झाला तर आत्ता हातची संधि जाईल बघ." असे म्हणून समीरने आईचा निरोप घेतला.

समीर पुढे अन् त्याच्या मागोमाग दलनायक व त्याचे हत्यारबंद सैनिक चालू लागले. त्यांच्या मागे हातात कुदळी, फावडी अन् हाती लागेल ते घेऊन काही धडधाकट खेडूतही निघाले. त्यांच्याबरोबर गावचा पाटीलही होता. मोठ्या उत्साहाने सावधगिरी बाळगून ते सर्व जंगलात पोचले.

चोरांचा पडाव नजरेच्या टप्प्यात आल्याबरोबर समीरने सर्वांना थांबवले, समोरच्या एका टेकाडावर चढून तो पाहू लागला. सारे चोर अजून बेशुद्धावस्थेतच असल्याचे नीट पाहून घेऊन आनन्दाने त्याने इशारा करून दलनायक व पाटील यांना आपल्याजवळ बोलावून घेतले.



त्यांच्याबरोबर सैनिक व इतर ग्रामवासीही टेकाडापलीकडे उतरले. दलनायकाच्या आज्ञेने सैनिकांनी तेथील वेल वगैरे कापून घेऊन त्यांच्या साह्याने बेशुद्ध चोरांचे हात मागे घेऊन करकचून बांधून टाकले.

नशा उतरल्याबरोबर प्रथम भैरवमलनेच डोळे उघडले. आपल्यासमोर दलनायकाला पाहून तो हैराणच झाला!

"दुष्टा! आता तुझं काही चालणार नाही बघ. मुकाट्याने आमच्याबरोबर नीघ. पळायचा प्रयत्न केलास तर काटेकुटे अन् दगडाधोंड्यातून तुला फरपटत घेऊन जाऊ आम्ही! तुम्हा लोकांचे हातपाय सोलवटले किंवा तुमची सर्व शरीरं कापली



जाऊन केवळ मस्तकंच आमच्या हाती राहिली तरी हरकत नाही. आम्ही राजाला ती मस्तकंच मोठ्या आनन्दाने दाखवू. तेव्हा, सावध! नीटपणे आमच्याबरोबर चला!" दलनायकाने त्याला धमकी देत म्हटले.

भैरवमलने बंधन तोडायचा प्रयत्न केला. तेव्हां दलनायकाने त्याला गुद्दे मारत पुन्हा धमकावले—"मुकाट्याने आलास तर ठीक आहे, नाहीतर तुला अन् तुझ्या साथीदारांना इथेच पुरून टाकू, समजलं?" तो उच्च आवाज त्या डोंगरात प्रतिध्वनित झाला! "समजलं? जलं?" या अवधीत भैरवमलचे इतर साथीदारही एक एक करून शुद्धीत आले. आपली परिस्थिति कळून यायला त्यांना वेळ नाही लागला! चाबूक चालू लागल्याबरोबर सर्वजण उठून पुढे चालू लागले. त्यांच्या मागे पुढे सशस्त्र सैनिक चालत होते. दलनायक, समीर व गावचा पाटील हे तिघे सर्वात पुढे चालत होते.

सगळी वरात समीरच्या गावी पोचली तेव्हां आसपासच्या पंचक्रोशीतून तिथे जमलेले सर्व लोक हे दृश्य 'आ वासून' पहात राहिले. सारे चोर-डाकू माना खाली घालूनच चालत होते. भोवती जमलेल्या लोकात त्यांच्याकडून लुबाडले गेलेले जे लोक होते, त्यांनी लगेच त्यांना मारायला दगड उचलायला सुरुवात केली. ते पाहून त्यांना ताबडतोब थांबवत समीर म्हणाला—"अरे, थांबा, थांबा! आता हे सर्वजण पकडले तर गेले आहेत ना? राजाच आता त्यांना योग्य ती शिक्षा देईल. तुम्ही लोक शान्त व्हा!"

गाववाल्यांनी लगेच समीरला खांद्यावर उचलून घेत घोषणा द्यायला सुरुवात केली—"समीर की जय!" आणि ते आनंदाने उड्या मारू लागले. गावच्या पाटलाने समीर, दलनायक व सर्व सैनिक यांना मेजवानी दिली.

जेवणानंतर समीरला एका झाडाखालून हलकीशी शीळ ऐकू आली. समीरने तिकडे



वळून पहाताच, त्याला एका झाडामागे उभा असलेला अपूर्व दिसला. मोठ्या आनन्दाने समीर त्याच्या दिशेने धावू लागताच अपूर्वने त्याला सावधगिरीचा इशारा दिला. तो पाहून समीरच्या ध्यानात आले की अपूर्व स्वतःच्या बाबतीत गुप्तता बाळगू इच्छित आहे. कोणाला संशय येणार नाही, अशा बेताने मग समीर त्या झाडाकडे गेला. तो अपूर्वला म्हणाला—"तुमचं दर्शन मला आनन्ददायक वाटतं."

"डाकूंना पकडवण्यात तू जे चातुर्य दाखवलंस, त्याचा मला खूप संतोष वाटला. पण ते बिचारे किती दुष्ट असले तरी अखेर ती ही माणसंच आहेत नं? त्यांनाही तहानभूक असतेच! पाटलाला सांगून त्यांच्याही जेवणाची व्यवस्था करव." अपूर्वने समीरला सुचवले.

"जशी आज्ञा! आपल्या म्हणण्याप्रमाणेच सर्व काही करीन देवा!" समीर उत्तरला.

"समीर, मला 'मित्र' म्हण. त्यानेच बरं वाटेल मला." अपूर्व हसत म्हणाला.

* * *

दलनायकाने पकडून आणलेल्या सर्व चोर-दरोडेखोरांना राजाने मृत्युदण्ड सुनावला. त्यांच्या हातापायात लोखंडी



साखळ्या अडकवून त्यांना तुरुंगात डांबून टाकण्यात आले. शिक्षेची अंमलबजावणी होईपर्यंत त्यांना ज़िवन्त ठेवता यावे, इतकेच थोडेसे अन्न त्यांना रोज दिले जाऊ लागले. सर्व चोर जिवाची आशा सोडून एका बाजूला माना खाली घालून बसून असत. एकदा एक चोर रागावून बोलला—"भैरव! तुझ्यामुळेच आम्हाला ही परिस्थिती आली आहे."

"काय रे! नावानं बोलावतोस मला? एवढं धैर्य? कालपर्यंत 'मालक, मालक' करत हात जोडत होतास! विसरलास काय? तुमचा नायक आहे म्हटलं!" भैरवनाथ आवेशाने बोलला.



"मला आता काही सुद्धा आठवत नाही, आणि शिवाय तुझ्यामुळेच आता आम्हा सर्वांना प्राणास मुकावं लागणार आहे! आता कशासाठी आम्ही तुला मान द्यावा?" त्या चोराने बेपर्वाईने उलट प्रश्न केला.

"नालायका, अरे चुप बस. आणखी एक शब्द जरी तोंडातून काढलास ना, तर जीवच घेईन बघ तुझा." भैरवमल चिडून ओरडला.

"अरे त्यासाठी तू कशाला कष्ट घेतोस? राजाचे शिपाई ते काम करतीलच की! केवळ आम्हालाच नव्हे, तर तुलाही प्राणास मुकावं लागणार आहे म्हटलं!" त्या चोराने आता जीभ बरीच सैल सोडली होती!

अमर्याद क्रोधाने आता भैरवमल थरथर कापू लागला. एक साथीदार असं काही बोलला अन् इतर सर्व गप्प बसले.

याचाच अर्थ ते सर्वजण या साथीदाराच्याच बाजूचे असले पाहिजेत! त्याला तर असेही वाटले की त्या एका चोराच्या तोंडून बाकी सर्वजणही हेच बोलत आहेत.

"तुम्हा लोकांची मृत्यूच्या तडाख्यातून वाचायची इच्छा आहे काय?" एक मधुर स्वर तिथल्याच एका कोपऱ्यातून निनादला.

सर्व चोर त्या दिशेने पाहू लागले, पण अंधारात कोणालाच काही दिसेना. पण तिकडेच पहात भैरवमलने विचारले. "कोण आहेस तू?"

"मी......अं...पण तुम्हाला पकडून देण्यात माझाच हात होता." त्या स्वराने माहिती दिली.

"वा:, फारच छान! पकडून दिलंस तूच! अन् सोडवायची गोष्टही तूच करतोयस? आम्हाला वाचवायचा प्रयत्न आता तू कशासाठी करतोयस?"

"कारण......अपराध्यांना मृत्युदंड मिळावा, हे मला बरं वाटत नाहीय! अपराध्यांचं हृदयपरिवर्तन व्हावं अशी माझी इच्छा आहे. पापपूर्ण जीवन जगत दुसऱ्यांना त्रास देत तुम्ही लोक आपलंच आयुष्य कमी करत आहात. असलं जीवन जगण्याने आजपर्यंत कधीच कुणाचं भलं झालं नाहीय, म्हणून मी तुम्हाला पकडून दिलं. पण आता इथून पुढे काही चांगलं काम करून प्रमाणिकपणे जगायचं वचन देत असाल तर मी तुमच्यासाठी राजाकडे शब्द टाकीन, तुम्हाला माफी देववीन." अपूर्व अंधारातूनच बोलला.

चोर थोडा वेळ गप्प राहिले. नंतर सर्व एकाच आवाजात म्हणाले–"आमच्यावर दया कर! आमच्या गळ्यातला फास वाचव. तू म्हणशील तसं वागू आम्ही इथून पुढे!"

"भैरवमल, तुझा काय विचार आहे बाबा?" अपूर्वने विचारले.

यावर एक लांब सुस्कारा सोडत भैरवमल म्हणाला–"माझीही एके काळी इच्छा होती की, सुख-समाधानाचं आयुष्य जगावं. परंतु हळूहळू दुसऱ्यांना त्रास देत पापी जीवन जगायची संवय जडली मला. आता तूच आम्हाला या संकटातून वाचव, यापुढे आजीवन आम्ही तुझ्याच सेवेत राहू."

माझ्या सेवेत नाही–'स्वत:च्या आत्म्याच्या सेवेत' म्हणजे धर्मपथावर आपण चालत रहा. धर्मपथावर चालणाऱ्यांचा कधीही पराजय होत नाही, त्यांना



अशान्तीला तोंड द्यावं लागत नाही." अपूर्व बोलला.

"मी स्वत:साठी नाही, या सर्वांसाठी दु:खी आहे. यांना सर्वांना सोडून देऊन राजाने मला एकट्यालाच फाशी दिलं तर मी आनन्दाने फाशी जाईन." भैरवमल म्हणाला.

"तुझं हे बोलणंच तुझ्या हृदयपरिवर्तनाचं द्योतक आहे, भैरवमल! तुम्हा लोकांसाठी मी जरूर राजाजवळ बोलेन. तोपर्यंत तुम्ही देवाचं ध्यान करा, म्हणजे तुमच्या मनाला शांति अन् शक्ति मिळेल. आपल्या अपराधांबद्दल त्या जगन्नियन्त्याजवळ क्षमा मागा. तुमचा पश्चात्तापच

तुमचं रक्षण करील." अपूर्वने त्यांना दिलासा दिला.

* * *

अपूर्वने समीरकरवी राजाला सांगितले की सर्व डाकूंना आता पश्चात्ताप झाला आहे. इथून पुढे सन्मार्गाने चालायची त्यांची इच्छा आहे; तेव्हा राजाने त्यांना दया दाखवून मुक्त करावे. पण राजा ते ऐकेना. तो म्हणाला–"या सर्वांनी अनेक निष्पाप, भोळ्या लोकांचा जीव घेतलेला आहे. तेव्हां त्यांना फाशी देणंच न्यायसंगत होईल."

"महाराज, पण मला तर वाटतंय की देवानेच त्यांना माफी दिली आहे." समीर म्हणाला.

"असं? म्हणजे तू देवाचा प्रतिनिधी आहेस तर!" राजा त्याला खिजवत बोलला.

"मी तसं म्हणत नाही महाराज! पण ज्या महापुरुषाने मला चोरांपासून वाचवलं होतं, त्याच्या द्वाराच मी देवाचा संदेश ऐकत आहे." समीर नम्रतेने उत्तरला.

"शाब्बास, मग देवच जर त्यांना वाचवू इच्छित असेल तर तोच एखादा चमत्कार घडवून त्यांना सोडवू शकेल ना?" राजा म्हणाला.

"महाराज, ते चोर बिचारे सध्या पश्चात्तापाच्या आगीत होरपळत आहेत. त्या क्रूर दरोडेखोरांना पश्चात्ताप होणं, हाही एक चमत्कार नव्हे काय?" समीर पुन्हा त्याच नम्र आवाजात बोलला.

यावर मोठ्याने हसत राजा म्हणाला–"तू म्हणतोस ते खरंही असेल कदाचित्! पण मला या गोष्टी पुरेशा नाही वाटत. देवानेच भैरवमलला वाचवायचं ठरवलं आहे ना? मग मला विनंती कशासाठी? ज्या दोरीने त्यांना फाशी दिलं जाईल, ती दोरीच एखाद्या विजेसारख्या ज्वालेने तोडून टाकून तो या चोरांना वाचवू शकेल की!"

"अच्छा? राजाला चमत्कारच पहायचा असेल तर तसंच घडेल." अपूर्व गंभीर होत म्हणाला.

(क्रमशः)





# कार्यकुशल

दृढनिश्चयी विक्रम पुन्हा त्या झाडाकडे गेला, झाडावरून प्रेत उतरवून ते आपल्या खांद्यावर लादून नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे निघाला. तेव्हां त्या प्रेतात वास करणारा वेताळ राजाला म्हणाला–"हे राजा, कोणाच्या आज्ञेचं पालन करण्यासाठी तू या मध्य-रात्रीच्या वेळी अशा भयाण जंगलात हे कष्ट उपसत आहेस, याबद्दल मला काहीच कल्पना नाही. महान स्वामीभक्त आणि असामान्य धैर्य असणारे विवेकी लोक सोडून दुसऱ्या कुणाच्या आवाक्यातलं हे काम नव्हे, हे मात्र मी बरोबर ओळखतो. पण कधीकधी अशा कुशल व कार्यक्षम लोकांनाही अपमानित होऊन आपलं उच्च स्थान घालवावं लागतं. अशा तऱ्हेने अपमानित व पदच्युत झालेल्या एका पथक-प्रमुखाची गोष्ट मी तुला सांगतो. नीट

## वेताळाच्या गोष्टी



सावध चित्ताने ती एकून घे, तुझा थोडासा श्रमपरिहारही होईल. असे बोलून वेताळ गोष्ट सांगू लागला–

गिरिपुरचा राजा धूमकेतु हा अत्यन्त क्रूर होता. त्याची राज्य-लालसा अदम्य होती. त्याच्या राज्याजवळच धन-दौलतीने शिगोशीग भरलेलं कांभोजराज्य होतं. ते हस्तगत करायची धूमकेतूची बरीच जुनी इच्छा होती. पण ते जिंकणं सोपं नव्हे हे ही तो जाणून होता. अशातच एक दिवस कांभोज राजकुमारी आपल्या सख्यांसह वनविहाराला गेली असल्याची बातमी त्याला कळली. धूमकेतूने लगेच आपले सैनिक पाठवून तिला पकडले अन् एका गुप्त स्थानी कैद करून ठेवले.

राजा धूमकेतूने यानन्तर एक दूत पाठवून कांभोज राजाला निरोप दिला की– "तुमची कन्या मदालसा सध्या माझ्या ताब्यात आहे. तेव्हा आपण महसूल म्हणून दहा लाख मोहोरा ताबडतोब पाठवून द्याव्या. महसूल पाठवलात, की आपल्या कन्येला सकुशल परत पाठवण्यात येईल."

कांभोजच्या वृद्ध मन्त्र्याने हे वृत्त आपल्या राजाला कळवून, त्याने दूताला म्हटले– "आम्ही एक महिन्याच्या आतच महसूल पाठवायची तजवीज करू." आणि त्याने दूताला इतमामाने परत पाठवले.

यावर कांभोज राजा रागावून आपल्या मन्त्र्याला म्हणाला–"आम्ही धन पाठवलं तरी तो दुष्ट माझ्या मदालसेला सुखरूप परत पाठवीलच याचा काय भरंवसा?"

वृद्ध मन्त्री उतरला–"सरकार, मी तसा निरोप अशाकरता दिला की आपल्यालाही अजून थोडा वेळ मिळेल विचार करायला."

राजाने जरा विचार केला. पण काहीच सुचलं नाही, तेव्हा तो म्हणाला–"ठीक आहे. पण आता पुढे काय करायचं?"

"एकादा स्वामीभक्त आणि समर्थ असा गुप्त हेर पाठवून आपण राजकुमारीला कुठं ठेवलंय याचा पत्ता काढून घेऊ." मन्त्री गंभीर होत म्हणाला.

मग राजा अन् मन्त्र्याने ताबडतोब, एकमताने ठरवलं, की या कामाला आपल्या गुप्तहेर विभागाचा नायक केशववर्मा हाच अत्यन्त योग्य होईल.

केशववर्मा दुसऱ्या दिवशी सकाळीच रवाना झाला. एक रात्र अन् एक दिवस चालून तो गिरिपुरच्या सरहद्दीवरील नदी-किनारी पोचला. तिथे धूमकेतूच्या सैनिकांचा एक तळ होता. कोळयाच्या वेषात नदी पार करून केशववर्मा राजधानीत पोचला. एक आठवडाभर अनेक प्रकारे प्रयत्न केल्यावर त्याला पत्ता लागला की, नदीकिनारी जंगलात एका जुन्या किल्ल्यात राजकुमारीला कैद करून ठेवलेली आहे. रात्रीच्या वेळी केशववर्मा त्या जंगलात पोचला, अन् आसपास शोध घेऊ लागला. इतक्यात अचानक त्याच्या डोक्यावर जोरदार प्रहार झाला. त्याने लगेच मागे वळून पाहिले, तो मागे हातात मशाल घेतलेला एक शिपाई त्याला दिसला. तो पुन्हा दुसरा प्रहार करणार, तोच केशववर्माने त्या शिपायाच्या छातीत आपली तलवार भोसकली. खाली पडता पडता शिपाई जोरात ओरडला, अन् त्यामुळे आणखी काही शिपाई तेथे धावत येऊ लागले.

ते पाहून केशववर्माने शिपायाच्या हातातली मशाल घेऊन आसपासच्या वाळलेल्या पाला-पाचोळयाला आणि झाडोऱ्याला आग





लावली. पहाता-पहाता आगीच्या ज्वाळा पसरू लागल्या आणि त्यामुळे तेथे धावपळ सुरू झाली, या परिस्थितीचा फायदा घेऊन केशववर्मा तिथून निसटला आणि तीन-चार दिवसात कांभोजनगरला पोचला.

डोक्याला पट्टी बांधून आलेल्या केशववर्माला पाहून राजा अन् मन्त्री आश्चर्य चकित झाले. नंतर त्याची कहाणी ऐकून त्यांना वाईट वाटले. दुसऱ्याच दिवशी कृतसेन नावाचा एक तरूण शिपाई राजाकडे आला व म्हणाला–"मी राजकुमारीला सोडवून आणू शकेन."

राजाचा यावर जराही विश्वास बसेना. तरीही तो म्हणाला–"ठीक आहे! तू केशववर्माला भेटून त्या जुन्या किल्ल्याबद्दल माहिती मिळवून ठेव."

"क्षमा असावी महाराज, पण केशववर्माला भेटून फारसा काही उपयोग होईल असं नाही वाटत मला." कृतसेन म्हणाला.

राजा व मन्त्री हे ऐकून त्याच्याकडे आश्चर्याने पाहू लागले–"इतकी गडबड झाल्यानन्तरही धूमकेतूने राजकुमारीला तिथेच ठेवलं नसणार! खरं ना?" कृतसेनने स्पष्टीकरण केलं.

आता मात्र राजा व मन्त्री समजून चुकले की हा कृतसेन चांगलाच बुद्धिमान आहे. राजा त्याला म्हणाला–"ठीक आहे; तू आता तुला हवा तसा प्रयत्न कर. जाऊ शकतोस तू."

चार दिवसांनी कृतसेन परत आला. पण राजकुमारी त्याच्याबरोबर नव्हती. एकटाच आला होता तो. रागाने राजाने त्याला म्हटले–"मला वाटतं की तू केवळ बुद्धिहीनच नव्हे, तर भित्राही असला पाहिजेस."

यावर कृतसेन नम्रपणे म्हणाला–"क्षमा असावी महाराज, हे काम पूर्ण करायला मी एकटाच पुरेसा नाही. आपल्या दोन्ही राज्यांच्या सरहद्दीवरील नदी जिथे समुद्राला मिळते, तिथे एका बेटावर धूमकेतूने राजकुमारीला कैद करून ठेवलं आहे; आणि खूपसं सैन्यही तिथे पहाऱ्याला



बसवलं आहे. ही गोष्ट आपल्याला न कळवता सरळ तिथे जाणं बरोबर वाटलं नाही मला! कारण तिथे माझाच मृत्यु ओढवला असता तर राजकुमारीच्या ठावठिकाण्याचं रहस्यही माझ्याबरोबरच पुरलं गेलं असतं."

यावर राजा चिडून म्हणाला–"अरे, चल चालता हो इथून!" नन्तर राजाने मन्त्र्याशी चर्चा करून लगेच सेनापतीला बोलावून घेतले. मन्त्र्याने त्याला विचारले–"नदीच्या पात्रामधे असलेल्या त्या बेटावर हल्ला करून राजकुमारीला सोडवून आणणं तुला शक्य होईल का?"

सेनापती तावडतोब उत्तरला–"हो! सहज शक्य आहे महाराज! धूमकेतूला संशय येणार नाही, अशा बेताने आपले शंभर बहादुर सैनिक कोळ्यांच्या वेषात जाऊन त्या बेटाला वेढा घालतील. मग राजकुमारीला सोडवणं अगदी सोपं होईल महाराज."

"ठीक आहे. तुला तुझ्या प्रयत्नात यश मिळालं की निरोप पाठव. मग आपण सैन्य घेऊन जाऊन गिरिपुरवर हल्ला चढवू आणि धूमकेतूचा शेवट करून टाकू." वृद्ध मन्त्री म्हणाला.

मन्त्र्याची कल्पना शंभर टक्के बरोबर ठरली. गिरिपुरचा किल्ला कांभोज सैन्याने



जिंकला आणि स्वत: राजा धूमकेतु युद्धकैदी म्हणून कांभोजच्या कारागृहात दाखल झाला.

या विजयाचा उत्सव साजरा केला जात असताना राजा मन्त्र्याला म्हणाला–"महामन्त्री, हा विजयोत्सव चालू असतानाच आपण आपल्या केशववर्माचा सत्कार केला, तर कसं काय होईल?"

मन्त्री यावर म्हणाला–"नाही महाराज, सत्कार करायचा म्हटलं, तर कृतसेनचा करायला हवा, केशववर्माचा नव्हे."

थोडा विचार करून राजा म्हणाला–"तुमचं म्हणणं बरोबर आहे महामन्त्री!" नन्तर मोठ्या थाटाने कृतसेनचा सत्कार केला गेला आणि गुप्तहेर विभागाच्या

अधिकाराच्या जागेवरून केशववर्माना काढून टाकून ती जागा कृतसेनला देण्यात आली.

गोष्ट इथवर संपवून वेताळाने विक्रमला विचारले – "राजा, कांभोज राजाने मन्त्र्याच्या सांगण्यावरून केशववर्माचा केवळ सत्कारच थांबवला असं नव्हे, तर त्याला त्याच्या पदावरूनही हटवलं; हे बरोबर झालं का? ज्या कृतसेनला एकदा 'भित्रा' म्हटलं होतं, त्यालाच गुप्तहेर खात्याचा प्रमुख नेमून त्याचा सत्कार केला राजाने! हे सर्व असंबद्ध अन् असंतुलित नाही वाटत? एका भित्र्याला जबाबदारीची जागा देणं कितपत उचित झालं? या प्रश्नांचं उत्तर माहीत असूनही दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे होतील हे तुला माहीतच आहे."

यावर राजा विक्रम म्हणाला–"केशववर्मा समर्थ अन् स्वामीभक्त असेलही; पण त्याचा रागीट स्वभाव त्याला मारक आहे. आपल्या प्राणावर बेतलं, तेव्हा त्याने अविचाराने सारं जंगलच जाळून टाकलं. त्यावेळी तो हेही विसरून गेला की राजकुमारी तिथेच आहे; आणि आगीमुळे तिच्या जिवालाही धोका पोचू शकतो. त्याच्या उतावळेपणामुळे कामाची सफलता दूरच, पण समस्या आणखीच गुंतागुंतीची झाली; धूमकेतुने राजकुमारीला दुसऱ्याच गुप्तस्थानी हलवले. पण ही गोष्ट अगोदरच ओळखून कृतसेन राजकुमारीचा बरोबर पत्ता मिळवू शकला आणि त्यामुळेच बेटावर आणि धूमकेतूच्या राज्यावरही हल्ला करण्याचा वृद्ध मन्त्र्याचा बेत सफल झाला. धूमकेतूचे पतनही त्यामुळेच शक्य झाले. मन्त्र्याच्या सल्ल्यावरून राजाने खरी गोष्ट बरोबर ओळखली आणि कार्यकुशल असणाऱ्या कृतसेनचा सत्कार केला."

मग, अशा रीतीने राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ त्या प्रेतासह पुन्हा एकदा अदृश्य होऊन त्या पूर्वीच्या जुन्या झाडाच्याच फांदीला लटकू लागला.

(कल्पित)





# मजेदार पंखा

एका राजाला पंख्यांचं भारी वेड होतं. त्यामुळे त्याने खूपसे तऱ्हेतऱ्हेचे पंखे आपल्यापाशी जमवून ठेवले होते.

एके दिवशी दुपारच्या कडक उन्हाच्या वेळी राजा आपल्या विश्रान्ती-गृहात आराम करत बसला होता. इतक्यात राजवाड्याच्या बाहेरील रस्त्यावरून कोणा पंखेवाल्याची आरोळी ऐकू आली–"मजेदार पंखे, अद्भुत पंखेऽऽ पण खूपच स्वस्त! किंमत फक्त पन्नास अशर्फीऽऽ!"

राजानं पंखेवाल्याला बोलावून घेतले.

"कायरे, इतकी जास्त किंमत लावली आहेस? असं काय विशेष आहे तुझ्या पंख्यात?" राजाने त्याला विचारले.

यावर पंखेवाला मोठ्या नम्रतेने बोलला– "हुजूर! इतके खास अद्भुत पंखे मी फक्त पन्नास अशर्फीना विकतो आहे. खूप स्वस्तच म्हणायला हवेत खरं म्हणजे!"

"असं? पण दिसायला तर ते इतर सर्वसामान्य पंख्यांसारखेच दिसतायत की! इतके काही खास मजबूत नाही दिसत?" राजा अविश्वासाने बोलला.

"महाराज! आपल्या सारख्यांना फसवायची चूक होईल का माझ्या हातून? इतकं कुठलं धैर्य माझ्यात? मी अगदी खरं सांगतोय की हे पंखे शंभर वर्षांहूनही अधिक टिकतील!" पंखेवाल्याने पुन्हा एकदा खात्री दिली.

एक पंखा घेऊन पन्नास अशर्फी पंखेवाल्याच्या हातावर ठेवत राजा म्हणाला– "पहातोच या मजेदार पंख्याची क्षमता किती आहे ती! पुन्हा महिन्यानंतर माझ्याकडे ये तू!"

"जशी आज्ञा महाराज! पण याचा उपयोग कसा करायचा, ते मला सांगायचंय." पंखेवाला पुन्हा नम्रपणे म्हणाला.

हे बोलणं ऐकून राजाला राग आला. पंखेवाल्याला काही बोलू न देता तो म्हणाला–"अरे, पंखा कसा हलवायचा, हे ही तू मला सांगणार होय? अशी काय महान् विद्या आहे ती! जा तू आता."

नंतर राजा जरा आराम करण्यासाठी बिछान्यावर पडला. आणि नवा पंखा हलवू लागला. एक दिवस पंखा हलवताना त्याची पानं सुटी होऊन खाली पडली अन् दांडाच तेवढा राजाच्या हाती राहिला!

पण एक महिना गेल्यावर खरोखरच तो पंखेवाला बेधडक येऊन हजर झालेला पाहून मात्र राजाला मोठं आश्चर्य वाटलं. वाकून राजाला नमस्कार करत तो म्हणाला–"आज्ञा करावी महाराज! आपल्या आदेशाप्रमाणे महिना पूर्ण होताच मी आपणासमोर हजर आहे."

त्याला पहाताच राजाच्या रागाचा पारा खूपच चढला. तो म्हणाला–"अरे तू तर एक नंबरचा लबाड प्राणी दिसतोस." अन् तो तुटका दांडा त्याने पंखेवाल्यासमोर धरला.

हे सर्व पाहूनही जरासुद्धा न घाबरता पंखेवाला म्हणाला–"महाराज, क्षमा असावी मला. पण मी आपल्याला प्रथमच सांगितलं होतं की हा पंखा जरा विशेष असा आहे, याचा उपयोग नीट व्हायला हवा. पण आपण माझ्या सांगण्याकडे लक्षच दिलं नाहीत, म्हणूनच याची अशी अवस्था झाली."

"असं? कसा उपयोग करायला हवा होता याचा?" राजाने चिडून विचारलं.

"महाराज हा विशेष पंखा आहे नं, म्हणून हा हाताने न हलवता नुसताच पकडून आपलं डोकं त्याच्यापुढे हलवायचं." पंखेवाला उत्तरला.

राजा तसा मोठा विनोदप्रियही होता. त्यामुळे खो खो हसत तो म्हणाला–"वा खूप! पंख्याच्या बाबतीतलं तुझं ज्ञान अद्भुत खरं. माझ्याकडे अनेक पंखे आहेत. मी तुला त्यांचा रखवालदार म्हणून नेमतो." असं बोलून राजाने त्याला आपल्याकडे नोकरी दिली.



चांदोबा पुरवणी–३१

# महान् स्वप्नदर्शी भारत

## समर्पणाची भावना

भारताच्या स्वातन्त्र्य-लढयात, निरनिराळ्या क्षेत्रांतील अनेक व्यक्तींनी 'नेता' म्हणून काम केले. अशा प्रकारे प्रजेचे आदरस्थान बनणाऱ्या व्यक्तींपैकी एक होत्या प्रसिद्ध कवयित्री श्रीमती सरोजिनी नायडु.

कविकोकिळा सरोजिनि नायडु यांचे वडील अघोरनाथ नायडु हे हैद्राबादच्या निजाम कॉलेजचे प्रिन्सिपॉल होते. सरोजिनीदेवींचा जन्म १८७९ मधे हैद्राबाद येथे झाला. लहानपणापासूनच त्यांच्यात समाज–सुधारणेची भावना दिसून येत असे. यामुळेच त्यांनी डॉ. गोविन्दराजुलु नायडु यांच्याशी आंतरवर्णीय विवाह केला. १९२५ मधे त्या भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेसच्या अध्यक्ष म्हणून निवडल्या गेल्या.

श्रीमती सरोजिनीदेवी भारताचे पूर्वीचे वैभव व कीर्ती याबाबतीत मोठे प्रभावपूर्ण भाषण करत असत, आणि अशा प्रकारे प्रजेच्या मनात त्या नवा उत्साह आणि सद्य:परिस्थितीबद्दल उद्वेग जागवत असत. आपल्या राजकीय जीवनाचा प्रारंभ करताना त्यांनी प्रजेला अशी शपथ घ्यायला लावली की–"पर्वत व नक्षत्रे यांना साक्षी ठेवून आम्ही अशी प्रतिज्ञा करतो की, आम्ही सर्व मिळूनमिसळून पुढे जात राहू. आमचे विचार व वचन, आमची ताकद व सामर्थ्य या सर्वांचा आम्ही आमची मातृभूमि व तिचे सौभाग्य यासाठी उपयोग करू."

## तुम्हाला माहीत आहे?

१. मूल जन्मल्याबरोबर त्याला शिपाई किंवा शिकारी बनवण्याची प्रथा आपल्या देशात कोठे आढळते?

२. जगातील सर्वात अधिक उंचीचा धबधबा कोणता?

३. व्हेनिस शहरात आढळणाऱ्या 'गोंडोला' सारख्या लांब नावा आपल्या देशात कोठे वापरल्या जातात?

४. श्रवणबेळगोळची गोमतेश्वराच्या मूर्तीची उंची आणी कुतुबमिनारची उंची यात कसले साम्य आहे?

[पान ३६ पहा]



# महालक्ष्मी

देव-दानवांनी अमृत मिळवण्यासाठी मन्दार पर्वताची रवी व वासुकीची दोरी करून क्षीरसागर घुसळला. हे मंथन संपले तेव्हा त्यातून प्रथम हलाहल बाहेर पडले. नंतर अमृत निघण्यापूर्वी अनेक दिव्य वस्तूंबरोबरच महालक्ष्मीचाही उद्भव झाला. क्षीरसागरतनया लक्ष्मी-देवीला, मानवाने आशा करावी अशा सव प्रकारच्या संपत्तीची अधिष्ठात्री देवी मानले जाते. भक्त या लक्ष्मीची अनेक रूपात पूजा करतात. वैकुण्ठातील स्वर्ग-लक्ष्मी, घराघरातील गृहलक्ष्मी, शेतकऱ्यां-कडून पुजली जाणारी धान्यलक्ष्मी, व्यापाऱ्यांची वाणिज्य-लक्ष्मी आणि वीर-बहादुरांची आराध्यदेवी विजय लक्ष्मी ही सर्व या महालक्ष्मीचीच रूपे होत.

भारतात सर्वत्र कोणत्या ना कोणत्या रूपात महालक्ष्मीची आराधना केली जाते. निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या ठिकाणी महोत्सव साजरे केले जातात. महा-लक्ष्मीची मोठ्या भक्तिभावाने पूजा केली जाते.

कमलपुष्प हे लक्ष्मीचे फार आवडते फूल मानले जाते.

# चांदोबाच्या बातम्या

## मुलींची प्रतिभा



नुकत्याच झालेल्या दहावीच्या परिक्षेत दोन मुलींनी सर्वांचे लक्ष आपल्याकडे आकर्षित करून घेतले. त्यांच्यात असे कोणते वैशिष्टय आहे बरे? एक आहे मौसमी चटर्जी नामक बंगाली मुलगी! हिचे वय केवळ आठ वर्षे आणि सात महिने इतके असून तिने दहावीचे पेपर्स लिहून आपल्या अद्भुत स्मरणशक्तीची चुणूक दाखवली आहे. दुसरी आहे महाराष्ट्रातील सुनीता कजरू सावन्त. या मुलीला दोन्ही हात नसल्यामुळे तिने आपले पेपर्स पायाच्या बोटांनी लिहिले. पेपर लिहिण्यासाठी तिला इतरांपेक्षा अर्धा तास अधिक वेळाची सवलत दिली गेली होती. तरीही तिने इतरांप्रमाणेच तीन तासात प्रत्येक पेपर लिहून पूर्ण केला.

## अविश्वास



ॲंटनी ॲंडरसन नावाचा एक आठ वर्षांचा मुलगा अमेरिकेतील बारक्राफ्ट एलिमेंटरी स्कूलमध्ये शिकत आहे. एकदा अमेरिकेचे अध्यक्ष जॉर्ज बुश त्या शाळेला भेट द्यायला गेले होते. आपल्या शेजारी उभ्या असलेल्या जॉर्ज बुशना ॲंडरसन 'अध्यक्ष' मानायला तयार नव्हता. आपणच अध्यक्ष आहोत असा त्याला विश्वास वाटावा म्हणून त्यांनी मुलाला आपला फोटो असलेले आपले ड्रायव्हिंग लायसेन्स दाखवले, आणि शाळेच्या फाटकाबाहेर उभ्या असलेल्या आपल्या कारकडे निर्देश केला. तरीही जणू काही 'हा पुरावा पुरेसा नसल्याच्या' भावनेने ॲंडरसन अध्यक्ष बुश यांच्याकडे पहातच राहिला!

# साहित्य सोनियाचिया खाणी

१. भास्कराचार्यांनी आपण लिहिलेल्या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायाला आपल्या मुलीचे नाव दिले होते. त्या मुलीचे नाव काय? आणि त्या ग्रंथाचे नाव काय?

२. साहित्यासाठी नोबेल पुरस्कार मिळवणारा सोविएत रशियाचा पहिला लेखक कोण?

३. सर सी. व्ही. रामन यांना एक पुस्तक लिहिण्यासाठी फुलांमुळे प्रेरणा मिळाली. त्या पुस्तकाचे नाव काय?

४. 'दि लास्ट मॅन इन युरोप' नावाचे पुस्तक अगोदर आणखी एका नावाने प्रकाशित झाले होते. पहिले नाव काय होते, व त्याचा लेखक कोण?

५. मेरी एन इव्हान्स, एरिक ब्लेअर–ही दोन प्रसिद्ध लेखकांची खरी नावे आहेत. लेखक बनल्यानंतर ते कोणत्या नावांनी प्रसिद्ध झाले?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे?

१. कर्नाटकातील कूर्ग प्रान्तात जेव्हा मुलगा जन्मतो, तेव्हा त्याच्या हाती चिमुकले धनुष्य व बाण दिला जातो. आणि बंदुक डागली जाते.

२. कर्नाटकातील 'जोग' धबधबा. याचे पाणी २५३ मीटर इतक्या उंचीवरून खाली पडते.

३. काश्मिरमधील 'डाल लेक' मधे उपयोगात आणले जाणारे शिकारे.

४. पहिल्याची उंची आहे १७ मीटर व दुसऱ्याची ७१ मीटर.

### साहित्य

१. लीलावती; सिद्धान्त शिरोमणी.

२. मिखाइल शोकोलोव्ह; १९६५ मधे.

३. रंगांच्या बाबतीत माहिती देणारा ग्रंथ–'दि फिजिऑलॉजी ऑफ व्हिजन'

४. १९८४, जॉर्ज ऑर्वेल.

५. जॉर्ज इलियट, जॉर्ज ऑर्वेल.



जगातल्या पौराणिक कथा–५

## पर्सिअस व आन्द्रोमेदा

[ मागील अंकावरून पुढे ]

धाडसी पर्सियसने मेंडुसा भुताचा अन्त केला आणि तिचे शिर घेऊन परत येत असताना, समुद्रकिनाऱ्यावर एका सुन्दर तरुणीला–आन्द्रोमेदाला–गिळायला येणाऱ्या विचित्र प्राण्याला मारून टाकून तिचेही रक्षण केले. त्यामुळे आन्द्रोमेदाच्या आई-वडिलांनी पर्सियसशी तिचा विवाह करून दिला.

विवाहाचा विधि पूर्ण झाल्यानन्तर आन्द्रोमेदाचा एक नातेवाईक युवराज फिनियस याने आपल्या मित्रांच्या मदतीने आन्द्रोमेदाचे अपहरण करायचा प्रयत्न केला; पण तो विफल झाला. कारण त्यावेळी पर्सियसने मेंडुसाचे मस्तक त्यांच्यापुढे धरले, आणि त्यामुळे त्या सर्वांचे दगडात रूपान्तर झाले.





नन्तर पर्सियस आपली नववधू आन्द्रोमेदा हिला बरोबर घेऊन आपल्या आईला भेटायला सेरिफोज बेटावर पोचला. नेमक्या त्याच वेळी तेथील राजाच्या अत्याचारापासून आपली सुटका करून घेण्यासाठी त्याची आई धावत सुटलेली होती. वेळेवर पोचलेल्या पर्सियसने तिच्या पाठलागावर असणाऱ्या राजासमोर मेंडुसाचे मस्तक धरून त्याचेही एका शिळेत रूपान्तर घडवून आणले.



यानन्तर मेडुसाच्या मस्तकाचा आणखी काही उपयोग करायचा विचार नसल्यामुळे पर्सियसने मन्दिरात जाऊन ते देवी मिनर्व्हाला अर्पण करून टाकले. इथून पुढे आपल्या स्वतःच्या शक्तीवरच विसंबायचे त्याने ठरवले. मन्दिरात आणखी काही दिवस ध्यान-धारणेत घालवून नन्तर आपले राज्य अर्गोस येथे निघून जाण्याचा त्याने निश्चय केला.

आपली आई आणि पत्नी आन्द्रोमेदा यांना बरोबर घेऊन पर्सियस अर्गोसकडे निघाला. अगदी शैशवावस्थेत असता-नाच त्याला आपल्या आजोबांनी त्याच्या आईसह समुद्रात सोडून दिले होते. पण आता तो एका सुन्दरशा नावेत बसून आपल्या जन्मस्थानाकडे परत निघाला होता. तोपर्यंत त्याची कीर्ति चारही दिशांना पसरलेली होती.





त्याची नाव लारिसा तटावर पोचली. तेथील राजा त्याचे सादर स्वागत करण्यासाठी पुढे आला. राजाने आपल्या वडिलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ एक उत्सव साजरा करायचे ठरवले होते. राजाबद्दल असणारा आपला आदर प्रदर्शित करण्यासाठी उत्सवात होणाऱ्या खेळांच्या स्पर्धेत भाग घ्यायचे पर्सियसने ठरवले.

उत्सवातील एका स्पर्धेत पर्सियसने एक खूप वजनदार व घट्ट असलेले दगडाचे चाक गरागरा फिरवून खूप दूर फेकून दिले. पण ते खुणेपेक्षा खूपच पुढे जाऊन तेथून जाणाऱ्या एका माणसाच्या अंगावर पडले.





मरून गेला तो माणूस दुसरातिसरा कोणी नसून पर्सियसचा आजोबा – अर्गोसचा राजा खुद्द अक्रियसच होता! आपला नातू परत येत असल्याची खबर ऐकून, त्याच्यापासून आपला जीव वाचवण्यासाठी अक्रियस लारिसा बेटावर निघून आला होता. पण विधिलिखितापासून तो वाचू शकला नाही. पर्सियसने फेकलेल्या चाकामुळेच त्याचा मृत्यु घडून आला व ज्योतिषांची भविष्यवाणी अखेर खरी झाली.

यानन्तर पर्सियस अर्गोसला गेला. पण आपल्याच हातून आपल्या आजोबांचा मृत्यु झाल्याच्या दुःखामुळे त्याने सिंहासनावर बसायला नकार दिला.





पर्सियसने नन्तर मॅसेनल नावाच्या नवीन शहराची स्थापना केली आणि तेथे राहून त्याने राज्य संभाळले. आन्द्रोमेदासह त्याने चिरकाल 'प्रजारंजक' म्हणून कीर्ति मिळवली.

पर्सियसच्या मृत्युनन्तर त्याची प्रजा त्याला 'दैवी अंशापासून उत्पन्न झालेला माणूस' समजून त्याची पूजा करु लागली. त्याची एक मूर्तीही बनवून त्यांनी तिची स्थापना केली. ती मूर्ति त्या प्रान्ताचे एक आकर्षण बनून राहिली.





पर्सियसच्या पुत्रांपैकी एकाचे नाव पेर्सस असे होते. त्याने फारस देशाची स्थापना केली. फारसी लोकांना त्यामुळे पेर्ससची संतति मानले जाऊ लागले. अनेक कथा-काव्य व नाटकां-द्वारा पेर्सियसची कथा कित्येक लोकांना प्रेरक ठरली. श्री अरविन्द यांनीही पर्सियस नाटक रचले आहे.



# मंत्री मिलन

**गोष्ट** जुन्या काळातील आहे. कोसल देशावर राजा चित्रध्वज राज्य करीत असे. त्याचा सुबुद्धि नावाचा एक मंत्री होता. आपला मंत्री दुराचारी आहे हे जाणायला राजाला फार वेळ लागला नाही. तरी पण हे आपल्याला जसं काही माहीत नाही असं भासवीत राजा एकाद्या सुयोग्य मंत्र्याच्या शोधात राहिला. शेवटी एका गावी एक गुरुकुल चालवणारा युवक मिलन राजाला मंत्री-पदासाठी योग्य वाटला. राजाने आपल्या मनातील गोष्ट एका पत्रा द्वारे मिलनला कळवली.

पत्र वाचून मिलनला मोठं आश्चर्य वाटलं. तो लगेच राजधानीच्या वाटेला लागला. चित्रध्वज राजाला भेटून त्याने सांगितले–"राजन्, गुरुकुल चालवण्याचे काम मी मोठ्या संतोषाने करीत आहे. राजनीतीकडे माझा ओढा नाही, नि मला ती आवडत ही नाही. आपल्याला हे पत्र लिहून कळवणं मला योग्य वाटलं नाही, म्हणून मी स्वतःच आपल्याकडे आलो. माझी मंत्री बनण्याची इच्छा नाही. महाराज, आपण मला क्षमा करावी."

यावर राजा चित्रध्वज म्हणाला– "तुम्हाला अधिकार-पदाची लालसा नाही. तुमच्या सारखा माणूसच मंत्री बनायला सर्वस्वी योग्य. माझा मंत्री सुबुद्धि अधिकाराच्या मोहानेच दुर्वर्तनी नि दुराचारी बनला आहे. पैशांच्या लालसेने तो जन-कल्याण विसरला. म्हणूनच मी त्याला काढून टाकू इच्छितो. प्रजेच्या कल्याणासाठी आपण मंत्री-पद स्वीकारावं असं मला वाटतं. नालायक व दुर्वर्तनी लोक शोधून काढून त्यांना नोकरी वरून काढून टाकणं योग्य. अधिकार-पदावर सुयोग्य व्यक्तींची नेमणूक करणं इष्ट. आपले गुरुकुल



व्यवस्थित चालू राहील यासाठी मी योग्य ती व्यवस्था करीन."

मिलन राजाची आज्ञा नाकारू शकला नाही, त्याने मंत्रीपद स्वीकारलं!

मिलनला मंत्री बनवून राजाने आपल्याला पदच्युत केलं याचं सुबुद्धीला मोठं आश्चर्य वाटलं. हे त्याला अमळ अगोदर कळतं, तर त्याने आपल्या चुका सुधारण्याचा प्रयत्न केला असता. पहिल्याच दिवशी मिलनने सुबुद्धीच्या अनेक चुका शोधून काढल्या नि त्याला त्यांबाबत स्पष्टीकरण विचारलं.

काय उत्तर द्यावं हे सुबुद्धीला सुचेना. तो म्हणाला—"चुका झाल्या हे तर खरं! पण माझा काही अपराध नाही. आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांवर मी विश्वास ठेवला. काही निवडक गोष्टी सोडल्या, तर माझ्या हाताखाली काम करणारे अधिकारीच सर्व कारभार चालवीत आहेत." असे सांगून सर्व चुका त्याने दुसऱ्यांच्या माथी मारल्या.

सुबुद्धीच्या हाताखाली जवळ जवळ शंभर अधिकारी होते. सर्वांना भेटून मिलनने विचारले. सर्व जण म्हणाले—"आमच्याकडे जी कामं सोपवली ती आम्ही सर्वांनी केली. काही चूक असली तर मंत्रीमहाशयांची!"

"याचा अर्थ असा की मन्त्र्याने अनेक अपराध केले आहेत. हा मोठा स्वार्थी नि दुष्ट दिसतो आहे. मन्त्र्याचे अपराध सिद्ध करण्यासाठी तुमच्या जवळ काही पुरावे आहेत?" मिलनने अधिकाऱ्यांना विचारले.

"एकच नाही, अनेक! मंत्री सुबुद्धीचे अपराध उघडकीस आणण्यासाठी आमच्या पैकी प्रत्येका जवळ शेकडो पुरावे आहेत." एका अधिकाऱ्याने माहिती पुरवली.

"ठीक आहे. उद्या आपण सर्व जण असेच बसू. मग मी सुबुद्धीसाठी मला पाहिजे ते सर्व जाणून घेईन." असं सांगून मिलनने सर्वांना रवाना केले.

नंतर मिलन सुबुद्धीला घेऊन राजाकडे आला नि राजाला निवेदन केलं—





"महाराज, सुबुद्धीने आपल्या हाताखाली असलेल्या अधिकाऱ्यांवर सत्ता गाजवली, पण त्यांचं प्रेम संपादन केलं नाही. आणि म्हणून तो खुर्चीवरून खाली उतरताच खालचे सर्व अधिकारी त्याच्या विरुद्ध बोलू लागले."

राजाने विचारले—"मग याला आता कोणती शिक्षा करायची बरं?"

मिलन उत्तरला—"प्रभु, ते आपण आता उद्या पाहू."

शंभर सरकारी अधिकाऱ्यांशी मिलन काय प्रश्नोत्तरे करतो हे राजाला पहायचं होतं. म्हणून दुसऱ्या दिवशी राजा ही मिलन बरोबर बसला. राजा नि मिलन राजवाड्यातील एका दालनात बसले आणि त्यांनी एकेका अधिकाऱ्याला बोलवलं.

पहिला अधिकारी आला. मिलन त्याला म्हणाला—"माजी मंत्री सुबुद्धि बद्दल तुला जे काही सांगायचंय ते सर्व सांग."

लगेच तो अधिकारी सुबुद्धीच्या कुकर्मांचा पाढा वाचू लागला. त्याला मधेच थांबवून मिलन म्हणाला—"हे सगळं ऐकायची माझी मुळीच इच्छा नाही. सुबुद्धि बद्दल काही चांगलं सांगण्यासारखं तुझ्याजवळ असलं तर ते मला पाहिजे. नाही तर तू जाऊ शकतोस."

तो अधिकारी काही ही सांगू शकला नाही. तेथून परत फिरला. यानंतर असेच आणखी काही अधिकारी आले नि परत गेले. त्यांच्यापैकी दहा अधिकाऱ्यांनी सांगितलं की सुबुद्धि मध्ये काही चांगले गुण ही आहेत. प्रमुख गुण म्हणजे आपल्याला पाहिजे असतील ती कामे सुबुद्धि आपल्या अधिकाऱ्यांना समजाऊन सांगून अथवा धाकदपटशा दाखवून करून घेतो.

सर्व जण गेल्यावर मिलन राजाला म्हणाला—"महाराज, ज्या दहा अधिकाऱ्यांनी सुबुद्धीत काही गुण पाहिले त्यांना फक्त कामावर ठेवावे, बाकीच्या नव्वदांना काढून टाकावे. इतकंच नव्हे, तर माजी मंत्री सुबुद्धि याला तुरुंगातील कैद्यांवर देखरेख करण्याचं काम द्यावं. त्या अधिकार-पदावर तो चांगले काम करील."

राजाने आश्चर्याने विचारले–"हा निर्णय कसा काय घेतला आपण? अपराधी सुबुद्धीला एक अधिकारी बनवण्याची आपण शिफारस करीत आहात! आणि त्याच्या आज्ञांचं पालन करणारांना काढून टाकायचं म्हणता? हा कुठला तुमचा न्याय?"

यावर हसत मिलनने आपल्या निर्णयाचे समर्थन केले–"प्रभु, सुबुद्धीने अपराध केला असणे शक्य आहे. पण त्याच्या हाताखाली काम करणाऱ्या कोणी ही त्याबाबत आपणाकडे तक्रार केलेली नाही. याचा अर्थ असा की त्याने सर्वांना धाकात ठेवले होते. यालाही माणसाच्या ठिकाणी काही योग्यता असावी लागते. या योग्यतेचा आपण उपयोग करून घेतला पाहिजे. आपल्या हाताखाली काम करणाऱ्या माणसांना समजाऊन सांगून वा धाकदपटशा दाखवून काम करून घेण्याची योग्यता त्याच्यात आहे हे आपण कबूल करावे. तुरुंगातील अधिकारी म्हणून तो काय करीत आहे, इकडे मी लक्ष ठेवीन. त्याच्याकडून अनेक कैद्यांत सुधारणा घडवून आणता येईल. या नोकरीमुळे सुबुद्धीला आपला बराच वेळ कैद्यांबरोबर काढावा लागेल. हीच त्याला पुरेशी शिक्षा आहे. आता या नव्वद अधिकाऱ्यांची गोष्ट पहा. यांना आपल्या पुढील माणसात फक्त दोष तेवढे दिसतात. दुसऱ्यातील गुण पाहण्याची त्यांना सवयच नाही. अशा लोकांना अधिकारी बनण्याचा हक्कच नाही. म्हणून माझ्या योजनेनुसार प्रजेला जरा ही उपयोगी न पडणाऱ्या या नव्वद अधिकाऱ्यांना नोकरी वरून काढून टाकणेच योग्य आहे."

प्रशंसेच्या सुरात राजा चित्रध्वज म्हणाला–"मला वाटलं होतं त्याहून अधिक योग्यता आहे आपली! आपण खरोखरीच आदर्श मंत्री व्हाल, यात मला संशय नाही."

यानंतर मंत्री मिलन याच्या योग्य सल्ल्यानुसार राजा चित्रध्वज अनेक वर्षे सुखा-समाधानाने राज्य करीत राहिला.






हनुमानाने लंका नगरीत प्रवेश केला तेव्हा त्याला विविध प्रकारचे राक्षस दिसू लागले. याग-दीक्षेत राहणारे, जटा धारण करणारे, डोक्यावरील सर्व केस सफाचट केलेले, बैलाचे कातडे पांघरलेले, अभिचार होम-हवन करून शत्रूं वर आक्रमण करणारे, निरनिराळी शस्त्रे धारण करून इतस्ततः संचार करणारे, विकृत आकारवाले, काळे आणि ठेंगू असे, सुपासारखे आपले मोठे कान हलवणारे, हातात ध्वजा घेऊन भटकणारे असे अनेक प्रकारचे राक्षस तेथे हनुमानाने पाहिले.

रात्र संपत चालली होती. आकाशात चन्द्र चमकत होता. हनुमान थेट रावणाच्या प्रासादात जाऊन पोचला. तेथे सुंदर स्त्रिया मधुर संगीत अलापीत होत्या. काही जणी आपल्या शरीरावर चन्दनाचा लेप लावीत होत्या. काही आडव्या होऊन आराम करीत होत्या.

त्या स्त्रियात मनुष्यांसारखी दिसणारी सीता कोठे तरी दिसेल अशा आशेने हनुमान त्या सर्वांना लक्षपूर्वक पहात राहिला. पण त्याला तेथे अशी स्त्री कोठे ही दिसली नाही. हनुमान मनातल्या मनात निराश झाला. कामरूपी हनुमानाने लंकेत मन मानले तसे भ्रमण केले नि पुन्हा रावणाच्या प्रासादात परत आला.

रावणाचा महाल हनुमानाला मोठा अद्भुत दिसला. चांदीच्या बनवलेल्या या भवनात सर्वत्र सजावट सोन्याची होती.

१२. हनुमानाला सीता दिसली!



दारांवर रंगीबेरंगी तोरणे दिसत होती. उत्तम जातीचे हत्ती आणि घोडे मधून मधून दिसत होते महापराक्रमी राक्षस रावणाच्या महाला र पहारा देत होते. राक्षस स्त्रिया व पुरुष आपापल्या कामांसाठी इकडे तिकडे हिंडत होते. तेथील सर्व हालचाली मोठ्या अजब दिसत होत्या. सर्वत्र आबादी-आबाद होती. तो महाल इन्द्र-भवनासारखा दिसत होता आणि लंका नगरीच्या एकाद्या आभूषणासारखा दिसत होता.

हनुमान या महालात फिरून बारकाईने सर्व काही पहात होता. रावणाच्या महालातील पलंग, मेज, बैठका, भांडी, फुलदाण्या वगैरे सर्व सोन्याचे बनवल्यासारखे दिसत होते. पंच-रत्न-जडित खिडक्यातुन पक्षांचे पिंजरे टांगलेले होते. हनुमानाला तेथे पुष्पक विमान ही दिसले. ते प्रथम कुबेराचें होते. त्यावर पृथ्वी, फुलझाडे, कमळांनी भरलेली सरोवरे आदि दृष्ये कोरलेली होती तो त्यात रंग भरलेले होते. ते विमान फारच विशाल होते. ज्यांची बसण्याची इच्छा असेल त्या सर्वांना या विमानात जागा मिळे असे म्हणतात. एकाद्या भव्य घरापेक्षा ही मोठ्या या विमानाकडे पाहून हनुमानाला आश्चर्य वाटले. तो तसाच रावणाच्या महालात इकडे तिकडे भटकत राहिला. अशा रीतीने बराच वेळ हिंडून महाल पाहिल्यावर ही संपूर्ण भवन पाहिल्याचे समाधान हनुमानाला वाटले नाही. अशा रीतीने भरपूर भटकून ही हनुमानाला सीता मात्र कोठे ही दिसली नाही.

रावणाच्या विशाल प्रासादातील कोपरा अन् कोपरा हनुमानाने पाहिला. रावणाच्या बायका ज्या अंत:पुरात रहात असत तेथे ही हनुमान पोचला. रावणाकडील स्त्रियात काही राक्षसिणी होत्या, काही राजकुमारींना रावणाने आपल्या पराक्रमाने जिंकलेले होते, आणि काही अशा होत्या, की त्यांनीच रावणावर प्रेम केलं होतं, नि रावणाची पत्नी होऊन त्याच्याकडे आल्य होत्या. सर्वत्र भरपूर प्रकाश देणारे दीप प्रज्वलित होते.



रावणाच्या अंत:पुरातील अनेक स्त्रिया गाढ झोपी गेल्या होत्या. त्या रंगी-बेरंगी रेशमी वस्त्रे नेसून, विविध रत्नजटित अलंकार परिधान करून वेलबुट्टी काढलेल्या गालीच्यांवर पहुडल्या होत्या. त्यांच्या गळयांत सुगंधित पुष्पमाला शोभायमान होत्या. जवळ जवळ अर्धी रात्र सरली होती, त्यामुळे काही जणी तिथेच बसल्या बसल्या निद्रा-सुख अनुभवीत होत्या. हनुमानाने एक अद्भुत सुंदर दृश्य त्या ठिकाणी पाहिले.

हनुमानाने लक्ष देऊन सर्वांच्या चेहऱ्यांकडे पाहिले. एका विशाल शय्येवर झोपलेल्या रावणाला ही त्याने पाहिले. रावणाच्या हातांची बोटे पाच महासर्पांसारखी दिसत होती. त्याने आपल्या शरीरावर रक्तचंदन लावलेले होते. विशालकाय रावण घोरणाऱ्या एकाद्या सोन्याच्या पहाडासारखा दिसत होता. त्याने शरीरभर विविध अलंकार धारण केलेले होते.

रावणाप्रमाणेंच त्याची पत्नी मंदोदरी पण एका शय्येवर झोपलेली होती. तिचं सौंदर्य, अवयवांची ठेवण नि कोमलता पाहून हनुमानाला आनंद झाला—कदाचित् हीच तर सीता नसेल ना!

पण दुसऱ्याच क्षणी त्याचा संतोष नाहीसा झाला. रामाचा विरह झालेली सीता असा



साज-शृंगार कसा करील? आणि निद्रा-सुख ही तिच्या नशिबात कोठले? सुखाने खाऊन-पिऊन ती अशी सुंदर व स्वस्थ कशी दिसू शकेल? एकाद्या पर-पुरुषाची पत्नी बनून ती कशी राहू शकेल! नाही, नाही. ही सीता असणे शक्यच नाही. असा ठाम निश्चय करून हनुमान तेथून पुढे निघाला.

सीतेचा शोध घेण्यासाठी हनुमान सर्व वृक्ष नि लताकुंज पहात राहिला. सर्व चित्रशाळा त्याने धुंडल्या. त्याच्या मनात एक शंका निर्माण झाली. सीतेला कदाचित् मृत्यु तर आला नसेल? आपल्याला वश न झाल्यामुळे या दुष्ट रावणाने सीतेचा अंत तर केला नसेल? अथवा



या भयंकर राक्षसीना पाहून सीता घाबरून तर मृत्युमुखी पडली नसेल ना? सुग्रीवाने दिलेली मुदत संपून आता बरेच दिवस गेले होते. सीतेला पाहिल्यावाचून परत जाणं कसं शक्य आहे! जर असाच परत गेलो तर सर्व जण विचारतील—लंकेत जाऊन काय मिळवलंस तू? कोणत्या कामगिरीवर गेला होतास? लोकांनी असे प्रश्न विचारले तर काय उत्तर देऊ त्यांना?

काही असलं, तरी नुसता विचार करून काय मिळणार? म्हणून हनुमान दूर-दूरच्या ठिकाणी सीतेचा शोध घेण्यासाठी निघाला. तो पाताळात गेला, जंगलातून हिंडला, विहिरीतून उतरून पाहिलं. अनेक राक्षस स्त्रिया त्याला दिसल्या, पण सीता त्याला कोठे ही दिसली नाहीं. सुंदर स्त्री पाहिली की त्याच्या मनात आशा निर्माण होई, पण जेव्हा त्याला समजे की ही सीता नाही, तेव्हा तो निराश होऊन जाई. रावण जेव्हा सीतेला पळवून घेऊन जात होता, तेव्हा झटापटीत ती खाली तर पडली नाही? समुद्रात पडून तिने जलसमाधि तर घेतली नसेल? अथवा रामाच्या विरहाने व्याकुळ होऊन तिने प्राण तर सोडला नसेल?

हनुमानाने मनातल्या मनात निश्चय केला की जर सीता सापडली नाही तर आपण इथेच समुद्र-किनारी चिता रचून तीत प्राणार्पण करायचं! त्याच्या मनात आणखी ही असा विचार आला की आपण स्वत: जाऊन रावणाचा वध करावा, अथवा यज्ञ-पशु प्रमाणें रावणाला रामापर्यंत घेऊन जावे. हे ही एक सत्कार्यच होईल!

अशा रीतीने विचार करीत असलेल्या हनुमानाला दूर अंतरावर उंच उंच वृक्ष असलेले एक सुरेख उद्यान दिसले. त्याचं नाव होतं अशोकवन. हनुमान त्या उद्यानाकडे पहात राहिला. अजून पर्यंत या वनात त्याने सीतेचा शोध घेतलेला नव्हता. कारण हे वन आताच तर त्याला दिसलं होतं. इथं सीता सापडली तर? हनुमानाच्या मनात आशा निर्माण झाली आणि या





उद्यानात सीतेचा शोध करण्याचा त्याने निश्चय केला.

उत्साहाने उड्या मारीत मारीत हनुमान अशोक-वनात पोंचला. त्याने लघु रूप धारण केले आणि उद्यानातील वृक्ष-राजीत प्रवेश केला. नुकताच वसंत ऋतु सुरू झालेला होता. तेथील साल, अशोक, चंपक, उद्दाल, नाग, रसाल, कपिमुख आदि वृक्षांना लता-वेलींनी वेढलेले होते.

त्या उद्यानाच्या परिसरात हनुमान बाणासारखा या झाडावरून त्या झाडावर, वरून खाली असा जाऊ लागला. झाडांवर झोपलेले पक्षी घाबरून जागे झाले व आरडा-ओरड करू लागले. झाडांवरील फुलांनी त्याच्या शरीरावर वृष्टि केली. त्याला त्या उद्यानातील सरोवरे, टेकड्या व सोन्या-चांदीचे नकली वृक्ष ही दिसले.

अशोक-वनात एक क्रीडा-पर्वत ही होता. त्याच्यावर उंच उंच शिखरे, अनेक शिला-गृहे व निरनिराळ्या प्रकारचे वृक्ष होते. या पर्वतातून एक नदी खाली वहात येत होती. तिथे एक विशाल विहीर होती. या विहिरीच्या चारी बाजूंना उंच उंच महाल होते. तेथे काही सोन्याच्या टेकड्या ही होत्या.

हिरव्यागार पानांनी भरगच्च अशा एका झाडावर बसून हनुमान चारी बाजूंना पाहू लागला. काही अंतरावर त्याला एक शुभ्र चैत्यप्रासाद दिसला. त्या अद्भुत प्रासादाला शंभर खांब होते. या प्रासादात हनुमानाला सीता बसलेली दिसली.

विरहतापामुळे ती अतिशय दुबळी व दुःखी झालेली होती. तिची पिवळी साडी मळलेली होती. दुःखावेगाने ती अश्रु ढाळीत होती. तिच्या चारी बाजूने राक्षसी स्त्रिया पहारा देत होत्या. रावण जेव्हा सीतेला घेऊन चालला होता, तेव्हा हनुमानाने तिला पाहिलं होतं. सीतेची थोडी रूप-रेखा त्याला आठवत होती, पण आता तिच्यात बराच बदल झालेला होता. सीतेने ऋष्यमूक पर्वतावर आपले काही दागिने टाकले होते. आणि जे दागिने तिने टाकलेले नव्हते, म्हणजे जे तिच्या अंगावर होते, त्यांचे वर्णन रामाने हनुमानाजवळ केलेले होते. ते दागिने आता हनुमानाने ओळखले. जे दागिने तिने टाकले होते, त्यांच्या जागी नवे दागिने नसल्याचे हनुमानाने पाहिले. यावरून त्याला समजले की ही निश्चित सीताच असली पाहिजे. त्याला अपार आनंद झाला. आस-पासच्या राक्षसींच्या दृष्टीस आपण पडू नये म्हणून हनुमान झाडाच्या गर्द पानात लपून राहिला. मग त्याने एकदा या सर्व राक्षस स्त्रियांकडे पाहिले.

बरीच रात्र झालेली होती. राक्षसांचं वेदाध्ययन सुरू झालं होतं, हनुमान ते ऐकू लागला. त्याच वेळी मंगल वाद्ये वाजू लागली. रावण जागा झाला. त्याला सीतेचे स्मरण झाले. मग त्याने झटपट शृंगार केला आणि तो अशोक-वनाकडे जायला निघाला. त्याच्या मागे शंभर देवता स्त्रिया आणि गंधर्व स्त्रिया पण निघाल्या. काही स्त्रियांनी सुवर्ण-मशाली आपल्या हाती घेतल्या होत्या. काही स्त्रिया चवऱ्या ढाळीत होत्या. काही स्त्रिया हातात तलवारी पकडून चालल्या होत्या, तर काहींच्या हाती पाण्याने भरलेले स्वर्णकलश होते. एका स्त्रीने रावणाच्या डोक्यावर छत्र धरले होते.

सर्व स्त्रियांच्या पायातील नूपुरांची किणकिण ऐकून हनुमान तिकडे खूपच



आकर्षित झाला. मशालींच्या प्रकाशात रावणाला हनुमानाने पाहिले होते. आता रावण येऊन काय करील हे पाहण्याची हनुमानाची फार इच्छा होती. म्हणून एका खालच्या फांदीवर उतरून, पानांच्या आड लपून हनुमान खालील दृश्य लक्षपूर्वक पाहू लागला.

रावण थेट सीतेजवळ येऊन थांबला. त्याला दुरून येताना पाहूनच सीतेचा थरकाप झाला. ती गुडघ्यांवर बसून, हातांनी छाती झाकून ढसढसा रडू लागली. तिने चारी बाजूंना मोठ्या आशेने पाहिले की आपल्या रक्षणासाठी कोणी येईल. पण सर्व काही व्यर्थ!

मूर्तिमान शोकदेवता सीतेला रावण म्हणाला—

"सीते, मला पाहून तू अशी घाबरतेस का? तुझ्या सौंदर्यावर मोहित होऊन मी तुझ्याकडे आलो, माझा स्वीकार का करीत नाहीस बरे तू? इथे तुला कुणाचेच भय बाळगण्याचे कारण नाही! जो पर्यंत तू माझ्यावर प्रेम करीत नाहीस, तो पर्यंत मी तुला स्पर्श करणार नाही. तू कशासाठी दुःख करीत आहेस? मळकट कपडे धारण करून, अशा रीतीने उपास करणं सोडून दे. साज-शृंगार, उत्तम कपडे परिधान कर. अलंकार आणि पुष्पमाला धारण कर. माझा स्वीकार कर. उत्तम प्रकारचं मद्य प्राशन कर. मऊ गुलगुलीत शय्येवर आराम कर. नाच गाण्यात रंगून जा. सुख-समाधानाने आपले दिवस घालव. आपला यौवन-काळ व्यर्थ घालवू नकोस. तुझ्यासारखी सुंदरी या जगात अन्य कोणी नाही. मी कोणी पर-पुरुष आहे असं का समजतेस? मी तुला पट्टराणी बनवीन. मी तुझा गुलाम बनून राहीन. तुझी जी काही इच्छा असेल, त्याबाबत मला आता कळव. जंगलात भटकणारा तो राम काय कामाचा आहे? त्याला विसरून जा. तो तुझी निंदा करील असं मुळीच मनात आणू नकोस. तुला पाहण्यासाठी तो इथं येऊच शकणार नाही. समजलं?"





# किन्नर राणी

गोष्ट खूप जुनी आहे. त्या काळात काश्मीरमधे एक गरीब फासेपारधी रहात असे. तो रोज सकाळी जंगलात जाऊन सुन्दर-सुन्दर पक्षी पकडून पिंजऱ्यात बन्द करी आणि संध्याकाळी ते शहरात आणून विकी. अशा प्रकारे तो आपला मुलगा सुधाम याचे पालनपोषण करीत असे. काही दिवसांनी तो फासेपारधी मरून गेला, अन् बिचारा सुधाम पोरका झाला! लहानपणीच आपले पोट भरण्यासाठी त्याला आपल्या पित्याचा व्यवसाय पत्करून फासेपारधी बनावे लागले.

पित्याच्या मृत्यूच्या दुसऱ्याच दिवशी जंगलात जाऊन सुधामने आपले जाळे एका झाडाच्या फान्दीला लटकावले आणि तो वाट पाहू लागला. थोड्यात वेळात जाळ्यात पक्षी अडकला. सुधाम लगेच झाडावर चढून पाहू लागला, तर त्याला दिसले, की एक कावळा अडकला आहे! 'हा कावळा कोण खरीदणार, याचं काय बरं करावं?'—असा विचार सुधाम करत होता, इतक्यात तो कावळा मानवी आवाजात बोलू लागला—"महाराज, मला सोडून द्या ना! मी ही बदल्यात तुमच्यावर उपकारच करीन! उद्या तुमच्या पिंजऱ्यात एक खूपच सुन्दर पक्षी अडकेल अशी व्यवस्था करीन मी! तो तुम्ही आपल्या राजाकडे घेऊन गेलात, तर तुम्हाला अपार धन मिळेल!"

कावळ्याच्या या बोलण्यावर विश्वास ठेवून सुधामने त्याला सोडून दिले आणि खरोखरच कावळ्याच्या बोलण्या प्रमाणे दुसऱ्या दिवशी जाळ्यात एक अत्यन्त सुन्दर असा पक्षी अडकला. तो घेऊन सुधाम राजाकडे गेला. असा दुर्मिळ पक्षी मिळाल्यामुळे राजाने खूष होऊन सुधामला खूपसे सोने

काश्मीरमधील लोककथा



दिले. पण एवढे सोने मिळूनही सुधामची कष्ट-दशा संपली नाही. कारण, काश्मीरच्या राजाजवळ जो विदूषक होता, त्याला सुधामला इतके सोने मिळालेले पाहून असूया वाटली. तो राजाला म्हणाला—

"महाराज, याच्यासाठी तर आपल्याला एक हस्तिदंती घरच बनवायला हवं!"

"अरे, पण इतकं हस्तिदन्त कुठून मिळवायचं?" राजाने विचारले.

"का? या सुधामला हस्तिदन्तही मिळवणं काय अवघड असेल का?" विदूषकाने राजाला फुसलावून दिले.

आता राजाने सुधामला बोलावून म्हटले—

"तू जो दुर्मिळ पक्षी आणला आहेस, त्याच्यासाठी आम्हाला एक हस्तिदंताचं घर बनवायचं आहे. तेव्हा हस्तिदंत आणायचं काम तुझं. मी तुला चाळीस दिवसांची मुदत देत आहे, त्यापूर्वी ते मिळालं नाही, तर तुझी धडगत नाही."

राजाचे हे कठोर वचन ऐकून दुःखी झालेला सुधाम घरी परतला. इतक्यात तो कावळा तेथे आला आणि सुधामला म्हणाला—

"तुम्ही इतके उदास का मालक?"

सुधामने त्याला आपणावर आलेले संकट सांगितले. यावर कावळा म्हणाला—

"इतक्याशा गोष्टीसाठी हैराण झालात आपण? राजाकडे चाळीस पिंपं दारूची मागणी करा आपण. इथून शंभर योजनांच्या अंतरावर एक सरोवर आहे. तिथे पाणी पिण्यासाठी रोज हत्तींच्या झुंडीच्या झुंडी येत असतात. त्या पाण्यात ती सारी दारू ओतून द्या, की झालेच आपले काम!"

सुधामने तावडतोब राजाकडे जाऊन, म्हटले—"महाराज, आपण माझ्याबरोबर चाळीस पिंपं दारू लादून गाड्या माझ्या-बरोबर दिल्यात, तर आपल्याला आवश्यक तेवढं हस्तिदन्त मी आणून देऊ शकेन."

राजाने लगेच तशी व्यवस्था करून दिली. कावळयाच्या सांगण्या प्रमाणे सुधामने शंभर योजनांवरील त्या सरोवराच्या पाण्यात ती दारू ओतून दिली.





रात्री सरोवरावर हत्तींचा एक मोठासा कळप आला. पाण्यात मिसळलेली दारू पोटात गेल्याने ते सारे हत्ती बेहोश होऊन खाली पडले. गाडीवानांच्या मदतीने त्यांचे दात कापून घेऊन सुधामने ते गाड्यांवर लादले आणि तो राजाकडे गेला.

इतके सारे हस्तिदन्त पाहून राजा फारच खूष झाला. सुधामला त्याने चांगले बक्षिस दिले. लवकरच सुंदरसे दन्तगृह तयार झाले.

आता विदूषकाच्या मनातली असूयेची आग आणखीनच भडकली. तो राजाकडे जाऊन म्हणाला—"महाराज, आपला पक्षी फारसा मनापासून गात नाही!"

"ओहो! मग त्यासाठी आता काय करायला हवं आपण?" राजाने विचारले.

"हं! त्यासाठी या पक्ष्याच्या मालकाला शोधून आणायला पाहिजे. मालकाला पाहून हा आनन्दाने गाऊ लागेल!"

"पण मालकाचा पत्ता कसा लागेल?"

"का बरं? सुधामला यात काय अवघड आहे?" विदूषकाने पुन्हा संधी साधत विचारले.

मग काय! राजाने पुन्हा सुधामला वेठीला धरले. तो सुधामला म्हणाला—"हे बघ, या पक्ष्याच्या मालकाला शोधून काढून चाळीस दिवसांच्या आत माझ्यासमोर हजर कर; नाहीतर तुझं मस्तक धडावेगळं झालंच असं समज!" राजाची ही आज्ञा ऐकून सुधाम दुःखी झाला. उदास मुद्रा घेऊन तो घरी परतला.

पुन्हा तो पहिला कावळा सुधामपुढे हजर होऊन म्हणाला—"अरेच्चा! पुन्हा आपण उदास? आता काय झालं नवीन?"

सुधामने आपली नवी कामगिरी त्याला सांगितली. ते ऐकून कावळा म्हणाला—

"इतकंच ना? राजाला सांगून एका नौकेची व्यवस्था करवून घ्या. नौकेवर राजेशाही सर्व सुख-सुविधा आणि वैभव असलं पाहिजे अशी अट घाला. त्या नौकेत बसून आपल्या नदीतून आपण पूर्वेकडे



शंभर योजने गेलात की किन्नरांची एक वस्ती लागेल. तेथे तुमची नौका पहायला लोकांची खूप गर्दी होईल. पण फक्त किन्नर-राणी सोडून आपण कोणालाही नौकेवर येऊन देऊ नका. किन्नर राणीने नौकेवर येऊन त्यावरील सुन्दर वस्तु पहायला सुरुवात करताच नौका पुढे हाकायची आज्ञा आपल्या नावाड्यांना द्या; अन् तिच्यासह राजाकडे या. ती किन्नर राणीच त्या पक्ष्याची मालकीण आहे."

कावळ्याच्या सांगण्याचे सुधामने तन्तो-तन्त पालन केले. राजाला सांगून त्याने अजब वस्तु आणि अद्भुत तसबिरी वगैरेंनी सुसज्जित अशी एक नौका बनवून घेतली आणि तिच्यात बसून नदीतून तो पूर्वेकडे निघाला.

काही दिवसांच्या सफरीनन्तर तो किन्नर-देशाच्या किनारी पोचला. तेथे किन्नर लोकांनी नौका बघण्यासाठी मोठी गर्दी केली. पण किन्नर राणी सोडून सुधामने कोणालाही आपल्या नौकेवर चढू दिले नाही. तो म्हणाला–"प्रथम मी तुमच्या राणीला नौका दाखवणार आहे. त्यानंतरच तुम्ही बाकी सर्वजण नौका पाहू शकाल."

हे ऐकून किन्नर राणी मोठी खूष झाली आणि नौकेवर चढली. नौकेवर निर-निराळ्या खोल्यांतून सर्व अद्भुत वस्तु सजवून मांडून ठेवलेल्या होत्या, मऊ गालीचे सर्वत्र अंथरलेले होते, सुंदरसे दिवे आपला रंगीत प्रकाश पसरवत होते. ते सर्व पहाता पहाता किन्नर राणीला वेळेचे भानच राहिले नाही. पण इकडे तिने पहिल्या खोलीत प्रवेश करताच शिडे उभारून सुधामने नौका केव्हाच पुढे हाकारली होती, आणि तिने आपला परतीचा प्रवास सुरू केला होता! किन्नर राणीने नौकेवरचे प्रदर्शन पाहून पूर्ण केले तेव्हा तिचा चार योजनांचा प्रवास पूर्ण झाला होता.

किन्नर राणीला बरोबर घेऊन सुधामने राजमहालात प्रवेश करताच दन्तगृहातला तो सुन्दर पक्षी आनन्दाने चिवचिवाट करू लागला, गाऊ लागला. हे पाहून राजाही खूप आनन्दला. किन्नर राणीला पाहून तर त्याचा हा आनन्द द्विगुणित झाला! त्याने तिच्याशी विवाह करायचा प्रस्ताव केला आणि तिनेही या विवाहाला मान्यता दिली.

मोठ्या थाटामाटाने विवाहसमारंभ साजरा झाला. कित्येक मोठमोठी माणसे विवाह समयी हजर होती. विवाह समा-रंभाचा प्रबंधक सुधामच होता. विवाह पहायला आलेला सुधामचा मित्र–तो कावळा–सारा वेळ सुधामच्या खांद्यावरच मिरवत होता. त्याला पाहून किन्नर राणी रागाने म्हणाली–"अग पिशाचिणी, इथे पण आलीस होय तू? तुला कोणी इथे यायला सांगितलं?"

सुधाम किन्नर राणीला म्हणाला–"हा कावळा माझा दोस्त आहे राणीसाहेब! आपली काही आगळीक झाली असेल, तर मी त्याच्या वतीने आपली माफी मागतो! आणि त्या कावळ्यामुळेच आपण काय काय करू शकलो हे सुधामने राणीला निवेदन केले. ते ऐकून राणीचा राग शान्त झाला.

"ही माझी मैत्रीण आहे. पण फार गर्विष्ट आणि आगाऊ आहे ती! म्हणूनच मी तिला 'कावळा' करून टाकलं! पण इतकी शिक्षा करूनही, मला वाटतं, की तिचं माझ्यावर खूप प्रेम आहे! ठीक आहे, मी आता माझा शाप परत घेत आहे!" राणी म्हणाली.

त्याबरोबर सुधामच्या खांद्यावरील कावळा फडफडत उठला आणि त्याच्या बदली एक सुन्दरशी किन्नर युवती राणीच्या बाजूला उभी राहिली.

सर्व पाहून काश्मीर राजा फार आनंदला. त्याच मुहूर्तावर त्याने सुधामशी त्या किन्नर युवतीचा–राणीच्या खास सखीचा–विवाह करून दिला. दुष्टबुद्धि विदूषकाला राजाने फाशीची शिक्षा सुनावली. सुधामला राजाने आपल्या दरबारात चांगलीशी नोकरी दिली. अशा तऱ्हेने आपल्या किन्नर पत्नीसह सुधाम सुखाने कालक्रमणा करू लागला.



# हुशार वाघ

कांचनपूर गावात शिबू नावाचा एक धनगर रहात असे. तो रोज सकाळी आपल्या मालकाच्या मेंढयांचा कळप जंगलात चरायला नेत असे; अन् संध्याकाळ झाली की पुन्हा त्यांना हाकलत आणून कोंडवाड्यात बन्द करीत असे. एकदा त्याला काही पैशांची गरज होती. खूप प्रयत्न करूनही त्याला कुठूनही तेवढा बन्दोबस्त करायला जमले नाही. तेव्हा नाइलाजाने त्याने कळपातली एक मेंढी विकून आपली गरज भागवली.

रोजच्याप्रमाणे संध्याकाळी मेण्ढ्या घेऊन शिबू परतला, तेव्हा त्या मोजून मालक म्हणाला–"अरे शिबू, कळपात एक मेण्ढी कमी आहे! कुठे सोडून आलास की काय?"

तेव्हा आपला घाबरटपणा लपवत तो म्हणाला–"खरंच मालक, तुम्हाला सांगायला विसरलो बघा! एक हुशार वाघ माझी नजर चुकवून मेण्ढी उचलून घेऊन गेला."

त्याचं बोलणं खरं मानून मालक त्याला दटावत म्हणाला की–"यापुढे जरा सावध रहा." दुसऱ्या दिवशी शिबूने आणखी एक मेण्ढी विकली. अन् मालकाला पुन्हा वाघाचं कारण सांगितलं.

"असं होय? मग तर उद्या मी त्या माधव शिकाऱ्याला बरोबर घेऊन येईन. त्याचं निशाण कधी चुकत नसतं, त्या वाघाला ताबडतोब मारून टाकलं पाहिजे." मालकाने सुचवले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळपर्यंत कळपाबरोबर राहून वाट पाहूनही तो वाघ काही आलाच नाही. मालकाने शिबूला विचारलं–"आज कसा नाही आला वाघ?"

यावर आपली हुशारी दाखवत शिबू म्हणाला–"मी म्हटलं नव्हतं वाघ हुशार आहे म्हणून? आज माधव शिकारी कळपाबरोबर असल्याचा पत्ता लागला असणार त्याला!"

हे ऐकून हसत हसत मालक म्हणाला–"मग उद्यापासून तू नको येऊस कामाला!"

आता मात्र शिबूने मालकाचे पाय धरून माफी मागितली आणि खरी गोष्ट सांगून टाकली. त्याला क्षमा करून मालक म्हणाला–"हं, ठीक आहे. आता तरी नीट प्रामाणिकपणे रहा. चोरीबिरीचे उद्योग सोडून दे. नाहीतर उपाशी मरायची पाळी येईल तुझ्यावर."

–मिहीर हर्षे





# बावळी रूपाणी

फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एका खेड्यात एक शेतकरी रहात होता. अल्प वयातच त्याची बायको वारली. त्याच गावात रूपाणी नावाची एक मुलगी होती. तिला आपलं असं कोणी नव्हतं. त्या दुर्दैवी आणि निराधार मुलीकडून तो शेतकरी आपल्या घरातील सर्व कामे करून घेऊ लागला. वेळ मिळाला तर रूपाणी शेतकऱ्याच्या शेतावरील कामे ही करी. पण ती थोडी वेडसर होती. कोणती ही गोष्ट चटकन तिच्या लक्षात येत नसे.

रूपाणी शेतकऱ्याला विचारायची–"तुमच्या घरची सगळी कामं मी करते ना? माझ्याशी लग्नच का करीत नाही?"

यावर हसून शेतकरी म्हणायचा–"हे काय बोलतेस रूपाणी? इतके दिवस थांबून मी आता तुझ्याशी लग्न करूं?"

रूपाणी रोज शेतकऱ्याला भंडावून सोडी. हे सर्व शेतकऱ्याला सहन होईना. एक दिवशी दुपारी शेतात खूप कष्ट करून थकलेली रूपाणी शेताच्या बांधावर गाढ झोपी गेली. शेतकऱ्याने तेलात काजळ मिसळलं आणि रूपाणीच्या चेहऱ्यावर व अंगावर सर्वत्र काळे पट्टे ओढले.

संध्याकाळी सूर्यास्तापूर्वी रूपाणी जागी झाली. आपल्या अंगावरचे काळे पट्टे पाहून तिला खूप भीती वाटली. आपल्यालाच तिने प्रश्न विचारला–"मी खरंच कोण आहे? एकादी राक्षसीण तर नाही?"

आपली शंका फेडून घेण्यासाठी रूपाणी शेतकऱ्याच्या घरी गेली नि बाहेरूनच तिने विचारले– "रूपाणी आहे का घरात?"

शेतकरी हसत म्हणाला–"आहे, ती आत काम करीत आहे."



रूपाणी चांगलीच घाबरून गेली. 'तर मग मी रूपाणी नाहीच!' असा विचार करून ती अंधारात जंगलाच्या रस्त्याला लागली.

जंगलात तिला दोन चोर भेटले. रूपाणीचं भयानक रूप पाहून दोघे ही घाबरले नि पळून जाऊ लागले. रूपाणी त्यांच्या मागे पळत ओरडून म्हणाली– "मी तुम्हाला खूप मदत करीन."

आपल्या बरोबर एकादी पिशाचिनी असली तर छानच, असा विचार करून चोर थांबले. न भीता रूपाणीच्या जवळ आले. त्यांना कुठून तरी एक बकरी चोरायची होती, पण त्यांना माहीत नव्हतं बकऱ्या कोठे चरत असतात?

रूपाणी म्हणाली–"ते सगळं तुम्ही माझ्यावर सोडून द्या. तुम्ही फक्त माझ्या मागे मागे या. झालंच तुमचं काम!"

चोरांना फारच आनंद झाला. ते रूपाणीच्या मागे चालू लागले. कुंपणाबाहेर चोरांना उभं करून रूपाणी आत पोचली. कुंपणाच्या आतून रूपाणीने किंचाळून विचारलं–"बकरा पाहिजे की बकरी?"

"अशी ओरडू नकोस. बकरी काय, अन् बकरा काय!" चोर म्हणाले.

"जाड-जूड जनावरच पहाते. पण बकरा पाहिजे तुम्हांला की बकरी ते तर सांगाल?" रूपाणी आतूनच ओरडली.

ती पुन्हा जोरात ओरडली-"अरे, इथं खूप जनावरं आहेत. सगळीचं घष्ट-पुष्ट! लवकर सांगा तुम्हाला बकरी पाहिजे की बकरा?"

चोर म्हणाले–"तू अगोदर ओरडणं बंद कर. वाटेल ते एक जनावर घेऊन ये म्हणजे झालं."

एवढ्यात बकऱ्यांचा मालक खडबडून जागा झाला. तो बाहेर आला, तेव्हा चोरांनी पळ काढला तेथून. रूपाणीचं भयंकर रूप पाहून बकऱ्यांच्या मालकाला वाटलं आपल्या आवारात एक पिशाचिनी आलेली आहे. तो भीतीने थरथर कापू लागला.

त्या दिवशी रूपाणी बरोबर चोरांना ही उपास घडला. दुसऱ्या दिवशी अंधार पडताच चोर एकाद्या कोंबडीच्या शोधात





निघाले. पण कोंबडी कुठे मिळेल हे त्यांना माहीत नव्हतं.

"ते सगळं तुम्ही माझ्यावर सोडा. तुम्ही फक्त माझ्या मागे या म्हणजे झालं!" एवढं सांगून रूपाणी गावाकडे निघाली. चोरांना बाहेर थांबायला सांगून रूपाणी कुंपणात शिरली. आतूनच ओरडू लागली– "अरे कोंबडी पाहिजे का कोंबडा? इथं कोंबडे आहेत, कोंबड्या आहेत!"

चोर म्हणाले–"अग, अशी ओरडू नकोस. एकादी गुबगुबीत कोंबडी आण. चांगला लठ्ठ कोंबडा मिळाला तरी चालेल."

"गुबगुबीत, लठ्ठ ते समजलं रे! पण कोंबडा की कोंबडी?" रूपाणीने पुन्हा किंचाळून विचारलं.

"अग, का उगाच ओरडते आहेस? एकादा घष्ट-पुष्ट पक्षी घेऊन ये." चोर म्हणाले.

"तसं नाही. तुम्ही नीट सांगा, तुम्हाला कोंबडी पाहिजे का कोंबडा? इथे खूप कोंबडे नि कोंबड्या आहेत." यावेळी रूपाणी खूपच जोरात ओरडली. या ओरडण्यामुळे सारे कोंबडे जागे झाले आणि आरवू लागले. एवढ्यात पहारेकरी ही जागा झाला. त्याला पाहताच चोर पळून जाऊ लागले.

"अरे मूर्खांनो, पळून काय चाललात? तुम्हाला कोंबडा-कोंबडी काय पाहिजे ते मी द्यायला निघाले नि तुम्ही पळून चाललात? थांबा, मी येते ना तुमच्या बरोबर!" असं म्हणून रूपाणी चोरांच्या मागे धावू लागली. रूपाणीला पाहताच तिचे ते भयानक रूप पाहून पहारेकरी बेशुद्ध होऊन धडामदिशी खाली पडला.

पुढे दोन दिवस चोर दिसलेच नाहीत. रात्री गावात एक पिशाचिनी भटकते आहे म्हणून सर्व लोक घाबरू लागले. तिसऱ्या दिवशी मध्य-रात्री चोर पुन्हा एकाद्या बकरी वा कोंबडीच्या शोधार्थ निघाले. रूपाणी त्यांच्या मागे निघाली, पण चोरांनी तिला आपल्या बरोबर येऊ दिलं नाही. आता चोरांना कळून चुकलं की ही पिशाचिनी बरोबर असली तर आपल्याला उपाशीच रहावं लागणार!

रूपाणीला चांगलीच भूक लागलेली होती. म्हणून ती गावाच्या बाहेर एका शेतात गेली आणि खोदून खोदून रताळी काढून खाऊ लागली. शेताचा मालक शेतातच झोपडी बांधून रहात होता. रात्री उशीरा तो झोपेतून जागा झाला नि झोपडीच्या बाहेर आला. रताळी खाणाऱ्या रूपाणीला पाहून त्याला वाटलं कोणी राक्षसीण आली आहे, आणि देवऋषाला बोलवण्यासाठी तो तेथून पळत सुटला.

देवऋषि झोपेतून जागा झाला नि तावडतोब शेतकऱ्याच्या मागे निघाला. शेतात पोचण्याच्या रस्त्यावर एका ठिकाणी खूप दलदल होती. त्या चिखलातून चालण्यासाठी देवऋषाला शेतकऱ्याच्या मदतीची आवश्यकता भासली

शेतकरी म्हणाला–"ठीक आहे मी आपणास माझ्या खांद्यावर बसवून या दलदलीतून घेऊन जातो. तुम्ही या राक्षसिणीला पळवून लावा. नाही तर भीक मागून जीवन कंठायची पाळी येईल माझ्यावर!"

शेतकऱ्याने देवऋषाला आपल्या खांद्यावर बसवलं आणि तो त्या चिखलातून चालू लागला. अंधारातून शेताकडे येत असलेल्या लोकांना रूपाणी चोर समजली. तिला वाटलं त्यांनी एकादा बकरा पकडून आणला असावा. तिने जोरात ओरडून विचारलं–"चांगला धष्ट-पुष्ट आहे ना?"

हे एकताच शेतकरी हादरून गेला. "धष्ट-पुष्ट आहे की नाही ते आता तूच पहा बाई!" असं म्हणून शेतकऱ्याने देवऋषाला तेथेच चिखलात टाकून दिले नि तेथून धूम ठोकली.

ही रात्रीची घटना ही त्या शेतकऱ्याला कळली. रूपाणीलाच लोक पिशाचिनी समजताहेत हे ही त्याच्या लक्षात आलं. आतां शेतकऱ्याला रूपाणीची कीव आली. त्याने रूपाणीला शोधून काढलं. तिला चांगलं नाहू-माखू घातलं, चांगले कपडे नेसायला दिले. नंतर भटजींना बोलावून तिच्याशी आपलेलग्न लावले. आता तो रूपाणीसह सुखा-समाधानाने राहू लागला.














# बंगला-देशची महिला प्रधान मंत्री



**आ**ता बंगला देशची ही एक महिला मंत्री झाली आहे. आतापर्यंत या उपखंडात तीन महिला प्रधान मंत्री झाल्या.

१९६० मध्ये श्रीलंकेच्या प्रधान मंत्री बनलेल्या श्रीमती सिरिमाओ बंडारनायके या जगातील पहिल्या महिला प्रधान मंत्री होत. यापूर्वी एक वर्ष त्यांचे पति डब्ल्यू. आर्. डी. बंडारनायके यांचा खून केला गेला. आपल्या नवऱ्याच्या पश्चात् अधिकार ग्रहण करणाऱ्या श्रीमती सिरिमाओंनी १७ वर्षें शासनाची सूत्रें सांभाळली.

१९६६ मध्ये भारताचे प्रधान मंत्री लाल बहादूर शास्त्री यांचा अचानक देहान्त झाल्यावर त्यांच्या मंत्री मंडळातील श्रीमती इंदिरा गांधी लोकसभेच्या कॉंग्रेस पार्टीच्या प्रमुख झाल्या. त्यानंतर त्या आपल्या देशाच्या प्रधान मंत्री बनल्या. सतत दोन वेळा प्रधान मंत्री बनलेल्या इंदिरा गांधी १९७७ च्या निवडणुकीत पराभूत झाल्या; पण दोन वर्षानंतर झालेल्या निवडणुकीत त्या जिंकल्या. १९८४ मध्ये एका दुष्ट बंदूकधाऱ्याने गोळ्या झाडून त्यांना ठार मारले. तोपर्यंत त्यांनी देशाचे उत्कृष्ठ नेतृत्व केले.

श्रीमती इंदिरा गांधीच्या शासन-काळातच पूर्व पाकिस्तान 'बंगला देश' नावाने स्वतंत्र झाला. या प्रयत्नात भारताने योग्य ते सहकार्य दिले.

पाकिस्तानात जुल्फिकर अली भुट्टो पहिले प्रधान मंत्री बनले. अध्यक्ष याह्याखान जेव्हा देश सोडून पळाले तेव्हा भुट्टो अध्यक्ष बनले. पण पाच वर्षांच्या अवधीतच त्यांना अध्यक्ष-पद सोडावं लागलं. न्याय-निवाडा झाल्यावर त्यांना फासावर लटकावे लागले. यानंतर त्यांची मुलगी बेनजीर भुट्टो हिने राजनैतिक क्षेत्रात पदार्पण केले. १९८५ मध्ये झालेल्या निवडणुकीत बेनजीरच्या नेतृत्वाखालील पीपल्स पार्टी अधिकारावर आली, आणि ती पाकिस्तानची प्रधान मंत्री झाली. पण

१९९० मध्ये घेतलेल्या निवडणुकीत पीपल्स पार्टीचा पराभव झाला.

बंगला देशचे पहिले प्रधान मंत्री शेख मुजीबुर रहमान १९७५ मध्ये देशाचे अध्यक्ष झाले. पण सहा महिन्यातच त्यांचा वध करण्यात आला. यानंतर देशात अनेक उलथापालथी झाल्या. अशाच एका घडामोडीत जनरल इर्शाद बंगला देशाचे अध्यक्ष बनले. इर्शाद यांनी सतत आठ वर्षे निवडणुका घेण्याची टाळाटाळ केली. शेवटी जेव्हा इर्शाद यांनी राजिनामा दिला आणि निवडणूक घेण्याची व्यवस्था केली. तेव्हा या निवडणुकीत बेगम खलिदा जिया यांच्या नेतृत्वाखालील नॅशनल पार्टीने सर्वात अधिक जागा पटकावल्या. ५ एप्रिल रोजी बंगला देशचे पार्लमेंट 'जातीय संसद' स्थापन झाले आणि बेगम खलिदा जिया या प्रधान मंत्री बनल्या.

शेजारच्या ब्रह्मदेशात ही गेल्या वर्षी झालेल्या निवडणुकीत अपूर्व यश मिळालेली महिला प्रधान मंत्री बनण्याची शक्यता आहे. तेथील नेता ऑंगसान याचा खून झाल्यावर भारतात शिकलेल्या त्याच्या मुलीच्या पार्टीने अभूतपूर्व यश संपादन केले. पण ब्रह्मदेशाच्या अध्यक्षांनी अजून तिला प्रधान मंत्री बनण्याची संधि दिलेली नाही.





# न्यायाधीषाची जबाबदारी

कोणे एके काळी सहारनपुर मध्ये व्याज-बट्टयाचा धंदा करणारा एक व्यापारी रहात असे. त्याचं नाव होतं भीमसिंह. सोहनने त्याच्याकडून एक हजार अशर्फ्यांचं कर्ज घेतलं होतं, नि एक वर्षानंतर तो रक्कम परत करायला आला. भीमसिंहाने पैसे परत घेतले नाहीत. म्हणाला—"तू व्याजच देत रहा, मला मुद्दल आता नकोय!"

फार आवश्यकता होती म्हणून सोहनने भारी दराने कर्ज घेतले होते. दीड हजार अशर्फ्या देऊन आता सगळं कर्ज फिटणार होतं. केवळ व्याजच देत राहिला तर मरेपर्यंत दर वर्षी पाचशे अशर्फ्या द्याव्या लागणार होत्या. सोहन अमळ घाबरला आणि सर्व कर्ज सव्याज देण्याबाबत त्याने भीमसिंहला विनंती केली.

यावर भीमसिंह म्हणाला—"आपण जे कागदपत्र लिहिले आहेत, त्यात असं ठरलंय की तू मला दर वर्षी पाचशे अशर्फ्या व्याजापोटी द्यायच्या! त्यात कर्ज फेडण्याबाबत काही उल्लेख नाही, म्हणून ते मला परत घेता येणार नाही. तू ठरल्याप्रमाणे फक्त व्याज देत रहा.

सोहनला वाटलं आपली फसगत झाली. त्याने विचार केला—यातून आपली सुटका व्हायची असली तर ती फक्त न्यायाधीशच करू शकेल.

दोघे न्यायाधीशाकडे गेले. कागदपत्र वाचून न्यायाधीश म्हणाला—"यात लिहिलं आहे की सोहन नावाच्या व्यक्तीने भीमसिंहाकडून एक हजार अशर्फ्यांचं कर्ज घेतलं आहे. नि या रकमेवर तो दर वर्षी पाचशे अशर्फ्या व्याज देत राहील. कर्ज चुकवण्याबाबत यात काही लिहिलेलं नाही. म्हणून तू कर्ज फेडण्याची आवश्यकता नाही. तू तावडतोब भीमसिंहाला व्याजाच्या



पाचशे अशर्फ्या ठेऊन टाक. नाही तर तुला आमरण तुरुंगात रहावं लागेल ?"

नाइलाजाने सोहनने भीमसिंहाला पाचशे अशर्फ्या दिल्या आणि तिथंच तो रडू लागला. भीमसिंह आपले पैसे घेऊन गेल्यावर न्यायाधीश सोहनचे सांत्वन करू लागला—"भीमसिंह फार धोकेबाज आहे. अशा लोकांशी व्यवहार करताना फार सावध राहिलं पाहिजे. जे काही झालं ते सारं आता विसरून जा. भीमसिंहापासून आपला बचाव करण्यासाठी मी तुला एक उपाय सांगतो. माझ्या सांगण्यानुसार करशील तर गेलेल्या पाचशे अशर्फ्यां-शिवाय एक अशर्फी ही तुला अधिक द्यावी लागणार नाही. तू आतां आपलं नाव सोहन ऐवजी सावन ठेव. मी एक दस्तावेज बनवून देतो. भीमसिंहाला व्याज द्यायचंय सोहनने, सावनने नाही. ठीक आहे न ? अशा रीतीने तू या संकटातून मुक्त होशील."

सोहनने मोठ्या आनंदाने दस्तावेज तयार केला नि तो आपल्या घरी आला. एक वर्षानंतर भीमसिंह व्याज वसूल करण्यासाठी सोहनकडे आला तेव्हा तो म्हणाला—"मी सावन आहे, व्याजाबद्दल तू सोहनला काय ते विचार." असं म्हणत त्याने आपला दस्तावेज भीमसिंहाला दाखवला.

भीमसिंहाने ताडलं की ही सर्व सोहनची बुद्धि नाही.

यानंतर काही दिवसांनी एक श्रीमंत माणूस सोहनचा पत्ता काढीत त्याच्या घरी आला नि म्हणाला—"या घरात राहणाऱ्या सोहन नावाच्या माणसाला एक लाख अशर्फ्या देण्याची माझी जबाबदारी आहे. मोठ्या संकटातून माझ्या वडिलांचे प्राण वाचवण्याचे काम सोहनच्या वडिलांनी केले होते. म्हणून माझ्या वडिलांची त्यांना एक लाख अशर्फ्या देण्याची इच्छा होती. इतके दिवस मी पैशांच्या तंगीत होतो. त्यामुळे ही रक्कम देऊ शकलो नाही. माझ्या वडिलांची अपुरी इच्छा पूर्ण करण्याचा शुभ मुहूर्त आज आला आहे.





आपले अनपेक्षित भाग्य जाणून सोहनला फार आनंद झाला. नि त्याने श्रीमंताला आपणच सोहन असल्याचे सांगितले.

तो श्रीमंत माणूस म्हणाला—"तूच सोहन यावर मी कसा विश्वास ठेवू ? गावातल्या कोणी प्रतिष्ठित माणसाने तूच सोहन असल्याचे सांगावे !"

गावातील बड्या लोकात सर्वात बडा म्हणजे भीमसिंह ! श्रीमंत नि सोहन दोघे ही भीमसिंहाकडे आले.

भीमसिंह सोहनला म्हणाला—"तू तर आपलं नाव बदललंस ! पण तुझ्या जुन्या कर्जांची जबाबदारी तुझीच ना ?"

हे ऐकून सोहन विचारात पडला. भीमसिंहाचं म्हणणं मानलं नाही तर हाती येऊ घातलेल्या एक लाख अशर्फ्या गमावणार होता तो. मानलं तर एक लाख हाती येतील, पण मग भीमसिंहाला दर वर्षी पाचशे अशर्फ्या द्याव्या लागणार !

यात काही धोका असावा असं सोहनला जरा ही वाटलं नाही. म्हणून भीमसिंहाच्या सूचनेनुसार त्याने आपण सोहन असल्याचे लिहून दिले. झालं ! एक लाख अशर्फ्या मिळणं दूरच राहिलं, भीमसिंह व्याजाच्या पैशांचा रोज तगादा करू लागला.

निरुपायास्तव सोहन पुन्हा न्यायाधीशा-कडे आला नि झालेली सर्व गोष्ट त्याला सांगितली. न्यायाधीश रागाने म्हणाला—"एकदा फसल्यावर ही तू पुन्हा गाफिल राहिलास ! तू असा का नाही विचार केलास की आपले पैसे वसूल करण्यासाठी भीमसिंह काही ही करू शकतो. एकदम कोणी येऊन एक लाख अशर्फ्या देण्याची गोष्ट करू लागला, तर तू त्याच्यावर विश्वास कसा ठेवलास ?"

"हुजूर इथून पुढे मी सावध राहीन. पण आता आपण मला वाचवा." सोहनने न्यायाधीशाला प्रार्थना केली.

न्यायाधीशाने ताबडतोब भीमसिंहाला बोलवून विचारलं—"हा सोहन तुला दर वर्षी द्यायच्या पाचशे अशर्फ्या देत नाही न ?



मी याला तुरुंगात डांबून ठेवतो. कोणी चांगला जामीन दिल्याशिवाय याची तुरुंगातून सुटका नाही!"

भीमसिहाला मोठा आनंद झाला. ताबडतोब सोहनच्या घरी जाऊन त्याच्या बायको व मुलांना त्याने धमकी दिली–"घर किंवा शेत विकून माझं वार्षिक व्याज चुकतं करण्याचं करारपत्र लिहून द्या. नाहीतर सोहन आता मरेपर्यंत तुरुंगातच राहणार!"

तोपर्यंत न्यायाधीशाकडून संकेत मिळाल्यामुळे सोहनची बायको जरा ही घाबरली नाही. तिने भीमसिहाला सांगितलं–"नाही तरी नवरा घरात असून काय उपयोग? इकडून तिकडून कर्ज काढून आमच्या गळ्याला फास लावतो! जे आमच्या भाग्यात असेल ते होईल. राहू द्या त्याला तुरुंगातच."

असं किती दिवस चालेल याचा विचार करून भीमसिह पण गप्प बसला. पण एक आठवड्या भरात सोहन तुरुंगातून परत आला. त्याचं असं झालं–त्या देशाचा राजा आणि राणी बरीच वर्षं संतति नसल्यामुळे दु:खी होते. आता त्यांना एक मुलगा झाला! या आनंदाप्रीत्यर्थ तुरुंगातील किरकोळ अपराध्यांना मुक्त करण्यात आले होते.

भीमसिह लगेच सोहनकडे आला नि म्हणाला–"तू तुरुंगातून सुटलास, मला फार आनंद झाला. आता माझी व्याजाची रक्कम देऊन टाक."

"तुझं व्याज दिलं नाही या अपराधाबद्दल तर मी तुरुंगवास भोगला! आता मी तुझं काही देणं लागत नाही. समजलं?" सोहनने आपली कर्जातून सुटका करून घेतली.

भीमसिह पुन्हा न्यायाधीशाकडे गेला तेव्हा न्यायाधीश म्हणाला–"सोहन म्हणतो ते बरोबरच तर आहे!"

काही दिवसां नंतर भीमसिहाने एक नवी युक्ति योजली. आता एक सभ्य माणूस सोहनकडे आला नि त्याला एक पत्र दाखवलं. पत्रात लिहिलं होतं की सोहन त्या माणसाला ओळखतो आणि एक विश्वास ठेवण्यायोग्य माणूस असल्यामुळे त्याला नोकरी द्यायला हरकत नाही.

हा माणूस येऊन सांगू लागला–"हुजूर, आपण माझ्यावर कृपा करावी. बरेच दिवस मला कोठे ही नोकरी मिळत नाही. न्यायाधीश आपले चांगले मित्र आहेत ना? आपण यावर स्वाक्षरी केली तर या पत्राच्या साह्याने न्यायाधीशाकडून मला चांगली नोकरी मिळेल."

सोहनला वाटलं–सही करायला काही हरकत नाही. त्याने पत्रावर स्वाक्षरी करून टाकली. पण यात ही एक डाव होता. त्या पत्रातील सर्व मजकूर अदृश्य झाला. सोहनची सही तेवढी शिल्लक राहिली.

भीमसिहाने स्वाक्षरीच्या वर मजकूर लिहिला की सोहनला दहा हजार अशर्फ्या कर्ज मिळालं आणि दर वर्षी एक हजार अशर्फ्या तो परत देईल. आणि हा कागद घेऊन तो न्यायाधीशाकडे गेला.

पत्र पाहून न्यायाधीशाने भीमसिहाला रवाना केले. सोहनलाला बोलवून विचारले–"अजून तुझं डोकं ताळ्यावर नाही आलं वाटतं! तू पत्रावर सही का केलीस बरे?"

रडत सोहन सांगू लागला–"मी सही तर एका शिफारसपत्रावर केली."



न्यायाधीशाच्या लक्षात आलं की जादूच्या शाईचा उपयोग करून भीमसिहाने सोहनला धोक्यात आणलेलं आहे. तो सोहनला म्हणाला–"मूर्खा, धोकेबाज लोक रोज अधिक हुशार होत चालले आहेत, पण तुझ्या बुद्धीत मात्र काही फरक पडला नाही. आता तुला वाचवणं मला शक्य नाही!"

"महाराज, माझ्या सारख्या अडाणी नि लाचार माणसांना अपराध्यांच्या तावडीतून सोडवण्यासाठीच तर आपण आहात ना?" सोहनने प्रश्न केला.

यावर न्यायाधीशाचा पारा अधिक चढला नि तो म्हणाला–"एकदा वाचवलं,

दुसऱ्यांदा वाचवलं ! प्रत्येक वेळेला वाचवणं मला कसं जमेल ? एकदा विश्वासघात झाल्यावर, तुमच्या सारख्या लोकांनी अधिक सावध रहायला नको का ? नाही तर भोगा आपल्या चुकीची फळं !"

"महाराज, आपण मला वाचवू नका, पण मला एक शंका आहे. आपण रागवू नका. माझ्यासारख्या अडाण्यांचं संरक्षण करणं हे जसं आपलं कर्तव्य आहे, तसंच अपराध थांबवणं हे ही आपलं कर्तव्य नाही का ?" सोहनने विचारले.

आपला राग आवरीत न्यायाधीशाने विचारले–"दोन मध्ये काय फरक आहे ?"

"खूपच फरक आहे ! माझ्यासारख्या भोळ्या नि अडाणी माणसाला कोणी धोका दिला तर ती माझी चूक आहे, कबूल ! गुन्हे थांबवण्याचा आपण प्रयत्न करताहात, तर गुन्हेगार आणखी नवीन क्लृप्त्या योजतो आहे. गुन्हेगारांनी गुन्हे करू नयेत म्हणून आपण आपल्या हुशारीचा उपयोग का करीत नाही ? अपराध्यांच्या बुद्धीशी स्पर्धा करून त्यांना अपराधापासून परावृत्त करण्याचं काम आपण का करीत नाही ? मग सामान्य माणूस काय करू शकणार ?" सोहनने मार्मिक प्रश्न टाकला.

हे ऐकून आपली काय चूक आहे ते न्यायाधीशाच्या लक्षात आलं. त्याने दुसऱ्या दिवशी जाहिर केलं–"कर्ज देणारांनी आपल्या मनाला येईल तशी करारपत्रे करू नयेत. जे दस्तावेज आमच्या समोर लिहिले जातील, येथून पुढे तेच मान्य होतील."

चार दिवसांनी भीमसिंह न्यायाधीशाला भेटला नि सोहनच्या कर्जाबाबत पृच्छा केली. तीक्ष्ण नजरेने त्याच्याकडे पाहत न्यायाधीश म्हणाला–"सोहन किती पैसेवाला आहे, त्याची संपत्ति किती आहे हे सर्वांना माहीत आहे. अशा माणसाला साक्षीदार नसताना तू दहा हजारांचं कर्ज दिलंस हा तुझा मूर्खपणा आहे. तू आहेस एक धोकेबाज, तुझी बुद्धिमत्ता सर्व जण जाणतात. तू आता चालू लाग इथून !"

यानंतर सोहन सारख्या गरीबांना सतत न्यायाधीशाच्या घराची पायरी चढण्याचे प्रसंग फारच कमी येऊ लागले.






[ ४ ]

[अपूर्वने समीर नावाच्या मुलाला डाकूंच्या तडाख्यातून वाचवले. त्याच्याच सल्ल्याने समीरने सैनिकांच्या मदतीने ती संपूर्ण टोळी पकडून दिली. राजाने त्या सर्वांना मृत्युदंड सुनावला. आपल्या दुष्कृत्यांबद्दल पश्चात्ताप झालेल्या डाकूंना क्षमा करावी म्हणून अपूर्वने समीरद्वारे राजाला विनन्ती केली. पण राजा ते मानायला तयार होईना...आता पुढे वाचा.]

**ज्या** कारागृहात डाकूंना डांबून ठेवले होते, तेथे अंधार दाटत चालला आणि भयानक शांतताही पसरली. एक डाकू कण्हत कण्हत दुसऱ्याला विचारू लागला–"काय रे, तुला काय वाटतं ? राजा आपल्याला माफी देईल ?"

"काही ईश्वरी कृपा झाली, तर गोष्ट निराळी, पण मला नाही वाटत कीं आपली मरणापासून सुटका होईल !" तो बाजूचा डाकू दयनीय आवाजात बोलला.

त्यांचे बोलणे ऐकून सरदार भैरवमल गुरगुरला–"का रे, इतके भित्र्या भागु-बाईसारखे रडताय का ?"

"भित्रे, भित्रे ! आपण भित्रेच नाही तर काय ? आजपर्यंत आपण केलेली कामं काय धाडसाची कामं होती ? नि:शस्त्र वाटसरूंना लुटणं, असहाय्य पोरं उचलून नेणं, दुर्बल-कमजोर लोकांना



भिती दाखवून, धमकावून त्यांना लूटणं-मारणं, ही सारी कामं काय धाडसी म्हणण्यासारखी आहेत आपल्याला? कोणी घाम गाळून, पै-पै करून मिळवलेल्या पैशांवर आपण आजवर चैन करत आलो--ही गोष्ट आपल्याला लाजिरवाणी नव्हे? आम्हाला हा भित्रेपणा कोणी शिकवला? तूच, तूच ना? आता ते सर्व विसरलास काय?" त्या चोरांनी सर्वांनी एकदमच 'काव-काव' करायला सुरुवात केली.

त्यांना द्यायला योग्य असे उत्तर आता भैरवमल जवळ नव्हते, तो आपला गप्पच बसून राहिला.

अचानक पुन्हा चोरांना अपूर्वचा तो पहिलाच मधुर आवाज ऐकू येऊ लागला– "अरे तुम्ही सर्वजण लहान पोरांसारखे काय बोलता आहात? सर्व जबाबदारी भैरवमलवर का ढकलत आहात? तुम्ही सर्वांनी अगदी जाणून बुजून अपराध केलेले आहेत. आता स्वत:ला निर्दोष समजून अशी आत्मवंचना नका करू. आपण केलेल्या अपराधांची आपापली जबाबदारी तुम्हाला मानायलाच हवी. तेव्हां तुम्ही सर्वच शिक्षेस पात्र आहात."

अपूर्वच्या या बोलण्यावर कोणीही तोंड उघडले नाही.

थोड्या वेळाने अपूर्वच्या आवाजाच्या रोखाने पहात भैरवमल म्हणाला–"देवा, तू खरोखरच आम्हाला वाचवू शकशील काय? या कारागृहाचे शिपाई तर म्हणत आहेत की येत्या दशमीला आम्हाला फाशी दिलं जाणार आहे!"

"तुम्ही सर्वजण मनातलं सर्व विसरून एकाग्र चित्ताने देवाची प्रार्थना करा. भल्या माणसांचं नेहमी भलंच होत असतं!" अपूर्वने आश्वासन दिले.

* * *

सर्व जनता आज खूष होती. 'आपणा-वर जुलूम करणाऱ्या डाकूंना उद्या सूर्योदयापूर्वी फाशी दिलं जाणार!' अशी घोषणा झालेली होती.



पहाटेच राजधानीतले लोक वधस्थानी जमले. काहीजण कारागृहापासून वधस्थानी जाणाऱ्या रस्त्यावर दोन्ही बाजूंना रांगा करून उभे राहिले. कोतवाल एका घोड्यावर बसून पुढे जात होता, आणि त्याच्या मागून शिपाई हात बांधलेल्या डाकूंना वधस्थानाकडे घेऊन जात होते. त्यांच्या मागे व पुढे ही काही सशस्त्र शिपाई चालत होते. रस्त्याच्या बाजूला उभे असणाऱ्यांपैकी एक बाई अचानक रांग मोडून डाकूंच्या समोर येत ओरडू लागली–"बदमाष! दूर देशाहून येणाऱ्या माझ्या नवऱ्यावर तुम्ही हल्ला केलात. त्याने निडरपणे आपल्या लाठीने पिटून तुम्हाला पळवून लावलं. भित्रे लोक तुम्ही, सर्वजण...पाय लावून पळून गेलात. पण शेवटी भित्रे भागुबाई, मागनं परत येऊन पाठीत भोसकून माझ्या नवऱ्याला मारलंत तुम्ही! कष्ट करून त्याने जमवलेलं सारं धन पळवून नेलंत! भित्रे, नालायक आहात तुम्ही!..." तिने भैरवमलला जोरात थप्पड मारली अन् ती ओक्साबोक्शी रडू लागली.

तिचे बोलणे ऐकून इतर माणसं चेकाळली. अन् त्या चोरांना मारण्यासाठी ती पुढे येऊ लागली. एकूण परिस्थिति बेकाबू होणारसं पाहून कोतवाल स्वत: घोडा फिरवून तेथे येऊन लोकांना म्हणू लागला–"तुमचं दु:ख मी समजू शकतो. तुमचा रागही कळतो मला! पण आत्ता तुम्ही एक गोष्ट विसरत आहात. आपल्या साऱ्या पापांचं फळ भोगायला हे लोक वधस्तंभाकडेच चालले आहेत. अशा अवस्थेत आपला सूड उगवण्यासाठी आत्ता तुमचं हे पुढे सरसावणं बरं नव्हे. थोडा धीर धरा, यांना आता भगवान माफ करणार नाहीये!"

इतक्यात आपले हात आकाशाकडे उंचावून भरल्या गळ्याने भैरवमल त्या बाईला उद्देशून बोलू लागला–"माई, मी महापापी आहे, यात जराही शंका नाही. केवळ तुझ्या नवऱ्यालाच नव्हे, तर अनेक



अभागिनींच्या मुलांना, पित्यांना मारून मी मोठ्या पापाचा धनी बनलो आहे. तुम्ही सर्वांनी मला माफ करायचं ठरवलंत, तरी परमेश्वर आता मला नक्कीच माफ करणार नाही, ही गोष्ट खरीच. मरून मी आता नरकाचाच धनी होणार!" त्याच्या आवाजात आता कमालीचे दुःख व पश्चात्ताप भरलेला होता.

त्याच्या बोलण्यामुळे लोक शान्त झाले. त्याला थप्पड मारणारी ती स्त्रीही एक दीर्घ उसासा सोडून शांत झाली.

भैरवमलकडे वळून कोतवाल म्हणाला– "तुम्ही लोक आता पस्तावत आहात, पण तुमचे अपराध तर अक्षम्य असे आहेत. ज्या समीरला तुम्ही मारून टाकायला निघाला होतात, त्यानेच राजाकडे तुमच्यासाठी माफीची विनंती केली, पण त्याला यश आलं नाही. तुम्ही लोक कमनशिबी आहात. समीरची विनंती राजाने मानली नाही."

भैरवमल यावर म्हणाला–"आम्हीही लाचार आहोत. मी पापीच आहे. मला शिक्षा मिळायलाच हवी. पण या बिचाऱ्या माझ्या साथीदारांच्या पापांनाही मीच कारण आहे ना? कृपा करून त्यांना सोडून द्या. त्यांना मिळणाऱ्या सर्व शिक्षा एकवटून मला जितका त्रास देता येईल तितका द्या. त्या सर्वांच्या वाट्याची शिक्षा मलाच मिळायला हवी!"

यावर हसून कोतवाल बोलू लागला– "राजाचा न्याय बदलणं आमच्या कोणाच्याच हाती नाही. निर्णयाबाबत फेरविचार करायची वेळही टळून गेली आहे. तुम्हाला उगीच आशा दाखवणं मला शक्य नाही. आता तुम्हा सर्वांना फाशी चढण्यावाचून अन्य मार्ग नाही."

सर्वजण वधस्थानी पोचले. डाकू संख्येने जवळजवळ वीस एक होते. त्यांना मातीच्या एका उंचवट्यावर उभे करण्यात आले. फाशीची तयारी चालूच होती. कोतवालाने फाशी देणाऱ्याला विचारले–"तयारी पुरी झाली की नाही तुझी?"



"होय हुजूर, सर्व तयारी झाली आहे." तो मारेकरी उत्तरला.

"सर्वात आधी भैरवमला फाशी दिले जाईल, अन् मागोमाग बाकी सर्वांना." कोतवालाने जाहीर केले.

दोन शिपाई पुढे होऊन भैरवमलला फाशीच्या तख्तावर घेऊन गेले.

"भैरव! तुझी काय शेवटची प्रार्थना असेल, ती करून घे!" कोतवाल बोलला.

हात जोडून भैरवमल बोलू लागला– "माझ्यामुळे ज्यांना ज्यांना त्रास झाला, त्या सर्वांची मी क्षमा मागत आहे. माझी सारी पापं माफ करून माझं रक्षण करावं अशी मी त्या परमेश्वराची प्रार्थना करत आहे."

मारेकऱ्याने पुढे होऊन भैरवमलच्या गळ्यात दोरीचा फास अडकवला.

मातीच्या उंचवट्याखाली उभे असलेले सर्वजण आता श्वास रोखून समोरचे दृश्य पाहू लागले.

कोतवाल मारेकऱ्याला म्हणाला–"मी आता दहा अंक मोजीन. मी 'दहा' म्हटल्याबरोबर दोरी ओढून फास आवळ."

"जी हुजूर!" मारेकरी उत्तरला.

कोतवाल हळू हळू आकडे मोजू लागला. एक, दोन, तीन,....!



जमा झालेल्या लोकांच्या मनात एकाच वेळी, भीति, उत्सुकता, बेचैनी भरून आली होती. सूर्य उगवत होता अन् त्याचे पहिले किरण फाशीच्या स्तंभावर पडत होते. फाशीचा मजबूत दोर तेल लावल्यासारखा चमकत होता!

"नऊ!" कोतवालाचा आवाज गंभीर होता. स्तंभाजवळचे अन्य डाकू रडू लागले.

"दहा!" शांततेचा भंग करत कोतवाल ओरडला.

मारेकऱ्याने ताबडतोब दोर ओढला. भैरवमलचे शरीर ताबडतोब लटकायला हवे होते, पण असे झाले नाही! इतकेच नव्हे, तर वरच्या बाजूची दोरी जराशी कापली गेली होती!



पुन्हा एक नवीन दोर आणण्यात आला. पण काय आश्चर्य! दोरी पुन्हा काचली.

हा चमत्कार पाहून तिथले सर्वजण थक्क झाले! कोणाच्या तोंडून शब्द फुटेना! थोड्या वेळाने कोतवाल म्हणाला– "कुठल्याशा अमानवीय शक्तीनेच हे घडत असावं असं वाटतंय. आपल्याला तावडतोब राजेसाहेबांना ही खबर पोचवायला हवी. मी स्वतःच जाऊन त्यांच्याशी बोलून येतो. तोपर्यंत तुम्ही आणखी एक नवा दोर तयार ठेवा, अन् माझी वाट पहा." कोतवाल घोड्यावर स्वार होऊन तेथून निघून गेला.

थोड्या वेळाने राजा, मंत्री व सेनापती या तिघांना बरोबर घेऊन कोतवाल परत आला. राजाने स्वतः फाशीची दोरी नीट तपासून पाहिली. नंतर पुन्हा मारेकऱ्याने फास भैरवमलच्या गळ्यात घातला.

पूर्वीप्रमाणे आकडे मोजत कोतवालाने 'दहा' म्हटल्याबरोबर मारेकऱ्याने पुन्हा दोरी आवळली. पण 'फट्' असा आवाज होऊन दोरी तुटली!

ही विचित्र घटना तीनदा घडलेली पाहून जनता भयाने व आश्चर्याने ओरडली– "अरे काय चमत्कार हा!"

राजा जरा वेळ गप्प राहिला अन् डोके हलवत म्हणाला–"काही कारण नसतानाच चांगली मजबूत दोरी तीन वेळा का बरं तुटली असेल? नक्कीच काही महत्त्वाचं कारण असलं पाहिजे याच्यामागे! या खुनी डाकूंना माफ करायची समीरने विनंती केली. तेव्हा मी म्हटलं होतं की देवाच्या मनात असेल तर त्यानेच काही चमत्कार करून वाचवावं यांना! तो चमत्कार माझ्या डोळ्यांसमोरच घडला आहे. आता या भैरवमलला सोडून द्या. केवळ त्यालाच नव्हे, तर त्याच्या साऱ्या साथीदारांनाही सोडून द्या. पण त्यांनी आपल्या देखरेखी-खाली राहून आपलं नवं जीवन सुरू करावं!"

तोपर्यंत सर्व जनतेच्या मनातही ही भावना घर करून गेली की पश्चात्तापाने



पोळणाऱ्या या डाकूंना स्वतः परमेश्वरानेच क्षमा केली असावी. म्हणूनच तर तीनदा दोर तुटला! त्यामुळे राजाने जेव्हा त्यांना माफी दिली तेव्हा सारी जनताही आनन्दाने घोषणा देऊ लागली.

शिपायांनी सर्व चोरांच्या हातापायातल्या साखळ्या काढून घेऊन त्यांना मुक्त केले.

भैरवमल व साथीदार सर्वजण डोळ्यात आनन्दाश्रू घेऊन राजाजवळ गेले आणि त्यांनी मोठ्या भक्तीने व कृतज्ञतेने राजाच्या पायांना हात लावून त्याला नमस्कार केला.

"तुम्ही लोक आपली ही कृतज्ञता त्या करुणामय परमेश्वराला दाखवा. त्यानेच आपली शक्ती दाखवून तुमचे प्राण वाचवले आहेत. तुम्ही आता तुमचं पुढचं आयुष्य पवित्र मार्गाने व्यतीत करा, दयावान परमेश्वराच्या कृपेने आपलं भावी जीवन सुधारा. माझी इतकीच इच्छा आहे की देवाला न आवडेल असं कुठलंही काम यापुढे करू नका." अशा प्रकारे सर्वांना आशिर्वाद देऊन राजाने त्यांना सद्वर्तनाचा उपदेश केला.

आनन्दाने जनतेनेही आरोळ्या दिल्या— "महाराजांचा जय असो! करुणामय परमेश्वराचा जय असो."

* * *

जंगलात एकान्तात बसलेल्या अपूर्वला नमस्कार करून समीरने विचारले—"हा चमत्कार आपण कसा बरं दाखवला?"

यावर मंदपणे हसत अपूर्व म्हणाला— "मी जेव्हा खूप गतीने धावतो, तेव्हा एका अवस्थेत मी अदृश्य होतो. जेव्हा कोतवाल 'पाच' म्हणे, तेव्हा मी वेगाने पळून फासाजवळ पोचत असे. वेगामुळे मी अदृश्य होत असे. कोतवालाने 'दहा' म्हणताच मी तलवारीने दोर कापत असे. अन् पुन्हा त्याच वेगाने आपल्या जागी निघून जात असे. अशा प्रकारे मी त्या सर्वांना वाचवू शकलो. ते मरता मरता वाचले याचा मला फार आनन्द वाटतो समीर!"

(पुढे चालू)





# गुरु-दक्षिणा

दृढनिश्चयी राजा विक्रम पुन्हा झाडाजवळ आला, झाडावरून प्रेत उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि मुकाट्याने तो श्मशानाकडे चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणारा वेताळ म्हणाला—"राजा, तू कुणाच्या तरी द्वेषापोटी वा कुणाचा सूड घेण्यासाठी हे सर्व कष्ट उपसत आहेस, की याचे दुसरे काही कारण आहे मला माहीत नाही. बरेच लोक सूड घेण्याच्या भावनेने हट्टाने संधीची वाट पहात राहतात आणि मग अपयशाच्या भीतीमुळे चमत्कारिकपणे वागतात. उदाहरणार्थ मी तुला यज्ञकर्म नावाच्या मुनीची गोष्ट सांगतो. ती तू लक्षपूर्वक ऐक. यामुळे तुझा थोडा श्रम-परिहार ही होईल." असं म्हणून वेताळ राजाला यज्ञकर्मची गोष्ट सांगू लागला.

हिमगिरी राज्याचा राजा होता वीरसेन. त्याला एकुलता एक मुलगा होता विजयवर्धन.



आपल्या मुलाला सर्व विद्या-पारंगत बनविण्यासाठी एकाद्या योग्य गुरूचा शोध वीरसेन घेऊ लागला. एवढ्यात राजाला शांतिवनात गुरुकुल चालविणाऱ्या व तपश्चर्या करणाऱ्या यज्ञकर्म नावाच्या एका मुनीबाबत माहिती मिळाली.

एके दिवशी आपल्या मुलाला घेऊन वीरसेन यज्ञकर्माच्या आश्रमात पोचला नि त्याला म्हणाला–"महात्मन्, मी या देशाचा राजा आहे. हा माझा मुलगा विजयवर्धन माझ्या पश्चात् हाच देशाचा राजा होणार. याला विद्यासंपन्न बनविण्याची सुवर्ण-संधि मी आपणास देऊ इच्छितो. आता इथून पुढे जबाबदारी आपणांवर!"

यज्ञकर्माने आपली भूमिका सांगितली–"राजा, विद्याध्ययन करण्यासाठी आलेला राजपुत्र अथवा कोणा मजुराचा सामान्य मुलगा दोघे ही मला सारखेच. म्हणून राजपुत्राला विद्या शिकवणं ही मला सुवर्णसंधि नाही. नि अजून मी आपल्या मुलाला आपला शिष्य म्हणून स्वीकारलं ही नाही."

"स्वत: राजाने येऊन काही मागणी केली. तर आपण नाही म्हणणार नाही अशा विश्वासाने मी आपणाशी बोललो." राजा विश्वासाने म्हणाला.

"सर्वांचं भलं करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर आहे. आपण असं अहंकाराने बोलणं आपल्याला शोभत नाही." यज्ञकर्म निर्भयपणे बोलून गेला.

वीरसेनला खूपच राग आला. तो मुनीला म्हणाला–"तुमच्याशी वादविवाद करण्याची माझी इच्छा नाही. आपण मला एवढं सांगा की माझ्या मुलाला आपण आपला शिष्य बनवणार की नाही?"

अमळ विचार करून यज्ञकर्माने उत्तर दिले–"या सुपुत्राला विद्यादान करायचं मी स्वीकार करतो!"

यज्ञकर्माच्या बोलण्याने वीरसेनचा अहंकार डिवचला गेला. तरी पण आपला क्रोध बाहेर न दाखवता त्याने मुलाला गुरुगृही सोडलं नि तो राजधानीला परतला.



त्याच दिवसापासून विजयवर्धनचे विद्याध्ययन सुरू झाले. गुरूच्या देखरेखीखाली विजयवर्धन जेव्हा सोळा वर्षांचा झाला, तेव्हा सर्व वेद-वेदांग व शास्त्रांमध्ये तो प्रवीण झाला. विविध विद्या व कलांमध्ये तो चांगलाच पारंगत झाला.

एक दिवशी यज्ञकर्माने आपल्या राजकुमार शिष्याला जवळ बोलवून सांगितलं–"शिष्योत्तमा, आज तुझं अध्ययन संपलं! तुझा राज्याभिषेक झाल्यावर आदर्श राजा अशी कीर्ति संपादन कर. माझे अनेक आशीर्वाद!"

गुरूच्या पायांवर मस्तक ठेवून विजयवर्धनने आपले मनोगत सांगितले–"गुरुवर, आपणास काही गुरु-दक्षिणा द्यावी अशी माझी इच्छा आहे"

स्मित हास्य करीत यज्ञकर्म म्हणाला–"बेटा विजय, तुझ्यासारख्या शिष्योत्तमाचा गुरु बनणं ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. मला तुझ्याकडून कोणत्याही प्रकारची गुरु-दक्षिणा नको."

तरी पण विजयवर्धनने आपलेच म्हणणे जोराने मांडले–"गुरुजी, माझ्या समाधानासाठी काही तरी मागणी आपण करावीच!"

विजयवर्धनच्या मनांतील प्रेम समजून यज्ञकर्म म्हणाला–"चिरंजीव, तुझ्या संतोषासाठी मी गुरुदक्षिणा मागेन पण



ती आता नाही. मला जेव्हा आवश्यकता असेल तेव्हा मी ती मागून घेईन."

विजयवर्धनने गुरूच्या पायांवर मस्तक ठेवले नि तो राजधानीकडे निघाला. सर्व विद्या व कलांमध्ये पारंगत झालेल्या आपल्या मुलाला पाहून राजा वीरसेनला खूप आनन्द वाटला. आता त्याच्या मनात एक विचार आला. गुरुकुलात पाहिल्यांदा आपण प्रवेश केला, त्यावेळी यज्ञकर्माने आपल्याशी अनादराने जे बोलणे केले त्याचा सूड उगवला पाहिजे.

दुसऱ्या दिवशी वीरसेनने आपल्या काही सैनिकांना बोलवून आज्ञा दिली–"तुम्ही लोक यज्ञकर्माच्या आश्रमात जा आणि त्याला सांगा की जोपर्यंत तो मला शरण

येत नाही, तोपर्यंत मी त्याला शांतपणे जीवन जगू देणार नाही. जर तो हे मानायला तयार नसेल तर तुम्ही त्याच्या आश्रमाला आग लावून द्यां."

सैनिक यज्ञकर्मच्या आश्रमात पोचले, आणि राजाचा निरोप जशाचा तसा त्यांनी मुनीला कथन केला. ते सर्व ऐकून यज्ञकर्म जरा ही विचलित झाला नाही. तो म्हणाला—"त्या दुरहंकारी राजाची मी मुळिच माफी मागणार नाही."

राजाच्या आज्ञेनुसार शिपायांनी आश्र-माला आग लावून दिली आणि राजाला जे घडले ते सर्व येऊन सांगितले.

एक आठवड्यानंतर आता तरी यज्ञकर्म आपली माफी मागेल अशा अपेक्षेने राजा वीरसेन स्वतःच आश्रमात येऊन दाखल झाला.

त्या वेळी यज्ञकर्म एका झाडाखाली बसलेला दिसला. मुनीजवळ जाऊन राजा म्हणाला—"माझा अनादर केल्यामुळे आता तुझ्यापाशी रहायला झोपडी ही नाही, असा झाडाखाली बसला आहेत. निदान आता तरी मला शरण ये."

यावर यज्ञकर्माने निवेदन केलं—"राजा, हा माझा अहंकार नाही. आत्मगौरव आहे. तू मोठा दुरहंकारी आहेस. तू तर हे सुद्धा विसरलास की मी राजपुत्राला विद्यादान करणारा गुरु आहे."

राजाचा क्रोध अनावर झाला. रागातच बडबडला—"मी आता तुझे प्राण घेऊ शकतो." वीरसेनने धनुष्यावर बाण चढवला आणि तो यज्ञकर्मं वर सोडला.

यज्ञकर्माच्या डोळ्यातून काही ज्वाला निघाल्या, राजाने फेकलेल्या बाणाची मर्म-स्थानी पोचण्यापूर्वीच राख झाली.

हा चमत्कार पाहून वीरसेनने आपला घोडा परत फिरवला. यानंतर राजा कधी ही यज्ञकर्माच्या आश्रमाकडे गेला नाही.

काही महिन्यांनंतर वीरसेनने विजय-वर्धनचा राज्याभिषेक समारोह मोठ्या थाटात साजरा केला. दुसऱ्याच दिवशी विजयवर्धन आपल्या गुरूच्या दर्शनासाठीं निघाला. झाडाखाली बसून तपश्चर्या करणाऱ्या यज्ञकर्माला त्याने पाहिले. सर्व आश्रम जळून खाक झालेला त्याला दिसला.

विजयवर्धन गुरु यज्ञकर्माच्या जवळ गेला नि त्यांची पादपूजा केली. यज्ञकर्माने डोळे उघडले नि विचारलं—"बेटा, सर्व काही कुशल-क्षेम आहे न?"

"गुरुजी, माझा राज्याभिषेक झाला. या मंगल वेळी आपला आशीर्वाद ग्रहण करण्यासाठी इथे आलो आहे. पण अग्नीच्या मुखी पडलेला आपला आश्रम पाहून मन खिन्न झालं. हा काय बरं अपघात झाला? कोण दुष्ट याला कारणीभूत आहे?" विजयवर्धनने गुरूला प्रश्न केला.

यज्ञकर्माने शिष्याला सांगितलं—"बेटा, काही ही अपघात झालेला नाही. अहंकाराने अंध झालेल्या एका दुष्टाची ही सर्व करतूत आहे. माझे प्राण घेण्याचा ही त्याने प्रयत्न केला."







हे ऐकून अत्यंत आवेशाने विजयवर्धन म्हणाला—"हा दुष्ट कोणी ही असो, मी मुळिच त्याची गय करणार नाही. मी प्रतिज्ञा करतो की मी त्याचा शिरच्छेद केल्याशिवाय राहणार नाही. ज्याने आपणावर हा अत्याचार करण्याचे साहस केले तो मूर्ख कोण हे कृपा करून मला सांगा."

शिष्याची प्रतिज्ञा ऐकून यज्ञकर्म अंमळ घाबरला नि म्हणाला—"हे दुष्कर्म करणाऱ्या बद्दल काही जाणताच अशी प्रतिज्ञा करणं योग्य होणार नाही. त्याचं नाव समजल्यावर तुला प्रतिज्ञाभंग करावा लागेल अशी ही शक्यता आहे!"

"गुरुजी, मी आपली प्रतिज्ञा पूर्ण करणार नाही असं आपल्याला का बरे वाटावं? माझ्याबाबत कुठली ही शंका नको. त्या दुष्टाचं नाव मला सांगा." दृढनिश्चयाने विजयवर्धनने विचारले.

थोडा वेळ थांबून यज्ञकर्माने सांगितलं—"तो दुसरा कोणी नाही, तुझा पिता वीरसेन!"

विजयवर्धनला फारच आश्चर्य वाटलं, त्याने विचारलं—"माझ्या पित्याने आपणावर हा अत्याचार केला म्हणता! तरी पण मी त्यांना कदापि क्षमा करणार नाही. आपणाबद्दल त्यांच्या मनात एवढा द्वेष कसा निर्माण झाला?"

यज्ञकर्माने विजयवर्धनला प्रारंभापासून घडलेलं सर्व सांगितलं. यावर विजयवर्धन म्हणाला—"गुरुजी, मी आता जाऊन आपल्या वडिलांना घेऊन येतो नि आपल्या समोर त्यांचा शिरच्छेद करतो." आणि तो परत जायला निघाला.

शिष्याला थांबवीत यज्ञकर्म म्हणाला—"वत्स, तुला आठवतंय, एकदा तू मला गुरुदक्षिणा घेण्याबाबत खूप आग्रह केला होतास! मी तुला सांगितलं होतं—योग्य वेळी मी आपली गुरुदक्षिणा मागून घेईन." कदाचित् आता ती वेळ आलेली आहे.

विजयवर्धनने हात जोडून भक्तिपूर्वक निवेदन केलं—"गुरुजी, आपण आज्ञा करावी. आपल्या आज्ञेचं पालन करायला मी तयार आहे."

शांतपणे यज्ञकर्माने मागणी केली—"वत्स, आपल्या पित्याला प्राण-दान दे. एवढ्याच गुरु-दक्षिणेची तुझ्याकडून अपेक्षा आहे.

"गुरुजी, आपली आज्ञा शिरोधार्य आहे." असं म्हणून विजयवर्धनने गुरुच्या पायांना स्पर्श केला नि तो तेथून निघाला.

आपली गोष्ट संपूर्ण करीत वेताळाने प्रश्न विचारला—"राजा, ज्या वीरसेनने आपले प्राण घेण्याचा प्रयत्न केला, मनात आणलं असतं तर आपल्या तपोबलाने यज्ञकर्म त्याची राख बनवू शकला असता. तरी पण त्याने तसं केलं नाही. राजा वीरसेनला सोडून दिलं. असं त्याने का बरं केलं? अपयशाच्या भीतीने? इच्छा असती तर राज्याभिषेक करून आलेल्या विजयवर्धनच्या हस्ते ही यज्ञकर्म राजाचा शेवट करू शकला असता. पण त्याने तसं ही केलं नाही. का? माझ्या या प्रश्नाचं उत्तर माहीत असून ही दिलं नाहीस तर तुझं शिर धडापासून वेगळं होईल!"

यावर राजा विक्रम म्हणाला—"मुनि यज्ञकर्म सर्वसंगपरित्यागी महात्मा आहे. तो राग-द्वेषाच्या पलिकडे आहे. अशा व्यक्तीला अपयशाचं भय नाही, नि कीर्तीची लालसा नाही. अशा महात्म्याचे शत्रु अज्ञानी असतात, ते त्यांना थोडं दटावून, सूचना देऊन सोडून देतात. या महापुरुषात सूड घेण्याची भावना कधी नसते. म्हणूनच यज्ञकर्माने गुरुदक्षिणेच्या नावावर आपल्या शिष्य विजयवर्धनला वीरसेनाची हत्या करण्यापासून परावृत्त केलं. अशा रीतीने एक गोष्ट निर्विवाद सत्य आहे की यज्ञकर्माच्या व्यवहारात कीर्ति-अपकीर्तीला कोठे ही थारा नाही!"

अशा रीतीने राजा विक्रमाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य झाला नि पुन्हा झाडाच्या फांदीवर लटकू लागला.

(कल्पित)

[आधार—एन्. आर्. शिवनागेश यांची एक कथा]



# राजेशाही ऐट

**वि**जयपुरीवर राजा वीरवर्माचे शासन चालू होते. आपले पूर्वज व वंशाची प्रतिष्ठा याबद्दल राजाच्या मनात अत्यन्त आदर व गौरवभावना होती. एके दिवशी दरबार संपल्यावर राजा व विदुषक तेथेच बसून गप्पा मारत होते. इतक्यात दोन वर्षांचा छोटा राजकुमार कुमारवर्मा तेथे आला.

आपल्या मुलाला प्रेमाने उचलून सिंहासनावर बसवत राजा त्याला म्हणाला–"बाळा, आपली राजेशाही ऐट कशी असते, ते दाखव बरं आपल्या विदुषकाला!"

जसे काही आपल्या पित्याचे बोलणे समजलेच. अशा प्रकारे छोटा राजकुमार पायावर पाय टाकून अगदी आरामात मागे रेलून बसला. ते पाहून एकदम खुष होत राजा ओरडला– "शाबास बाळा, शाब्बास!" अन् विदुषकाकडे वळून तो म्हणाला–"पाहिलंस ना, माझा मुलगा कसा राजसी थाट दाखवत आहे!"

यावर विदुषक म्हणाला–"हां महाराज, पहातोच आहे नं! राजकुमाराचं वय ते काय, पण या वयात सुद्धा कशी ऐट दाखवत आहेत छोटे कुमार!"

विदुषकाच्या या प्रशंसेने खुष होऊन राजा वीरवर्माने त्याला एक रत्नमाला बक्षिस दिली. यानंतर सिंहासनावरून उतरून कुमार खाली खेळू लागला. विदुषक त्याला पुन्हा म्हणाला–"कुमार, पुन्हा एकदा आपली ऐट दाखवा ना!"

पण विदुषकाकडे बिलकुल लक्ष न देता कुमारवर्मा तसाच खेळत राहिला. आता मात्र राजाचा चेहरा वाकडा झाला.

इतक्यात विदुषक हसून म्हणाला–"महाराज, पुन्हा एकदा कुमारने आपल्या वंशाची रीतच दाखवून दिली? त्यांनी फक्त आपल्या पित्याची आज्ञाच पाळली, इतरांची नव्हे! बरोबर नं?"

विदुषकाच्या या समयोचित बोलण्यावर खूष होऊन राजाने पुन्हा एक मौल्यवान अशी मोत्यांची माळ त्याला बक्षिस दिली.



चांदोबा पुरवणी–३२

# महान् स्वप्नदर्शी भारत

## फाळणी म्हणजे प्रगति नव्हे?

**१९४०** ते ४६ या भारताच्या इतिहासातील महत्त्वाच्या कालात स्वातंत्र्य-समरातील सैनिक मौलाना अबुल कलम आजाद यांनी भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेसचे अध्यक्ष-पद भूषविले होते. सर्वजनप्रिय मौलाना आजाद यांचा जन्म १८८८ मध्ये झाला. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यापासून १९५८ मध्ये आलेल्या मृत्यु पर्यंत ते केन्द्रीय शिक्षण-मंत्री होते.

मौलानांनी भारताच्या फाळणीचा घोर विरोध केला. विशाल भारताची दोन देशात वाटणी करण्याचे काय भयंकर परिणाम होतील, याबद्दल मौलानांनी १९४६ मध्ये लिहिले होते–"देशाची फाळणी करण्यामुळे आपल्या समस्या सुटणार नाहीत. विभाजनामुळे आपापसातील बेबनाव व स्पर्धा वाढेल आणि दोन्ही देशातील अल्पसंख्य लोकांची दु:खे वाढतील. आज आपल्यात जी स्पर्धा नि द्वेष आहे, तो तात्कालिक आहे असं मला वाटतं." एकदा ग्लॅडस्टन म्हणाला होता– "पाण्याचे भय दूर करण्यासाठी पाण्यात उतरून पोहणंच अधिक चांगले! त्याच प्रमाणे आपल्या समस्या सोडविण्यासाठी ती जबाबदारी आपण आपल्या शिरावर घेणे उत्तम. हाच योग्य मार्ग होय." जर मौलानांचा सल्ला आपण मानला असता तर आज आपल्या या उपखंडात अधिक शांति नांदली असती!

## तुम्हाला माहीत आहे?

१. एक प्रसिद्ध इतिहासकार लेनपूल एका प्रतिष्ठित व्यक्तीबाबत म्हणाला होता–"रडत-खडत त्याने जीवनात प्रवेश केला, नि रडत-खडतच तो मेला!" ही प्रसिद्ध व्यक्ति कोण?

२. जगात फार खोल खाणी कोठे आहेत?

३. फार पूर्वी पारशी लोक भारतात केव्हा आणि कोणत्या प्रांतात आले?

४. भारतातील सर्वात मोठं स्वच्छ सरोवर कोणतं?

[पान ३६ पहा]



# सरस्वती

प्राचीन काळी पवित्र सरस्वती नदीच्या किनाऱ्यावर अनेक ऋषि-मुनी रहात असत. त्यांच्या तोंडून अनेक अद्भुत श्लोक प्रकट झाले. स्वच्छ-शीतल पाण्याने भरलेली पवित्र ज्ञानवाहिनी माता सरस्वतीच्या सदय अंत:करणाने ही अद्भुत वाक्-शक्ति नि अनंत आध्यात्मिक प्रेरणा आपल्याला दिली असे ऋषि मानत.

ज्याप्रमाणे धन-संपत्तीची अधिदेवता सागरपुत्री लक्ष्मी व शक्तीची देवता पर्वत-राजपुत्री पार्वती, त्याप्रमाणे सरस्वतीला विद्येची अधिष्ठात्री देवता मानले जाते. असं म्हणतात की विद्वानांच्या जिव्हाग्रावर वसत असलेली वाग्देवी सरस्वती ही पर-ब्रह्माच्या मुखातून अवतीर्ण झाली. विद्याध्ययन सुरू करण्यापूर्वी शारदा-मातेची पूजा करण्याची प्रथा आहे. हृदयाला आल्हाद देणारी नि मनोविकास घडवणारी माता सरस्वती आहे असे मानले जाते. ती शुभ्र वस्त्रे व अलंकार धारण करणारी आहे, असा पुराणात उल्लेख आहे. वीणा आणि पुस्तकधारिणी वाणीचं वाहन आहे हंस!

### किती किती युद्धे

शेवटी एकदाचं खाडी-युद्ध संपलं, जग भर लोकांना बरं वाटलं. या संदर्भात नार्वेच्या एका गणितज्ञाने युद्धांबाबतचे काही आकडे मिळवले. गेल्या ५,५६० वर्षांत झालेल्या युद्धात खाडी युद्धाचा क्रमांक १४,५६१ वा आहे. या आकडेवारी वरून असे लक्षात येते की सरासरी २.५ वर्षात एक युध्द झाले!



## चांदोबाच्या बातम्या




### अमेरिकेतून रामायणाचा पहिला अनुवाद !

अमेरिकेत रामायणाचा इंग्रजी अनुवाद प्रथमच होत आहे. तीन विद्यापीठातील पाच संस्कृत पंडितांनी हा कार्यक्रम बारा वर्षांपूर्वी सुरू केला. प्रिन्स्टन विद्यापीठाने नुकताच तिसरा भाग प्रकाशित केला. आणखी चार भाग प्रकाशित झाले की संपूर्ण रामायण संपेल. पंचवीस वर्षांपूर्वी बडोद्याहून निघालेल्या सुधारित रामायण काव्याच्या आधारे हे अनुवाद कार्य चालू आहे.

# साहित्य सोनियाचिया खाणी

१ रॉबिनसन क्रूसो बेटावर किती दिवस राहिला होता ?

२. 'फुल सर्कल' नावाने आपली आत्मकथा कोणी लिहिली आहे ?

३. दोन ब्रिटिश प्रधान मंत्र्यांनी 'द पास्ट मास्टर्स' आणि 'एपी.एम्. ऑन पी.एम्.' नावाची दोन पुस्तके लिहिली. ते प्रधान मंत्री कोणते ?

४. शेक्सपीयरच्या नाटकांपैकी एक आहे–"ऑल इज वेल दॅट एण्डस् वेल्!" प्रसिद्ध रशियन कादंबरीकाराने आपल्या एका कादंबरीला हेच नाव दिले होते. ती कादंबरी कोणती ? तिचा लेखक कोण ?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे ?

१. हुमायून. लहान असताना तो मरता मरता वाचला. आपल्या अंतिम काळात तो पायऱ्यांवरून पडला नि मरण पावला.

२. बंगलोर जवळच्या कोलार येथील सोन्याच्या खाणी.

३. इ. सन पूर्व ७६० मध्ये, ते गुजरात मध्ये आले.

४. काश्मीरच्या खोऱ्यातील उलर सरोवर.

### साहित्य

१. २३ वर्षे, २ महीने आणि १९ दिवस.

२. सर एंथनी ईडन.

३. हेरॉल्ड मॅकमिलन, हेरॉल्ड विल्सन.

४. 'वॉर अँड पीस,' लिओ टॉल्स्टॉय.

जगातल्या पौराणिक कथा–६

## अदृश्य आवाजाचा इशारा

राजकुमारी अॅटलांटा फार सुन्दर तरुणी होती. एकदा ती डोंगराळ भागात फिरत असताना १ चमत्कारिक आवाज तिच्या कानी आला. त्या आवाजाने तिला इशारा दिला की तिने अजिबात विवाह करू नये; केल्यास तिच्यावर संकट येईल.



पण त्याच वेळी तिच्याशी विवाह करू इच्छिणाऱ्या देशोदेशीच्या राजकुमारांच्या मागण्यांवर मागण्या तिच्या पित्याकडे येत होत्या. अॅटलांटाचा विवाह यापैकी कोणाशी करून द्यावा याबद्दल राजा विचारात पडलेला होता.





अॅटलांटाही काळजीत पडली. आपण विवाह न करायचा निर्णय घेतला तरी आपला पिता ते कदाचित् मानणार नाही; आणि जबरदस्तीने कोणाशी तरी आपला विवाह लावून देईल असे तिला वाटले. त्यामुळे खूप विचार करून एका विशेष निर्णयावर येत ती राजाला म्हणाली–"पिताजी, पळण्याच्या शर्यतीत मला हरवू शकेल अशाच तरुणाशी मी विवाह करीन." राजाने तिची ही अट मान्य केली.



अशी घोषणा केली गेली की शर्यतीत जे हरतील त्यांची शिरं उडवली जातील. हिप्पोमेनस नावाच्या एका युवकाला या स्पर्धेत पंच म्हणून काम दिले गेले. सर्व बघ्यांच्या लोकांसमोर स्पर्धा सुरू झाली अन् हवेपेक्षाही वेगाने धावून अॅटलांटाने सर्वांना हरवले.

हरलेल्या साऱ्या युवकांना मृत्युदण्ड दिला गेला. यानन्तर आणखी काही युवक पुढे आले, व त्यांनीही मरणाला मिठी मारली. इतके होईपर्यंत पंच म्हणून काम करणाऱ्या हिप्पोमेनसला वाटले की, आपणही या स्पर्धेत भाग घ्यावा, अन् आपले नशीब आजमावून पहावे.





अॅटलांटाचे हिप्पोमेनसवर फार प्रेम होते. त्यामुळे त्याला स्पर्धेत भाग घेऊ द्यावा की नाही याबद्दल तिच्या मनात द्वन्द्व सुरू झाले. इकडे हिप्पोमेनसने एकान्तात जाऊन व्हीनस देवीची प्रार्थना केली.

व्हीनस देवता खूष झाली. हिप्पोमेनसला प्रत्यक्ष दर्शन देऊन तिने त्याच्या हातात तीन सफरचन्दे दिली. त्यांचे काय करायचे हेही तिने हिप्पोमेनसला नीट समजावून सांगितले. हिप्पोमेनस खूप आनन्दला. मोठ्या भक्तिभावाने त्याने देवीला प्रणाम केला.





अॅटलांटा व हिप्पोमेनस यांच्यात पळण्याची शर्यत सुरू झाली. ती चढाओढ बघायला लोक खूप मोठ्या संख्येने हजर राहिले. अॅटलांटाने पळायाला सुरुवात केल्यावर हिप्पोमेनसने एक सफरचन्द तिच्यासमोर टाकले.

इतके सुन्दर फळ पाहून अॅटलांटाला ते उचलून घ्यावेसे वाटले. वेग कमी करून ते पकडण्याच्या मागे लागली ती. या अवधीत हिप्पोमेनस तिला ओलांडून पुढे निघून गेला. त्याच्या या युक्तीवर खूश होऊन लोकांनी टाळ्या वाजवल्या.





नंतरही दोन वेळा त्याने उरलेली दोन सफरचन्दे अशीच ॲटलांटासमोर टाकली. ती उचलू नयेत असे वाटूनही दोन्ही वेळा मोहात पडून त्यांना उचलण्यासाठी ॲटलांटा थांबली आणि दोन्ही वेळा हिपोमेनस तिला मागे टाकून, आपण पुढे जाण्यात सफल झाला. अशा प्रकारे शेवटी चार पावले तिच्या पुढेच राहून हिपोमेनसने ती शर्यत जिंकली.

आता मात्र त्या अदृश्य आवाजाचा इशारा लक्षात न घेता ॲटलांटाने हिपोमेनसशी विवाह केला. दोघेही खूप खूप झाले. पण त्या आनन्दात व्हीनस देवीकडे जाऊन तिचे आभार मानायला हिपोमेनस विसरला.





त्याची ही उपेक्षा पाहून व्हीनसला फार राग आला. सिबिली नावाच्या एका देवीच्या द्वारे तिने या जोडप्याला शाप दिला. दुसऱ्याच क्षणी त्या नूतन दांपत्याचे वाघात रूपान्तर झाले. अशा तऱ्हेने ॲटलांटाला जो इशारा मिळाला होता तो खरा ठरला.




एके काळी रोममधे यूनान नावाचा एक राजा राज्य करीत असे. मोठा शूर व बलशाली होता तो. अनेक सामन्त राजे त्याच्या वर्चस्वाखाली होते. या राजाला एक विचित्रसा त्वचारोग होता. अनेक मोठ मोठ्या वैद्यांच्या उपायानेही तो बरा होऊ शकला नव्हता. राजाला आता असे वाटू लागले की–'या रोगातून काही आपली सुटका नाही!'

पण एकदा रैयान नावाचा एक म्हातारा वैद्य कुठूनसा रोममधे आला. अनेक प्रकारच्या रोगांचे निदान करण्यात तो मोठा तरबेज होता. त्याने जेव्हा राजाच्या त्वचारोगाबद्दल ऐकले, तेव्हा तावडतोब राजाला भेटून वैद्य म्हणाला–"महाराज, मला आपणावर इलाज करायची परवानगी द्यावी. मी आपला रोग नक्की बरा करू शकेन."

"खरोखरीच तू मला रोगमुक्त केलेस, तर मी तुला मालामाल करून सोडीन अन् आपल्या परिवारात सामिल करून घेईन." राजा म्हणाला.

यानन्तर वैद्याच्या रहाण्याची व्यवस्था करून देण्यात आली. रैयानने एक विशेष असे औषध बनवले. त्याने एक लाकडी हातोडी बनवून त्यात एक भोक पाडले. त्या भोकात त्याने आपण बनवलेले ते औषध भरले, आणि त्यावर वरून एक पोकळ व लांब असा दांडा घट्ट बसवला. अशा प्रकारे बनलेली ती लांब दांड्याची हातोडी घेऊन वैद्य राजाकडे गेला व म्हणाला–"महाराज, आज आपण ही हातोडी घेऊन 'पोलो' खेळायला जा. हाताच्या तळव्यांना घाम येईपर्यंत या हातोड्याने आपण पोलो खेळत रहा. बास, हाच आपल्या रोगाचा इलाज! आपला रोग नक्की बरा होऊन जाईल पहा!"

रोममधील लोककथा




आपले अनुचरं बरोबर घेऊन, राजा घोड्यावर बसून 'पोलो' खेळायला निघाला आणि वैद्याने दिलेल्या हातोडीच्या साह्याने तो खेळ खेळू लागला. हातांना चांगला घाम येईपर्यंत तो पोलो खेळत राहिला.

नंतर वैद्य राजाला स्नानगृहात घेऊन गेला आणि त्याने राजाला छानशी आंघोळ घातली. यानंतर राजाला झोपवून ठेवून वैद्य आपल्या घरी निघून गेला.

राजा झोपेतून जागा झाला, तेव्हा त्याच्या अंगावरच्या त्वचारोगाचा कुठे पत्ताच नव्हता! ते पाहून राजाच्या आश्चर्याला आणि आनन्दाला काही पारावार उरला नाही!

त्या दिवसापासून, वैद्याचे कित्ती कौतुक केले तरी, राजाची जीभ थकत नसे. तो म्हणे–"अरे, असा वैद्य जगात आणखी कुठे असेल तरी का? लाकडी हातोड्याच्या पोकळ नळीद्वारा याने औषध माझ्या शरिरात भिनवलं अन् मोठ्या अद्भुत रीतीने माझा रोग बरा केला!" दररोज दरबारात बोलायचा विषय 'वैद्य' हाच झाला आता! अन् दररोज वैद्याला नजराण्यांवर नजराणेही पोचत राहिले.

पण हा सर्व प्रकार पाहून राजाच्या अमात्याचे मात्र पोट दुखू लागले. राजा व वैद्य यांच्यात फूट पाडायच्या उद्देशाने तो एकदा राजाशी एकान्तात बोलू लागला–"महाराज, आपण माना किंवा नका मानू, पण या वृद्ध वैद्याला आपण इतकं जवळ करत आहात हे बरे नव्हे! एकाद्या दिवशी आपणावर त्याच्यामुळे मोठे संकट गुदरेल!"

यावर राजाने आश्चर्याने विचारले–"अमात्य! हे काय बोलत आहात? तुमचं डोकं तर फिरलं नाही? मोठमोठ्या वैद्यांना माझा जो रोग दूर करता आला नाही, तो रैयानने जणू काही जादू करावी, असा दूर केला!"

"पण महाराज, आपण पुढचा विचार करत नाही आहात! रैयान इतका कुशल अन् शक्तिशाली आहे, हीच गोष्ट मुख्यत: धोक्याची आहे! ज्याच्या अंगात इतकी शक्ति आहे, तो उद्या आपल्या हातात आणखी काही पकडायला देऊन आपला जीवही घेऊ शकेल की नाही?" अमात्याने विचारले.

राजा एकदम सुन्नच झाला हे ऐकून! हा विचार तर त्याला एकदम नवाच होता! स्वत:ला सावरत राजाने विचारले–"तुम्ही म्हणता ते ही बरोबरच आहे! मग आता, या बाबतीत तुमचा पुढला विचार काय?"

"आपण माझं मत विचारत असाल, तर मी असं म्हणेन की त्या वैद्याचं मस्तक उडवून द्यावं. त्याला जास्त वेळ दिला तर तो नक्कीच आपणाला संकटात लोटेल!" अमात्याने सल्ला दिला.

"वा वा! तुमचा सल्ला तर अगदी बिनतोड आहे." असे म्हणून राजाने वैद्याला बोलावणे धाडले.

वैद्य तातडतोब राजासमोर हजर झाला आणि म्हणाला–"मी आपल्या सेवेला हजर आहे, महाराज! बोला, काय आज्ञा आहे?"

"मला तुझं डोकं उडवायचं आहे! त्यासाठीच बोलावलंय मी!" राजा कठोरतेने म्हणाला.

हे ऐकून वैद्य चमकलाच! हा तर त्याच्यावर अचानक वज्राघातच होता!




त्याने विचारले–"महाराज, माझ्या हातून न कळत आपली काही आगळीक घडली का?"

"मला आत्ताच समजलं की तू शत्रु-पक्षाचा गुप्त हेर असून माझा जीव घेण्यासाठीच इथे आलेला आहेस! तेव्हा तू माझ्यावर आडून वार करण्याऐवजी, मीच तुझ्यावर प्रत्यक्ष वार करायचं ठरवलंय! तयार रहा आता मरायला!" राजा म्हणाला.

"महाराज, नक्कीच कोणी तरी आपल्या कानात विष ओतलंय माझ्याविरुद्ध! ठीक आहे, हरकत नाही. प्रत्येकाला एक ना एक दिवस मरायचं तर आहेच! पण मला

एकच काळजी वाटते. मी रहातो त्या घरात एक अमूल्य असा वैद्यक ग्रन्थ आहे. आपण माझी भेट म्हणून त्याचा स्वीकार करावा. त्यात अपूर्व अशी रहस्ये सापडतील. माझं शिर धडापासून वेगळं केल्यानंतरही आपण त्याच्याशी कसे बोलू शकाल, या विषयीचं रहस्यही त्यात लिहिलेलं सापडेल आपणाला! अन् अशा प्रकारची कित्ती तरी रहस्यं असतील त्यात!" वैद्य बोलला.

तो अद्भुत ग्रन्थ आपण तावडतोब पहावा अशी इच्छा राजाच्या मनात उत्पन्न झाली. त्याने आपला एक नोकर पाठवून रैयानच्या घरातली सगळी पुस्तके मागवून घेतली. त्यातले वैद्याने सांगितलेले पुस्तक काढून तो त्याची सारी पाने भराभर उलटून पाहू लागला. पण पाने एकमेकांना चिकटली असल्यामुळे दरवेळी जिभेला बोट लावून त्या ओल्या बोटाने राजा पान उलटू लागला. काही पाने उलटल्यावर राजाने वैद्याला विचारले–"अरे, यात तर काहीच नाही! पानं सारी कोरीच दिसतायत!"

आणखी काही पानं उलटा महाराज! डाव्या बाजूच्या एका पानावर तीन ओळी लिहिलेल्या सापडतील!" वैद्य बोलला.

आणखी तीन चार पाने उलटताच राजा एकदम धाडकन् खाली पडला! एकदम हाहा:कार झाला व सर्वजण राजाकडे धावले. पण, तोपर्यंत राजाचा प्राण उडूनही गेला होता! राजाने जी पाने उलटली होती त्यांना एक अत्यंत प्रभावी असे विष चोपडलेले होते! पाने उलटण्यासाठी राजाने जेव्हा जेव्हा जिभेला बोट लावले, तेव्हा तेव्हा ते जहर राजाच्या पोटात जात राहिले आणि शेवटी तो खाली कोसळला.

अशा प्रकारे मन्त्र्याच्या सल्ल्यानें, प्राण वाचवणाऱ्या वैद्याचाच जीव घेण्याचा कृतघ्नपणाचा विचार केल्यामुळे राजाने स्वतःचाच मृत्यु ओढवून घेतला.





# वीर हनुमान

रावणाचे बोलणे ऐकून सीता थरथर कापू लागली. ती फार घाबरून गेली. एक गवताची काडी हातात घेऊन रडव्या सुरात म्हणाली–

"तू माझी आशा सोडून दे. पापी माणसाला उत्तम लोकात प्रवेश जसा दुर्लभ, तशी मी तुला दुर्लभ आहे. मी उच्च कुलात जन्मलेली पुण्यवान स्त्री आहे, माझे पाऊल कधी वाकडे पडणार नाही! मी एक पतिव्रता आहे, परस्त्री आहे. तू स्वतःच्या बायकांसह जसा राहतोस, तसंच दुसऱ्यांना आपल्या बायकां बरोबर राहू दे. तुला योग्य मार्गदर्शन करणारं कोणी नाही, म्हणून तू असा चुकीच्या मार्गावर चालू पहात आहेस. अथवा विनाशकाल जवळ आल्यामुळे तू कुणाचं म्हणणं ऐकून घ्यायला तयार नाहीस. तुझ्यामुळे लंकेचा लवकरच सर्वनाश होणार आहे. तेव्हाच लोकांना संतोष होईल. मला तुझं अंतःपुर, अधिकार, संपत्ति काही ही नकोय. मी रामाची पत्नी आहे. जर तुला सुखा-समाधानाने रहायचं असेल तर त्या रामाचा मित्र हो. त्याच्या सारखा मित्र जगात अन्यत्र कोठे ही शोधून सापडणार नाही. उदारतापूर्वक तो तुला क्षमा करून सोडून देईल."

हे बोलणं ऐकून रावणाचा क्रोध अनावर झाला. तो सीतेला म्हणाला–

"सीते, तुझं हे म्हणणं ऐकून मी केव्हा ही तुझे प्राण घेऊ शकतो. तुझ्यावर मोहित असल्यामुळे आपला राग आवरून धरीत



आहे. मी तुला दिलेल्या मुदतीपैकी अजून दोन महिने शिल्लक आहेत. त्यानंतर तू माझी पत्नी होशील. हे जर तू मान्य केलं नाहीस, तर मी तुला मारून, शिजवून खाऊन टाकीन. नीट विचार करून जो काही निर्णय घ्यायचा तो घे. नाहीतर सर्व परिणामांना तयार रहा."

रावण मोठ्या क्रूरतेने सीतेला असं सांगत होता, तेव्हा तिथे असलेल्या काही राक्षसिणींच्या मनात तिच्याबद्दल दया उत्पन्न झाली. डोळ्यांवाटे त्यांनी आपली सहानुभूति व्यक्त केली. त्या सर्व राक्षसिणींना उद्देशून रावण म्हणाला–"तुम्ही ताबडतोब असं काही करा की सीतेच्या मनात माझ्याबद्दल प्रेम निर्माण होईल. साम, दाम, दंड, भेद सर्व उपाय करून पहा."

रावणाची सर्वात धाकटी पत्नी धान्यमालिनी तेथे होती. रावणाचा हात आपल्या हाती घेत ती म्हणाली–"तुमच्यासाठी एवढी मी आहे ना? आपण राक्षसांचे राजे आहात! तुम्हाला या मानवी स्त्रीची आवश्यकताच काय मुळि? तुमची पत्नी होण्याचं भाग्य ब्रह्मदेवाने हिच्या भाळी लिहिलं नाही. म्हणून ती तुम्हाला वश होत नाही. जिचं तुमच्यावर प्रेम नाही, तिची आशा करणे व्यर्थ आहे. मी या सीतेपेक्षा अधिक सुंदर नाही का? मी तुमच्यासाठी सर्व त्याग करायला तयार आहे, मग का नाही तुम्ही तिचा नाद सोडत?"

धान्यमालिनीच्या म्हणण्याकडे रावणाने फारसे लक्ष दिले नाही. मात्र तो तिथून परत फिरला. तो गेल्याबरोबर सर्व राक्षसिणी सीतेच्या भोवती जमा झाल्या व तिची निंदा करू लागल्या. एकजटा, हरिजटा, प्रघसा, विकटा, दुर्मुखी अशी नावे असलेल्या या सर्व तिला सांगू लागल्या–"रावण महान सम्राट आहे. त्यांची पत्नी बनणं ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. अशा रीतीने रावणाचा धिक्कार करणं हे मूर्खपणाचं होय! असला मूर्खपणा तू सोडून दे आणि रावणाचं म्हणणं मान्य कर. इथं तुला सर्व प्रकारचे सुख मिळेल. मग का उगाच त्या वनवासी रामाचं चिंतन करीत बसतेस?"

सीता त्यांना उद्देशून म्हणाली–"तुमचा हा उपदेश हे मोठं पाप आहे हे तुम्हाला समजत नाही. तुम्ही सर्वांनी मिळून मला खाऊन टाकलं तरी चालेल. पण रावणाची पत्नी बनणं मी कदापि स्वीकारणार नाही. समजलं?"

आता त्या सर्व राक्षसिणी सीतेला धमकाऊ लागल्या. ती सर्व बोलणी झाडावर बसलेला हनुमान ऐकत होता. सीता त्या राक्षसिणीं बरोबर येऊन हनुमान बसलेल्या शिंशपा वृक्षाखाली बसली. तेथे बसून ही ती रडतच होती.

विनता नावाची राक्षसी सीतेला म्हणाली–"तू गुणवती आणि पतिव्रता आहेस याची मी प्रशंसा करते. पण प्रत्येक गोष्टीला काही मर्यादा असते. राक्षसांचा राजा रावण सुंदर आहे, नि पराक्रमी पण आहे. त्याची पत्नी होऊन उत्तम साजश्रृंगार कर नि सुखाने रहा. रामासारखा माणूस रावणाशी शत्रुत्व करून जिवंत राहू शकणार नाही. तू रामाची आशा सोडून दे. तो वनवासी राम तुला काय सुख देऊ शकणार आहे याचा नीट विचार कर."



दुसऱ्या काही राक्षसिणी म्हणाल्या–"तुझ्या कल्याणासाठीच आम्ही हे सर्व सांगत आहोत. आमचं म्हणणं तू का ऐकत नाहीस? तुझं हे यौवन चिरकाल टिकणारं नाही. तुला ठार मारून आम्ही खाऊन टाकू."

राक्षसिणी आपापसात बोलू लागल्या–"आपण अगोदर सीतेला मारून टाकू, नंतर रावणाला जाऊन सांगू की सीता मेली. मग रावण म्हणेल–मेली असली तर खाऊन टाका तिला एकदाची. तिचं मांस आपण सर्वजणी सारखं सारखं वाटून घेऊ. नाही तर आपल्यातच भांडण सुरू व्हायचं.



या मानवी स्त्रीचं मांस फार स्वादिष्ट असलं पाहिजे. त्याच्या साठी आपल्यात भांडणं नकोत."

हे सर्व ऐकून सीतेला फार दुःख झालं. राम-लक्ष्मण आणि कौसल्या-सुमित्रा यांची आठवण करून ती रडू लागली. आपल्याला मरण येत नाही याचंच तिला अतिशय दुःख झालं.

आता पर्यंत झोपलेली त्रिजटा नावाची म्हातारी राक्षसीण सर्वांना सांगू लागली— "तुम्ही काय सीतेला खाणार? तुम्ही मला खाऊन टाका. मी आज एक भयंकर स्वप्न पाहिलं. त्यात मी पाहिलं की राक्षसांचा नाश होणार आणि रामाचा जय होणार."

"काय? काय पाहिलंस तू स्वप्नांत?" सर्व राक्षसिणी त्रिजटेला विचारू लागल्या. सर्व जणी तिच्या भोवती जमा झाल्या नि निरनिराळे प्रश्न विचारू लागल्या.

पूर्वेला सूर्य उगवत होता. त्रिजटा त्यांना म्हणाली—"शुभ्र कपडे घालून, पांढऱ्या फुलांच्या माळा परिधान करून राम लक्ष्मणासह पालखीत बसून लंकेत आला. एक हजार हंस पक्षी त्या पालखीचे वहन करीत होते. ही सीता शुभ्र वस्त्रें परिधान करून समुद्रातील श्वेत पर्वतावर उभी होती. ती जाऊन रामाला भेटली. यानंतर एका पर्वतासारख्या हत्तीवर बसून राम लक्ष्मणासह लंकेत हिंडताना मी पाहिला. नंतर सीता, राम आणि लक्ष्मण हत्तीवर बसून लंकेत फिरत राहिले. शेवटी राम सीता नि लक्ष्मण यांना घेऊन पुष्पक विमानातून उत्तर दिशेकडे जाताना मी पाहिला. आणि मी पाहिलं की रावणाने कन्हेरीच्या फुलांच्या माला घातल्या, सर्व शरीराला तेल लावलं आणि तेल पिऊन नशेच्या भरात जमिनीवर पडला. आणखी एकदा मी पाहिलं की रावण पुष्पक विमानातून खाली पडला, त्याच्या डोक्यावर केस नव्हते, त्याच्या अंगावर काळ्या रंगाचे कपडे होते, आणि कोणी एक स्त्री त्याला जमिनीरून फरफटत नेत होती.





रावण गाढवावर बसून दक्षिण दिशेकडे जाताना मी पाहिला. एकदा तो भिऊन गाढवावरून खाली पडताना ही मी त्याला पाहिलं. लाल कपडे घातलेल्या व सर्व शरीरावर चिखल माखलेल्या एका स्त्रीने रावणाच्या गळ्यात दोरी बांधून ती त्याला दक्षिण दिशेला फरपटत घेऊन चालली होती. तेथे मला कुंभकर्ण ही असाच दिसला. रावणाचे सर्व मुलगे तेलाने अभिषेक करताना मी पाहिले. रावण डुकरावर बसला होता, इंद्रजित मगरीवर नि कुंभकर्ण उंटावर बसला होता. हे तिघे ही दक्षिणेकडे जाताना मी पाहिले. फक्त विभीषणाने पांढरे कपडे घातलेले होते आणि शुभ्र फुलांच्या माळा घातलेल्या होत्या. त्याने आपल्या शरिरावर चंदनाचा लेप लावलेला होता. तो आपल्यां चार मंत्र्यांसह एका चार दातांच्या हत्तीवर बसलेला होता. लंका नगरी समुद्रात बुडाल्याचं मी पाहिलं."

अशा रीतीने बराच वेळ ती आपण स्वप्नात पाहिलेल्या गोष्टी सांगत राहिली. मग त्रिजटा म्हणाली–"आता तुम्ही दूर व्हा. रामाला सीता मिळाली असं आता समजून चला. तुम्ही सीतेला जे काही सांगत आहात, ते शांतपणे विचारपूर्वक सांगा. मला वाटतं आपण सीतेकडून अभयदान मिळविले तर फार बरे होईल."

झाडावर बसलेला हनुमान हे सर्व पहात होता, ऐकत होता. सीतेचं सांत्वन कसं करावं हे काही त्याच्या लक्षात येत नव्हतं. तिच्याशी न बोलताच परत जाणं ही योग्य नव्हतं. त्या राक्षसिणीं मध्यें शंका निर्माण करून राक्षसांशी युद्धाला आमंत्रण देणं ही बरोबर होणार नव्हतं. युद्धात यशच मिळेल याचा काय विश्वास? राक्षसांशी लढाई करून त्यांना हरवलं, तरी नंतर समुद्र पार करून जाण्याइतकी ताकत आपल्यात असेल का? अगोदर असं पाहिलं पाहिजे की आपल्याला कोणी मायारूपी राक्षस समजून सीता भिऊन जाणार नाही.





या सर्व गोष्टींचा नीट विचार करून हनुमानाने सीतेला ऐकू जाईल अशा रीतीने एक गोष्ट सांगायला सुरुवात केली–

"दशरथ नावाच्या महान राजाला राम नावाचा एक मुलगा होता. तो वडिलांच्या आज्ञेवरून आपली बायको व धाकटा भाऊ यांना घेऊन वनवासाला निघाला. रामाने अनेक पराक्रमी राक्षसांना ठार मारलं. रावणाला जेव्हा अनेक राक्षसांच्या मृत्यूचा समाचार मिळाला, तेव्हा मायामृगाच्या साह्याने त्याने सीतेला पळवून नेलं. राम आपल्या पत्नीचा शोध करू लागला. रस्त्यात सुग्रीव नावाच्या एका वानराशी त्याची मैत्री जमली. रामाने वाली नावाच्या वानर-राजाला ठार मारलं आणि सुग्रीवाला राजा बनवलं. सुग्रीवाच्या आदेशावरून हजारो वानरवीर सीतेचा शोध घेण्यासाठी सर्व दिशांना रवाना झाले. मी त्यांच्या पैकी एक आहे, शंभर योजनांचे अंतर पार करून समुद्रावरून या इथे आलो. रामाने सीतेच्या ज्या काही खाणा-खुणा सांगितल्या, त्यांवरून मी सीतेला ओळखले."

येथपर्यंत सांगून हनुमान थांबला. लक्षपूर्वक त्याची गोष्ट ऐकणाऱ्या सीतेला मोठं आश्चर्य वाटलं. डोकं वर करून तिने झाडाकडे पाहिलं. तिला हनुमान दिसला.

शुभ्र वस्त्रें परिधान केलेला झाडांच्या पानां आड लपलेला हनुमान सीतेला एकदम



विजेसारखा भासला. तिला थोडं भय वाटलं. संकटग्रस्त वानराचं रूप तिला दिसलं, म्हणून ती फार दुःखी झाली. राक्षसिणींना ऐकू जाणार नाही अशा रीतीने ती रडू लागली. रामाची गोष्ट ऐकवणारा कोणी लंकेत कसा येईल? सीतेला क्षण भर वाटलं आपण स्वप्न तर पहात नाही ना? स्वप्नात माकड दिसणं हे अशुभसूचक आहे. तिला भीति वाटली की कदाचित् रामावर तर काही संकट आलं नाही ना! पण इथं तिला झोपच कुठं येत होती? मग ती स्वप्न कशी पाहणार? ती नित्य रामाचेच चिंतन करीत असे. म्हणून रामाबद्दल हे सर्व तिला ऐकू आलं. कदाचित् हा सारा भ्रम असावा. काही ही असो,

तिने मनोमन इन्द्र, बृहस्पति, ब्रह्मदेव नि अग्नि यांना नमस्कार केला, आणि आपण जे काही ऐकलं ते सर्व खरं व्हावं अशी त्यांना प्रार्थना केली.

एवढ्यात हनुमानाने झाडावरून खाली उडी मारली. सीतेला नमस्कार करून हनुमान म्हणाला—"माते, तू मोठी पतिव्रता दिसतेस, कोण तू? अशी अश्रू ढाळीत का बसली आहेस?

तुला पाहिलं की असं वाटत – देवांशी तुझं काही नातं असलं पाहिजे. तुझे पुत्र, वडील, भाऊ नि पति कोण बरे? वनस्थानातून अपहरण केली गेलेली सीता तू असलीस तर मला सांग. तुझं सर्व प्रकारे कल्याणच होईल."

यावर सीता हनुमानाला म्हणाली—

"मी महाराजा दशरथांची सून आहे. विदेह राजा जनकाची मी मुलगी. माझं नाव सीता. रामाच्या घरी मी बारा वर्षे सर्व सुखे अनुभविली. तेराव्या वर्षी जेव्हा रामाच्या राज्याभिषेकाची तयारी सुरू झाली, तेव्हा दशरथाच्या पत्नींपैकी एक कैकेयी म्हणाली की रामाचा राज्याभिषेक होणार असेल तर ती अन्न-पाणी सोडून मरून जाईल. ती असं ही म्हणाली की रामाला वनवासाला पाठवावं. महाराजा दशरथांनी पूर्वी एकदा कैकेयीला वरदान दिलं होतं. म्हणून वचन-भंगाच्या दोषातून मुक्त होण्याासाठी दशरथाने रामाला राज्य देण्याचा विचार सोडला. पित्याचे वचन पाळण्यासाठी वल्कले परिधान करून निघालेल्या रामाने मला कौसल्येजवळ रहावयास सांगितले. मी रामाला सोडून स्वर्गात सुद्धा राहू शकणार नाही. म्हणून मी रामाच्या अगोदर जंगलात जाण्यास तयार झाले. आम्ही दंडकारण्यात रहात होतो, तेथून या दुष्ट रावणाने मला पळवून आणली. रावण मला म्हणाला की आणखी दोन महिने मी जिवंत राहीन. नंतर तो मला मारून टाकणार आहे."

हे सर्व ऐकून हनुमान उदास झाला आणि सीतेचं सांत्वन करू लागला.





# राजकन्येचा हट्ट

छितकुल गावात छगन नावाचा एक तरूण रहात असे. त्याचे आईबाप वारल्यामुळे तो आपल्या मामाकडे रहात असे. त्याची मामी ब्रह्मदेवी फार तोंडाळ बाई होती. छगन ज्या दिवशी त्यांच्याकडे रहायला आला, त्या दिवसापासून तिने घरातली मोलकरीण आणि शेतावर काम करणारा नोकर, या दोघांनाही कामावरून काढून टाकले. त्या दोघांचेही काम आता एकट्या छगनलाच करावे लागे. एक वर्ष पुरं होण्यापूर्वीच जड काम करताना एकदा छगनचा डावा हात अजिबात कामातून गेला, तो लुळा झाला.

छगन आता एका हातानेच सारी कामे करी, पण ब्रह्मदेवीला त्याची मुळीच दया येत नसे. ती स्वतः खूप लठ्ठ असल्यामुळं हालचाल करायला तिला जरा त्रासच होत असे. नेहमीच दमल्यासारखा श्वास टाकत ती व्हरांड्यातल्या झोपाळ्यावर हळूहळू झोका घेत भईमुगाच्या शेंगा सोलून खात बसलेली असे. खाता खाता ती छगनला शिव्या देई. बडबड ऐकून अलिकडे छगनला वाटू लागले होते की ही मामी 'ब्रह्मदेवी' कसली, आपल्यासाठी तर ती 'ब्रह्मराक्षसी' च आहे!

एका वर्षी फार पाऊस पडला. छितकुल गाव अन् आसपासच्या मुलखातलं भुईमुगाचं सारं पीक कुजून वाया गेलं. आसपास कुठेच शेंगा मिळेनात. एकदा मामीला कळलं की शहरात एका ठिकाणी शेंगा स्वस्त मिळत आहेत. तिने लगेच छगनला बोलावून म्हटले, "जा शहरात जाऊन एक पोतंभर शेंगा घेऊन ये. पण भाड्याची गाडी वगैरे नाही करायची हं, याद राख! पोतं आपल्या खांद्यावर घेऊन ये. भाड्यात पैसे घालवलेस तर पाठच सोलून काढीन!"

विराज अवचट



छितकुल गाव आणि शहर यांच्यामधे एक जंगल होतं. जंगलात रानटी जनावरांची नेहमीच भीती असे. पण छगनला नाइलाजाने एकट्यानेच जावं लागलं. शहरातून पोतंभर भुईमुगाच्या शेंगा घेऊन तो परतीच्या वाटेला लागला.

जंगलाच्या रस्त्याने जरासं चालल्यावर पोत्याच्या भाराने छगन दमला आणि पोतं खाली उतरवून एका झाडाखाली बसून श्वास टाकू लागला. अशी दोन-मिनिटंच गेली असतील नसतील, एवढ्यात हातात एक वाकडी-तिकडी काठी घेतलेली एक म्हातारी एकदम झपकन तिथे आली. तिच्या अंगावरचे कपडे काळे होते आणि सारे केस पिंजारलेले होते. तिने छगनला विचारलं—"कोण रे तू? बी पेरण्यापासनं—हे शिरीषाचं झाड मी वाढवलं. माझी जागा आहे ही, बरा आरामात बसला आहेस रे? उं?" तिचा अवतार अन् किच्च आवाजातलं बोलणं ऐकून छगन धैर्य एकवटून बोलू लागला—

"मी आहे आत्याबाई, आपला छगन! तुझ्यात अन् माझी मामी ब्रह्मदेवी यांच्यात किती फरक आहे! काय आश्चर्य हे!"

हे बोलणं ऐकून म्हातारी म्हणाली—"काय म्हणालास? आश्चर्य वाटतं? अरे, मला पाहूनच माणसांची दातखीळ बसते, तुला नुसतं आश्चर्यच वाटतंय? तुझं धारिष्ट पाहून मी तर खूष झालेय तुझ्यावर! हं, काय म्हणत होतास? माझ्यात अन् तुझ्या मामीत कसलंच साम्य नाहीय? मग सांग तर तुझी मामी कशी आहे?"

यावर छगन हळूच म्हणाला—"माझी मामी चांगली लठ्ठ आहे, पण तू तर वाळक्या, जळक्या लाकडासारखी बारीक आहेस. तुझा वेष अन् रूप पाहून चुकून एखाद्याला वाटेल की तू एक जादुगारीणच आहेस!"

त्याचं हे बोलणं ऐकून हातातली काठी हवेत फिरवत म्हातारी. म्हणाली—"अरे बावळटा! कुणाला तसं वाटलं तर चूक नव्हेच. मी खरोखर जादुगारीणच आहे रे! किती जादूटोणा शिकला तरी शरीराची रोग व्याधी सुटत नाही बघ. त्यामुळेच मी अशी वाळक्या लाकडासारखी झालेय. अच्छा, या पोत्यात काय आहे रे?" असं विचारत म्हातारीने काठी पोत्यात भोसकली.

पण लगेच पोतं दोन्ही हातांच्या कवेत घट्ट पकडत छगन म्हणाला—"यात भुईमुगाच्या शेंगा आहेत. मामी हे दाणेच खूप खात असते. तिच्या शक्तीचं अन् तब्येतीचं रहस्य यातच आहे."

"हां, अस्सं बोल ना! हल्ली माझ्या अंगात मुळीच ताकद राहिली नाही. या शेंगा मला देऊन टाकून आपल्या वाटेनं जा कसा!" ती जादुगारीण एकदम म्हणाली.

"बाप रे! या शेंगा तुला देऊन टाकल्या, तर मामी मला जिवन्त ठेवील का? या पोत्यात माझा जीवच अडकलेला आहे जादुगार आत्याबाई!" छगन उत्तरला.

त्याचं बोलणं ऐकून जादुगारीण जरा विचारात पडली. मग म्हणाली—"अच्छा. ऐक तर! शक्ती देणाऱ्या या शेंगांच्या बदल्यात मी तुला एक कोंबडी देते. ही कोंबडी अंडी न घालता सरळ पिल्लंच जन्माला घालते बघ! असली कोंबडी जगात कुठ्ठे मिळायची नाही."

"हूं! ही कोंबडी तर मामी रात्रीच भाजून खाऊन टाकील." छगन म्हणाला.



"बरं, मग कोंबडीबरोबरच दुधाऐवजी पाणी देणारी एक गायही देते मी तुला, मग तर झालं?" जादुगारणीने आणखी मधाचं बोट लावलं.

"दुधाऐवजी पाणी देणाऱ्या गायीला माझी ब्रह्मराक्षसी मामी ब्रह्मदेवी घराच्या आवारात पाऊल नाही ठेवू द्यायची. तुझी ही देणगी पण कुचकामी आहे आत्याबाई." छगनने तरीही ताकास तूर लागू दिला नाही.

"मग आता ऐक तर. या दोनांबरोबर मी तुला एक बोलणारा कावळा पण देते. ठीक आहे? आता तरी कबूल हो ना!" जादुगारीण गयावया करू लागली.



"माझ्या मामीसमोर माणसाचीही तोंड उघडायची शामत नाही, तिथे कावळे न कुत्रे काय बोलणार?" छगनने विचारलं.

आता मात्र म्हातारीचे डोळे भरून आले. ती म्हणाली–"मला ही आपल्या मामी-सारखीच मान बाळा. माझ्याजवळ या प्राण्यांशिवाय आणखी काहीच राहिलेलं नाही. हे तीन्ही प्राणी घेऊन मला हे पोतं दे ना! आभारी होईन तुझी."

म्हातारीच्या डोळ्यातलं पाणी पाहून छगनचं मन द्रवलं. त्याने ते पोतं म्हाताऱ्या जादूगारणीला देऊन टाकलं, अन् छगनला तिने पिल्लं देणारी कोंबडी, पाणी देणारी गाय अन् बोलणारा कावळा हे प्राणी देऊन टाकले.

सूर्योदयाच्या सुमारास छगन तेथून निघाला. कावळा त्याला म्हणाला–"तू पुढे चालत रहा, मी तुझ्या मागे-मागे उडत येईन. जोरात टाळचा वाजवून मला बोलावलंस, की मी तावडतोब येऊन तुझ्या खांद्यावर बसेन. मी कुठे पळून बिळून जाईन अशी भीती बाळगू नकोस."

जंगलातल्या पाऊलवाटेने जात जात संध्याकाळपर्यंत छगन एका गावात पोचला. पण एकाएकी पाऊस सुरू झाल्यामुळे त्याला जवळच्याच एका खाणावळीत आश्रय घ्यावा लागला. छगन तिथे जाण्यापूर्वीच खाणा-वळीत एक मोठा वैद्य आलेला होता. कोंबडीने त्या खाणावळीत अंड्याऐवजी एकदम पिल्लूच जन्माला घातलेलं पाहून वैद्याला मोठं आश्चर्य वाटलं. त्याने छगनला विचारलं. "काय आश्चर्य! ही कोंबडी तुझीच आहे ना रे?"

'हो' म्हणत छगनने डोकं हलवलं. त्याबरोबर वैद्याने विचारलं–"विकतोस ही कोंबडी मला?"

"हं! अशा खास वस्तु कोणी विकून टाकतं होय?" छगन बोलला.

"ते तर खरंच!" वैद्य म्हणाला. पण पुन्हा क्षणभर थांबून वैद्य म्हणाला–"तुझा कामातनं गेलेला डावा हात मी नीट करून देईन. माझ्याजवळ असलेला एक खास लेप मी तुझ्या हाताला लावीन, सकाळी हात एकदम ठीकठाक झालेला असेल! मग त्या बदल्यात दे ही कोंबडी मला."

छगनने वैद्याचा हा प्रस्ताव मान्य केला. रात्री वैद्याने छगनच्या अधु झालेल्या हाताला कसलासा लेप चोळला. सकाळी उठल्याबरोबर आपला हात एकदम ठीक झालेला पाहून छगनलाही आश्चर्य अन् अन् आनन्द वाटला. कबूल केल्याप्रमाणे कोंबडी वैद्याच्या हवाली करून अन् आपली गाय घेऊन छगनने त्या खाणावळीला रामराम ठोकला. दुपारपर्यंत तो एका डोंगराळ भागात पोचला. कडक उन्हामुळे सगळं अंग चिवचिवत होतं. इतक्यात एका वळणावरील झाडीतून कोणाच्याशा कण्हण्याचा आवाज छगनच्या कानी आला. जवळ जाऊन पाहिलं तो एक प्रौढ माणूस जखमी अवस्थेत पडलेला दिसला.

छगनला पाहून त्या जखमी माणसाने विचारलं–"माझा घसा सुकून चाललाय! थोडं पाणी मिळेल का तुमच्याजवळ?" जवळपास कुठे पाणी असेल अशी लक्षणं दिसत नव्हती. 'काय बरं करावं?' छगन विचार करू लागला. अचानक त्याला आपल्या गायीची आठवण झाली. पानांचा द्रोण करून त्याने त्यात गायीच्या पाण्याची धार काढली, अन् ते पाणी त्याने जखमी माणसाला पाजलं.





त्या बिचाऱ्या माणसाला थोडी हुशारी आली. त्याने मग स्वतःची हकिकत छगनला सांगितली. तो चांगला धनवान माणूस होता. गावाला जात असताना वाटेत त्याला काही चोरांनी मारझोड करून लुटलं अन् जखमी अवस्थेत झाडीत फेकून देऊन ते चंपत झाले.

"तुम्ही योग्य वेळी पाणी पाजून माझा जीव वाचवलात!" तो श्रीमन्त माणूस कृतज्ञतेने म्हणाला.

"महाराज, तुम्ही वाचलात याचं श्रेय मला मुळिच नाही हं! हे सर्व केवळ या गायीच्या कृपेने घडलं. इथे आसपास तर कुठेच पाणी नाहीये." छगन म्हणाला.

छगनचं बोलणं एकून तो जखमी माणूस आश्चर्यातच पडला. त्याने विचारलं— "दुधाऐवजी पाणी देणारी गाय! आश्चर्य!" मग त्या गायीकडे निरखून पहात तो म्हणाला—"ओहो! तर माझी प्राणदात्री ही गाय आहे तर! काही असो, पण तुम्ही जरूर माझ्या घरी यायला पाहिजे हं. माझे प्राण वाचवणाऱ्या या गायीची पूजा करायचीय मला."

मग त्या माणसाबरोबरच छगन त्याच्या घरी गेला. त्याने छगनचा चांगलाच अतिथि-सत्कार केला. गाय आपल्याच घरी ठेवून तिची रोज पूजा करावी असे ठरवून त्याने छगनला तिच्या बदल्यात सोन्याच्या नाण्यांची एक थैली बहाल केली. त्या पैशातून छगनने एक सुरेखसा सफेत घोडा आणि काही राजसी कपडे खरेदी केले. सुन्दरसा पोशाख घालून अन् घोड्यावर बसून छगनने आता थेट राजधानीचा रस्ता धरला.

नगरात पोचण्यापूर्वी छगनला एका डोंगरावर एक सुंदरसं देऊळ दिसलं. देवदर्शनासाठी तो डोंगरावर चढून गेला. त्याचवेळी तिथली राजकन्या देवदर्शन उरकून आपल्या सख्यांसह डोंगर उतरत होती. पांढऱ्या घोड्यावर बसून ऐटीत जाणाऱ्या, सुंदर पोषाखातल्या छगनला राजकुमारीने पाहिलं. ती विचारात पडली की—"हा तरुण नक्कीच कुठला तरी राजपुत्र असला पाहिजे."

आपणाकडे रोखून पहाणाऱ्या राजकन्येला पाहून छगनने विचारलं—"माझ्याकडे इतकं रोखून पहाणारी तू आहेस तरी कोण?"

त्याचा हा प्रश्न ऐकून राजकुमारीला भारीच आश्चर्य वाटलं! तिच्या मागेमागे येणाऱ्या तिच्या सख्याही गप्पच राहिल्या. तेव्हा आकाशाकडे पहात टाळ्या वाजवून छगनने आपणाबरोबर उडत येणाऱ्या कावळ्याला खाली बोलावून घेतलं अन् विचारलं—"अरे सेवका, ही अद्भुत सुन्दरी कोण आहे? ती माझ्या प्रश्नाचं उत्तर का नाही देत आहे?"

"इतकं सुन्दर रूप, अन् इतक्या साऱ्या सख्या पाहूनही आपल्या लक्षात नाही आलं? ही इथली राजकन्या असेल, तर नवल कसलं?" कावळ्याने माहिती दिली.

कावळ्याचा अन्दाज बरोबरच निघाला. कावळ्याला बोलताना पाहून ती त्रैलोक्य-सुन्दरी म्हणाली—"वा वा! काय कमाल आहे! आत्तापर्यंत असली गंमत कोणीच दाखवली नाही, आजच प्रथम पाहते आहे मी हा प्रकार!" इतकं बोलून आपल्या सख्यांसह राजकुमारी भराभरा डोंगर उतरून निघून गेली.

हे सर्व काय घडत आहे हे छगनला कळेचना! तो मुकाट्याने देवळात गेला अन् देवाला नमस्कार करून बाहेर आला.



तो डोंगर उतरून खाली आला, तेव्हा राजाची माणसं त्याचीच वाट पहात उभी असलेली आढळली त्याला! मोठ्या आदराने ते सर्वजण छगनला राजभवनात घेऊन गेले.

त्रिलोकसुंदरीचा पिता आपल्या कन्येचे लवकरच हात पिवळे करून देऊन राज्यकारभार आपल्या जावयाच्या हाती सोपवण्याच्या विचारात होता. पण राजकुमारीने हट्ट धरला होता की–"मी उगीच कोणा असल्या-तसल्याशी मुळीच लग्न करणार नाही. मला जो कोणी एकादा चमत्कार करून दाखवील, त्याच्याशीच करीन मी लग्न!" अशातच दोन वर्षं निघून गेली, पण राजकुमारी अजून कुमारीच राहिली होती.

कित्येक राजकुमार आले. आपणाकडून काही विशेष गोष्ट दाखवण्याचा त्यांनी खूप प्रयत्न केला, पण कोणीच राजकुमारीचं मन जिंकू शकला नाही. 'राजकुमारीचा विवाह' राजासमोर एक मोठा पेच बनून राहिला होता. अशातच आकाशातून उडणाऱ्या कावळ्याला खाली बोलावून घेऊन त्याच्याशी संवाद करायचा चमत्कार छगनने करून दाखवून राजकुमारीवर चांगलाच प्रभाव पाडला.

एका पंधरवड्याच्या आतच छगन व राजकन्येचा विवाह मोठ्या थाटामाटात पार पडला, अन् छगन त्या देशाचा राजाही बनला.

कावळ्याबरोबर निरोप पाठवून छगनने मामी ब्रह्मदेवी हिला बोलावून घेतलं. ती आल्यावर छगनला म्हणाली–"अरे बाळा, मी मोठी निर्दयी अन् पापीण आहे रे! आपल्या जिव्हालौल्यासाठी मी तुला शेंगांचं पोतं उचलून आणायची आज्ञा केली. तुला खूप त्रास दिला मी! माफ करशील मला छगन?"

यावर हसून छगन म्हणाला–"माझ्याशी फार मोठ्या-मोठ्या गोष्टी करू नका मामी! त्या काळातल्या कष्टांमुळे तर आज मला इतकं सुख मिळालं."





# लाकडाची सूनबाई

हस्तिनापुरात शिवदत्त नावाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याची बायको अतिशय भांडखोर बाई होती. तिला कंटाळून एके दिवशी ब्राह्मण घरातून पळून गेला आणि बैरागी बनला.

शिवदत्तला तीन मुलगे होते. थोरल्याचे लग्न झाले अन् सुनेने घरात पाय ठेवताच सासूची तणतण सुरू झाली. म्हणून एक दिवस ते दोघंही घर सोडून दुसरीकडे रहायला गेले.

आता दुसऱ्या मुलाचा विवाह झाला अन् दुसरी सून घरी आली. तिलाही या भांडखोर सासूने त्रास द्यायला कमी केले नाही. दिवसेंदिवस सासूचा त्रास सहन करणे तिलाही अशक्य झाले, अन् एक दिवस स्वतःला गळफास लावून घेऊन तिने आत्महत्या केली. या धक्क्याने शिवदत्तचा दुसरा मुलगाही हाय खाऊन मरून गेला.

शिवदत्तच्या सर्वात धाकट्या मुलाचे नाव होतं–वसुदत्त. घरातला हा सर्व प्रकार पाहून गप्प रहाणे त्याला शक्य झाले नाही. आपल्या भांडकुदळ आईला चांगला धडा शिकवायचा असे त्याने ठरवले.

एके दिवशी शेजारच्या गावी जाऊन वसुदत्तने माणसाच्या आकाराची एका तरुणीची लाकडी मूर्ती घडवून घेतली. आपल्या शेजारचेच एक घर त्याने भाड्याने घेऊन ठेवले. मध्यरात्री ती मूर्ती गाडीतून आणून त्याने कोणाला नकळत त्या घरात ठेवली अन् एका विश्वासू मोलकरणीला पहाऱ्याला बसवले. इतके सारे करून तो सकाळी घरी आईकडे आला, आणि तिला म्हणाला–"आई, मी शेजारगावी जाऊन लग्न करून घेतलंय. माझी बायको या घरात राहिली तर तुमच्यात उगीच भांडणं होतील, म्हणून मी तिला शेजारच्या घरात

रहायला ठेवलं आहे. तू तिकडे जाऊ नयेस. लक्षात ठेव हं आई!"

वसुदत्तच्या आईचा आता नाइलाजच झाला. मुलाचे बोलणे ऐकून खूप राग आला तिला. पण त्याच्याशी भांडण केलं, तर हाही मुलगा हातचा जाईल अन् मग आपण अगदी एकटं पडू—या विचाराने ती गप्प बसली. आपल्या पहिल्या दोन्ही सुनांवरचा राग, खरं तर तिला या सुनेवर काढून घ्यायचा होता.

शेवटी काहीतरी ठरवून तिने स्वतः आपल्या डोक्याला जखम करून घेतली आणि रक्त येऊ लागल्यावर स्वतःच जोर-जोरात आरडाओरडा करू लागली. आसपासचे लोक तिथे गोळा झाले. सर्वजण त्याच्या आईला विचारू लागले—"अहो काय झालं? जखम कशी झाली तुम्हाला?"

यावर वसुदत्तची आई आणखीनच जास्त रडू लागली. ती म्हणाली—"ही सगळी माझ्या नव्या सुनेची करणी बरं! मी मुकाट्याने आपल्या घरात तांदूळ निवडत होते, तर ती इथे आली अन् मुसळाने माझं डोकं फोडून पटकन् आपल्या घरात निघून गेली होऽऽ!"

हे ऐकून आसपासच्या त्या बायाबापड्या खूप चिडल्या, अन् त्या एकदम वसुदत्तच्या नव्या घरात घुसल्या, पण काय? तिथे तर केवळ लाकडाची मूर्तीच होती!

"हं, हीच माझी बायको बरं! हिनेच माझ्या आईला मुसळाने मारलं अन् पटकन् इथे निघून आली. दारही लावून घेतलं बरं का आतून तिने!" वसुदत्त व्यंगात्मक आवाजात बोलला.

आता मात्र वसुदत्तच्या आईचे बिंग फुटले! आपल्या करणीचा आता तिला पश्चात्ताप होऊ लागला. आसपासच्या बायकांनीही तिला चांगलेच फैलावर घेतले.

यानन्तर काही दिवसांनी वसुदत्तने लग्न केले अन् बायकोला आपल्या घरीच आई-जवळ आणून ठेवले. आपला सर्व दुर्व्यवहार बाजूला ठेवून वसुदत्तची आई आता आपल्या सुनेशी प्रेमाने वागू लागली.



निसर्गातील आश्चर्य :



## पाणहत्तींची धाव

नदीच्या पाण्याच्या तळावरून पाणहत्ती खूप वेगाने पळू शकतो. हा प्राणी दहा मिनिटे पर्यंत पाण्याच्या पृष्ठाखाली राहूही शकतो.



## उडणारा विशालकाय पक्षी

उडू शकणाऱ्या सर्व प्राण्यात टेरोसोर क्वेटझॉल कोट्लस नॉर्थरोपी नावाचा एक प्रकारचा डायनोसोर आकाराने खूपच मोठा असतो. जवळजवळ ६ कोटी ५० लाख वर्षांपूर्वी अस्तित्वात असणाऱ्या या प्राण्याचे अवशेष १९७४ मधे अमेरिकेतील टेक्सासमधे सापडले. या प्राण्याच्या एका पंखाचे वजन ८६ किलो आणि त्याची लांबी ५० फूट आहे.

## विषारी सस्तन प्राणी

ऑस्ट्रेलियात रहाणाऱ्या प्राण्यात डकबिल्ड प्लाटिपस हा एकच सस्तन प्राणी असा आहे की त्याच्या ग्रन्थीत वीष भरलेलं असतं!





सिंहनूक

# कंबोडियात शांतता

गेली बारा वर्षे कंबोडियात जे अंतर्युद्ध चालू होतं ते एकदाचं संपलं! याचं श्रेय अर्थात् संयुक्त राष्ट्र-संघाच्या शांति बाबतच्या प्रयत्नांना आहे. युद्धात भाग घेणाऱ्या तीन विप्लवी गटांना संयुक्त राष्ट्र-संघाने 'सुप्रीम नॅशनल कौन्सिल' मध्ये भाग घ्यायला लावून एक तह घडवून आणला आणि अशा रीतीने शांतता स्थापित झाली.

कंबोडियाचे दुसरे नाव कंप्यूशिया. दुसऱ्या विश्व-युद्धात जपानने हा देश हस्तगत करीपर्यंत तो फ्रेंच इंडो-चायनाचा एक भाग होता. १९४५ मध्ये जपानचा पराभव झाल्यानंतर हा पुन्हा फ्रेंचांच्या ताब्यात आला. सन १९५३ मध्ये फ्रान्सने कंबोडिया सोडला आणि हे एक स्वतंत्र राज्य बनले.

सन १९७० मध्ये अमेरिकेच्या मदतीने लॉननोलने अचानक बंड उभारले आणि आता पर्यंत चालू असलेल्या प्रिन्स सिहनूकच्या शासनाचा येथे अंत झाला. लॉननोलची कारकीर्द सुरू झाली आणि सिहनूक देश सोडून निघून गेला. यानंतर पाच वर्षांनी ख्मेररूजच्या नेतृत्वाखाली गोरीला शासनाची सुरुवात झाली, परंतु

कमालीची भूकमारी आणि दारूण हत्याकांडामुळे ही राजवट औट घटकेची ठरली. वीएट्नाम या शेजारी देशाने सन १९७९ मध्ये सैन्य पाठविले आणि हेंग सामरिनच्या नेतृत्वाखाली इथे नवे शासन सुरू झाले. पण कंबोडियातून वीएट्नामी सेना जशी हटू लागली तशी इथे पुन्हा अंतर्युद्धाला सुरुवात झाली आणि जवळ जवळ १२ वर्षे शेतीप्रधान कंबोडियाची आर्थिक स्थिति अत्यन्त दयनीय झाली.

इंडोनेशियाची राजधानी जकार्ता आणि थाइलंड मध्ये चर्चा झाल्या आणि त्यानुसार तीन गटांमध्ये एक समझोता झाला. प्रिन्स सिहनूक, खेमेररूज आणि खेमेर लिबरेशन फ्रंट चे सदस्य या तिन्ही गटांना सुप्रीम नॅशनल कौन्सिल मध्ये समाविष्ट करण्यात आले. प्रिन्स सिहनूक अध्यक्ष होणार नि आजचे प्रधान मंत्री हुनसेन उपाध्यक्ष.

प्रिन्स सिहनूकने सांगितले की ते नोव्हेंबर महिन्यांतच मायदेशी परत येऊ शकतील, म्हणून आता सुप्रीम नॅशनल कौन्सिलचे अधिवेशन ऑगस्ट महिन्यात थाईलंडची राजधानी बँकाक मध्ये होईल.

फार प्राचीन काळापासून भारत व कंबोडिया यांचे संबंध आहेत. जगातील सर्वात विशाल परिसर असलेले मंदिर 'आंगकरवाट' कंबोडियातच आहे. बाराव्या शतकात हे मंदिर बांधले गेले आणि येथे हिंदू मंदिरे, बौद्ध मंदिरे व अन्य इमारती आहेत. आता ही सर्व मंदिरे मोडकळीस आली आहेत. आंगकर कोणे एके काळी खेमर राज्याची राजधानी होती.






# बुद्धिमान

भूषण नावाच्या एका जमीनदाराला आपल्या जमीनदारीचा हिशोब ठेवण्यासाठी कारकुनाची गरज आहे, असे कळल्यावरून वीरेंद्र नावाचा एक तरूण त्याच्याकडे गेला.

वीरेन्द्रच्या येण्याचे कारण समजून घेतल्यावर भूषण त्याला म्हणाला–"ठीक आहे. पण तू माझ्यापेक्षाही अधिक बुद्धिमान आहेस असे सिद्ध झालं, तरच मी तुला माझ्याकडे नोकरीला ठेवीन. यासाठी तुला दोन कामं करावी लागतील. शिवमंदिराच्या मोहल्यात रहाणाऱ्या रमझाने माझ्याकडून दोन वर्षांपूर्वी दोनशे मोहोरा उसन्या घेतल्या. पण आजपर्यंत त्याने त्या परत दिल्या नाहीत. मी तर त्या त्याला बिनव्याजी दिल्या होत्या. पण हा उपकारही न मानणाऱ्या रमझाकडून ती रक्कम वसूल करू घेणं मला कठीण होऊन बसलंय. हे कर्ज जर तू प्रथम वसूल करून दाखवलंस, तर मी तुला दुसरं एक काम नंतर सांगेन."

वीरेन्द्र जमीनदाराला म्हणाला–"आता तुम्ही थोड्या वेळाने रमझाकडे या. तुमचं कर्ज तुम्हाला परत मिळून जाईल." नन्तर वीरेंद्र सरळ रमझाच्या घरी गेला, अन् त्याला म्हणाला–"रमझा, मला अचानक एक अडचण आलीय. दोनशे मोहोरांची गरज आहे मला आत्ता. यासाठी दरमहा, दरशेकडा दहा मोहोरा इतक्या दराने तुला व्याजही देईन मी, अन् तसं करारपत्रही लिहून द्यायची माझी तयारी आहे. तेव्हा आत्ता तेवढी रक्कम देऊन मदत कर ना मला!"

व्याजाच्या लोभात पडून दुसऱ्या खोलीत जाऊन रमझा दोनशे मोहोरा घेऊन आला अन् वीरेंद्रला म्हणाला–"तू रक्कम



मोजून घे, तोपर्यंत मी कर्जरोखा तयार करतो."

वीरेन्द्र मोहोरा मोजत असतानाच जमीनदार भूषण तिथे येऊन पोचला. त्याला पाहून रमझा घाबरलाच, पण वीरेन्द्र मात्र जमीनदाराला पाहून रमझाला म्हणाला–"ओऽ! मी खरं काम तर विसरूनच गेलो, अन् स्वत:च्याच अडचणीत गुंतलो! या भूषणजींनी मला तुझ्याकडे कर्जवसुलीसाठी पाठवलं होतं." आणि आता आपल्या हातातल्या मोहोरा भूषणच्या हाती देत तो म्हणाला–"मालक, नीट मोजून घ्या. दोनशे मोहोरा, 'बरोबर आहेत."

भूषण ते पाहून चाटच पडला! स्वत:ला नीट संयत करत रमझाही आता म्हणाला– "वीरेन्द्र, ही रक्कम भूषणचं कर्ज परत करण्यासाठीच मी जमवली होती. तुझी अडचण पाहून तुला ती कर्जाऊ द्यावी असा विचार करत होतो मी. माफ कर बाबा, आता तुला द्यायला माझ्याकडे एक मोहोरही शिल्लक नाही."

यावर वीरेन्द्र म्हणाला–"काही हरकत नाही रमझा, जास्त व्याज कबूल केलं, की मला कुठेही हे कर्ज सहज मिळेल, मी आणखी एकाद्या ठिकाणी प्रयत्न करीन." आणि तो जमीनदाराच्या मागोमाग निघून गेला.

या घटनेनन्तर वीरेन्द्रला शाबासकी देत भूषण म्हणाला–"हे बघ, तू माझं एक काम तर छान केलंस. तुझी बुद्धिमत्ता पाहून मला संतोष वाटला. तुझी जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडी आहे. आतां माझे दुसरे काम नीट समजून घे. या गावात माझी दोन घरं आहेत. एकात मी रहातो, आणि दुसऱ्यात सुरेन्द्र नावाचा भाडेकरी रहातो. तो दर महिन्याला भाडं देतो, पण घर खाली करायला मात्र तो तयार नाही. तीन आठवड्यात माझी मुलगी आणि जावई इकडे येणार आहेत. ते येण्यापूर्वी घर रिकामं होणं आवश्यक आहे. आता हे काम मी तुझ्यावर सोपवत आहे.



वीरेन्द्र ताबडतोब जाऊन सुरेन्द्रला भेटला. त्याच्याशी बोलता बोलता वीरेन्द्रच्या लक्षात आले, की सुरेन्द्र मोठा प्रामाणिक माणूस आहे. पण त्याबरोबच तो मोठा हट्टी आणि बेदरकारही आहे. तो म्हणू लागला की, भूषणने त्याला घर खाली करायला सांगताना काही अपशब्द वापरले होते; अन् म्हणूनच तो आता घर रिकामं करून द्यायला तयार नाही. आणि अगोदरच करारपत्र केलेले असल्यामुळे अजून दोन वर्षं तरी घर रिकामं करून द्यायची गरज नाही.

वीरेन्द्र तरीही नेटाने तीन दिवसपर्यंत सुरेन्द्रशी मैत्री ठेवून हिंडत राहिला. रोज जाताना सुरेन्द्रकडे तो मेवा-मिठाई घेऊन जायचा. सुरेन्द्रची मुलेही त्याला 'मामा–मामा' करत चिकटू लागली.

या अवधीत वीरेन्द्रने गावच्या सावकाराला भेटून म्हटले– "सुरेन्द्रला घर बदलायचं आहे. तुम्ही आपलं घर त्याला भाड्याने द्याल काय?"

सावकाराचं एक घर बरेच दिवस रिकामे पडलेले होते, आणि ही गोष्ट वीरेन्द्रला माहीत होती. म्हणूनच त्याने हे पाऊल उचलले होते. कोणी भाडेकरूच विचारायला येत -नसल्यामुळे सावकार आता खूषच होऊन गेला.



"सुरेन्द्रचा स्वभाव जर विचित्रच आहे. त्याच्या मनात आलं की लगेच घर बदलेल. तेव्हा किल्ल्या आता माझ्याच हाती द्या ना." वीरेन्द्र म्हणाला.

नंतर थोड्या वेळाने वीरेन्द्र तेथून सुरेन्द्रच्या घरी गेला, आणि म्हणाला– "मला असं दिसतंय की हे घर काही तुला लाभदायक नाहीये. तुम्ही लोक अजून काही दिवस इथेच रहाल, तर तुम्हा लोकांना उगीच भूतबाधा वगैरे होईल. मी तुमचा हितैषीच आहे. सावकाराचं एक घर रिकामं आहे. तुम्ही लोक तिथे रहायला जा ना!"

रोज गोड बोलणाऱ्या वीरेंद्रच्या तोंडून ही गोष्ट ऐकून सुरेन्द्रची मुलेबाळे घाबरून



गेली. पण सुरेन्द्रवर याचा काहीच परिणाम झाला नाही. तो म्हणाला–"हं, तुला त्या भूषणनं पाठवलेलं दिसतंय! मी मुळीच हे घर सोडणार नाही. भूषणनं केलेलं करारपत्रही मजजवळ आहे." आणि त्याने ते करारपत्रही आणून दाखवले.

ते पत्र पाहून वीरेन्द्र म्हणाला–"मी तुझ्या भल्यासाठीच म्हणतोय. माझं म्हणणं ऐक तर खरं. माझं थोडंच काही वाकडं होणारेय!" इतके बोलून वीरेन्द्रने बरोबर आणलेली मिठाई सर्वांना वाटली.

त्या मिठाईत नशेचे औषध मिसळलेले होते. ती खाऊन सुरेन्द्रचे सर्व कुटुम्ब बेशुद्ध झाले. आता वीरेन्द्रने भूषणच्या मदतीने गाड्या आणि माणसांची सोय करून सुरेन्द्रचे सारे सामान सावकाराच्या घरात हलवले. आणि तिथे त्याची नीट मांडामांडही करून टाकली. नन्तर सुरेन्द्रच्या कुटुम्बातल्या सर्वांना उचलून नव्या घरात पलंगांवर निजवून ठेवले. जमीनदार भूषणचे घर परत त्याच्या ताब्यात देऊन टाकले. भूषणने ताबडतोब आपले काही सामानही तिथे नेऊन ठेवून काही लोकांच्या रहाण्याची सोयही करून टाकली.

वीरेन्द्रने सुरेन्द्रचे करारपत्रही फाडून टाकले. सुरेन्द्र शुध्दीवर आला तेव्हां त्याच्या लक्षात आले की आपण फसवले गेले आहोत व आता आपण नव्या घरात आहोत. आता जमीनदाराशी भांडण्यात काही अर्थ नाही हे ओळखून तो चूप राहिला.

आपले घर आपल्या हाती आलेले पाहून भूषण आनंदित झाला. त्याने वीरेन्द्रची खूप स्तुति करून म्हटले की–"तू स्वतःला मोठा बुद्धिमान समजतोस पण मीच तुझ्या वरचढ आहे बरं का! कारण आपल्या बुद्धीचा वापर करून मी मला कठीण असणारी कामं तुझ्याकडून करून घेतली. तुझ्यासारखं स्वतःचा काही मतलब साध्य करून न घेता दुसऱ्याची कामं केली नाहीत मी कधी! तेव्हा असं सिद्ध होतंय की, मीच बुद्धीत तुझ्याहून श्रेष्ठ आहे."



यावर जराही न घाबरता वीरेन्द्र म्हणाला–"मालक, तुमचं म्हणणं शंभर टक्के मान्य आहे मला! पण आपण जे कारण सांगत आहात, ते मात्र बरोबर नव्हे. खऱ्या बुद्धिमान माणसाने आपणापेक्षा वरचढ बुद्धिमान माणसाला आपल्याकडे कधीच कामाला ठेऊ नये. मी तुमच्यापेक्षा वरचढ आहे, हे लक्षात आल्यामुळेच तुम्ही मला आता काम देणार नाही आहात. तुम्ही ही गोष्ट मानली असतीत, तरी मी तुमच्याकडे काम केलंच नसतं. ही खरी गोष्ट कबूल करण्यात आता तुम्ही टाळाटाळ करू नये हे उत्तम!"

आता वीरेन्द्रचे म्हणणे कबूल करून भूषण म्हणाला–"तू खरोखरच बुद्धीने माझ्यापेक्षा श्रेष्ठ आहेस हे मी मान्य करतो. आपल्या बुद्धीच्या जोरावर तू कुठेही जगू शकशील. मी प्रथमच निश्चित करून टाकलं होतं की माझ्याशी हरणाऱ्यालाच मी कामावर ठेवीन; जिंकणाऱ्याला नाही."

तो असे बोलत असतानाच त्याची मुलगी अमला घरातून बाहेर आली अन् त्याला म्हणाली–"बाबा, तुम्हीच म्हणाला होतात नं, की बुद्धीत तुम्हाला जो हरवील, त्याच्याशी तुम्ही माझं लग्न करून द्याल? वीरेन्द्रने येऊन माझ्याशी विवाहाची इच्छा व्यक्त केली होती, तेव्हाच मी त्याला तुमची ही अट सांगितली होती. त्यासाठीच त्याने आपली बुद्धिमत्ता पणाला लावून तुम्हाला हरवून दाखवलं. आता म्हटल्याप्रमाणे आमचा विवाह करून द्यायला हवा तुम्हाला!"

आता भूषण वीरेन्द्रला म्हणाला–"तू बुद्धिमत्तेत माझ्याहून श्रेष्ठ आहेस, यात काही वादच नाही. तू इतका हुषार आहेस की माझी मुलगी आपण होऊनच तुझ्याशी विवाह करू इच्छित आहे. मग मी कसा नकार देणार बरं?"

अशा तऱ्हेने लवकरच अमलाचा वीरेन्द्रशी विवाह झाला आणि जमीनदार भूषणचा जावई बनून वीरेन्द्रही सुखी झाला.



# शेवटची संधी

खूप जुनी गोष्ट. देवप्रिय नांवाचा धर्माचरण करणारा एक सज्जन माणूस होता. तो नेहमी अहिंसा, देवभक्ती, परधर्मसहिष्णुता, मानव-समानता इत्यादींचा प्रचार करत असे. पण त्याचा एक प्रतिस्पर्धी होता यशकाम! हा यशकाम बरोबर उलट, म्हणजे हिंसा, नास्तिकता अन् त्याबरोबरच जुन्या परंपरा वगैरेंचा प्रचार करी. अशा प्रकारे या दोघांच्यात भावनात्मक विरोध आणि शत्रुत्व रुजत गेले.

देवप्रिय एकदा आजारी पडला आणि दिवसेंदिवस आजार वाढून तो मृत्यूच्या दारात पडला. अर्धवट बेशुद्धीमुळे तो कुणाला भेटू शकत नसे. पण अशातच त्याने यशकामला भेटायची इच्छा व्यक्त केली. ते जाणून यशकामला मोठेच आश्चर्य वाटले. तो देवप्रियकडे गेला.

मृत्युसमीप पोचलेल्या धर्मपरायण देवप्रियला पाहून यशकामने विचारले–"धर्माचार्य, मला मोठं आश्चर्य वाटतंय की एरव्ही कुणाला न भेटणाऱ्या तुम्ही, या शेवटच्या घटकेला मला भेटायची इच्छा कशी काय व्यक्त केलीत?"

हा प्रश्न ऐकून धर्माचार्य देवप्रियने मन्द हसून म्हटले–"हे जग सोडल्यानंतर स्वर्गात मला इतर कोणालाही भेटता येईल! पण एकदा का हा लोक सोडला, की मग तुमच्याशी बोलायची संधी मात्र मला मिळणार नाही; म्हणूनच मी तुला ही शेवटची संधी देऊ केली."





# साहसी अपूर्व

[ ६ ]

[ एक यज्ञ करून सदानन्द मुनीने अद्‌भुत शक्तींनी युक्त असा अपूर्व नावाचा लहान चणीचा मुलगा पैदा केला. मुनीच्या आदेशाप्रमाणे अपूर्व संकटग्रस्त, गरीब व सज्जन लोकांना तो मदत करू लागला. राजकुमारीशी विवाह करण्याचे कारस्थान करणाऱ्या दुष्ट मान्त्रिकाला अपूर्वने राजाच्या हाती पकडून दिले. —पुढे वाचा ]

"समीर!" अशी हाक ऐकताच खाटेवर पडलेला समीर एकदम खडबडून उठून बसला. त्या मध्यरात्री आपल्या समोर असलेल्या अपूर्वला पहाताच त्याने भक्तिभावाने त्याला नमस्कार केला.

"मला तुझ्याकडून संकटात सापडलेल्या चार मुलांना वाचवण्यासाठी मदत हवी." अपूर्व म्हणाला.

"आज्ञा द्या, मी तयार आहे." समीर चटकन बोलला.

"आता शान्तपणे सर्व सांगत बसायला वेळ नाही. चल, लवकर माझ्याबरोबर नीघ." म्हणत अपूर्वने समीरचा हात धरला आणि तो भराभरा बाहेर निघाला. समीरही उत्साहाने त्याच्यामागे चालत राहिला. जसजसा चालण्याचा वेग वाढला, तसतसे समीरला वाटू लागले की आपण हवेत तरंगत जात आहोत. थोड्या वेळात दोघे समुद्रकिनारी पोचले. तेथे एक जहाज उभे होते.



"पाच मुलं हिंडत इथे आली. जहाज पाहिल्याबरोबर ते जवळून पहावं, असं वाटलं त्यांना. जहाजाच्या मालकानेही गोडगोड बोलून त्यांना जहाजावर बोलावून घेतलं. जहाजातल्या निरनिराळया खोल्या आणि तिथलं इतर सामानही त्याने मुलांना दाखवलं. जहाज चालतं कसं आणि लंगर कसा टाकतात हे ही त्याने सांगितलं. नंतर मुलं जेंव्हा परत जायला निघाली तेव्हा त्या मालकाने त्यांना कसलंसं गोड पेय प्यायला दिलं. ते प्यायल्याबरोबर ती पोरं बेशुद्ध पडली. दूर प्रांती नेऊन जाऊन तेथे पोरांना विकून टाकायचा विचार आहे त्याचा! गुलाम म्हणून विकून खूप पैसा मिळेल त्याला." अपूर्वने समीरला सर्व हकिकत सांगितली.

"हे सर्व तुम्हाला कसं कळलं?" आश्चर्याने समीरने विचारले.

त्या जहाज-मालकाबद्दल माझ्या मनात संशय होता. नंतर लपून बसून जेंव्हा त्यांची बोलणी ऐकली, तेंव्हा माझ्या शंकेला दुजोरा मिळाला." अपूर्व उत्तरला.

"पण तुम्ही जहाजावर कसे पोचलात?" बुचकळयात पडलेल्या समीरने विचारले.

"आता आपण जसे जहाजावर पोचू ना? तसंच! मी आता लपून राहून काय काय करायला हवंस ते सांगेन तुला. तू या पोरांना वाचवायचा रस्ता शोधून काढ." अपूर्व म्हणाला.

"तुम्ही तर लपून बसणार. मग मी त्या जहाजवाल्यांच्या दृष्टीस न पडता पोरांना बाहेर कसं काढू?" समीरने आपली शंका प्रकट केली.

"तू ही त्या अडकलेल्या पोरांपैकीच एक बनल्यासारखं कर. त्यांच्या संख्येच्या बाबतीत खलाशांना कदाचित शंका येईल. पण ती ही एक गंमतच होईल. अच्छा, आता तू समुद्रयात्रेला तयार आहेस ना?" अपूर्वने विचारले.

"हो हो, अगदी तय्यार!" समीर उत्सुकतेने म्हणाला.



अपूर्वने समुद्राकडे तोंड करून शिट्टी वाजवली. ताबडतोब समुद्रातल्या उंच उंच लाटांवर तरंगत चार मोठाले मासे किनाऱ्याकडे आले. अपूर्वने आपल्या हाताचा आधार देऊन समीरला एका माशावर बसवले आणि तो स्वतः दुसऱ्या एका माशाच्या पाठीवर आरूढ झाला. ते दोन्ही मासे बाणाच्या वेगाने पाण्यात शिरले. दुसरे दोन मासे त्यांना संरक्षण देत दोन बाजूंनी पोहू लागले.

"या माशांना तुम्ही कसं पाळीव बनवलंत?" समीरने आश्चर्याने अपूर्वला विचारले.

"मी काही पाळीव-बिळीव बनवलं नाही. या साऱ्या जगात एकच विश्वात्मा भरून राहिलेला असतो. मानव, पशु-पक्षी आणि इतर सर्व प्राणिमात्रात या दिव्य आत्म्याचा अंश सूक्ष्म रूपाने भरलेला असतो. त्या अंशाला जागृत करून आपण एकादा संदेश कुठूनही धाडला, अन् मुळात आपला हेतु चांगला असला तर ते प्राणी आपल्या आदेशानुरूप काम करतात. मी सूक्ष्म अंशाच्या द्वारेच या माशांना संदेश पाठवला; कळलं?" अपूर्वने समजावून सांगितले.

"ओहो! तर मग तुम्हाला मानवांच्या हृदयातही ही सहकार-भावना जागृत करता येत असेल?" समीरने विचारले.



"नाही! कारण अन्य प्राणी वा पशु-पक्ष्यांप्रमाणे मानवप्राणी केवळ निसर्गाच्या अधीन नसतो. मानवजीवनात केवळ त्याच्या-त्याच्या मनाचे व्यवहार प्रबळ असतात. मनात अनेक तऱ्हेचे संदेह, विचार आणि प्रश्न सागर-लहरींसारखे उचंबळत असतात. त्या सर्व शंका-कुशंकांना या शक्तीने बांधून ठेवणे अशक्य असते. तरीही सत्यमार्गी आणि माया-कपट वगैरेपासून अलिप्त असणारी निर्मल मनाची जी माणसं असतील त्यांना मात्र माझी हाक नक्की ऐकू येईल, अन् ते माझे सन्देश पाळतील." अपूर्व उत्तरला.

इतक्यात त्यांना घेऊन जाणारे ते मासे जहाजाजवळ पोचले. माशांना धन्यवाद



देऊन दोघेही जहाजावर चढले. एका खिडकीतून त्यांनी आत डोकावून पाहिले. त्या खोलीत ती मुले झोपलेली होती. त्यांच्यावरचा त्या पेयाचा अंमल अजून संपलेला नव्हता. खोलीचा दरवाजा बन्द होता.

हळूच दोघांनी जवळच्या खोलीत डोकावून पाहिले. तिथे जहाजाचा मालक बाकीच्या खलाश्यांसह बसलेला होता. त्याच खोलीत तलवार, भाले, लाठ्या आणि काही विचित्रशी हत्यारे मिळून खूपशी हत्यारेही ठेवलेली त्यांच्या दृष्टीस पडली. त्यांच्या बोलण्यावरून अपूर्वला कळून चुकले की, हे जहाज चाचेगिरी करणाऱ्या टोळीचे आहे; अन् त्या टोळीचा नायक म्हणजेच जहाज-मालक होय.

"या पोरांचे आईबाप त्यांना शोधत इथे येऊन पोचण्यापूर्वीच आपल्याला इथून कूच करायला हवं." तो सरदार बोलला.

"पण त्या अगोदरच ते सारेजण इथे आले, तरी काय होणाराय?" एक मुख्य साथीदार म्हणाला.

"पण आपल्याबद्दल उगीच कुणाला संशयाला कशाला जागा ठेवायची?" सरदार कुरकुरला.

असेच काहीसे बोलत ते दोघे खोलीबाहेर आले. त्या चाच्यांच्या सरदाराने लंगर उचलायची आज्ञा दिली अन् लगेच आज्ञापालन होऊन हळूहळू डुलत जहाज समुद्रात पुढे सरकू लागले.

आता तो सरदार त्या मुलांच्या खोलीपाशी गेला आणि त्याने दरवाजा उघडला.

"आता यांना समुद्रात उड्या मारून देवमाशांची शिकार बनायचं असेल तर गोष्ट वेगळी! पण आता काही ही पोरं आपल्या तावडीतून वाचू शकत नाहीत." सरदाराने आपल्या त्या मुख्य साथीदाराला हसून सांगितले.

नंतर ते दोघेही तो दरवाजा सोडून दुसरीकडे वळले.

"हीच छान संधी आहे. तू पटकन जाऊन त्या पोरांच्यात झोपून रहा." अपूर्व हळूच समीरच्या कानात कुजबुजला.





समीर चुपचाप जाऊन त्या मुलांबरोबर झोपून राहिला.

"आता आपण यांना रत्नद्वीपलाच घेऊन जाणार आहोत ना?" त्या प्रमुख साथीदाराने सरदाराला विचारले.

"नाही, दुसऱ्या एका छोट्याशा बेटावर जायचंय. तिथे चार-पाच ठिकाणांहून गुलामांचे व्यापारी येत असतात अन् तिथे हवी तेवढी किंमतही मिळते." सरदार म्हणाला.

खोलीतून जरासा आवाज आलासा वाटला. साथीदाराने आत डोकावून पाहिले. उजेड काहीसा मंदच होता. आत जाऊन त्याने दिव्याची वात जरा वर केली.

"एकेका मुलाचे आपल्याला कमीत कमी शंभर दिनार सहज मिळतील. पाच मुलांचे पाचशे दिनार होतील." सरदार बोलत राहिला. बोलत असताना तो आपल्या मिशांवर ताव देत होता.

"मला वाटलं नव्हतं की मोजणी करण्यात तू इतका कच्चा असशील! शंभराचे सहापट केले तर पाचशेच कसे होतील?" त्या साथीदाराने टोमणा मारला.

"मूर्खा! नीट बघ, पोरं सहा नाही—पाचच आहेत!" सरदार जरा चिडून बोलला.

"पाच नाही—सहा आहेत! मला नीट दिसतं, मी काही डोळ्यावर पट्टी बांधलेली नाहीय!" साथीदारही आता तापू लागला होता.

"सहावा काय हवेतनं उत्पन्न केलास की काय? उगाच काहीतरी बडबडू नकोस!" सरदार ओरडत म्हणाला.

यावर तो चाच्यांचा सरदार खोलीत आला आणि त्याने मुलं मोजून पाहिली. ती तर सहा होती! पण सरदाराचा विश्वास बसेना. दिवा हातात घेऊन तो मुलांच्या जवळ आला आणि पुन्हा एकदा त्याने मोजणी केली. त्यांचे चेहरेही नीट निरखून पाहिले.

"ठीक आहे. काळजी करायचं कारण नाही. जास्त असली, तर जास्त फायदाच मिळेल ना! पाचशेच्या ऐवजी सहाशे म्हणजे जास्तच ना? आता का होईना, पण



कळलं ना तुला मूर्ख कोण आहे ते? तू मला मूर्ख म्हणाला होतास ना? माफी माग माझी. काय? कसा काय विचार आहे?" चेष्टेच्या सुरात साथीदार आपल्या सरदाराला म्हणाला. त्याची सरदाराशी सर्वात जास्त जवळीकही होती.

पण सरदाराला मात्र त्याचे हे बोलणे आवडले नाही. तो आता भडकून म्हणाला—"याचा अर्थ म्हणजे......म्हणजे मी तुला मूर्ख वाटतो काय? जीभ छाटून टाकीन बघ मी!" असे म्हणून त्याने आपल्या कमरेची तलवार सर्रकन बाहेर उपसली.

"चूक माझी नाही, तुझीच होती. तुझा शब्द मी तुला परत केला, इतकेच!" शांतपणे तो साथीदार म्हणाला.

पण सरदाराचा तर अगदीच ताबा सुटलेला होता. तो ओरडला—"एकदा नाही, शंभरदा म्हणीन, तूच मूर्ख आहेस, मूर्ख आहेस, मूर्ख आहेस!"

त्या दोघांच्या आरडाओरड्याने जहाजावरचे त्यांचे बाकीचे साथीदार तेथे आले. त्यांना माहीत होते की आपल्या सरदारात आणि त्याच्यां या खास साथीदारात काही धुसफुस चालू होती, पण ते आपला द्वेष आणि शत्रुत्वभावना अशी प्रकट करतील, याची मात्र त्यांना मुळीच कल्पना नव्हती.

"तुझी ती बोथट तलवार पाहून घाबरेन की काय मी?" तलवार परत आपल्या म्यानात घालत साथीदार बोलला.

"काय म्हणालास? माझी तलवार बोथट आहे? मग बघच तर कशी धार आहे ती!" असे गर्जत सरदार साथीदारावर तुटून पडला.

पण तो साथीदारही चांगला चलाख आणि चपळ होता. त्याने पटकन जवळची एक तलवार घेऊन आपल्यावर वेड्यासारखा हल्ला करणाऱ्या सरदाराच्या छातीत भोसकली सुद्धा! तो सागरी चाच्यांचा सरदार किंचाळून तिथेच मरून पडला.

इतर सारे साथीदार खलाशी घाबरून पुतळ्यासारखे जागीच खिळून गेले! पण मेलेल्या सरदाराचा तो खास साथीदार मात्र आता खूष होता! "हा किती दुष्ट



होता ते तुम्हाला माहीतच आहे. याने आपल्या पहिल्या सरदाराला फसवून मारले होते, पण मी काही तसं केलं नाही. याने मला मारायचा प्रयत्न केला, तेव्हांच मी याच्यावर तलवार चालवली. आत्म-संरक्षणासाठीच मी याला मारलं आहे. मला याबद्दल मुळीच वाईट वाटत नाहीये. पाच आणि सहा यातला फरक ज्याला कळत नाही, तो आपला सरदार नाही राहू शकत. या दुष्टाचं प्रेत फेकून द्या समुद्रात, अन् आपापल्या कामाला लागा!"

आता हाच आपला नवा सरदार हे त्या साथीदारांना कोणी सांगायची गरज नव्हती. त्याच्या आज्ञेप्रमाणे त्यांच्यातल्या काही जणांनी मेलेल्या सरदाराचे प्रेत उचलून समुद्रात फेकून दिले.

इकडे जहाजावरचा गोंधळ ऐकून खोलीत झोपलेली पोरं जागी झाली आणि खिडकीतून बाहेर पाहू लागली. इतक्यात दिवा विझवून टाकून समीर त्यांना कुज-बुजत्या, पण कडक आवाजात म्हणाला—

"माझं म्हणणं नीट ऐका! हे सारे समुद्री चाचे लोक आहेत. ते तुम्हाला कुठल्याशा दूरच्या बेटावर नेऊन गुलाम म्हणून विकून टाकणार होते. तुम्हाला वाचवण्यासाठीच मी इथे आलो आहे. माझ्या सूचना मानून मी सांगतो तसे वागाल, तर तुमची सुटका होऊ शकेल. तुम्ही डोळे मिटून पहिल्या-प्रमाणेच पडून रहा. त्यांना वाटेल की अजून तुम्ही बेशुद्धीत आहात. या चाच्यांची योजना, किंवा त्यांच्या सरदाराच्या हत्येबाबत आपल्याला काहीच माहीत नाही असंच आपण दाखवू या! आपल्याला सर्व माहीत आहे, अशी शंका जरी आली तरी ते आपले सर्वांचे हातपाय बांधून टाकतील, अन् आपल्याला पळून जाणं कठीण होईल."

समीरचं बोलणं ऐकून मुलांना खरी गोष्ट कळून चुकली! आश्चर्य आणि भय यामुळे त्यांच्यापैकी कोणी तोंड उघडून बोलूही शकेना! समीरच्या सूचनेप्रमाणे पुन्हा आडवं होऊन त्यांनी झोपेचे सोंग केले!

(क्रमशः)





# अग्निसिद्ध

दृढसंकल्प असणारा राजा विक्रम पुन्हा त्या झाडाकडे गेला. फान्दीला लटकणारे प्रेत काढून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले, आणि नेहमीप्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाची वाट चालू लागला.

प्रेतात निवास करून असलेला वेताळ राजाशी बोलू लागला—"राजा, विषारी सापांचे फूत्कार, कोल्ह्यांची कोल्हेकुई आणि घुबडांचे घूत्कार ऐकू येत असलेल्या, या भीतिदायक स्मशानात अशा भयाण रात्रीच्या वेळी तू वाटचाल करीत आहेस. मला वाटतंय्, की यामागे नक्कीच काही खास उद्देश असला पाहिजे! पण तू जो उद्देश साधण्याच्या मागे लागला आहेस, तो साधल्यानन्तर त्याचं फळ मात्र अयोग्य व नुकसान करणाऱ्या लोकांच्या हाती पडण्या-मुळे तू राजा अग्निसिद्धप्रमाणे स्वतःला वाचवू शकशील की नाही याबद्दल मी

## वेताळाच्या गोष्टी



बराच साशंक आहे. पुढे काही अप्रत्याशित घडण्याआधीच मी तुला सावधगिरीची सूचना देऊ इच्छितो. त्यासाठी मी राजा अग्निसिद्ध याची गोष्टच सांगतो तुला. त्यामुळे तू सावधही राहशील आणि थकवा न भासता तुझी वाटही मजेत संपेल." इतके बोलून वेताळ ती गोष्ट सांगू लागला.

अग्निशिखा राज्यावर राजा अग्निसिद्ध याचे राज्य होते. तो मोठा वीर होता. जवळच विशाल नावाचे राज्य होते. या दोन्ही राज्यात पिढीजात शत्रुत्व होते. त्यामुळे अग्निसिद्धला राज्याच्या प्राप्तीतला अधिक भाग सुरक्षिततेसाठी सैन्यावरच खर्च करावा लागे.

बराच विचार करून एकदा अग्निसिद्धने विशालराज सोमदत्त त्याच्याकडे शान्तिसन्देश पाठवला की—"जुने शत्रुत्व विसरून आपल्या दोन्ही राज्यात आपण मित्रत्वाचे संबंध स्थापित करू या."

परंतु सोमदत्तने मूर्खपणाने हा प्रस्ताव नामंजूर करून उलट संदेश पाठवला की—"तुमच्या बापजाद्यांच्या काळापासून आमच्या वंशाचं जे नुकसान होत आलेलं आहे, ते आम्ही विसरू शकणार नाही."

काही वर्षे अशीच निघून गेली. सोमदत्त एकदा शिकारीला गेला असताना अपघातात त्याचा मृत्यु ओढवला. आता त्याचा पुत्र सत्यदीप विशाल राज्याच्या गादीवर बसला. आता पुन्हा आपण शान्तिसाठी काय प्रयत्न करावे, याबद्दल तो विचार करू लागला. अशातच त्याला अग्निसिद्धची कन्या स्वयंप्रभा हिच्याबद्दल कळले.

स्वयंप्रभा चांगली शिकलीसवरलेली होती. तिची बुद्धि व सौन्दर्य यांचा चांगलाच बोलबाला होता. सत्यदीपने विचार केला की—"स्वयंप्रभेशी आपण विवाह केला, तर दोन्ही राज्यांतले संबंध आपोआपच सुधारतील."

आपला हा विचार कळवण्यासाठी पत्र लिहून सत्यदीपने एका संदेशवाहकाची रवानगी केली. ते पत्र वाचून अग्निसिद्ध





फारच खुश झाला. आपल्या पित्याच्या विरुद्ध विचारधारा असणारा, शान्तिस्थापनेचा मार्ग चोखाळणारा सत्यदीप अग्निसिद्धला आपल्या कन्येसाठी अत्यन्त योग्य असाच वर वाटला. त्याने स्वयंप्रभेचा सत्यदीपशी विवाह करून देण्याचा विचार पक्का केला.

परंतु अग्निसिद्धच्या पुत्राला, सिंहस्कंधला आपल्या पित्याचा निर्णय मुळीच आवडला नाही. शत्रुशी असे नाते जोडणे त्याला अपमानास्पद वाटले. तरीही त्याने आपला हा विचार पित्याजवळ बोलून दाखवला नाही.

युवराजाशी जास्त जवळिकेचे संबंध असणाऱ्या राजपरिवारातल्या काही जणांनी ही गोष्ट ओळखली. त्यांनी सिंहस्कंधच्या मनात विषारी बीजंच पेरली. त्याच्याशी सारखं-सारखं बोलून त्या लोकांनी त्याच्या मनावर ठसवलं की—'स्वतः होऊन स्वयंप्रभेशी विवाहाचा प्रस्ताव मांडण्यात सत्यदीपचा काही डाव असला पाहिजे! असला प्रस्ताव लगेच मान्य करणाऱ्या आपल्या महाराजांना नक्कीच मतिभ्रम झालेला असावा! सिंहस्कन्ध या प्रसंगी गप्प राहिला, तर आपलं राज्यच हातचं जाईल.'

आता सिंहस्कन्धने राजा अग्निसिद्धला पदच्युत करून स्वतःच सिंहासनावर बसायचे कारस्थान रचले. त्यानुसार एका मध्यरात्री अग्निसिद्धला कैद करण्यात आले आणि एक शुभमुहूर्त पाहून सिंहस्कन्धला राज्याभिषेक केला गेला.

कारागारात पडलेल्या अग्निसिद्धला फारच दुःख झाले. असे पाऊल उचलण्यास सिंहस्कंधची दुर्बुद्धि कारण नसून, काही दुष्ट राजकर्मचाऱ्यांचे कारस्थानच यामागे असले पाहिजे, आणि त्यांच्या दबावाखाली येऊनच आपल्या मुलाने हे कुकृत्य केले असले पाहिजे असेच त्याला वाटले.

राज्यावर बसल्याबरोबर सिंहस्कंधने सत्यदीपला निरोप पाठवला की—"माझ्या बहिणीशी विवाहाचा प्रस्ताव मांडून तू

आडून आमच्या पाठीत सुरी भोसकायचा विचार केलास. वाड-वडिलांपासून चालत आलेल्या शत्रुत्वाचा सूड घेण्यासाठीच तू हे विवाहाचं नाटक मांडलं आहेस. तुला चांगली शिक्षा केल्यावाचून मी मुळींच गप्प बसणार नाही. आता तू युद्धाला तयार रहावंस हे बरं!"

हा निरोप मिळालेल्या सत्यदीपला दु:खाचा चटका बसला! त्याने सिंहस्कंधला हरवून पुन्हा अग्निसिद्धला राजा बनवायचा निश्चय केला.

यातच अग्निशिखा राज्याच्या जनतेत खळबळ माजली. महाराजांना कैद करून युवराजाने सिंहासन ग्रहण केल्यामुळे प्रजेत विद्रोहाचे वातावरण निर्माण होऊ लागले. या विद्रोहाचे नेतृत्व रवीन्द्र नावाच्या एका युवकाच्या हाती सोपवले गेले.

सिंहस्कन्धने आपल्या राज्यातली बंडाळी प्रथम मोडून काढून नंतर शत्रूशी युद्ध करण्याचा निर्णय घेतला. यासाठी बंड-खोरांचा नेता रवीन्द्र यालाच पकडण्याच्या मागे तो लागला.

या बंडाची बातमी कळल्याबरोबर युद्धाला सुरुवात करायची हीच योग्य वेळ आहे हे सत्यदीपने हेरले, अन् तो युद्धाला सज्ज झाला. सिंहस्कन्धची परिस्थिति 'इकडे आड अन् तिकडे विहीर' अशी झाली. ज्या लोकांनी त्याला प्रोत्साहन देऊन राजा-विरुद्ध कारस्थान केले, ते आपमतलबी लोक आता दुसराच विचार करू लागले! त्यांनी ठरवले की, या युद्धात जर सत्य-दीपचा जय झाला, तर आपण सत्यदीपशीच हातमिळवणी करायची! असे झाले की आपणापैकीच एकाला हे अग्निशिखा राज्य मिळून जाईल. पण हे त्यांचे नवे कारस्थान जेव्हा सिंहस्कन्धला कळले, तेव्हां आपली चूक त्याच्या लक्षात आली आणि त्या सुर्वे कारस्थान्यांना त्याने कैद केले.

'आता या युद्धात आपला जय तरी होईल, नाहीतर वीर-मरण तरी'–असा विचार करून सिंहस्कन्ध आपले सैन्य घेऊन युद्धाला निघाला, सत्यदीपशी त्याचा सामना झाला, आणि घनघोर युद्ध सुरू झाले. पण आपल्या राजाशी एकनिष्ठ असलेले सैन्या-तले शिपाई सिंहस्कन्धला सोडून ऐन वेळी सत्यदीपला जाऊन मिळाले. सिंहस्कन्धला हार खावी लागली.

सिंहस्कन्धला कैद करून राजा अग्नि-सिद्धला मुक्त करवण्यात आले. सत्यदीपला मिठी मारत राजा अग्निसिद्ध म्हणाला– "तुझ्या बाबतीतली आपली कृतज्ञता कशी प्रकट करू हेच मला समजत नाहीये. तुझी मदत मी कधीच विसरू शकणार नाही. तुझा खूप आभारी आहे मी!"

यावर हसत हसत सत्यदीप म्हणाला– "यात उपकार कसले महाराज? आपण पूर्वी ठरवल्याप्रमाणे 'जावई' म्हणून माझा स्वीकार करावा!"

तेथून अग्निसिद्ध आपल्या महालात गेला आणि स्वयंप्रभाला बोलावून घेऊन त्याने







सत्यदीपशी विवाह करण्याबद्दल प्रस्ताव केला.

जरा वेळ मौन राहून नन्तर स्वयंप्रभा म्हणाली—"बाबा, आपल्या मनातली खरी गोष्ट आता सांगते मी तुम्हाला! तुम्ही जेव्हां कैदेत होतात, तेव्हा प्रजेत राजभक्ति जागृत करून, तळहातावर शिर घेऊन सिद्ध असणाऱ्या बंडखोर रवीन्द्रशी विवाह करायची माझी इच्छा आहे. पण ही गोष्ट कळल्यावर सत्यदीप रागावून आपल्या राज्याचं काही नुकसान करील अशी मला भीती वाटते बाबा!"

क्षणभर विचार करून अग्निसिद्ध म्हणाला—"त्याची काळजी करू नकोस तू बाळ. तुझ्या इच्छेप्रमाणे तुझा विवाह मी रवीन्द्रशीच करून देईन." नन्तर अग्निसिद्ध सत्यदीपला भेटायला गेला व त्याने ही गोष्ट सत्यदीपला सांगून टाकली.

स्वयंप्रभेच्या अपेक्षेप्रमाणे सत्यदीपला याबद्दल थोडा सुद्धा राग आला नाही. उलट स्वतः विवाहसमारंभाला हजर राहून नंतरच तो आपल्या राज्यात परत गेला.

यानंतर काही दिवसांनी सिंहस्कन्धला राज्याभिषेक करवून स्वतः वानप्रस्थाश्रम स्वीकारून अग्निसिद्ध जंगलात आपला आश्रम बनवून उर्वरित आयुष्य तेथे शान्तपणे घालवू लागला.

आपली गोष्ट इथवर पुरी करून वेताळ विक्रमला म्हणाला—"राजा, अग्निशिखा राज्य जिंकूनही सत्यदीपने ते स्वतःच्या ताब्यात का घेतले नाही? ज्या स्वयंप्रभेशी विवाह करायची त्याची इच्छा होती, तिचा दुसऱ्याच एका तरुणाशी विवाह करून देऊन तो मुकाट्याने निघून का गेला? सर्वावरून असंच दिसून येत नाही का, की सत्यदीप जराही राजनीतिज्ञ नाहीये? फक्त प्रजेला उत्तेजित करून देऊन बंड करणाऱ्या रवींद्रशी स्वयंप्रभेचा विवाह लावून देणाऱ्या राजा अग्निसिद्धचे हे कृत्य त्याच्या कारकीर्दीवर एक डाग नव्हे का? ज्या मुलाने आपल्याला कैद करून पितृद्रोह केला त्या सिंहस्कन्धला आपले सिंहासन देणं, हे काय राजनीतीचं लक्षण झालं? माझ्या प्रश्नांचं उत्तर माहीत असूनही तू न दिलंस, तर तुझ्या मस्तकाची छकलं-छकलं होऊन पडतील."

राजा विक्रम उत्तरला—"अग्निसिद्ध आणि सत्यदीप हे दोघेही महान् राजनीतिज्ञ आणि दक्ष आहेत, याबद्दल शंकाच नाही. विशाल व अग्निशिखा या दोन राज्यांतलं जुनं वैर मिटवणं हेच केवळ सत्यदीपचं ध्येय आहे, आणि ध्येयसिद्धीचा एक मार्ग म्हणजे—स्वयंप्रभेशी विवाह! पण सिंहस्कन्धचा पराभव व अग्निसिद्धची मुक्तता यांद्वारे त्याचे ध्येय सिद्ध झालेच होते. तेव्हां अशा परिस्थितीत दुसऱ्या कुणावर प्रेम असलेल्या स्वयंप्रभेशी बळजबरीने विवाह करणे म्हणजे जंगलीपणाच नव्हे का? म्हणून स्वतः हजर राहून त्याने स्वयंप्रभांचा रवीन्द्रशी विवाह होऊ दिला. कोणीही व्यक्ति जेव्हा स्वतःची शक्ति लढवून आपली उन्नति करते, तेव्हा तिला 'योग्य व्यक्ति'च म्हणायला हवे. रवीन्द्रच्या बाबत हेच घडले. त्या घटनेवरून त्याचे सामर्थ्य अन् राजभक्ति प्रकट होते, म्हणूनच अग्निसिद्धने त्याला आपला जावई बनवला; मग यात कारकीर्दीवर डाग तो कसला? आता सिंहस्कंधची हकीकत.—मुळात तो चांगलाच होता. केवळ कारस्थानी लोकांच्या फुसलावण्याने त्याने पित्याविरुद्ध पाऊल उचलले. त्यामुळे एकीकडून आणि दुसरीकडे सत्यदीपकडून त्याचा पराभव झाला. त्यामुळे अग्निसिद्धने विचार केला की, मिळालेल्या अनुभवाने सिंहस्कन्ध आता नक्कीच शहाणा झालेला असणार! म्हणूनच अग्निसिद्धने त्याला सिंहासन देऊन टाकले."

हे उत्तर देण्यामुळे विक्रमचा मौनभंग झाला आणि वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्याच जुन्या झाडाच्या फान्दीला लटकू लागला. (कल्पित)



# विसर्भोळा

सीताराम अगदी नंबर एकचा विसराळू प्राणी होता! अगदी आत्ता जे काम करील ते क्षणभरात विसरून जायचा तो! एकादी वस्तु कुठे ठेवली, तर लगेच विसरूनही जायचा. त्यामुळे त्याच्या कुटुंबातल्या सार्‍यांनाच भारी त्रास होई.

रोज कथा ऐकायला सीताराम संध्याकाळी देवळात जायचा आणि येताना वहाणा किंवा छत्री तिथेच विसरायचा; किंवा कधी आपलं उपरणंच तिथे सोडून येई.

पतीच्या या विसरभोळेपणापायी त्याची बायको अगदी त्रासून गेली होती. एक दिवस त्रासून तिने त्याची चांगलीच खरडपट्टी काढली.

ती खरडपट्टी ऐकून सीतारामच्या मनाला फार धक्का बसला. आपल्या विसराळूपणा-बद्दल त्याला फार दुःखही वाटले. आता विसरायचं नाही असा त्याने निश्चय करून टाकला.

त्या दिवशी देवळातून आल्या आल्या बायकोला जोरात हाका मारून तो म्हणाला—"बघ; मला सगळेजण विसराळू म्हणता ना? आज मी वहाणा विसरून नाही आलो. नीट बघून घे!"

सीतारामच्या बायकोने त्याच्या पायाकडे नजर टाकली आणि कपाळाला हात लावला! ती चिडून म्हणाली—"वा, वा! काय पण आठवणबहाद्दर! आज तर तुम्ही अनवाणीच गेला होतात की देवळात!"



चांदोबा पुरवणी—३४

# महान् स्वप्नदर्शी भारत

## "देश म्हणजे केवळ तेथील माती नव्हे!"

महायोगी श्री अरविन्द यांचा जन्म १५ ऑगस्ट १८७२ रोजी झाला. इंग्लंड मध्यें आपले उच्च शिक्षण संपवून सन १८९३ मध्ये ते मायदेशी परत आले. त्या दिवसापासून भारताच्या पुनर्जीवनाचा प्रयत्न त्यांनी सुरु केला. भारताला संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करणारे ते पहिले पुढारी होते. भारताला स्वातंत्र्य मिळणार याची जेव्हा त्यांना खात्री पटली तेव्हा सन १९१० मध्ये ते पांडीचरीला आले. मानव जातीचा उद्धार करायला उपयोगी पडेल अशी शक्ति भूतलावर आणण्यासाठी त्यांनी आपली योगसाधना सुरु केली. शेवटी १९४७ मध्ये त्यांच्या जन्म-दिवशीच भारताला स्वातंत्र्य मिळाले.

त्यांनी असे घोषित केले की—"भारत माता म्हणजे एक जमिनीचा तुकडा नव्हे, ती एक अद्भुत शक्ति आहे...दिव्य शक्ति आहे......!" त्यांनी पुढे असं ही सांगितलं—"भारत नष्ट होणार नाही. भावी मानवजातीचं भविष्य उज्ज्वल आणि उन्नत बनविण्याची अपूर्व शक्ति भारताच्या हाती आहे. भविष्यकालीन विश्वासाठी एक विशेष धर्म भारतातच अवतरणार आहे. हा धर्म अनन्त नि अमर असेल. हा धर्म सर्व शास्त्रे व तत्त्वज्ञानांना एका सूत्रात बांधेल आणि एकात्म मानवतेचा विकास करील!"

आपल्या भविष्याच्या या सर्वोत्कृष्ठ स्वरूपाला आपण कसे विसरू शकू?

## तुम्हाला माहीत आहे?

१. उत्तर भारतातील कोणत्या प्रदेशाला 'देवतांची दरी' असं नाव मिळालं आहे?

२. असं म्हणतात की आजची दिल्ली म्हणजेच पांडवांच्या वेळचे इंद्रप्रस्थ. तेव्हा पासून आता पर्यंत या शहराला सात नावे मिळाली. ती कोणती?

३. गेली ३०० वर्षे एका पवित्र संताच्या अस्थि एका चंदेरी कांचेच्या पेटीत सुरक्षित ठेवण्यात आल्या आहेत. आणि दर बारा वर्षांनी एकदा लोकांना त्यांचे दर्शन घडते. तो संत कोण नि ते स्थान कोणते?

४. भारतातील कोणत्या शहराला 'गुलाबी शहर' (पिंक सिटी) म्हणतात व कां?

[पान ३६ पहा]

## भारताची दैवते

# श्रीकृष्ण

श्रीमहाविष्णु अवतारात ज्याला संपूर्ण अवतार मानतात असा एकच अवतार श्रीकृष्णाचा. वसुदेव आणि देवकी यांच्या पोटी जन्म घेतल्यापासून श्रीकृष्णाने आपल्या लीला दाखवायला प्रारंभ केला. लहानपणी तो गवळ्यांच्या पोरात क्रीडा करीत राहिला. धोका देऊन मारायला आलेल्या राक्षसी पूतनेचा वध, कालिया-मर्दन, पर्वताला बोटावर उचलणं, लोककंटक कंसाचा वध आदि लीला करून गोप-गोपिकांना श्रीकृष्णाने आश्चर्य-चकित करून टाकले. अशा रीतीने सर्वांचे प्रेम संपादन करून शेवटी द्वारकाधीश बनून आपल्या प्रजेला संपूर्ण सुख-संतोष दिला आणि सर्वांचा आदर्श पालक बनला. उच्च धार्मिक मूल्यांचा निर्वाह करणाऱ्या पांडवांच्या पक्षात राहून श्रीकृष्णाने त्यांना विजय मिळवून दिला. भारत-युद्धाच्या प्रारंभी विषण्ण अर्जुनाला गीतेचा उपदेश देऊन आपल्या कर्तव्याची जाणीव करून देण्याचे महान् कार्य श्रीकृष्णाने केले. आज ही पिढ्यान् पिढ्यांना आध्यात्मिक मार्गदर्शन करण्याचे काम 'श्रीमद्‌भगवद्‌गीता' करीत आहे.

श्रीकृष्णाच्या बाल-लीलांचे वर्णन व या जगन्नियन्त्याची प्रशंसा करणारी रसाळ काव्ये अनेक भक्त व कवींनी रचलेलीं आहेत.

श्रीकृष्ण-जयंतीचा उत्सव देशात सर्वत्र मोठ्या उत्साहाने साजरा करण्यात येतो.



## चांदोबाच्या बातम्या

### पिकासोची भेट

प्रख्यात चित्रकार पिकासो यांच्या एका चाहत्याने तीस वर्षांपूर्वी त्याच्याकडे एक १०० डॉलर (१५०० रु.) चा चेक पाठवून विनंती केली की त्याने एक चित्र काढून आपल्याकडे पाठवावे. पिकासोने चेकच्या मागे एका हसणाऱ्या भुताचे चित्र रेखाटले नि स्वाक्षरी करून तो चेक आपल्या प्रशंसकाकडे परत पाठविला. गेल्या २४ जून रोजी लंडन मध्ये या खास चेकचा लिलाव करण्यात आला आणि ३,९६० पौंड (९०,००० रु.) किमतीला त्याची विक्री करण्यात आली.





### सर्व मुलीच !

चीन मधील फूजियनच्या ईशान्य दिशेला गौयांग नावाचे एक गाव आहे. गेल्या ४० वर्षांत या गावात १४० मुले जन्मली, त्यात १२ च फक्त मुलगे व बाकीच्या मुली आहेत. १९७६ पासून त्या गावात जन्मलेल्या शिशूत सर्वच्या सर्व मुली आहेत. आहे की नाही आश्चर्याची गोष्ट? त्या गावातील हवामान व अशा रीतीने केवळ मुलींचा जन्म यांचा काय संबंध

# साहित्य सोनियाचिया खाणी

१ सुप्रसिद्ध लेखक मुल्कराज आनंद यांची एक कादंबरी प्रथम इंग्लंड मधील वीस प्रकाशकांनी धुडकावून लावली होती. जेव्हा एका इंग्रजाने तिची प्रस्तावना लिहिली, तेव्हा तिचे प्रकाशन झाले. तो इंग्रज कोण? व ती कादंबरी कोणती?

२. आपल्या राष्ट्रीय चिन्हात अंकित असले–'सत्यमेव जयते!' हे कोठून उद्धृत केले गेले आहे?

३. नाट्यशास्त्राची माहिती देणारा अतिप्राचीन सुप्रसिद्ध भारतीय ग्रंथ कोणता?

४. 'ताकिक-ए-हिंद' चा लेखक कोण?

५. हिन्दी साहित्यांतील आद्य आधुनिक नाटककार भारतेन्दु हरिश्चन्द्राची दोन प्रसिद्ध पुस्तके कोणती?

## उत्तरावली

### तुम्हाला माहीत आहे?

१. कुलू, येथील प्रत्येक गावात देवतांच्या मूर्ति आहेत आणि दसऱ्याच्या वेळी या मूर्तींना सजवून शृंगारलेल्या रथांवर बसवून त्यांची मिरवणूक काढतात.

२. लालकोट, सिरी, तुगलकाबाद, जहाँपनाह, फिरोजाबाद, पुराना किला, शहाजहानाबाद.

३. सेंट फ्रांसिस झेवियर, गोव्यातील 'कथेड्रल ऑफ बॉम जीसस'.

४. राजस्थानातील प्रमुख शहर जयपुर. हे शहर राजा जयसिंहने वसवले. येथील इमारती व मंडपांच्या बांधकामात गुलाबी रंगाच्या दगडांचा वापर करण्यात आला आहे.

### साहित्य

१. ई. एम्. फॉर्स्टर, 'अन्टचेबल्स.'

२. मंडूकोपनिषद्.

३. भरत मुनीने लिहिलेले 'नाट्यशास्त्र.'

४. अल्बेरूनी.

५. 'सत्य हरिश्चन्द्र', 'भारत दुर्दशा.'



जगातल्या पौराणिक कथा–८

## पहिला शेतकरी

प्राचीन काळची गोष्ट आहे. पाताळ लोकातील टार्टारस देशावर राजा प्लूटो शासन करीत असे. एकदा प्लूटोने प्रॉस्परपाइन नावाच्या एका सुंदरीला पाहिलं नि तिच्यावर अतिशय मोहित झाला. त्याने बळजबरीने तिला उचलले आणि पाताळ राज्यात घेऊन गेला.

प्रॉस्परपाइनची आई जेव्हा घरी परत आली तेव्हा आपली मुलगी घरात नाही असे पाहून चिन्तित झाली. तिचा शोध घेत ती देवमाता सिरीस इकडे-तिकडे खूप भटकली, पण आपली मुलगी तिला सापडली नाही. सर्व पर्वत, दऱ्या नि मैदाने तिने धुंडाळली. प्रॉस्परपाइन तिला कोठे ही दिसली नाही.





देवमाता सिरीसने एका म्हातारीचं रूप धारण केलं आणि दुःखी अंतःकरणाने एका शिळेवर बसली. ती नऊ रात्री आणि नऊ दिवस तिथं बसून राहिली. शेवटी सेल्यूस नावाचा एक गरीब माणूस आणि त्याच्या मुलीने तिला पाहिलं. त्यांनी सिरीसला विनंती केली–"माते, आमच्या झोपडीत येशील?"



तो गरीब माणूस नि त्याची मुलगी यांचा दयाभाव देवमातेला जाणवला आणि ती त्यांच्या बरोबर निघाली. रस्त्यात त्या गरीब माणसाने सिरीसला सांगितलं की त्याचा मुलगा बरेच दिवस आजारी आहे आणि आता त्याच्या जगण्याची आशा दिसत नाही.

सिरीस एकाद्या सामान्य म्हातारी प्रमाणे त्याच्या बरोबर आलेली होती. झोपडीत पोचताच कॉट वर पडून राहिलेल्या गरीबाच्या मुलाच्या डोक्याचे तिने चुंबन घेतले. लगेचच त्या मुलाचा चेहरा तजेलदार दिसू लागला आणि तो हसत अंथरुणावर उठून बसला. हे पाहून मुलाचे आई-बाप व बहिण यांना मोठे आश्चर्य वाटले.





त्या मुलाच्या आईला अेक आणखी मोठा चमत्कार पहावयाचा होता. जशी रात्र झाली, तशी सिरीसने झोपलेल्या मुलाला उठवून बसवलं आणि ती त्याच्यावर काही मंत्र फुंकू लागली. मुलाची आई जागीच होती आणि गुपचुप हा सर्व प्रकार पहात होती.

देवी सिरीसने त्या मुलाला एका राखेच्या ढिगाऱ्यावर झोपवलं. मुकाटयाने हे सर्व पाहणारी मुलाची आई आता शांतपणे बसू शकली नाही. ही म्हातारी आता आपल्या मुलाचं काय करणार? ती धावरून गेली आणि आरडा-ओरड करीत तिने आपल्या मुलाला राखेच्या ढिगाऱ्या बाहेर काढलं.





तेव्हा घाबरलेल्या त्या आईला देवी सिरीस म्हणाली—"तू जरा धीर धरला असतास तर तुझा मुलगा अमर झाला असता. मृत्यूवर त्याने जय मिळवला असता. तू मंत्राचा सर्व प्रभाव नष्ट करून टाकलास! बरं आता जाऊ दे. तुझा मुलगा मोठा होईल तेव्हा तो मोठा धाडसी होईल. समाज-कल्याणाची कामें करून तो खूप प्रतिष्ठा मिळवील."

इतकं सांगून देवी सिरीस तेथून निघून गेली. यानंतर काही वेळाने तिला समजलं की तिची मुलगी प्रॉस्परपाइन हिचे प्लूटोशी लग्न झाले आणि आता ती टार्टारसची राणी बनली आहे. तिला झाल्या गोष्टीबद्दल फार समाधान वाटले.





अशीच आणखी काही वर्षं गेली. देवी सिरीस त्या गरीब कुटुंबाला विसरली नाही. मुलगा ट्रिप्टोलिमस आता चांगला मोठा झाला. देवी सिरीस आणखी एकदा त्या गरीबाच्या घरी आली आणि तिने त्या मुलाला नांगराचा वापर करायला शिकवलं. तिने ट्रिप्टोलिमसला बी पेरणं नि शेती-वाडी करणं शिकवलं. अशा रीतीने सिरीसने त्याला जगातला पहिला शेतकरी बनवलं.

सिरीसने त्या तरुणाला पंखवाल्या ड्रॅगनां द्वारे उडणाऱ्या आपल्या रथा-वर बसवलं आणि जगातील अनेक देश त्याला दाखवले. तिचा उद्देश असा की त्याने सर्वांना शेतीची कला शिकवावी. ट्रिप्टोलिमसने हे काम उत्तम रीतीने पार पाडलं.





ट्रिप्टोलिमसने आपल्या गावात देवी सिरीस साठी एक भव्य मंदिर बांधलं. जस-जसे दिवस गेले, तस-तशी या मंदिरात पूजा-अर्चना मोठ्या उत्साहाने होऊ लागली. या मंदिरातील उत्सव ग्रीसचे नागरिक अनेक वर्षे मोठ्या धामधुमीने साजरा करीत असत.



# विकट हास्य

कित्येक वर्षां पूर्वी भद्राचलच्या जंगलात रस्त्याच्या कडेला एका योग्याचा आश्रम होता. तेथे राहणारा योगी नित्य आपल्या तपाचरणात लीन असे. त्याचे शरीर धष्ट-पुष्ट व निरोगी होते. त्याची दाढी लांब वाढलेली होती. त्याच्या चेहऱ्यावर एक अद्भुत प्रकाश दिसे. त्याला पाहताच त्याला आदरपूर्वक नमस्कार केल्याशिवाय कोणी पुढे जाऊ शकत नसे.

हा योगेश्वर या जंगलात केव्हा आला? कसा आला? कोठून आला? जंगलातल्या कोणत्या ही प्राण्याला याबाबत माहिती नव्हती. इथे हा आश्रम कसा बनला, केव्हा बनला–याबाबत सर्वांनाच आश्चर्य वाटे. लोक त्याच्या बद्दल निरनिराळ्या गोष्टी बोलत. काही ही अफवा उडाल्या तरी लोकांना एवढा विश्वास होता की हा आपला उद्धार करण्यासाठी आलेला एक महात्मा आहे. म्हणून त्याचे आशीर्वाद मिळविण्यासाठी लोक तिथे जमा होत असत. पण योगी कोणाशी बोलत नसे. तो नित्य मौन-पालन करी. आश्रमातील एका उच्च स्थानी तो पद्मासन घालून बसे. पाहणारांना वाटे याचा या जगातील कोणाशी काही संबंध नाही. म्हणून तिथे येणारा प्रत्येक माणूस भक्तियुक्त अंतःकरणाने यथाशक्ति दान करून योग्याला नम्रपणे नमस्कार करून पुढे जाई.

चोर-डाकूंनी भरलेल्या या जंगलांत योग्याच्या आगमनामुळे एक प्रकारची जाग आली. लोक जंगलात येऊ लागले आणि त्यांची संख्या दिवसें-दिवस वाढू लागली. त्याबरोबरच लूट-मारीच्या घटना ही वाढू लागल्या.

एक रात्री बऱ्याच उशीरा जंगलातील या रस्त्याने एक गाडी चालली होती.

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



गाडीत तीन स्त्रिया, दोन पुरुष व एक मुलगा होता. बायकांच्या अंगावर दाग-दागिने होते. एकाएकी डाकूंचा एक सरदार गाडीच्या समोर आला नि त्याने गाडीला आडवलं. त्याच्या डोक्यावर बांधलेला साफा, त्याचे बटबटीत लाल डोळे, लांब-लांब मिश्या, हातातील लाठी नि एकंदर वेशभूषा पाहून गाडीत बसलेल्या सर्वांना वाटलं—आता आपली प्राणांशी गाठ आहे. ते मनात खूप घाबरले, त्यांची शरीरं थरथर कापू लागली, तोंडावाटे शब्द फुटेना.

डाकूंचा सरदार लाठी जमिनीवर आपटत आपटत त्यांच्या जवळ आला नि म्हणाला—"तुम्ही सर्व जण मी काय म्हणतो ते लक्षपूर्वक ऐका. माझा धंदा डाकूचा असला तरी माझी कामाची पद्धत वेगळी आहे. मला पाहिजे तुमच्या जवळचं धन, तुमचे प्राण मला नको आहेत. मुकाट्याने आपले दागिने-पैसे मला देऊन टाका, बस तुमच्या जिवाला धोका नाही. जर तुम्ही माझं म्हणणं ऐकलं नाही, तर या झाडीत दबा धरून बसलेले माझे दहा साथी इथं येतील आणि आपलं काम करूनच आराम करतील. ते सर्व जण मोठे निर्दयी आहेत. मी इशारा करण्याचा अवकाश की ते इथे आलेच...! आता तुमचा तुम्ही विचार करा."

गाडीत बसलेल्या लोकांनी झाडांकडे पाहिले, त्यांना काही भयानक चेहरे दिसले तेथे. वाटलं, आता आपल्या प्राणांची काही धडगत नाही. पुरुष एकमेकांकडे पाहू लागले, करणार काय बिचारे? बायकांनी आपले सगळे दागिने दिले. दागिने आणि पैशांचं गाठोडं उचलीत सरदार म्हणाला—"ठीक आहे, आता तुम्ही जाऊ शकता." गाठोडं घेऊन सरदार अदृश्य झाला.

थोड्या वेळाने त्याच रस्त्याने एक व्यापारी चालत तेथे आला. डाकूंचा सरदार त्याला सामोरा गेला नि म्हणाला—"तुझ्या जवळचं सगळं धन दे, नाही तर प्राण द्यावे लागतील!" तो व्यापारी मोठा धाडसी व बुद्धिमान होता. तो डाकूंच्या सरदाराला



म्हणाला—"माझ्याजवळ फार थोडं धन आहे. जे आहे ते माझं नाही!" अगदी निर्भयपणे तो हे सर्व बोलला.

सरदाराने व्यापाऱ्याचं म्हणणं ऐकलं नाही. तेव्हा त्या व्यापाऱ्याने आपलं सगळं धन डाकूंच्या हाती दिलं नि झाडामागे लपलेल्या त्याच्या साथीदारांना उद्देशून म्हणाला—"मित्रांनो, पहा बरं! तुमच्या सरदाराच्या हाती मी एक हजार अशर्फ्या दिल्या आहेत. तुमच्या पैकी कोणा वर अन्याय होऊं नये. आपापला भाग नीट आपल्या पदरात पाडून घ्या." अशा रीतीने आरडाओरड करणाऱ्या त्या व्यापाऱ्याला सरदाराने आपल्या सोट्याचे दोन-चार फटकारे लगावले. रडत-रडत व्यापारी जंगलातून बाहेर पडला नि एका धर्मशाळेत पोचला.

त्या वेळी धर्मशाळेत काही पोलीस व त्यांचा एक अधिकारी यांचा मुक्काम होता. त्याने आपल्यावर ओढवलेल्या संकटांची कथा त्यांना सांगितली. पोलिस म्हणाले—"तो डाकू सरदार कोठे राहतो, चल आम्हाला दाखव. आता आम्ही त्याला पकडून आपल्या ताब्यात घेतो."

सर्व जण जंगलात आले. शिपाई एका जागी लपून बसले. व्यापारी पुढे चालू लागला आणि त्याच्या बरोबर फक्त अधिकारी मात्र राहिला. दोघांना येताना



पाहून चोरांचा सरदार त्यांना आडवण्या-साठी पुढे आला. सोटा जमिनीवर आपटत सरदार त्यांना धमकावू लागला—"पैसे काढा......नाहीतर प्राणांशी गाठ आहे, तिकडे पहा झाडीत माझे सर्व साथी तुमचा समाचार घ्यायला तयार आहेत!"

अधिकारी लाठी नि तलवार यांचा उपयोग करण्यात तरबेज होता. मोठा बहादूर होता तो! त्याने ताबडतोब शिट्टी वाजवली नि तो डाकूंच्या सरदारावर तुटून पडला. अधिकाऱ्याने त्याला घट्ट पकडून खाली पाडलं. शिट्टीच्या इशाऱ्यावर आलेल्या सर्व शिपायांना त्याने आज्ञा दिली—"मी याच्याकडे पाहून घेतो. झाडीत लपून

बसलेल्या याच्या सर्व दोस्तांना तुम्ही पकडा."

शिपाई तत्काल लपलेल्या चोरांना पकडायला पुढे सरसावले. पण त्यांच्या-पैकी कोणी ही जरा सुद्धा हालला नाही. शिपायांशी सामना करायला कोणी पुढे आला नाही किंवा कोणी पळून जायचा ही प्रयत्न केला नाही. शिपायांनी त्यांच्यावर लाठीमार केला. सर्व जण जिथल्या तिथे उभे!

नीट पाहिल्यावर समजलं ती सर्व नुसती बुजगावणी होती, गवताचे पुतळे. डोक्यावर पागोटी बांधलेली होती. सरदाराच्या बुद्धिमत्तेचं सर्वांना आश्चर्य वाटलं!

योग्याचा आश्रम जवळच होता. म्हणून रात्र भर आराम करण्यासाठी सर्व जण तेथे गेले. पण योगेश्वरांचा तिथे पत्ताच नव्हता!

अधिकाऱ्याच्या आज्ञेवरून शिपायांनी सारा आश्रम धुंडाळला. लुटलेली बरीचशी संपत्ती आणि सोन्या-चांदीचे दागिने मिळाले. शिपायांनी तो सर्व माल आपल्या ताब्यात घेतला. आणखी शोध घेतल्यावर आश्रमात एका ठिकाणी एक लांब-काळी दाढी भिंतीला टांगलेली दिसली. सर्व जण ती पाहू लागले. त्यांच्या आश्चर्याला पारावर राहिला नाही.

तेव्हा डाकूंच्या सरदाराने खरं काय ते सांगितलं–"आश्चर्य कसलं करीत आहात? तो माझा दिवसाचा वेश आहे. दाढी लावून मी मौन बसलो की भक्ति-भावाने लोक मला दान करतात. रात्री अन्य प्रकारे मला पैसा व दागदागिने मिळतात! पण आता माझं गुपित उघडकीस आलं. धोका देण्याचं काम नेहमी थोडंच कोणाला जमतं? कायद्याचे हात लांब असतात. केव्हा तरी धोकेबाज पकडला जाणारच! चालायचंच! आज हा वेष...उद्या आणखी एकादा!" असे म्हणून सरदाराने विकट हास्य केले.

अधिकाऱ्याने कपटी व धूर्त योग्याला राजा समोर नेऊन उभे केले. राजाने त्या ढोंग्याला आजीवन कारावासाची शिक्षा ठोठावली.





# वीर हनुमान

राक्षसिणींनी जे सांगितलं ते ऐकून रावणाला फार राग आला. त्याने शूर व बलशाली राक्षसांना बोलवून हनुमानाला पकडून आणण्याची आज्ञा दिली. ते राक्षसवीर शस्त्रास्त्रां सह हनुमानाला पकडायला निघाले. त्यांना अशोक-वनाच्या प्रवेश द्वारी हनुमान दिसला. राक्षसांनी तावडतोब हनुमानाला वेढा घातला. तेव्हा विशालकाय हनुमानाने आपली शेपूट जोराने जमिनीवर आपटली आणि जोराने आवाज करीत दंड थोपटले. तो आवाज लंकेत सर्वत्र सर्वांनी ऐकला.

डोळे लाल-पिवळे करीत हनुमान म्हणाला–"राम-लक्ष्मणाचा जय असो. रामाच्या छत्र-छायेत असलेल्या सुग्रीवाचा जय असो. कोसलराज रामाचा मी दास आहे. मी शत्रूंचा संहार करतो. मी वायु-पुत्र हनुमान आहे! वृक्ष आणि दगडांच्या शस्त्रांनी मी हजार रावणांशी सामना करू शकतो. तुमच्या डोळ्यांसमोर मी सारी लंका उध्वस्त करून टाकीन नि सीतेला नमस्कार करून रामाकडे जाईन. काय वाटलं तुम्हाला?"

हे सगळं बोलणं ऐकून राक्षसवीर घाबरले. तरी पण राजा रावणाच्या आदेशानुसार त्यांनी युद्ध करण्याचा निश्चय केला आणि अनेक शस्त्रांचा वापर करायला सुरुवात केली. हनुमानाला प्रवेश-द्वारा-जवळच एक लोखंडी गदा सापडली. ती हाती घेऊन हनुमानाने अनेक राक्षसांना

## १५. राक्षसांशी युद्ध



खाली पाडले. आणि मग तो अशोक-वनाच्या प्रवेश-द्वारी येऊन दाखल झाला.

घाबरलेल्या राक्षसांनी जाऊन राक्षस-वीरांच्या मृत्युची बातमी रावणाच्या कानांवर घातली. ती ऐकून रावणाचा क्रोध आणखी भडकला आणि त्याने महान् वीर प्रहस्ताच्या मुलाला हनुमानाशी लढायला पाठवलं.

एवढ्यात चैत्यप्रासाद हनुमानाच्या नजरेस पडला. हनुमानाच्या मनात विचार आला—हा चैत्यप्रासादच का उध्वस्त करून टाकू नये! लगेच त्याने प्रासादावर उडी मारली आणि तो ध्वस्त करून सिंहगर्जना केली. आता चैत्यप्रासादाचे रक्षक आपली शस्त्रे घेऊन हनुमानाशी लढायला आले. हनुमानाने एक खांब उपटून तो हवेत गरगर फिरवला आणि राक्षसांवर फेकला. शंभराच्या वर राक्षस मृत्यु-मुखी पडले.

याच वेळी प्रहस्ताचा मुलगा जंबुमाली गाढवं जुंपलेल्या रथावर स्वार होऊन हातात धनुष्य-बाण घेऊन हनुमानाशी लढाई करण्यासाठी आला. त्याला पाहताच हनुमानाचा युद्धा संबंधी उत्साह वाढला आणि त्याने गर्जना केली.

प्रवेश-द्वारी उभ्या असलेल्या खांबावर हनुमान बसला होता. जंबुमालीने त्याच्यावर बाण सोडायला सुरुवात केली. काही बाण हनुमानाच्या चेहऱ्यावर व हातांवर पडले आणि तो रक्ताने माखून गेला. आपल्या जवळ पडलेला एक भला मोठा दगड हनुमानाने जुंबमालीच्या रोखाने फेकला. जंबुमालीने आपल्या बाणांनी तो दगड खाली पाडला. तसेच हनुमानाने फेकलेल्या सालवृक्षाला ही त्याने आपल्या बाणांनी कापून टाकले आणि आणखी काही बाणांनी हनुमानाला जखमी केले. आता हनुमानाला असह्य राग आला नि आपली लोह-गदा जोरात फिरवून जंबुमालीकडे फेकली. तिच्या तडाख्याने जंबुमाली, त्याचे रथ व घोडे सर्वांचा नायनाट झाला. कोणी शिल्लक राहिले नाही.



जंबुमाली मेल्याचे जेव्हा रावणाने ऐकले तेव्हा त्याच्या कानशिलांना कंप सुटला. त्याने अग्निहोत्रा सारख्या तेजस्वी आपल्या सात मंत्री-पुत्रांना पाचारण केलं नि सेने-सह त्यांना हनुमानावर चालून जायला सांगितलं. प्रत्येक जण 'मी हनुमानाला मारणार!' अशी प्रतिज्ञा करून घोडे जुंपलेल्या आपल्या रथात बसून निघाले.

अशोकवनाच्या द्वारी पोचताच त्यांनी हनुमानावर बाणांचा वर्षाव केला. ते बाण आपल्या पर्यंत पोचू नयेत, म्हणून हनुमान आकाशात इकडे-तिकडे घिरट्या घालू लागला. तो सिंह-गर्जना करीत राहिला आणि त्यामुळे राक्षसांची घाबर-गुंडी उडाली. हनुमानाने त्यांना हाताने ठोसे मारले, पायांनी लाथा झाडल्या, मुठींनी गुद्दे मारले आणि आपल्या नखांचा उपयोग करून सर्वांना घायाळ केले. अशा रीतीने कित्येक राक्षसांचा अंत झाला. मरणारे मेले, ज्यांनी आपले प्राण वाचवले त्यांनी मागे पळ काढला.

हनुमान पुन्हा प्रवेश-द्वारी येऊन ठाकला. आणखी युद्ध करण्यासाठी त्याचे सर्व अवयव शिवशिवत होते.

रावणाला जेव्हा समजलं की सर्व मंत्री-पुत्र मृत्यु-मुखी पडले, तेव्हा त्याच्या मनात आता भय निर्माण झालं. तरी पण ते बाहेर न दाखवता रावणाने आपले सेनापती विरूपाक्ष, यूपाक्ष, दुर्धर, प्रघस आणि भावकर्ण यांना पाचारण करून सांगितलं—





"रथ नि हत्ती घेऊन जाऊन तुम्ही त्या वानराची खोड मोडा. त्याच्याकडे जरा ही दुर्लक्ष करू नका. तो वानरच आहे की नाही याबद्दल मला शंका आहे. हे एकादं महान बलशाली भूत दिसतंय! इन्द्राने तप करून आपला नाश करण्यासाठी याला निर्माण केलं असावं असं वाटतंय मला! वाली, सुग्रीव, जांबवंत, नील, द्विविद यांच्या सारखे वानरवीर मी पाहिले आहेत. पण त्यांच्यापैकी कोणात एवढी बहादुरी नाही. तुम्ही आपली सारी शक्ति एकवटून या या वानराला पकडा नि त्याला बंदी बनवा. या प्रयत्नात आपले स्वतःचे प्राण मात्र गमावून बसू नका."

राजाज्ञा झाली त्यानुसार हे पाच ही सेनापति रथ, हत्ती, घोडे आणि अनेक शस्त्रास्त्रे घेऊन सैन्यासह निघाले आणि हनुमानाच्या जवळ आले. त्यांनी सर्वांनी हनुमानाला वेढलं आणि एकसमयावच्छेदेकरून अनेक शस्त्रांचा उपयोग केला. त्यांनी फेकलेले काही बाण हनुमानाच्या तोंडावर आले, लगेच हनुमानाने गर्जना केली आणि पक्षासारखा तो आकाशात उडू लागला. तेव्हा दुर्धराने आकाशात शेकडो बाण सोडले. त्या बाणांपासून आपला बचाव करीत हनुमानाने आपले शरीर विशाल केले आणि विजेप्रमाने दुर्धराच्या रथावर तो तुटून पडला. दुर्धरा बरोबरच त्याचे रथाचे आठ घोडे मेले, रथाचे तुकडे-तुकडे झाले.

यानंतर हनुमानाने एक सालवृक्ष समूळ उपटून तो विरूपाक्ष व यूपाक्ष यांच्यावर टाकला, आणि ते दोघे ही प्राणाला मुकले. आता हनुमान प्रघस नि भावकर्ण यांच्याशी युद्ध करू लागला. त्याने एक छोटी टेकडी उचलून तिच्या प्रहाराने दोन्ही सेनापति व त्यांची सेना यांचा संहार केला.

मग हनुमान पुन्हा दारापाशी येऊन उभा राहिला.

हनुमानाने आपल्या पाच ही सेनापतींना ठार केल्याची बातमी जेव्हा रावणाला



मिळाली तेव्हा त्याने आपला मुलगा अक्षकुमार याच्याकडे पाहिले. युद्धाची विशेष आवड असणारा अक्षकुमार वडिलाचं असं पाहणं म्हणजे युद्धाला जाण्याची आज्ञा हे समजला. एका सोन्याच्या रथावर बसून तो हनुमानाशी युद्धाला सज्ज झाला. आठ घोडे जुंपलेला अक्षकुमारचा रथ जसा काही हवेत चाले. या रथावर नेहमी निरनिराळी शस्त्रास्त्रे असत.

अक्षकुमाराने हनुमानाला पाहिले आणि तो समजला की आता गाठ एका असामान्य वीराशी आहे. म्हणून मोठ्या प्रमाणावर युद्धाची त्याने तयारी केली. दोघांच्यात घनघोर युद्ध झाले. अक्षकुमाराने हनुमानावर निरनिराळ्या शस्त्रांनी प्रहार करायला सुरुवात केली, त्यामुळे हनुमानाचा युद्धा बाबतचा उत्साह वाढला. तो आकाशात उडाला. तेव्हा अक्षकुमार ही आपल्या रथा सह आकाशात उड्डाण करून हनुमानावर बाण फेकू लागला. त्या बाणांच्या तावडीतून आपला बचाव करीत हनुमान आकाशात फिरू लागला. आता या अक्षकुमाराला कसं मारावं याबाबत तो विचार करू लागला. हनुमानाने विचार केला — इतक्या लहान वयात अशा पराक्रमी अक्षकुमाराला आता मारलं नाही तर नंतर हा फारच उपद्व्याप करील. मग त्याने सावधपणे अक्षकुमारचे



पाय घट्ट पकडले नि त्याला हवेत गरगरा फिरवून जोराने जमिनीवर आपटले. पाहता पाहता अक्षकुमाराने प्राण सोडले.

अक्षकुमाराच्या मृत्यु बाबत जाणून रावणाला फार दुःख झालं. आपलं दुःख आवरत त्याने आपला मुलगा इंद्रजित् कडे पाहिलं आणि म्हणाला—"या वानराने आतापर्यंत जंबुमाली, मंत्र्यांचे पुत्र, पाच सेनापति, पुष्कळ सैन्य आणि तुझा धाकटा भाऊ अक्ष यांचे बळी घेतले. म्हणून त्याच्या शक्तीचा नीट अंदाज घेऊन तू त्याच्याशी युद्ध कर. युद्धभूमीत तू माझ्याप्रमाणेच बलाढ्य आहेस, तू देवतांना युद्धात पराभूत करू शकतोस. तू आता आपल्या बरोबर



सैन्य घेऊ नकोस, आपल्या अस्त्रांवरच तुझा अधिक विश्वास असू दे. तू स्वतःचं संरक्षण उत्तम रीतीने करू शकतोस याबद्दल मला पूर्ण विश्वास आहे. म्हणूनच मी तुला त्या वानराबरोबर लढण्यासाठी पाठवीत आहे."

इंद्रजितने वडिलांना प्रदक्षिणा घातली आणि तो युद्धावर जायला निघाला. रथावर स्वार होऊन तो तत्काल हनुमानाजवळ पोचला. हनुमानाने इंद्रजितला जसं पाहिलं त्याला उत्साहाचं स्फुरण आलं नि त्याने सिंहनाद केला.

इंद्रजितने हनुमानावर बाण सोडायला सुरुवात करताच हनुमान अकाशात उडाला. इंद्रजितच्या बाणांपासून स्वतःचा बचाव करीत तो मोठ्या उत्साहाने आकाशात इतस्ततः विहार करू लागला. इंद्रजितच्या लक्षात आलं की आपला एक ही बाण हनुमानाला लागलेला नाही, म्हणून तो खूपच चिडला त्याला समजलं की हनु-मानाला मारणं काही सोपं काम नाही. म्हणून निदान त्याला पकडण्यासाठी इंद्रजितने हनुमानावर ब्रह्मास्त्र सोडले. यामुळे ब्रह्मास्त्रात बांधला गेल्याने हनुमान आकाशांतून खाली पडला नि लाचार बनून निष्क्रिय अवस्थेत पडून राहिला.

आपण ब्रह्मास्त्रात बांधले गेलो आहोत हे हनुमानाला समजलं. आता त्याला आठवलं की ब्रह्मदेवाने त्याला वर दिला होता–'तू कोणत्या ही अस्त्राने बांधला जाणार नाहीस!' तरी पण काही वेळ ब्रह्मास्त्राच्या बंधनात राहण्याचा त्याने निश्चय केला. आवश्यकतेनुसार ब्रह्म, इन्द्र व वायु त्याला संरक्षण देतील असा विश्वास होता. एवढंच नव्हे, यामुळे त्याला आता रावणाशी बोलायची संधि मिळणार होती.

हनुमान हालचाल न करता पडून राहिला. राक्षस त्याच्या जवळ गेले. त्यांनी त्याला दोरांनी बांधून टाकले. हनुमानाला राक्षसांनी जसं बांधलं, तशी ब्रह्मास्त्राची पकड सुटली. इतर बंधनं असतील तिथं ब्रह्मास्त्र टिकत नाही, ही





गोष्ट इंद्रजितला माहित होती, म्हणून मूर्ख राक्षसांनी हनुमानाला साधारण दोरांनी बांधताना पाहून तो त्रस्त झाला. पण जेव्हा राक्षस घेऊन जाऊ लागले तेव्हा सुद्धा हनुमानाला हे समजलं नाहीं की ब्रह्मास्त्राच्या बंधनातून तो मुक्त झालेला होता.

लाठ्यांनी मार-पीट करीत, मुष्टिप्रहार करीत राक्षस विजयोत्साहाने हनुमानाला रावणाकडे घेऊन जाऊ लागले.

रावण नि त्याच्या दरबाऱ्यांचं लक्ष हनुमानाकडे वेधत इंद्रजित म्हणाला– "हा तो उद्धट वानर!" मस्त हत्ती-सारख्या तगड्या हनुमानाला पाहून दरबारी जन आपापसात विचारू लागले– "हा कोण असावा बरं? हा वानर लंकेत कशासाठी आला? कुठल्या कामगिरीवर हा आला असावा? लंकेत याचं कुणाशी काय काम असणार?"

रावणाच्या दरबारात पाऊल ठेवताच हनुमानाने एकदा सर्व दरबाऱ्यांकडे नजर टाकली आणि मग तो रावणाकडे पहात राहिला. रावणाचे डोळे निखाऱ्यासारखे लाल लाल झाले होते. रावणाने आपल्या मंत्र्यांकडे पाहून जणू काही सुचविले की त्यांनी आता हनुमानाला फैलावर घ्यायला सुरुवात करावी. तेव्हा रावणाच्या मंत्र्यांनी हनुमानाला प्रश्न विचारले–

"कोण आहेस तू? आणि इथं कशासाठी आला आहेस? तुला इथं कोणी पाठवलं आहे ते सांग!"

हनुमानाने न घाबरता उत्तर दिलं– "वानरराज सुग्रीवाचा मी दूत आहे. त्याने मला इकडे पाठवलं आहे!"

तेव्हा रावणाने प्रहस्ताला आदेश दिला– "विचार त्याला की तो इथे कशासाठी आला आहे? त्याने सुंदर अशोक-वन उध्वस्त केलं. राक्षसिणींना याने का घाबरवलं, आमच्या सैनिकांशी युद्ध करून याने इतक्या राक्षसवीरांचा वध कशासाठी केला?"





# नाग देवता

कमलपुरमधे पार्वतीबाई नावाची एक श्रीमन्त स्त्री रहात असे. तिला चार मुले होती. पतीच्या मृत्युनन्तर तीच आपल्या मुलांची आई व बाप अशा दोन्ही भूमिका निभावू लागली. जेव्हा चारही मुले मोठी झाली तेव्हा त्यांनी जवळच्या शहरात एक कापडदुकान घातले. नन्तर चारही मुलांसाठी योग्य मुली पाहून पार्वती-बाईने त्यांची लग्ने लावून दिली.

पार्वतीबाई मनाने चांगली होती, पण ती महाकंजूषही होती. घरात लाखो रुपये असूनही, एवढी-तेवढी रक्कम खर्च करताना तिच्या नाकी नऊ येत.

सुनांना वाटे – केव्हांतरी सासू काही निमित्ताने गाव सोडून कुठे जाईल तेव्हां आपल्याला आवडीचे पदार्थ करून खाता येतील. पण पार्वतीबाईला गाव सोडून जाण्याचा प्रसंग क्वचितच येई.

एकदा पार्वतीबाईच्या धाकट्या भावाचे पत्र आले की तिने त्याच्याकडे निघून यावे. तो जवळच्या एका गावी रहात असे. पार्वतीबाईने दुसऱ्याच दिवशी तिकडे निघायचे ठरवले. बास, ते ऐकूनच सुनांचे चेहरे उजळले!

पण पार्वतीबाई चांगलीच हुषार होती. तिला हे सर्व लक्षात यायला वेळ लागला नाही. पण वरवर मात्र तिने ते दिसू दिले नाहीं. रात्री पार्वतीबाई झोपायला गेली, तेव्हां घराच्या पिछाडीला तुळशीवृन्दावना-जवळ चारी सुना एकत्र जमल्या. आपसात बोलून त्यांनी ठरवले की, सासू दोन दिवस घरी नसेल, तेव्हां आपण आपापल्या आवडीची पक्वान्ने करून खाऊ या!

थोरली सून म्हणाली, की कित्ती दिवसां-पासून तुपात तळलेले वडे खायची आपली इच्छा आहे. दुसरीला काजूकतली खायची

सौ. सुजाता जाधव



होती, तिसरीला खव्याच्या करंज्या खायच्या होत्या, तर चौथीला शिरा-पुरी फारच आवडत असे!

अशा तऱ्हेने पदार्थांची नावे घेतल्यावर त्या आपापल्या खोल्यांकडे निघून गेल्या. पण दुसऱ्या दिवशी बनवायच्या पदार्थांच्या विचारात त्यांना झोप येईना. इकडे झोपेचे सोंग घेऊन पडलेल्या सासूने आपले सर्व बोलणे ऐकले असेल, याची त्यांना काय कल्पना!

दुसऱ्या दिवशी पहाटेच उठून पार्वतीबाई बैलगाडीत बसली, अन् आपल्या भावाच्या गावाकडे निघाली. निघणाऱ्या गाडीकडे सुना आनन्दाने पहात राहिल्या.

खरे तर सुना याच घडीची वाट पहात होत्या. सासू निघाल्याबरोबर पटापट त्या पदार्थ बनवायच्या तयारीला लागल्या. त्यासाठी आवश्यक सामान मागवले गेले. वडे बनवण्यासाठी डाळ पाण्यात भिजत पडली. चार प्रकारच्या भाज्या, चटण्या वगैरे बनून तयार झाल्या.

सर्वजण मोठ्या खुषीत होते. त्यांचे नवरे एकीकडे चांगले खायला मिळणार म्हणून खुष होते, तर आईला कळले तर काय होईल म्हणून एकीकडे घाबरतही होते. पण चारी सुनांनी आपापल्या नवऱ्यांची समजून घातली अन् त्यांच्याकडून आपल्या आईजवळ याबद्दल काही न बोलण्याचे वचनही घेतले.

चारी भाऊ जेव्हा शहराकडे निघाले, तेव्हा सुना पक्वान्ने बनवायच्या कामाला लागल्या. प्रथम लोणी कढवून तूप तयार केले गेले. नंतर डाळ वाटली गेली. आता चूल पेटवणार इतक्यात दरवाजा खटखटल्याचा आवाज आला.

थोरल्या सुनेने जाऊन दरवाजा उघडला, तो काय! क्षणभर गोंधळून ती खांबासारखी खिळूनच गेली. समोर सासू साक्षात उभी! ती हसत हसत सुनेकडे पहात होती.

पार्वतीबाईच्या हातात एक शिप्तर होते. ती बरीच दमलेलीही होती. शिप्तर टेकत, ऊर धपापत ती म्हणाली—आई ग! काय उन्ह हे! मधेच गाडी थांबवून परत फिरले बाई! पुढे जायची काही शामत नाही आपली!" इतके बोलून ती घरात शिरली.

सासूचा आवाज ऐकून इकडे सुना भीतीने थरथर कापू लागल्या. रवा, साखर, काजू, बेदाणे वगैरे जिनसा लपवून ठेवून त्या माजघरात निघून आल्या.

"अं? तुपाचा वास येतोय! काय करीत आहात ग?" सुनांकडे तीक्ष्ण नजर टाकत पार्वतीबाईने विचारले.

"काही नाही सासूबाई! तूप संपलं होतं ना, म्हणून लोणी कढवलं इतकंच!" मोठी सून उत्तरली.

बाकीच्या सुनांनीही तिला पाठिंबा देत माना डोलावल्या.

"हो खरंच! तुपाच्या नावानं मला एक आठवण आली! मधेच थांबलेल्या माझ्या प्रवासात एक आक्रित घडलं!" जवळच्या खुर्चीवर बसत पार्वतीबाई म्हणाली.

"काय आश्चर्य घडलं सासूबाई? लवकर सांगा न आम्हाला." म्हणत चारी सुनांनी सासूला गराडा घातला.

पार्वतीबाई सांगू लागली—"मी पहाटे गाडीतून निघाले नं? पण भावाच्या गावाच्या अलिकडल्या जंगलात बैलाच्या पायात चांगला लांब काटा घुसला, बैल जागीच थांबला! गाडीवानाने उतरून





काटा काढायला सुरुवात केली. मी जरा जवळ असलेल्या एका पडक्या मंडपाकडे निघाले. तिथे जरा बसायचा विचार होता माझा. पण अचानकच मला तुपातल्या वड्यांच्या वास आला!" असे म्हणून पार्वतीबाई थोडी थांबली.

वड्यांचे नाव निघताच थोरली सून जरा दचकली. पण तिनें कसेबसे स्तःतला सावरून घेतले. ते ओळखून हळूच पार्वतीबाई सांगू लागली.

"खरंच काय प्रकार आहे तो पहावा म्हणून मी वासाच्या दिशेने निघाले, तर थोडं पुढे गेल्यावर मोठ्या मोठ्या अंड्यांसारख्या दिसणाऱ्या खव्याच्या करंज्या तिथे आढळल्या मला! ही कसली अंडी, ते न समजून मी पुढे निघाले, पण एकाएकी माझं काळीज धडधडू लागलं!" असे म्हणून ती पुन्हा जरा थांबली.

"पुढे काय दिसलं सासूबाई?" खव्याच्या करंज्यांचं नाव ऐकून घाबरलेल्या तिसऱ्या सुनेने आपली भीति लपवत विचारले–

"हां, तेच तर सांगतेय मी! तिथे गव्हाळ रंगाचा एक नाग आपला फणा उभारून डोलत होता! त्याचा फणा कसा दिसला सांगू?" आपली ओंजळ दाखवत सासू म्हणाली–"इतकी मोठी, अगदी शिरा पुरी ठेवल्यासारखा चमचमत होता तो!"

शिरा-पुरी खूप आवडणाऱ्या चौथ्या सुनेला दचकून उचकीच आली. स्वतःला संभाळत तिने विचारले–"मग काय झालं?"

"तेच तर सांगतेय न? नागाला पाहून मी तर बाई घाबरूनच गेले! इतक्यात एक साधु आला तिथे. त्याच्या हातात केळ्याच्या पानात बांधलेली एक पुरचुंडी होती. मला घाबरलेली पाहून हसून तो म्हणाला–"ही तर नागदेवता आहे माई! ही जिथे असेल, तिथे नेहमी तुपातल्या वड्यांचा वास येतो! फणा अगदी शिरापुरी एकत्र ठेवल्यासारखा दिसतो, अन् यांची अंडी सांपाच्या अंड्यांसारखी न दिसता अगदी खव्याच्या करंज्यांसारखी दिसतात." इतकं बोलून त्या साधूने हातातली पुरचुंडी उघडली अन् ती नागापुढे ठेवली. माहीत आहे, त्यात काय होतं? त्यात तर नाजुक-साजुक काजूकतली होती!" पार्वतीबाईने सांगितले.

"काजूची कतली?" एकदम बोलून, काजूकतली आवडणारी दुसरी सून संकोचली.

"हो, काजूकतलीच! नागदेवतेने तिचा वास घेतला की साधू ती मिठाई 'प्रसाद' म्हणून उचलतो." पार्वतीबाईने आपली हकीकत संपवली.

सर्व हकीकत ऐकल्यावर चारी सुनांना कळून चुकले की आपली गुप्त मसलत सासूने अक्षरन् अक्षर ऐकलेली आहे! अन् म्हणूनच तिने नागदेवतेची गोष्ट रचून सांगितली आहे. आता चारी सुनांनी सासूच्या पाया पडून मोकळेपणी म्हटले–"आम्हाला क्षमा करा सासूबाई!"

पण आता पार्वतीबाईनेही सर्व सुनांना कवटाळत म्हटले–"ठीक आहे, ठीक आहे! आता अगोदर ते शिप्तर घ्या पाहू इकडे! पहा तर खरं, काय आहे त्यात ते!"

सुनांनी ते शिप्तर उघडून पाहिले, वा! वा! त्यांचे चेहरे आनन्दाने चमकू लागले! कारण शिप्तरात बरोब्बर त्यांना हवे असलेले पदार्थच ठेवलेले आढळले त्यांना! तुपातले वडे, काजू-कतली, खव्याच्या करंज्या आणि शिरा-पुरी! काय गंमत!

"तुम्ही कित्ती चांगल्या आहात सासूबाई!" चारी सुना पार्वतीबाईला बिलगत म्हणाल्या. आता पार्वतीबाई बोलू लागली–"खरं तर मीच तुमची क्षमा मागायला हवी मुलींनो! इतका पैसा असून मी तुम्हाला मनासारखं खायला दिलं नाही. एवढं आहे, त्यात सुख न मिळालं तर काय उपयोग? आता यापुढे, तुम्हाला हवं ते बनवून तुम्ही खात जा, अन् मलाही थोडंसं देत जा."

सासूच्या या उद्गारांनी सुनांनाही गहिंवरून आले.





# मासा हसला!

**फार** वर्षां पूर्वीची काश्मीर मधील एक गोष्ट. मासे विकणारी एक बाई टोपलीत मासे घेऊन राजवाड्यावर आली. राणीला मासे फार आवडत. ती टोपलीतील मासे पाहू लागली. एक मासा उड्या मारीत होता.

राणीने मासेवालीला विचारलं–"मला मादी मासा पाहिजे. हा नर आहे की मादी?"

हा प्रश्न ऐकल्या बरोबर मासा हसला! मासेवाली म्हणाली–"माझ्या टोपलीत तर सगळे नरच आहेत." राणीने एक ही मासा खरेदी केला नाही. मासा हसला म्हणून राणीला फार राग आला. त्या रागात ती आपल्या कोपभवनात निघून गेली.

राणीच्या रागाचं कारण राजाला समजलं. मंत्र्याला बोलवून राजा म्हणाला–"एका य:कश्चित् माशाचं एवढं साहस की त्याने या देशाच्या राणीला हसावं! सावधान, एक महिन्याच्या आत माशाच्या हसण्याचं कारण जाणून तू मला सांगितलं नाहीस तर तुझं डोकं उडवलं जाईल!" मंत्र्याला ही सूचना देऊन राजाने रवाना केले.

मंत्र्याला फारच दु:ख झालं, दु:खी-कष्टी अंत:करणाने तो घरी आला. अनेक बुद्धिमान पंडित, चतुर व्यक्ति, ज्योतिषी, योगी नि मांत्रिकांशी त्याने सल्लामसलत केली. उदास अंत:करणाने मंत्र्याने सर्वांना एकच प्रश्न विचारला–"एक सामान्य मासा राणीला हसला. याचं काय कारण असावं तुम्ही मला सांगाल?"

कोणी ही संतोषजनक उत्तर देऊ शकलं नाही. मंत्री बिचारा निराश झाला. त्याने प्राणांची आशा सोडली.

मंत्र्याचा मुलगा मोठा बुद्धिमान होता. आपल्या वडिलांच्या प्रश्नाचं उत्तर शोधायला तो स्वत:च निघाला. काही दिवस त्याने प्रवास केला. एकदा रस्त्यात त्याला एक शेतकरी भेटला. त्या शेतकऱ्यासह मंत्र्याचा मुलगा ही चालू लागला.

काश्मीरी लोककथा



काही अंतर चालून गेल्यावर म्हाताऱ्या शेतकऱ्याला मंत्र्याच्या मुलाने विचारले–"असं चालण्याऐवजी आपण दोघांनी एकमेकांना आपल्या खांद्यावर उचलून घेतलं तर प्रवासाचे श्रम कमी होतील नाही?"

शेतकऱ्याने काही उत्तर दिलं नाही. त्याला वाटलं या मुलाच्या डोकं जरा बिघडलेलं दिसतंय!

आणखी काही अंतर चालून गेल्यावर मंत्र्याच्या मुलाने कापणीला तयार असलेलं एका शेतातलं पीक पाहिलं. त्याने म्हाताऱ्याला विचारलं–"आता पर्यंत हे पीक कोणी खाऊन का बरं नाही टाकलं?"

या ही प्रश्नाचं शेतकऱ्याने काही उत्तर दिलं नाही. पण त्याचा संदेह मात्र दुणावला, जरूर या मुलाचं डोकं फिरलेलं दिसतंय!

असंच आणखी पुढे गेल्यावर एक जंगल लागलं. मंत्र्याच्या मुलाने आपला सुरा काढला नि तो शेतकऱ्याला देत विचारलं–"हा सुरा घेऊन जाऊन दोन घोडे आणू शकशील? आपल्याला उपयोगी होतील. हा सुरा मात्र कोठे हरवू नकोस हं! हा मोठा मूल्यवान आहे."

शेतकऱ्याने या प्रश्नाचं ही काही उत्तर नाही दिलं. पण मनात त्याने पक्कं जाणलं की हा मुलगा खरंचच वेडा आहे.

जंगल ओलांडून दोघे जण शहरात आले. शहरात कोणी ही त्यांच्याशी बोललं नाही. शहर चारी बाजूंनी निरखून पाहून मंत्र्याचा मुलगा म्हणाला–"वा, काय छान स्मशान आहे!" शेतकरी हसला.

आता शहर पार करून दोघे ही स्मशानात आले. स्मशानात एका प्रेताचा दाहसंस्कार चालू होता. मेलेल्या माणसाचे नातेवाईक तेथील लोकांना व रस्त्यावरून जाणारांना काही खाद्य-पदार्थ देत होते. त्या दोघांना ही काही खाद्य-पदार्थ मिळाले.



दोन पावलं चालून मंत्री-पुत्र थांबला, चारी बाजूंना पहात तो म्हणाला– "वा! किती भव्य नगर आहे नाही!"

शेतकऱ्याला आता सर्व कळून चुकलं होतं. तो गप्पच राहिला. दोघे ही चालत राहिले. एक नाला आडवा आला. शेतकऱ्याने वहाणा हातात घेतल्या, धोतर जरा वर करून नीट बांधलं आणि तो नाला पार करून गेला. पण मंत्र्याच्या मुलाने असं काही न करता नाला पार केला.

शेवटी शेतकरी आपल्या गावी पोचला. आपल्या बरोबर आलेला मुलगा वेडा आहे, हे माहित असून ही, शेतकऱ्याने त्याला आपल्या घरी जेवायला बोलवले.

यावर मंत्र्याचा मुलगा म्हणाला–"मी तुमच्या घरी येईन. पण अगोदर तुमच्या घराच्या तुळया मजबूत आहेत याची खात्री करून घ्या नि मग मला बोलवा."

या वेड्याशी बोलण्यातच काही अर्थ नाही असा विचार करून शेतकरी एकटाच घरात शिरला. आपली बायको व मुलांना बरोबर आलेल्या मुलाची कथा विस्ताराने सुनावली.

शेतकऱ्याची मुलगी मोठी चतुर होती. वडिलांनी सांगितलेल्या गोष्टी ऐकून म्हणाली–

"पिताजी, आपल्या बरोबर जो मुलगा आलेला आहे, तो वेडा नाही. चांगला बुद्धिमान दिसतो आहे. म्हणूनच त्याचं बोलणं तुम्हाला समजलं नसावं! एकमेकांना खांद्यांवर घेऊन जाण्याचा अर्थ आपापसात गप्पा-गोष्टी करीत प्रवासाचा त्रास हलका करीत चलणे. शेताला खाऊन टाकण्याचा अर्थ सावकारांनी हे पीक अजून आपल्या घशात कसं घातलं नाही? सुरा घेऊन जाऊन दोन घोडे आणण्याचा अर्थ दोन फोक कापून आणणे, वेळ आली तर ते उपयोगी पडतील. शहरात आपल्या ओळखीचं कोणी नसेल तर ते स्मशानच नाही का? नाला पार करताना पाण्यात कशावर



पाय पडेल सांगता येत नाही, म्हणून त्याने चपला काढल्या नाहीत! हा मुलगा बुद्धिमान दिसतोय. आपल्या घराच्यात तुळया मजबूत आहेत याचा अर्थ त्याला जेवण देण्याचा खर्च आपण सहज करू शकतो ना असा आहे. मी त्याचं आतिथ्य अवश्य करीन."

शेतकऱ्याच्या मुलीने बारा चपात्या, एक छोटीशी वाटी भर तूप, एका भांड्यात अर्धा शेर दूध असं सगळं एका नोकराच्या हाती दिलं नि गावाबाहेर विश्रांति घेत असलेल्या मंत्र्याच्या मुलाकडे त्याला पाठवलं. तिने बरोबर एक पत्र ही दिले. पत्रात लिहिले–

"मित्रा, चन्द्र संपूर्ण आहे. वर्षाचे बारा महिने असतात. समुद्र आपला किनारा पार करू इच्छितो आहे."

शेतकऱ्याच्या मुलीचा नोकर भोजन-सामग्री घेऊन निघाला. त्याला वाटेत त्याचा मुलगा भेटला. त्याला भूक लागली होती. थोडं भोजन त्याने आपल्या मुलाला दिलं नि बाकीचं जाऊन मंत्र्याच्या मुलाला दिलं. मंत्र्याच्या मुलाने भोजन केलं, शेतकऱ्याच्या मुलीने दिलेले पत्र वाचले आणि त्याचं एक उत्तर ही लिहिलं. नोकरा करवी ते उत्तर शेतकऱ्याच्या मुलीला मिळालं. उत्तरात लिहिलं होतं–



"धन्यवाद! अमावास्येचा चन्द्र होता, म्हणून तो दिसलाच नाही. मला वाटतं वर्षाचे आकराच महिने असतात. समुद्रातील निम्मे पाणी आटून गेले, आता तो आपला किनारा कसा ओलांडून जाणार?"

हे पत्र वाचताच शेतकऱ्याच्या मुलीने रागाने नोकराला विचारले–"मी दिलेलं तूप, एक चपाती आणि निम्म्या दुधाचं तू काय केलंस?"

नोकराच्या चोरीचा पत्ता लागला. शेतकऱ्याच्या मुलीने नोकराला विचारताच त्याने तत्काळ खरं सांगून टाकलं. आता मंत्र्याच्या मुलाची हुशारी शेतकऱ्याच्या ही लक्षात आली.

म्हातारा शेतकरी लगेच घराबाहेर पडला. स्वतः जाऊन मंत्र्याच्या मुलाला घरी घेऊन आला. मंत्र्याचा मुलगा नि शेतकऱ्याची मुलगी बराच वेळ गप्पा-गोष्टी करीत बसले. शेवटी मंत्र्याच्या मुलाने शेतकऱ्याच्या मुलीला मासा राणीला हसल्याची गोष्ट सांगितली आणि विचारलं– "सांग बरं, मासा राणीला का हसला असावा?"

शेतकऱ्याची मुलगी म्हणाली–"राणीच्या अंतःपुरात सर्वांची नजर चुकवून एकादा पुरुष रहात असावा!"

हे उत्तर ऐकून मंत्र्याच्या मुलाला आश्चर्य वाटलं. तो म्हणाला–"हे खरं असेल तर ते सिद्ध केलं पाहिजे. तू या कामी मला मदत करशील? माझ्या वडिलांचे प्राण वाचतील!"

शेतकऱ्याच्या मुलीने हा प्रस्ताव मान्य केला नि मंत्र्याच्या मुलाला मदत करण्यासाठी ती त्याच्या बरोबर निघाली. दोघे राजधानीत पोचले आणि मंत्र्याच्या घरी आले. शेतकऱ्याच्या मुलीचा तर्क जाणून मंत्री खुश झाला. त्याने जाऊन राजाला माशाच्या हसण्याचं कारण सांगितलं.

राजाने मंत्र्याला विचारलं–"पण याला काही पुरावा?"

शेतकऱ्याच्या मुलीने सुचवलं–"एक खंदक खणा, आणि राणीच्या सर्व सेविकांना एकेक करून त्यात उडी मारायला सांगा."

एक खंदक खणण्यात आला आणि एकेक सेविकेला बोलवून तिला त्यात उडी मारायला सांगण्यात आलं. सर्वांना भीति वाटली, कोणी ही उडी मारली नाही. फक्त एकीने धाडस केलं! शेतकऱ्याची मुलगी म्हणाली- "ही स्त्री नाही, हा पुरुष आहे!" खरंच ती सेविका पुरुष होती. हे समजल्यावर राणीला फार आनन्द झाला. तिने त्या पुरुषाला कडक शिक्षा सुनावली.

राजाने मंत्र्याला अनेक पारितोषिके दिली. मंत्र्याचा मुलगा आणि शेतकऱ्याची मुलगी यांचा विवाह थाटामाटात साजरा झाला.



## निसर्गातील आश्चर्ये :












## विश्व - वार्ता

# रंग-भेदाची प्रवृत्ति घटत चालली!




आंतरराष्ट्रीय क्रीडा-स्पर्धात आता क्रीडा-प्रेमी लोक दक्षिण आफ्रिकेतील खेळाडूंना पाहण्यासाठी उत्सुक झालेले दिसतात. कारण या स्पर्धात भाग घेण्यासाठी त्यांना मनाई होती, ती आता दूर झालेली आहे. २१ वर्षापूर्वी म्हणजे सन १९७० मध्ये रंग-भेदाच्या तत्त्वावर आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक समितीने आपल्या स्पर्धात भाग घेण्यासाठी दक्षिण आफ्रिकी खेळाडूंना मनाई केली होती, ती या जुलाई महिन्याच्या प्रारंभी आंतरराष्ट्रीय क्रिकेट कौन्सिलने काढून टाकली.

अशा रीतीने मार्ग मोकळा झाल्यावर १९९२च्या फेब्रुवारीत होणाऱ्या 'वर्ल्ड कप' क्रिकेट स्पर्धात तसेच या वर्षाखेरीस होणाऱ्या बार्सिलोना (स्पेन) ऑलिंपिक्स मध्ये दक्षिण आफ्रिका आता भाग घेईल. दक्षिण आफ्रिकी गोऱ्या सरकारच्या रंग-द्वेषी नीती-मुळे दक्षिण आफ्रिकेच्या खेळाडूंना आंतर-राष्ट्रीय क्रीडा-स्पर्धात भाग घेता येत नसे.

आता गोऱ्या सरकारच्या विचारात बदल घडून आला आहे. याचे जिवंत प्रमाण म्हणजे रंग-द्वेषाविरुद्ध लढणाऱ्या व २५ वर्षे तुरुंगात खितपत पडलेल्या नेल्सन मंडेलांची सन १९८९ मध्ये झालेली मुक्ति! यानंतर नेल्सन मंडेलांनी डीक्लार्कशी बोलणी केली नि त्याचा परिणाम असा झाला की डीक्लार्कने नुकतेच रंगद्वेषाबाबतचे तीन कायदे रद्द करणे मान्य केले. आता काळे लोक कोणत्याही देशात राहू शकतात, कोणत्याही शाळेत आपल्या मुलांना शिक्षणा-साठी दाखल करू शकतात आणि गोऱ्या लोकांच्या संस्थात ही नोकरी मिळवू शकतात. भारतीय सरकारने काळे-गोरे असा भेदभाव करणाऱ्या दक्षिण आफ्रिकी सरकारवर दडपण आणण्यासाठी जगातील काही देशांना विनंती केली. याचा खूपच चांगला परिणाम झाला आणि बरेच आर्थिक साह्य ही मिळाले.

दक्षिण आफ्रिकेत होत असलेले हे बदल जगातील सर्व देश उत्सुकतेने पहात आहेत.

गेली सहा वर्षं या देशावर लागू असलेले आर्थिक प्रतिबंध अमेरिकेने तावडतोब दूर केले. अमेरिकेची ही कार्यवाही पाहून जपानने संतोष प्रकट केला, परंतु स्वीडन व ऑस्ट्रेलिया यांनी अमेरिकेने उचललेल्या या पावलाबाबत आपली नाराजी व्यक्त केली.

अमेरिकेचं म्हणणं असं की दक्षिण आफ्रिकेत आता आणीबाणीची स्थिति राहिलेली नाही, राजनैतिक कैद्यांना मुक्त करण्यात आलेलं आहे आणि रंगद्वेषरहित सरकारची स्थापना करण्याबाबत बोलणी चालू आहेत, म्हणून अमेरिकेचे दक्षिण आफ्रिकेबाबतचे धोरण योग्यच होय. आज गोऱ्या सरकारने जी कार्यवाही चालविली आहे त्याबाबत नेल्सन मंडेला यांनी आनंद व्यक्त करीत म्हटले–"तरी पण अजून आपल्याला खूप सावध राहिलं पाहिजे, कारण या ना त्या कारणास्तव अजून काही राजकैदी तुरुंगातच डांबलेले आहेत. काळ्यातील निरनिराळ्या गटांपैकी कोणाची तरी बाजू सरकार उचलून धरते, म्हणून काळ्याकाळ्यांमध्ये हिंसाकांड माजले आहे. यामुळे खुल्या वातावरणातील राजकीय कार्यक्रम अंमलात आणणं शक्य होत नाही."

रंग-भेदाची प्रवृत्ति घटत चाललेली असली तरी अजून बरंच कार्य व्हायचं बाकी आहे आणि रंगद्वेषाची आग संपूर्ण विझेपर्यंत काम करीतच राहिलं पाहिजे.



मंडेला दंपति



# दोन बेकार

परशुरामचे वडील रामशरण म्हातारपणामुळे मरण पावले, तेव्हा कोठे परशुरामला आपल्या जबाबदारीची जाणीव झाली. त्याचे वय पंचवीस वर्षांचे होऊन गेले होते, पण आपण काही काम-धाम करावे असे त्याला आतापर्यंत कधी वाटलेच नव्हते. बरोबरच्या बेकार मुलांबरोबर भटकणे आणि जुगार खेळणे यातच त्याने आपला वेळ घालवला होता. परशुराम लहानपणीच मातृप्रेमाला वंचित झाल्यामुळे रामशरण त्याला कधीच काही बोलत नसत. पण आता मात्र परशुरामला आपण करून ठेवलेली कर्जे चुकवण्यासाठी घर विकून टाकावे लागले. गाववाल्यांच्या दृष्टीने तो एक रिकामटेकडेपणाने भटकत रहाणारा कामातून गेलेला असा मुलगा होता.

काम मिळवण्यासाठी खूप हिंडून जो वैतागून गेला. त्याला चांगले कळून चुकले की आपल्याला या गावात कसलीच नोकरी मिळणे शक्य नाही. नोकरीच्या शोधात एका संध्याकाळी तो गाव सोडून निघाला. सर्वत्र अन्धार पसरू लागल्यावेळी तो एका जंगलात पोचला होता. इतक्यात वादळवारा सुरू होऊन पाऊसही पडू लागला. आता रात्र कोठे काढावी हे परशुरामला कळेना. झाडांच्या आश्रयाने चालता चालता त्याला थोड्या अंतरावर एक दिवा टिमटिमत असलेला दिसला. तो त्या उजेडाच्या दिशेने चालू लागला.

ते एक जुने पडके देवीचे देऊळ होते. त्या मंदिरातच तो दिवा जळत होता. एक तरुण तेथील जमीन कपड्याने साफ करत होता.

परशुतामला पहाताच तो तरुण म्हणाला, "अरे, तू तर खूप भिजलेला दिसतोयस! अगोदर आपलं डोकं पूस बरं नीट!"



आणि त्याने एक कोरडे फडके परशुरामच्या समोर धरले.

परशुरामने त्या फडक्याने आपले डोके पुसून कपडेही बदलले.

त्या तरुणाने परशुरामला आपले नाव यतीन्द्र असल्याचे सांगितले. त्याने असेही सांगितले की आपण नोकरीच्या शोधात निघालो असून पावसामुळे देवळात थांबलो आहोत. नन्तर त्याने परशुरामला विचारले, "तुझी काय बाबा आहे हकिकत?"

परशुरामने काहीही न लपवता आपली गोष्ट सांगून टाकली. सगळे ऐकून यतीन्द्र हसत हसत म्हणाला—"म्हणजे दोघं एकाच माळेचे मणी म्हणायचे. चला, बरं झालं, मला एक सवंगडी मिळाला."

यतीन्द्रने आपली भाकरीची पोटली सोडली आणि दोघांनी त्यात असलेली भाकरी वाटून खाल्ली. दोघांची भूक भागली.

जेवढी जागा साफ झालेली होती, तीवर दोघेही आडवे झाले. पडल्या पडल्या परशुराम म्हणाला—"आजपर्यंत मी कधी नोकरी शोधायच्या फन्दात पडलो नाही, पण असा प्रयत्न करणारांबद्दल बरंच काही ऐकलं मात्र आहे! कोणाची शिफारस नसेल तर नोकरी मिळणं कठीणच नव्हे, तर अशक्यप्राय होऊन बसलं आहे."

"हूं! हे म्हणणं चूक नव्हेच, पण आपल्याला नोकरी मिळाली तर आपण आपली योग्यता आणि प्रामाणिकपणा दाखवून देऊ शकू." यतीन्द्र म्हणाला.

"तुला संधी मी मिळवून देईन." असे म्हणत तेथे एक देवी अवतरली.

परशुराम आणि यतीन्द्रने तिला त्याच देवळातली देवी म्हणून ओळखले. तिला साष्टांग नमस्कार करून त्यांनी विचारले—"माते! आम्हा दोघा बेकारांवर तू दया दाखवलीस, धन्य झालो आम्ही! आम्ही आयुष्यभर हे उपकार स्मरू. पण आम्हाला एवढं सांगायची कृपा कर ना, तू आम्हाला कशी काय मदत करणार आहेस?"

यावर देवी त्यांना म्हणाली—"मी तुम्हाला विशेष महिमा असणाऱ्या तीन वस्तु देणार आहे. त्यांच्या मदतीने तुम्ही जे काही मिळवाल त्या संबंधीची हकिकत बरोबर तीन दिवसांनी इथे येऊन सांगायची. कबूल?"

"हो, अगदी तुझ्या बोलण्यावर हुकूम वागू आम्ही!" दोघेही आनन्दाने आणि भक्तिपूर्ण आवाजात म्हणाले.

नन्तर देवीने त्या दोघांना एक एक मातीचे भांडे देऊन म्हटले—"मनात ज्याचा विचार करून हे भांडं तुम्ही फोडाल, तो तावडतोब तुमच्यासमोर हजर राहील."

"हां, पण असं झालं, तरी त्यात आमचा फायदा काय माते?" यतीन्द्रने विचारले.

आता देवीने एक एक मिरा त्यांच्या हातावर ठेवत म्हटले की—"हा आपल्या तोंडात ठेवून तुम्ही ज्यांच्याजवळ जे मागाल, ते तुम्हाला ते देतील."

"बरं, आता तिसरी वस्तु कोणती माते?" परशुरामने विचारले.

दोघांना एक एक तांब्याची अंगठी देत देवी म्हणाली—"ही अंगठी जोपर्यंत तुमच्या बोटात असेल, तोपर्यंत या अगोदरच्या दोन्ही वस्तु तुमच्याबरोबरच राहतील." इतके सांगून झाल्यावर देवी अंतर्धान पावली.



सकाळ होता होता पाऊसही थांबला. यतीन्द्र परशुरामला म्हणाला—"मी पूर्वेकडे जायचं ठरवलंय, तू पण येतोस माझ्याबरोबर?"

"नको, मी पश्चिमेकडे जातो. तिसऱ्या दिवशी रात्री आपण पुन्हा याच मन्दिरात भेटू." परशुराम उत्तरला.

परशुराम पश्चिमेकडे चालू लागला. दिवसभर चालून रात्री तो एका शहरात पोचला. देवीकडून मिळालेल्या त्या अद्भुत वस्तुंचा कसा वापर करायचा याबद्दलची योजना त्याने ठरवून ठेवली होती. तो एका मोठ्या महालासारख्या घरासमोर उभा राहिला. मातीचे भांड



जमिनीवर आपटत त्याने विचार केला की, त्या घराचा मालक आपणासमोर यावा.

थोड्याच वेळात प्रौढ वयाची एक स्त्री दरवाजा उघडून त्याच्यासमोर उभी राहिली. तिच्या अंगावर अमूल्य असे सोन्याचे दागिने चमचमत होते.

आपल्याजवळचा मिरीचा दाणा तोंडात टाकून परशुराम तिला म्हणाला–"तुमच्या अंगावरचे सर्व सोने उतरवून ताबडतोब माझ्या हवाली करा."

ती स्त्री जणू झोपेच्या अंमलातच होती. चेहरा मागे वळवून ती जोरात ओरडली–"सोन्या, सोन्या!"

दुसऱ्याच क्षणी 'सोन्या' नावाचा एक धिप्पाड कुत्रा भुंकत बाहेर आला आणि त्याने परशुरामचे नडगे तोंडात पकडले. त्याचा पाय ताबडतोब रक्तबंबाळ झाला. मालकिणीने अनेकदा परत बोलावूनही सोन्या परशुरामाचा पाय सोडीना. परशुरामला अचानक एक आठवण झाली. आपल्या हातातली अंगठी काढून त्याने दूर फेकून दिली. त्याबरोबर कुत्र्याने परशुरामला सोडून दिले. हे सर्व जणू काही स्वप्नातच घडल्याप्रमाणे झाले! कुत्रा आणि ती स्त्री, दोघंही घरात निघून गेले. अन् जाता जाता तिने दरवाजाही बन्द करून घेतला.

परशुराम नन्तर दोन दिवस त्याच गावात राहिला. कुत्र्याच्या चाव्यावर वनस्पतीच्या औषधांचा इलाज करून घेऊन तिसऱ्या दिवशी कसा तरी उठत बसत तो त्या जंगलात मन्दिरात पोचला. देवीने त्याला आलेला पाहून विचारले–"ही काय रे दशा तुझी? सांग बरं, काय काय झालं?"

काहीही न लपवता परशुरामने खरी हकीकत देवीला सांगून टाकली.

थोड्याच वेळात छानसे कपडे घातलेला यतीन्द्रही तेथे येऊन पोचला. देवीने त्यालाही आपली हकीकत विचारली. यतीन्द्र सांगू लागला–

"त्या अद्भुत वस्तु मिळाल्याबरोबर त्यांचा कसकसा उपयोग करायचा हे मी ठरवून ठेवले होते. मी सरळ राजधानीला पोचलो. संध्याकाळी राजोद्यानात 'राजाने समोर यावे' अशी इच्छा करून मी ते मांडं फोडलं. थोड्याच वेळात राजा तेथे हजर झाला.

मिऱ्याचा दाणा तोंडात ठेवून मी राजाला म्हटले–"राजेसाहेब, आपण आपल्या दरबारात मला नोकरी देण्याची कृपा करावी."

थोडंस हसत माझ्याकडे पाहून राजा म्हणाला–"मी तुला नोकरी दिलीच समज. तुला हवं तेव्हां येऊन दाखल हो."

अशा तऱ्हेने मला नोकरी मिळाली. दरबारातून आगाऊ काही पैसे घेऊन मी रहाण्यासाठी एक घर आणि चांगल्या कपड्यांची व्यवस्था करून इथे या मन्दिरात आलो."

आपल्या हातातली तांब्याची अंगठी देवीकडे परत देत यतीन्द्र म्हणाला–"माते, स्वत:च्या ताकदीवर माझा विश्वास आहे. तुझ्या कृपेने मिळालेल्या नोकरीत मी टिकून राहीन अशी मला खात्री वाटते."

आता देवी त्या दोघांना म्हणाली–"मी तुम्हां दोघांना एकाच प्रकारच्या वस्तु दिल्या. पण अतिलोभामुळे परशुराम त्यापासून आपला फायदा करून घेऊ शकला नाही. मी दिलेल्या मिऱ्याच्या दाण्याच्या आधारे यतीन्द्र राजाकडून अर्धे राज्यही मिळवू शकला असता." असे बोलून देवी अदृश्य झाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी शहराकडे निघण्यापूर्वी यतीन्द्र परशुरामला म्हणाला–"येतोस माझ्याबरोबर? माझ्याच घरी राहून तू दुसरी एखादी नोकरी शोध. केव्हां न केव्हां तुला ती मिळेलच."

"होय आता मी तुझ्यासारख्या बुद्धिमान आणि अनुभवी व्यक्ती जवळ राहिलो, तर काहीतरी शिकू शकेन. येतो मी तुझ्याबरोबर." असे म्हणून परशुराम यतीन्द्राबरोबर चालू लागला.



# यात काय संशय!

शिवपुरी गावात संतोष नावाचा एक माणूस रहात असे. एक पोपट पाळावा असे फार दिवस त्याच्या मनात होते. एकदा बाजारात एका दुकानात त्याला एक सुन्दरसा पोपट दिसला. संतोषने दुकानदाराला विचारले–"याची किमत काय?"

"शंभर रुपये." दुकानदार म्हणाला.

"शंभर? बाप रे!" संतोषने आश्चर्य प्रकट केले.

"अरे हा काही साधासुधा पोपट नाहिये. पाहिजे तर तुम्ही या पोपटालाच विचारून पहा, किमत योग्य आहे की नाही ते!" दुकानदार म्हणाला.

"काय रे हा दुकानदार म्हणतो, तसा तू शंभर रुपये किंमतीच्या लायकीचा पोपट आहेस?" संतोषने पोपटाला विचारले.

"यात काय संशय?" पोपट उत्तरला.

या उत्तरावरून संतोषला दुकानदाराचे बोलणे पटले आणि शंभर रुपये देऊन तो पोपटाला घरी घेऊन गेला. मोठ्या आनन्दाने त्याने घरात सर्वांना पोपट दाखवला. पण त्याची बायको किंवा मुलांपैकी कोणी काहीही प्रश्न विचारला, तरी तो एकच उत्तर देऊ लागला–"यात काय संशय?"

आता संतोषला कळून चुकले की पोपट फक्त एवढं एकच वाक्य बोलू शकतो. अन् आपण मात्र त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून फसवले गेलो; फारच नुकसान झाले आपले! आता डोक्यावर हात मारून घेत दुःखाने तो म्हणाला–"ओहो! कसा फसलो मी? एक नंबरचा मूर्खच नव्हे का मी?"

पोपट लगेच उत्तरला–"यात काय संशय?"

हे ऐकून मात्र संतोषसह सर्वांचीच हसून-हसून मुरकुंडी वळली!






[ ७ ]

[सदानन्द मुनींनी अपूर्व नावाचे एक आश्चर्यजनक व्यक्तित्व निर्माण केले. समुद्री चाचे पाच मुलांचे अपहरण करून त्यांना घेऊन जात होते. जहाजाची यात्रा सुरु झाल्यावर चाच्यांचा सरदार आणि त्याचा खास सहायक या दोघात भांडण झाले व त्याचे पर्यवसान सहायकाने सरदाराच्या छातीत तलवार भोसकून, त्याला ठार करण्यात झाले. —पुढची गोष्ट वाचा]

पहाट होत होती. मुले ज्या खोलीत होती, तेथे येऊन नवा सरदार त्यांना उठवू लागला. तो म्हणाला–"अरे उठा, उठा! पहा समुद्रात सूर्योदय किती सुन्दर दिसतो तो!"

समीरच्या तोंडून अपूर्वने दिलेल्या आदेशानुसार मुले मोठ्या धैर्याने डोळे मिटून पडलेली होती. त्यांनी डोळे उघडून चहूकडे पहात विचारले–"अरे! आपण इथे कुठे आहोत? अन् तुम्ही कोण आहात महाराज?" आदल्या रात्री जहाजावर घडलेली हकिकत आपल्याला जणु माहीतच नाही असा भाव त्यांच्या चेहऱ्यावर होता.

"मी या जहाजाचा मालक गरलधर!" सौम्य आवाजात नवा सरदार उत्तरला.

"काऽऽय? या जहाजाचे मालक?" समीरने आश्चर्य दाखवत विचारले.

"होऽ! मला कळलं, तुम्हाला कसलं आश्चर्य वाटतंय ते! ज्या माणसाने तुम्हाला



जहाज फिरवून दाखवलं ना, तो काही जरुरी कामासाठी एका ठिकाणी गेला आहे. तुमची देखरेख करायचं काम त्यानं माझ्यावर सोपवलं आहे. तुमच्या लक्षात आलंय ना, कि आत्ताही तुम्ही जहाजावरच आहात?" गरलधरने विचारले.

उठून जांभई देत समीर म्हणाला— "अरे, खूपच उशीर झाला की! आम्हाला आता तावडतोब घरी जायला हवं!"

"हा, हा, हा!" राक्षसासारखे हसतानाच एकदम ते दाबत गरलधर म्हणाला— "खरं काय घडलं, ते मला माहीत नाही. पण तुम्ही पोरं रात्रभर डाराडूर झोपून राहिलात. तुमची झोप मोडावीशीही वाटेना मला! म्हणून गप्पच राहिलो मी. रात्री जहाजाने आपली यात्रा सुरू केली. रात्रभरात आपण खूप दूर आलो आहोत. तुम्हीं आता पोहून तर परत नाही जाऊ शकणार न? तेव्हा आता जरा प्रवासाची गंमत लुटा!" असे बोलताना गरलधरचा स्वर चेष्टेचा वाटत होता.

मुलांनी ते ऐकले, पण न समजल्यासारखे ते एकमेकांच्या चेहऱ्यांकडे पहात राहिले.

"पण मग आता आमचं काय होणार?" समीरने तोच अबोध भाव चेहऱ्यावर कायम ठेवत विचारले.

"काही दिवसांनी खूपसा अनुभव गाठीला बांधून किनाऱ्यावर उतराल न् काय! तोपर्यंत निसर्गसौन्दर्य लुटत मजा करा!" गरलधर उत्तरला.

"तुमचं बोलणं ठीक आहे हो, पण आमचे आईबाप आणि सारे नातेवाईक काळजीत पडतील त्याचं काय?" एका मुलाने दुःखी आवाजात विचारले.

"काही दिवसांनी परत भेटलात की त्यांना आनंदही वाटेलच की!" हसत गरलधर बोलला.

"हं! तुम्ही खूपच हुशार वाटता हो!" समीरने फिरकी घेतली.

हा अभिप्राय खराच मानून गरलधर एकदम खूश झाला! मोठ्या गर्वाने मान ताठ करून तो दूर असलेल्या आपल्या साथीदारांकडे पाहू लागला. नंतर तो मुलांना त्या खोलीबाहेर घेऊन गेला. पाचही मुले समुद्रावरील सूर्योदय निरखत असताना अपूर्वची हाक ऐकून समीर त्या दिशेने पाहू लागला. डावीकडे त्याने जेव्हा वाकून पाहिले, तेव्हा एका मोठ्या माशावर बसलेला अपूर्व त्याला दिसला. तो मासा जहाजाच्या मागेमागेच पोहत होता.

बारीक आवाजात अपूर्व समीरला सांगू लागला— "तुम्ही पळून जायच्या प्रयत्नात आहात असा जर या चोरांना पत्ता लागला, तर ते तुम्हाला फार त्रास देतील. सध्या ते तुमच्याशी चांगले वागत आहेत, याचा अर्थ असा की त्यांना तुमच्याकडून आपलं काही काम साधून घ्यायचं आहे. काल गरलधर आपल्या साथीदारांशी बोलताना मी ऐकलं की, व्यापाऱ्यांचं एक जहाज या बाजूला येणार आहे, अन् ते लुटायचा यांचा विचार आहे. आपलं हे काम साधण्यासाठी बहुधा त्यांना तुमचा उपयोग करून घ्यायचाय. त्यांची काय योजना आहे, ती कळली तर आपल्यालाही योग्य पाऊल उचलता येईल. तोपर्यंत तुम्ही पोरं त्याच्याशी सावधगिरीने वागा."

इतक्यात समीरला गरलधरचा आवाज ऐकू आला— "अरे, असा वाकलास ना, तर एकदम समुद्रांत पडून देवमाशांना मेजवानी होईल तुझी! आम्ही तुझी वाट पहात आहोत, ये इकडे!"





समीर लगेच मागे वळला आणि हसतच गरलधरजवळ गेला. तेथे सर्वजण जेवायला बसले होते. काही समजत नसल्याचा आव आणत समीरने विचारले–"तुम्ही लोक या जहाजावर काय करता?"

"आम्ही समुद्रावर व्यापार करतो बाळ! हल्ली आमचे दिवस बरे नाहीत. नुकतंच काही चाचे लोकांनी आमचं जहाज लुटलं होतं." गरलधर उत्तरला.

"दुष्ट कुठले!" समीर रागाने उद्गारला.

"हं, नुसतेच दुष्ट नव्हेत काही; बेशरम लोकाचे! अगदी नालायक अन् बदमाष आहेत ते! आम्ही निःशस्त्र होतो, तेव्हां अचानक हल्ला केला त्यांनी. आम्ही तर कधी एकादी मुंगीही मारत नाही. आमच्यासारख्या अनेक व्यापाऱ्यांना लुटलं आहे त्यांनी आ पर्यंत." गरलधरने तिखटमीठ लावले.

"अरेरे! तुम्ही बिचारे किती चांगले लोक आहात हे तर पहातच आहोत न! आम्ही कोण, आमची नावं काय, हे माहीत नसतानाही तुम्ही आम्हाला जहाजात घेऊन समुद्रयात्रा घडवत आहात, खायलाप्यायला घालताहात आणि सुन्दर सुन्दर दृश्य दाखवत आहात. यावरूनच कळतंय न, की तुम्ही खूप दयाळु आहात. ठीक आहे. आता तुम्ही काय करणार आहात?" समीरने भोळेपणा दाखवतच विचारले.

"आपण आता अगोदर एका बेटावर पोचू. तिथे काही धन मिळवायची संधी आहेसं दिसतंय...." असे गरलधर आणखी काही सांगणार, इतक्यात समीरने मधेच विचारले–"हे कसं शक्य आहे बुवा? या जहाजावर आम्ही सहा पोर सोडून आणखी काहीच नाहीय! काही सामान-सुमान, चीज-वस्तु कुठे आहेत इथे?"

"ओहो, लहान मुलगा आहेस, पण गोष्टी मात्र खूप मजेशीर करतोयस हं! आत्ता आमच्याजवळ काही सामान नसलं, तरी तुम्ही पोरांनी आम्हाला मदत केलीत,



तर आपल्या या जहाजावर खूपसं सामान-सुमान येऊ शकेल."

"ते कसं काय? समुद्रात इथे मधेच हे कसं शक्य आहे? अन् आम्ही तर छोटी छोटी पोरं आहोत, आम्ही काय मदत करणार तुम्हाला?" उत्सुकता दाखवत विचारले.

आता गरलधर त्याला आपली योजना सांगू लागला–"ज्या चाच्यांनी आमचं जहाज लुटलं होतं, ते जहाज इकडेच येत आहे. आपलं जहाज त्या जहाजाजवळ पोचताच मी नापसंतीदर्शक काळा झेंडा फडकवीन. तेव्हां तुम्ही मुलं आपल्या खोलीबाहेर येऊन 'आम्हाला वाचवा हो, वाचवा!' असा ओरडाओरडा सुरू करा."

"आणि मग?" समीरने विचारले.

"तुमचा ओरडा ऐकून व्यापाऱ्यांच्या वेषातल्या त्या चाच्यांचं जहाज आपल्या जवळ येईल. तुम्ही त्यांना सांगा की 'आमचं जहाज चाच्यांनी लुटलं आणि आमच्या मोठ्या माणसांना आणि नाविकांना मारून टाकलं!' अन् तुम्ही दुःखाने रडायला लागा. तुमच्यावर विश्वास ठेवून त्यांचे काही लोक आपल्या जहाजावर येतील. तुम्ही त्यांना सरळ, आम्ही ज्या खोलीत बसलेले असू तेथे घेऊन या. नंतर काय करायचं ते आम्ही पाहून घेऊ." गरलधरने आपली योजना स्पष्ट केली.



"वा! काय अद्भुत योजना आहे पण!" एक मुलगा म्हणाला.

"हं! योजना आवडली ना? तुम्ही मुलं आमच्या सांगण्याप्रमाणे वागलात, तर नंतर आम्ही तुमचा छान सत्कार करू." गरलधर म्हणाला.

"खूप छान विचार आहे तुमचा. पण नन्तर तुम्ही लोक काय करणार?" समीरने विचारले.

ओठ चावत जरा गप्प बसून नंतर गरलधर म्हणाला–"त्यांनी जे काही केलंय, त्याचं उत्तर त्यांना असं मिळायला हवं की त्यांना आपल्या गुन्ह्याची जन्मभर आठवण राहील! त्यांनी आमचं जे नुकसान केलंय, त्याबद्दल



आम्ही त्यांचे प्राण घेतले तरी कोणी चूक म्हणणार नाही. पण त्यांना मारून टाकायचं मनात नाही माझ्या! आम्ही त्यांना कैद करून त्यांचं जहाज समुद्रात बुडवून टाकू अन् त्या बदमाशांना गुलामांच्या बाजारात विकून टाकू. जिवे मारण्यापेक्षा त्यांना गुलाम म्हणून विकणं—ही दयाच होईल न त्यांच्यावर? काय?"

गुलामांच्या बाजाराचे नाव निघताच मुले मनातल्या मनात घाबरून गेली. इतक्यात गरलधरचा एक साथीदार आत आला आणि आनंदाने म्हणाला—"सरदार, जहाज दिसलं!"

"शाब्बास! आपलं जहाज लवकर त्या जहाजाजवळ घेऊन चला. त्या जहाजावरची माणसं नजरेत येताच आपण वल्ही मुलांच्या हाती देऊन खोलीत लपू या. जा आता तू." गरलधरने साथीदाराला पाठवून दिले.

यानंतर गरलधर व मुलांनी जेवण उरकले आणि नंतर ते सर्व बाहेर आले. लांबून व्यापाऱ्यांचे जहाज दिसू लागले. वाऱ्याच्या वेगाने काही वेळ जहाज पुढे गेले आणि व्यापारी जहाजाजवळ पोचले. नंतर सरदाराच्या आज्ञेने चाच्यांनी वल्ही मुलांच्या हवाली केली अन् ते सर्व एका खोलीत लपून राहिले.

समीर जहाजाच्या डोलकाठीवर चढून अशा तऱ्हेने उभा राहिला की ते संपूर्ण जहाज नीट नजरेत येईल. इतक्यात आपल्या चाच्यांच्या जहाजावरून एक समुद्री कावळा व्यापाऱ्यांच्या जहाजावर जाऊन बसताना समीरला दिसला. समीरने ओळखले की त्या कावळ्याच्या द्वारे अपूर्वने नक्कीच काही सन्देश जहाजावरच्या प्रवाशांकडे पाठवला असला पाहिजे.

तोपर्यंत गरलधर नुसताच इकडे-तिकडे फिरत होता. आता त्याने काळा झेंडा डोलकाठीला बांधला आणि एकट्या दुकट्या असणाऱ्या आपल्या साथीदारांना खोलीत लपायला घेऊन जात तो समीरला म्हणाला—"ए पोरा, त्या जहाजातून येणाऱ्या



व्यापाऱ्यांना आपल्या जहाजावर आणायची जबाबदारी आता तुम्ही पार पाडायची."

समीरने ताबडतोब घसा फोडत उच्च आवाजात किंचाळायला सुरुवात केली—"अरे वाचवा आम्हाला! वाचवा!"

हा ओरडा ऐकून व्यापाऱ्यांच्या जहाजावरचा एक भला दिसणारा व्यापारी बाहेर आला. त्याच्या दोन्ही बाजूंना त्याचे बलदंड अंगरक्षकही होते.

"या जहाजावर आम्ही सहा मुलंच आहोत. आमच्या मोठ्या माणसांना मारून टाकून चाचे लोक पळून गेले. आम्हाला वाचवा! वाचवा!" समीर ओरडू लागला.

दुसऱ्याच क्षणी व्यापाऱ्यांचे जहाज चाच्यांच्या जहाजाजवळ आले. त्या दोन बलदंड माणसांनी दोन्ही जहाजे जोडणारी एक मोठीशी फळी टाकली आणि त्यावरून व्यापारी आणि चार चांगली मजबूत माणसे समीरजवळ येऊन पोचली. व्यापाऱ्याने हळूच विचारले—"ते दुष्ट कुठे आहेत रे?"

समीरने इशाऱ्यानेच ती खोली दाखवली अन् आपण मात्र उच्च आवाजात सांगू लागला—"महाराज, या! त्या खोलीत अजून थोडंसं मौल्यवान सामान शिल्लक आहे. चाचे चुकून ते इथेच सोडून गेले. आपण ते



सामान घ्या अन् कृपाकरून आम्हाला आपापल्या घरी पोचवा. इतकंच पुरे आम्हाला! दया करा आमच्यावर-महाराज? खरंच ते सर्व सामान तुम्ही घ्या. दाखवतो मी ते तुम्हाला. या इकडे!"

"घाबरू नकोस! तुम्हा मुलांना वाचवायलाच आलो आहोत आम्ही!" असे म्हणत तो झटकन त्या डाकू चाच्यांच्या खोलीजवळ गेला आणि पापणी लवायच्या आतच खोलीचे दार बन्द करून त्याने बाहेरून कुलूप ठोकले. नंतर खिडकीतून आत डोकवत त्या चाच्यांना सचेत करत तो व्यापारी म्हणाला—"नालायक, कुत्र्यांनो! आता तुम्हाला आपल्या करणीचं फळ

भोगायची वेळ आली आहे. माझ्याबरोबर चांगले पंचवीस धट्टे-कट्टे, मजबूत लोक आमच्या रक्षणासाठी आहेत. तुम्ही अनेकांची जहाजं लुटलीत, त्यातल्या प्रवाशांना मारून टाकून त्यांना जलसमाधी दिलीत. या पापाची शिक्षा आता जरूर मिळेल तुम्हाला! पळून जायचा मुळीच प्रयत्न करू नका, नाहीतर तुमच्या जहाजासकट तुम्हाला जाळून टाकू आम्ही! आमच्या जवळ कित्येक पिपं तेल आहे, तेव्हा जहाज जाळणं फारच सोपं आहे आम्हाला. आपलं भलं व्हावं असं वाटत असेल तर मुकाट बसून रहा. जराही हालचाल केलीत तर खबरदार! उद्या या वेळी आपण किनाऱ्यावर पोचू. तोपर्यंत तुम्हाला खायला काहीही मिळणार नाही. हां, थोडंसं पाणी मिळेल प्यायला. पुन्हा एकदा लक्षात ठेवा, हलायचा प्रयत्न केलात तर मात्र प्राण गमावून बसाल!"

चाच्यांच्या खोलीवर पहाऱ्यासाठी दहा तगडे लोक उभे राहिले. ते दिसायलाच अगदी जंगली कुत्र्यांसारखे क्रूर दिसत होते! काही जणांनी चाच्यांचे जहाज त्यांच्या जहाजाशी मजबूत बांधून टाकले होते. हे सर्व पाहून मुलांना फार आनन्द वाटला. ती आनन्दाने नाचू-बागडू लागली.

समीर आता तेथे अपूर्वच्या शोधाला लागला, तेव्हा व्यापारी त्याला म्हणाला— "बाळा, तू काय एका समुद्री कावळ्याकडून आम्हाला सन्देश दिलास? मला तर आश्चर्यच वाटतंय!" आणि त्याने समीरची पाठ थोपटली.

"तो सन्देश मी नाही पाठवला! आम्हाला वाचवायला आलेल्या एका दिव्यपुरुषाने पाठवला तो." समीरने सांगितले.

"अरे वा! दिव्य पुरुष?" व्यापाऱ्याला आता जास्तच आश्चर्य वाटते. "कुठंय तो?"

"मला ते माहीत नाही. पण मी इतकं मात्र सांगू शकतो की तो लवकरच आपणाकडे जरूर येईल." समीर म्हणाला.

दोन्ही जहाजे झपाट्याने समुद्रकिनाऱ्याकडे निघाली.

(क्रमशः)





# स्वाभिमानी अनन्त

हट्टी विक्रम पुन्हा त्या झाडापाशी आला. प्रेत खाली उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. प्रेतात मुक्काम करून असणारा वेताळ आता त्याला म्हणू लागला— "राजा, प्रत्येक वेळी पराजित होऊनही तू निराश होत नाहीस, याचं मला मोठं आश्चर्य वाटतं पहा! तुला सावधगिरीची सूचना देण्यासाठी मी एक हकिकत सांगतो. सुविद्य आणि कुशल असणारा प्रत्येक पालक हा सुसंकृत आणि निगर्वी असेलच, असा विचार करणं चूक होईल. तू आपल्या एखाद्या मित्र असणाऱ्या राजासाठी हे कष्ट करीत असशील तर तुला ताबडतोब सावध व्हायला हवं! उदाहरणादाखल आपल्या अहंकारी आणि मूर्ख स्वभावामुळे आपल्या सहपाठी आणि स्वाभिमानी अशा अनंतचा

## वेताळाच्या गोष्टी



अपमान करणाऱ्या हरीश नावाच्या या राजाची गोष्ट मी तुला सांगतो. गोष्ट लक्ष-पूर्वक ऐक, म्हणजे तुझे हे श्रमही विसरल्या-सारखे वाटतील तुला." इतके बोलून वेताळ त्या हरीश राजाची गोष्ट सांगू लागला—

महेन्द्रगिरी राज्याचा राजा श्रीधर याचा हरीश हा एकुलता एक पुत्र होता. विद्यार्जनासाठी राजा श्रीधरने हरीशला चित्रवनात रहाणाऱ्या आचार्य दिव्यानन्द यांच्या गुरुकुलात पाठवून दिले.

हरीश तेथे मोठ्या श्रद्धा व भक्तीने आचार्यांकडे विद्याभ्यास करू लागला. याच गुरुकुलात शिकणाऱ्या इतर विद्यार्थ्यांपैकी अनन्त नावाचा विद्यार्थी हरीशला फार आवडे. अनन्तच्या स्वाभिमानी वृत्तीमुळेच हरीश त्याच्याकडे जास्त आकर्षित झाला होता. दोघांच्यात चांगली मैत्री जमली.

अशी काही वर्षे निघून गेली. एक दिवस आचार्य हरीशला बोलवून म्हणाले—"वत्सा! तुझं विद्यार्जन आता पूर्ण झालं आहे. तू आता राजधानीला परत जाऊन आपलं राज्य संभाळ. लोकप्रिय राजा बनून चांगले नाव मिळव. बस, इतकीच माझी तुझ्याकडून अपेक्षा."

गुरुजींचा आशिर्वाद घेऊन राजधानीकडे परतताना अनन्तला गाढ आलिंगन देत हरीश म्हणाला—"मित्रा! आता आपल्या वाटा निराळ्या होत आहेत. तुझा विरह मला फारच दुःखदायक वाटणार आहे. माझी आठवण म्हणून हा हार ठेव तुझ्याजवळ!" आणि आपल्या गळ्यातला हिऱ्यांचा हार काढून तो अनंतच्या गळ्यात घालू लागला.

परन्तु अनन्त तो हार घेईना. नम्रपणे तो म्हणाला—"या हिऱ्यांपेक्षा तुझी मैत्रीच मला महत्वाची! हा हार मला नको!"

यानन्तर एका वर्षभरातच राजा श्रीधरने आपला पुत्र हरीश याला राज्याभिषेक करवला, आणि अशा तऱ्हेने हरीश राजा झाला.

गुरुकुलातले आपले शिक्षण संपल्यावर अनन्त योग्य अशा नोकरीच्या शोधाला लागला. शेवटी धनकाम नावाच्या एका मोठ्या जमीनदाराकडे त्याला एक लहानशी नोकरी मिळाली. अनन्तचे शिक्षण पहाता ती नोकरी तितकीशी योग्य नव्हती, पण अनन्तचे पोट भरायला ती पुरेशी होती.

अनन्तच्या पित्याचा वृद्ध मित्र शिवनाथ एकदा अनन्तकडे आला आणि अनुनय-पूर्वक त्याला म्हणाला—"बाळा, तुला माहीतच आहे, की मी हल्ली आजारी असतो. दिवसेंदिवस उदरनिर्वाह कठीण होत चाललाय. मी ऐकलंय की आपल्या देशाचा राजा तुझा मित्र आहे. माझ्या मुलाला त्याच्याकडून एकादी नोकरी मिळवून देऊन मला मदत कर ना!"

अनन्तचा आता नाइलाज होता! शिवनाथच्या मुलाला बरोबर घेऊन तो राजा हरीशकडे गेला. अनन्तच्या विनंतीवरून हरीशने मुलाला आपल्या सैन्यात नोकरी दिली. नंतर हरीशने अनन्तची चौकशी केली. तेव्हा अनन्तने सांगितले की, आपण एकदम ठीकठाक आहोत. आपल्या नोकरी-वरही आपण एकदम खूश आहोत!

शिवनाथच्या मुलाचे नाव होते प्रशान्त. या प्रशान्तला जेव्हां नोकरी मिळाली, तेव्हां अनन्तच्या राजाजवळ असलेल्या वजनाबद्दल इतर लोकांनाही कळले.



अनन्तच्या गावचा वीरेश राजाच्या दरबारात काम करत असे. लाच घेत असताना त्याला एकदा राजाच्या अधिकाऱ्यांनी पकडले. अनन्तकडे जाऊन तो गयावया करू लागला—"अनन्त, आपण लहानपणचे मित्र ना? राजाकडे जाऊन या एक वेळीच मला माफी द्यायला सांग ना! पुन्हा कधीही मी अशी चूक करणार नाही."

पण अनन्तने त्याला साफ सांगून टाकले की—"तू अपराध केला आहेस. तेव्हां आता त्याची शिक्षाही भोग!"

ही गोष्ट राजाच्या कानावर गेली आणि आपल्या मित्राच्या या सद्व्यवहारामुळे



राजाच्या मनातला त्याच्याबद्दलचा आदर द्विगुणित झाला!

याच काळात श्रीकान्त नावाचा एक मोठा व्यापारी असाच अनन्तकडे आला आणि आपली ओळख करून देऊन त्याला म्हणू लागला—"तुला माहीतच आहे, की आपल्या देशात कापसाची पैदास फार कमी होते. आपल्या शेजारच्या राज्यात कापूस खूप पिकतो. तेव्हा आपण जर तेथून कापूस आयात केला तर गरीब लोकांना कपडा खूप कमी भावात मिळू शकेल. या कापसाच्या आयातीसाठी मला राजाकडून परवाना हवा आहे. तू जर याची व्यवस्था केलीस तर तुला स्वतःचं काहीही भांडवल न घालता माझ्याकडून आपल्या फायद्याचा चौथा हिस्सा मिळेल."

जरा विचार करून अनन्त म्हणाला— "तू जे काम करू इच्छित आहेस, ते चांगले कल्याणकारी काम आहे. मला तुझ्या फायद्यातला हिस्सा मुळीच नको. पण हे देशकल्याणाचं काम करणं मी आपलं कर्तव्य मानतो." नंतर लगेच हरीशला भेटून, कामाचे महत्त्व पटवून देऊन अनन्तने श्रीकान्तला कापसाच्या आयातीचा परवाना मिळवून दिला.

श्रीकान्तनेही प्रामाणिकपणे जवळच्या राज्यातून कापूस मागवून मोठ्या प्रमाणावर कापड बनवून घेतले व ते स्वस्त भावात विकायला सुरुवात केली. कापड स्वस्त विकूनही श्रीकान्तला खूपच फायदा झाला. त्यातील चौथा हिस्सा अनन्तला देण्याचा त्याने खूप प्रयत्न केला, परन्तु त्याने एक पैही स्वीकारली नाही. आणि पुनःपुन्हा सांगितले की आपण परवाना मिळवून देण्याचे काम केवळ 'देशहिताचे कार्य' म्हणूनच केले. अर्थात ही गोष्टही हरीशच्या कानी गेलीच.

यानन्तर अनेक लोकांनी येऊन आपापले काम करून घेण्यासाठी अनन्तकडे याचना केली. पण त्यापैकी अनेकांची कामे 'केवळ स्वतःच्या फायद्यासाठी' अशा स्वरूपाची



असत. 'राजाशी मैत्री' चा असा काही परिणाम होईल असे अनन्तच्या कधी ध्यानीमनीही आले नव्हते.

अनन्तचा मालक धनकामही अनन्तच्या वर्तनाबद्दल प्रत्यक्ष पहात व ऐकत होताच. अनन्तचा स्वाभिमान व प्रामाणिकपणा यामुळे तो अनन्तवर फारच प्रसन्न होता. त्याने अनन्तला आपला जावई करून घ्यायचा विचार केला.

धनकामने हा प्रस्ताव अनन्तपुढे मांडला तेव्हां तो पटकन म्हणाला— "छे, छे! माफ करा. मी काही आपल्या मुलीच्या योग्य वर नव्हे!" अशा तऱ्हेने अनन्तने खूप टाळाटाळ करायचा प्रयत्न केला.

परन्तु धनकाम गप्प राहिला नाही. त्याने एकदा एक मेजवानी आयोजित करून नगरातल्या खूपशा प्रतिष्ठित लोकांना आमन्त्रण दिले. मेजवानीच्या वेळी अनन्तला एका बाजूला घेऊन जाऊन धनकाम त्याला म्हणाला—"अनन्त, कर म्हणून महाराजांकडे बरीच रक्कम मी देणं लागतो. वेळेवर पैसे हाती नसल्यामुळे मला खूप उशीर झाला आहे. मला आत्ताच कळलंय की राजा मला खूप कठोर शिक्षा ठोठावणार आहे. तू जरा त्यांना भेटून माझ्या साठी काही मुदत मागून घे ना!"



"वेळच्या वेळी कर भरणं हे प्रत्येकाचं कर्तव्य असतं! आपल्या अडचणी सांगून तो वेळेवर न भरणं हे उचित नव्हे नं? तेव्हां या मामल्यात, कृपा करून राजाकडे रदबदली करायला सांगू नका मला!" अनन्त उत्तरला.

यावर धनकाम अनन्तला म्हणाला— "अनन्त! वृद्ध व विधवा स्त्रिया यांना दर महिना मदत देण्याचा जो उपक्रम महाराजांनी सुरू केला आहे, त्यात त्यांच्याकडून हल्ली विलंब होत नाही का? मग हे मात्र कसं काय न्याय्य आहे?"

"या बाबत राजा हरीशची चूक समजा आहे. पण तुम्ही असं सांगा, कि



"त्याने चूक केली म्हणून आपणही तशी चूक करायची का?" अनन्तने परखडपणे विचारले.

आता हळूच हसत धनकाम म्हणाला– "अनन्त, आत्ता मेजवानीसाठी जमलेल्यांच्यात राजाचे काही गुप्त हेरही आहेत. आपलं हे बोलणं त्यांच्याकडून नक्कीच त्याच्या कानी जाईल. राजाची चूक काढण्याच्या अपराधामुळे तुम्हा दोघांच्या मैत्रीत बिघाड होण्याची दाट शक्यता आहे."

"तुमचा राजाबद्दल नक्कीच गैरसमज होतो आहे. माझ्या या टीकेतलं सत्य हरीश नक्कीच ओळखेल आणि आपली चूक सुधारेल." अनन्त आत्मविश्वासाने बोलला.

"ठीक आहे. एकदा असाच राजाला भेटायला जाऊन बघ. त्याच्या तुझ्याशी वागण्यात काही फरक झाला नाही तर तुमच्या मैत्रीची मी स्तुतीच करीन. पण एवढं मात्र लक्षात ठेव हं, कि तू हरलास तर मात्र तुला माझ्या मुलीशी लग्न करावं लागेल. काय?" धनकाम म्हणाला.

या गोष्टीला अनन्त तयार झाला. दुसऱ्याच दिवशी तो हरीशला भेटायला गेला. पण त्याला पहाताच डोळे लाल करत हरीश बोलला– "अनन्त, माझ्याच वागण्याची टीकाटिप्पणी करण्याइतका मोठा झालास हं तू! तुझ्या लायकीचा विचार न करता मी जो मित्रधर्म आचरत आलो, त्याचे चांगलेच पांग फेडलेस बरं! आता पुन्हा कधी आपलं तोंड दाखवायला येऊ नकोस. जाऊ शकतोस तू आता."

अनन्त धनकामकडे परतला आणि काय घडले याची खरी हकीकत सांगून त्याने आपला पराजय कबूल केला; आणि दिलेल्या वचनाप्रमाणे धनकामच्या मुलीशी त्याने विवाह केला.

इतकी गोष्ट सांगून झाल्यावर वेताळ विक्रमराजाला म्हणाला– "राजा, अगदी लहानशी नोकरी असूनही अनन्तने आपला मित्र राजा हरीश याच्याकडे स्वतःसाठी कसलीही मदत मागितली नव्हती, दुसऱ्याच कोणाला नोकरी देवविण्यासाठी त्याने राजाकडे शब्द टाकला. लाच घेणारा माणूस स्वतःचा दोस्त असूनही त्याला वाचवण्यासाठी तो राजाकडे गेला नाही. व्यापारी श्रीकान्त फायद्यातला हिस्सा द्यायला तयार असूनही अनन्तने तो स्वीकारला नाही. आणि हे सर्व माहीत असतानाही राजाने अनन्तच्या टीकेतलं सत्य ओळखलं नसेल, तर त्याचं कारण काय बरं असू शकेल? हा राजाचा गर्व की त्याचा मूर्खपणा, का तिसरंच काही? माझ्या या शंकेचं उत्तर माहीत असूनही तू द्यायचं टाळलंस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

उत्तरादाखल राजा विक्रम म्हणाला– "लहानपणापासूनच मैत्री असल्यामुळे अनन्त किती स्वाभिमानी व प्रामाणिक आहे हे राजा हरीश जाणून होता. अनन्तची नोकरी अगदीच मामुली होती, पण स्वतः चांगली नोकरी देऊ करूनही अनन्तने ते मानले नसते हेही हरीशला पक्के ठाऊक होते; म्हणूनच त्याने तसा काही प्रयत्न केला नाही. राजाशी असलेल्या त्याच्या मैत्रीचा स्वतःसाठी उपयोग करून घेण्यासाठी स्वार्थी लोक अनन्तवर दबाव आणू पहात असत. अशा परिस्थितीतच राजाला अनन्त व जमीनदार धनकाम यांच्यातल्या पैजेची हकिकत समजली. लोकांच्या दबावापासून अनन्तचा बचाव व्हावा आणि जमीनदाराचा जावई बनून अनन्त सुखी व्हावा, म्हणूनच राजा हरीशने रागावण्याचे नाटक केले. या सर्व हकीकतीवरून आपल्याला कबूल करावे लागेल, की राजा हरीश न गर्विष्ठ आहे, न मूर्खही! उलट तो अत्यन्त बुद्धिमान आणि अपार स्नेहशील आहे असेच सिद्ध होते."

अशा तऱ्हेने उत्तर दिल्यामुळे विक्रमराजाचे मौन भंग झाले; आणि वेताळ त्या प्रेतासह तात्काळ अदृश्य होऊन पुन्हा त्याच झाडाच्या फांदीवर जाऊन लटकू लागला. (कल्पित)



# मूळ स्वभाव

जमीनदार जगमोहन एक नंबरचा कंजूस माणूस होता. देवदर्शनासाठी कधी देवळात गेला, तर देवाला नारळ वहाणं, पुजाऱ्याच्या थाळीत कधी पैसे टाकणं किंवा जोडे संभाळणाऱ्या मुलाला काही देणं वगैरेसाठी तो बिलकुल खर्च करत नसे.

जमीनदाराचा कंजूसपणा पुजारी चांगलाच ओळखून होता, त्यामुळे तो कधी तोंड उघडून जगमोहनकडे काही मागतही नसे.

एकदा एका विशेष पर्वाच्या दिवशी देवळात सर्वात पहिला जाणारा भक्त जमीनदार जगमोहनच निघाला ! अन् त्या दिवशी आश्चर्य म्हणजे, जगमोहनने पुजाऱ्याच्या थाळीत एक पैसा दक्षिणाही टाकली.

पण इतक्या चांगल्या पर्वणीची सुरुवात एकच पैसा दक्षिणेने व्हावी याचा पुजाऱ्याला विषाद वाटला. त्याला गप्प बसवेना. तो जमीनदाराला म्हणाला–"आपणासारख्या बड्या माणसाकडून एक पैसाच दक्षिणा घेणं मला अपमानास्पद वाटतंय. कृपा करून आणखी एक पैसा टाका ना थाळीत !"

हे ऐकून जमीनदार चिडला. "आणखी एकच पैसा टाकून पुन्हा दुसऱ्यांदा तुझा अपमान नको करायला." असे म्हणून जगमोहनने तो पैसा उचलून घेतला अन् तेथून निघून गेला.



# चांदोबा पुरवणी–३५



भारताची दैवते :

## महाकाली

सृष्टि, स्थिति आणि लय यांना कारणभूत असणाऱ्या दिव्य शक्तीला आपल्या प्राचीन ऋषि-मुनींनी विविध स्वरूपात पाहिले आहे. निर्मल व प्रशांत वदनाने सर्वांचे संरक्षण करणारी दिव्य माता, अतिभयानक रूप धारण करून दुष्टांचे दमन करते. विश्वातील सर्व प्राण्यांची केवळ निर्मितीच नाही, तर त्यांचा नाश ही या दिव्य शक्तीच्या संकल्पानुसार होतो असा आपल्या पूर्वजांचा दृढ विश्वास होता. या दिव्य शक्तीच्या संहारक रूपाचेच नाव आहे महाकाली.

महाकालीचा रंग काळा असतो. शार्दूलचर्म धारण करून गळ्यात मुंडमाला आणि चार हातात भयानक शस्त्रे घेतलेल्या महाकालीचे रूप अति भयानक दिसते. असे भयानक रूप असले तरी महाकालीवर दृढ भक्ति-विश्वास ठेवून जे तिची पूजा-अर्चना करतात, त्या भक्तांचे ती मातृवत् रक्षण करते व सदासर्वदा त्यांचा उत्साह वाढविते असा भक्तांचा पक्का विश्वास आहे.

लोककंटक दुष्टांचा नाश करण्यासाठी अवतार घेतलेल्या महाकालीचा जन्म-दिवस साजरा करण्यासाठी देशात सर्वत्र विजयादशमीचा उत्सव अत्यंत आनंदाने व उत्साहाने पार पाडला जातो.



# तेरा वर्षे वयाचा पदवीधर

नुकत्याच ज्याच्या विषयी आपण अनेक बातम्या ऐकल्या, तो हा मुलगा आहे बालमुरलीकृष्ण अंबटी! हा अमेरिकेत रहात असलेला एक भारतीय विद्यार्थी आहे आणि विद्यार्जनात याने आपला विक्रम प्रस्थापित केला आहे. अपूर्व बुद्धिमान या बालकाला न्यूयॉर्क विश्व-विद्यालयाने जीव-शास्त्रांतील पदवी बहाल केली. ही पदवी धारण करणाऱ्या या मुलाचं वय केवळ तेरा वर्षांचं आहे.

गेल्या मे महिन्यात या विश्वविद्यालयाचा जो पदवीदान-समारंभ झाला, त्यात सुमारे दहा हजार विद्यार्थी-विद्यार्थिनींनी पदव्या ग्रहण केल्या. या समारंभात बालमुरलीकृष्ण अंबटीचा एक विशेष 'चांदीचा टॉर्च' देऊन गौरव करण्यात आला.

बालमुरलीचे आई-वडील दोघे ही आपल्या देशात अध्यापक म्हणून काम करीत आहेत. चार वर्षांच्या अल्प वयात बालमुरलीने कॅल्क्युलसची प्राथमिक सूत्रे आत्मसात् केली. मुलाच्या बुद्धीची प्रखरता लक्षात येताच आई-वडिलांनी त्याला सर्व प्रकारे प्रोत्साहन दिले.

बालमुरलीकृष्णने आपल्या वयाच्या आकराव्या वर्षी, आपला वयाने सहा वर्षांनी मोठा असलेला भाऊ जयकृष्ण याच्या बरोबर 'एड्स्' वर एक पुस्तक प्रकाशन करून आपले एक रेकॉर्ड प्रस्थापित केले. त्याच वेळी त्याने न्यूयॉर्क विश्व-विद्यालयांत' प्रवेशासाठी अर्ज केलेला होता.

नुकताच इसराइल मधील एक युवक, अठराव्या वर्षी आपला डॉक्टरेटचा प्रबंध लिहून जगातील सर्वात "कमी वयाचा डॉक्टर" म्हणून प्रसिद्ध झाला. आता याहून कमी वयात डॉक्टरेटची पदवी मिळवून इसराइलच्या या छोट्या डॉक्टरचे रेकॉर्ड मोडण्याचा बालमुरलीकृष्ण अंबटी प्रयत्न करीत आहे.

काल-गतीच्या पुढे चालणाऱ्या या बाल-मेधावी बालमुरलीला आपल्या प्रयत्नात यश मिळावं अशी आपण आशा करू या.

## तुम्हाला माहीत आहे ?

१ सायफर म्हणजे 'शून्या' चा शोध भारतातील कोणत्या गणितज्ञाने लावला ?
१. समुद्री घोडा खरोखरीच घोडा नसतो. मग तो कोण असतो ?
३. टोकिओ शहराचं नाव पूर्वी काय होतं ?
४. इ. स. ३१२ मध्ये कॉन्स्टंटिन चक्रवर्ती सम्राटाने एक रोमन नाणे प्रचारात आणले, ते चौदाव्या शतकापर्यंत चालू राहिले. ते नाणे कोणते ?
५. जगातील सर्वात मोठे ग्रंथालय कोणते ?
६. युरोपात जन्मला, आशियात मेला नि ज्याचा दफन-विधि आफ्रिकेत झाला तो राजा कोणता ?
७. शेक्सपिअरच्या नाटकात सर्वात मोठं नाटक कोणतं ?
८. एका राष्ट्रीय ध्वजात त्या देशाचा नकाशा असतो, तो देश कोणता ?
९. एव्हरेस्टच्या शिखरावर पोचल्यावर एडमंड हिलरी व तेन्सिंग नोर्के यांनी तेथे चार झेंडे रोवले. ते झेंडे कोणते ?
१०. हेन्री आर्चरने एका यंत्राचा शोध लावला. त्याचा उपयोग पोस्टाची तिकिटे छापणाऱ्या मशीनमध्ये केला जातो. ते यंत्र कोणते ?
११. गॅलिलिओने सर्वात प्रथम कोणता शास्त्रीय सिद्धान्त मांडला ?
१२. केंब्रिज विश्वविद्यालयाचा पदवीधर होण्यासाठी चार्लस् डार्विनने कोणत्या ग्रंथाचे अध्ययन केले होते ?
१३. भारत-भ्रमण करणारा पहिला अमेरिकेचा अध्यक्ष कोण ?
१४. पृथ्वीला सूर्याभोवती एक प्रदक्षिणा करायला किती वेळ लागतो ?
१५. एव्हरेस्ट पर्वताच्या शिखरावर सर्वात अधिक कसले दगड सापडतात ?

## उत्तरावली

# चांदोबाच्या बातम्या



## लंडनच्या प्राणी-संग्रहालयाची घोषणा

लंडनचे प्राणी-संग्रहालय जगातील एक अत्यंत प्राचीन संग्रहालय आहे. गेली १६० वर्षे जतन केलेल्या या संग्रहालयाला आता काही अडचणींशी सामना द्यावा लागत आहे. व्यवस्थापकांच्या सांगण्यानुसार हे प्राणी-संग्रहालय चालविण्यासाठी ४० मिलिअन पौंड एवढी रक्कम आवश्यक आहे. याला ब्रिटिश सरकारची तयारी नाही. म्हणून या संग्रहालयाच्या संचालकांनी जगातील सर्व जीव-जंतु-प्रेमी मुलांना प्रार्थना केली आहे की त्यांनी प्राणिसंग्रहालयाला आर्थिक मदत पाठवावी. अन्यथा नाईलाजाने येथील प्राण्यांना निर-निराळ्या ठिकाणी पाठवावे लागेल.

## येशू ख्रिस्ताची भाषा

बायबल मधील येशू ख्रिस्ताच्या प्रवचनांचा जगातील सर्व भाषात अनुवाद झालेला आहे. येशू ख्रिस्ताने आरामिक भाषेत आपली प्रवचने ऐकवली होती. आता आरामिक भाषा जवळ जवळ नष्ट होत चालली आहे. सीरियातील काही प्रदेशात केवळ काही हजार लोकच सध्या ही भाषा बोलतात. या भाषेला लिपि नाही. म्हणून या भाषेत लिहिणं-वाचणं शक्य होत नाही. सीरियामध्ये सिरियक, हिब्रु आणि अरबी या भाषांचे वर्चस्व आहे. आरामिक केवळ तोंडी स्वरूपात शिकवली जाते. म्हणूनच या भाषेत व्यवहार करणारांची संख्या अशी झपाट्याने कमी झालेली आहे.




## 'गोल्फ'ची बक्षिसे म्हणून जनावरे !

मलेशियामध्ये नुकत्याच ज्या 'गोल्फ' खेळाच्या चढाओढी झाल्या, त्यात विजेत्यांना बक्षिस म्हणून पैसे दिले गेले नाहीत. या स्पर्धेतील विजेत्यांना 'ट्रॉफी' पण दिल्या गेल्या नाहीत. विजेत्यांमधील प्रथम क्रमांकाला एक गाय, दुसऱ्या व तिसऱ्या क्रमांकांना मेंढ्या व चवथ्या-पाचव्या क्रमांकावरील विजेत्यांना दोन-दोन ससे देण्यात आले. 'होल-इन्-वन्' च्या विजेत्या खेळाडूला एका घोड्या बरोबर एक गाडी ही देण्याचा निर्णय झालेला होता. पण तो जिंकणारा कोणी निघालाच नाही. तेथील कृषि-मंत्र्याने याबाबत खुलासा केला की 'गोल्फ' खेळणाऱ्या खेळाडूत शेती व जनावरे यांबाबत प्रेम वाढावे म्हणून बक्षिसांची ही नवी प्रथा सुरू करण्यात आलेली आहे.





# जादूचा कान

प्राचीन काळची गोष्ट आहे. जपान देशात समुद्राच्या किनाऱ्यावरील एका गावात एक तरूण रहात असे. एके दिवशी तो समुद्राच्या किनाऱ्यावरील वाळूतून चालला असताना त्याला एका छोट्या खड्ड्यात तडफडणारा एक मासा दिसला. त्याने खड्ड्यातून माशाला उचललं नि समुद्रात सोडून दिलं. 'चला, एकाचा प्राण वाचवला!' अशा संतोषाने तो परत फिरला. एवढ्यात मागून एक आवाज आला—"ऐक, थांब जरा."

त्याने वळून मागे पाहिलं तेव्हा समुद्रांतील पाण्यात त्याला एक स्त्री दिसली. त्याला वाटलं ही स्त्री दुसऱ्या कोणाला तरी बोलवीत असेल. आणि तो आपली वाट चालू लागला.

त्या तरुणाला उद्देशून स्त्री म्हणाली—"मी तुलाच बोलवते आहे. थांब जरा!"

तरुणाला मोठं आश्चर्य वाटलं. तो थांबला, मागे फिरून त्या स्त्रीच्या जवळ गेला. तेव्हा ती स्त्री म्हणाली—"सागर राजाने मला तुझ्याकडे पाठवले आहे. तू सागर राजाच्या मुलीचे प्राण वाचवलेस, म्हणून तुला आणण्यासाठी राजाने मला पाठवले आहे. चल माझ्या-बरोबर."

यावर तो तरुण म्हणाला—"मला तर पोहता येत नाही. मग सागर-राज्यात मी कसा येऊ शकेन?"

"तू भिऊ नकोस. तू माझ्या पाठीवर बस, मी तुला सुखरूप राजापर्यंत घेऊन जाईन." त्या स्त्रीने आश्वासन दिले.

दोघे ही जेव्हा गुडघाभर पाण्यात पोचले तेव्हा त्या स्त्रीने माशाचे रूप घेतले. तो तरुण माशाच्या पाठीवर बसला. मासा सागर-राजाच्या महालाकडे निघाला. वाटेत मासा तरुणाला म्हणाला—"सागर राजा

एक जपानी लोककथा

जर तुला काही वरदान देऊ लागला तर एक 'जादूचा कान' माग. तो जादूचा कान आपल्या कानात ठेवलास की सर्व प्राण्यांच्या भाषा तुला समजू लागतील."

सागर-राजाने या तरुणाचे छान स्वागत केले. समुद्र-राजाचं काही दिवस अतिथ्य स्वीकारून आता तो घरी परत जायला निघाला. सागर-राजा म्हणाला–"ठीक आहे. आता मी तुला एक वर देऊ इच्छितो. माझ्या राज्यातील जी वस्तु तुला पसंत पडली असेल, ती मागून घे."

तरुणाने मागणी केली–"मला जादूचा कान पाहिजे. मला दुसरे काही नको."

"या सागर-राज्यात अद्‌भुत असा जादूचा कान फक्त एकच आहे. तरी पण तुझी इच्छा असली तर तो मी तुला देईन." असं म्हणून सागर-राजाने एका गुप्त ठिकाणी ठेवलेला जादूचा कान सेवकातर्फे मागवून घेतला नि त्याला तरुणाला दिला.

ज्या माशाच्या पाठीवर बसून हा तरुण सागर-राजाकडे आला होता, त्याच माशाच्या पाठीवर बसून तो समुद्र-किनारी परत आला. तो तरुण समुद्राच्या किनाऱ्यावर एकटाच बसला होता, एवढ्यात दोन बया पक्षी आपापसात बोलू लागले. तरुणाला वाटलं ते दोघे काय बोलत आहेत ते पहावं तर खरं! म्हणून छोट्या शंखाच्या आकाराचा जादूचा कान आपल्या कानात ठेवून तो ऐकू लागला. त्यांची बोली त्याला समजू लागली.

बया पक्षी आपापसात मजेत बोलत होते–"ही माणसं आपल्याला फार बुद्धिमान समजतात, पण मला हे मुळीच पटत नाही. हे लोक नाला पार करताना ज्या दगडावर पाय ठेवून जातात, ते खरं सोनं आहे! पण हे लोक त्याला साधा दगड समजून पुढे चालू लागतात."

हे बोलणं ऐकून त्या तरुणाला फार आश्चर्य वाटलं. तो त्या नाल्याजवळ गेला. तेथील तो दगड उचलून वरील मातीचे थर त्याने खरडून काढले, स्वच्छ झाल्यावर तो दगड सोन्यासारखा चमकू लागला. बया पक्षी जे बोलत होते ते खरंच होतं!

तरुणाने ती सोन्याची वीट आपल्या खिशात घातली नि घराकडे जायला निघाला. एवढ्यात दोन कावळे काव काव करू लागले. पुन्हा तरुणाने आपल्या जवळील जादूचा कान लावून कावळे काय म्हणत आहेत ते समजण्याचा प्रयत्न केला.

कावळे आपापसात म्हणत होते–"ही माणसं शुद्ध मूर्ख आहेत. कुठून कुठून वैद्यांना बोलवण्यात आले. पण जमीनदाराच्या मुलीचा रोग काही बरा झाला नाही. जमीनदाराच्या घरावर जेव्हा नवं गवत बांधलं गेलं, तेव्हा चुकून एक साप ही त्यात बांधला गेला. बिचारा उपाशी वाळून चालला आहे. त्याला मोकळं करून दूध पाजलं तर जमीनदाराच्या मुलीचा रोग पळून जाईल!"

तरुणाला वाटलं, बरं झालं आपण हे सगळं ऐकलं! तो थेट जमीनदाराच्या घरी पोचला.





तिथं बाहेरच एका फलकावर लिहिलं होतं–"माझ्या मुलीचं रोग-निदान करून तिला जो बरा करील त्याला पाहिजे ते बक्षिस दिले जाईल."

त्याने जमीनदाराच्या घरात प्रवेश केला नि म्हणाला–"आजारी मुलीचा रोग मी दूर करू शकेन! मला एक संधि द्याल?"

हे ऐकून तिथं जमलेले वैद्य उपहासाने हसू लागले. "आम्ही आता पर्यंत ज्या रोगाची परीक्षा करू शकलो नाही, तो रोग हा आला दूर करणारा!" वैद्यांनी तरुणाची टिंगल केली.

पण जमीनदाराची गोष्ट वेगळी होती. जो कोणी मुलीचा रोग बरा करायला येईल, त्याचे तो स्वागत करीत असे. कारण कोणाच्या हातात जादू असेल कसं समजणार?

तरुण जमीनदाराच्या मुलीच्या खोलीत गेला नि तिच्याकडे पहात म्हणाला–"हा रोग नाही, शाप आहे! एका जीवाची हिंसा होत आहे. या घराच्या छपरावरील गवतात एक साप बांधला गेलेला आहे. बिचारा उपाशी मरतो आहे. त्याला ताबडतोब मुक्त करून दूध पाजा. तेव्हा या शापातून मुक्ति मिळेल!"

जमीनदाराने लगेच आपल्या नोकरांना बोलवलं नि त्यांना छपरावरील गवत सोडायला सांगितलं. छतावरील एका लाकडावर भुकेने अर्धमेला एक साप दिसला. तो प्राण सोडण्याच्या बेतात होता. त्याला बंधनमुक्त केलं. त्याला प्यायला दूध दिलं. दूध पिऊन सापाच्या जिवात जीव आला. तो अमळ हालचाल करू लागला नि तिकडे खोलीत खाटेवर आजारी असलेली जमीनदाराची मुलगी ताठ उठून बसली. साप आपल्या वाटेने निघून गेला. जमीनदाराची मुलगी ठणठणीत बरी झाली.

जमीनदाराला खूप आनन्द झाला. त्याने या तरुणाला आपली मुलगी देण्याचे ठरविले. थाटामाटात लग्न-समारंभ पार पडला. आनन्दाने तो आपले दिवस घालवू लागला.





# योग्य गुरु

प्राचीन काळची गोष्ट आहे. भार्गव नावाच्या एका सावकाराला बऱ्याच वर्षानंतर एक मुलगा झाला. त्याचं नाव ठेवण्यात आलं दीपक. दीपक म्हणजे भार्गवचं सर्वस्व होतं. दीपक दिसायला फार सुरेख होता. भार्गवने विचार केला–दीपक साठी एकादा योग्य गुरु पाहून त्याला सर्व विद्यापारंगत बनवावं! पण असा समर्थ गुरु कोठे मिळणार? भार्गव याबाबत विचार करू लागला.

दीपक मोठा बुद्धिमान आणि चलाख होता. एकदा एकादी गोष्ट ऐकली की ती तो विसरत नसे. आपल्या वयाच्या मानाने तो अधिक बुद्धिशाली होता. मोठ्या अनुभवी माणसाप्रमाणे प्रश्न विचारायचा. त्याच्या प्रश्नांची उत्तरे देणे भार्गवला जमत नसे. अन्य कोणी ही सहज त्याच्या प्रश्नांची उत्तरे देऊ शकत नसे. अशा बुद्धिसंपन्न मुलाला एकादा सामान्य गुरु मिळाला तर त्याचा काय उपयोग? म्हणून भार्गव प्रयत्नपूर्वक गुरूचा शोध करू लागला. त्याच गावात एक गुरुकुल होतं. पण भार्गवला चांगलं माहीत होतं की दीपकला शिकवण्याजी बौध्दिक ताकत तेथील गुरुत नाही.

तेथून दोन कोसांवर एक गाव होतं शिलापीठ. तेथे कर्मठ नावाच्या एका वृद्ध गुरूने चालवलेले एक गुरुकुल होते. अनेकांनी सांगितलं की तेथील कर्मठचे शिष्य चांगले प्रतिभासंपन्न आणि कर्तबगार म्हणून प्रसिध्द आहेत. पण भार्गवला एक शंका होती.

जर कर्मठ खरोखर एक महान् गुरु असेल तर तो या छोट्या गावात का राहिला असता? ग्रामवासी त्याला देऊन देऊन काय देऊ शकणार? जर तो खरेच महान असेल,

काश्मीरमधील लोककथा



तर त्याने शहरात जायला हवं नि भरपूर कमाई करायला हवी. तरी पण एकाद्या दरच्या शहरातील गुरुकुलात दीपकला पाठवायला ही त्याचं मन तयार नव्हतं. कारण मुलाचा विरह सहन करणं भार्गवला शक्य नव्हतं.

भार्गवच्या मनात एक विचार आला. इतके लोक ज्या अर्थी कर्मठच्या गुरुकुलाची प्रशंसा करतात, त्याअर्थी सगळीच कशी खोटी असू शकेल? त्याने विचार केला-एकदा जाऊन प्रत्यक्षच सगळं पाहून यावं. एक शुभ-मुहूर्त पाहून गुरूला भेटीसाठी काही द्रव्य बरोबर घेऊन आपल्या मुलासह भार्गव शिलापीठाच्या गुरुकुलाकडे निघाला.

तो गुरुकुलात पोचला तेव्हा अंधार पडू लागला होता.

गुरु कर्मठ स्नान करण्यासाठी तलावा वर गेलेले होते. गुरुपत्नी आणि त्यांच्या मुलांनी भार्गवचे यथोचित आतिथ्य केले. भार्गवला फार संतोष वाटला.

गुरु-दर्शनासाठी तलावावर जाण्याची आपली इच्छा भार्गवने प्रदर्शित केली, तेव्हा कर्मठचा मोठा मुलगा आणि सहा वर्षांचा त्याचा नातू असे तलावाकडे निघाले. ते जेव्हा तलावापाशी पोचले तेव्हा गुरु कर्मठ किनाऱ्यावर कपडे धूत असताना दिसले. भार्गवने गुरूला आदरपूर्वक नमस्कार केला नि बाजूला उभा राहिला.

काही कुशल-प्रश्न झाल्यानंतर भार्गवने गुरूला विचारले-"गुरुवर, दोन खास रंगांपैकी आपल्याला दुसराच अधिक महत्त्वाचा वाटतो? दोन्ही एकमेकांना पूरक आहेत."

गुरुने उत्तर दिले-"तसे नाही. दोन्ही महत्त्वाचे आहेत. हा नसला तर तो नाही, नि तो नसला तर हा नाही!"

जवळच असलेल्या गुरूच्या नातवाला उद्देशून भार्गवने विचारले-"बाळ, आम्ही काय बोललो ते तुला समजले का?"

सहा वर्षांचा मुलगा म्हणाला-"का नाही? तुम्ही आजोबांना विचारलं की दिवसापेक्षा रात्र अधिक महत्त्वाची का? आजोबा म्हणाले-दोन्हींचे महत्त्व आहे!"

भार्गवने पुन्हा गुरूला विचारले-"जर संपूर्ण बारा आहेत, तर आपल्या सारख्या वृद्धाला सहाव्यातच इतके परिश्रम करण्याची काय आवश्यकता आहे?"

गुरु कर्मठ म्हणाले-"माझ्या जन्मानंतर, मरून पुन्हा जन्मलेले बत्तीस सुरक्षित आहेत. मग काय हरकत आहे?"

भार्गवने आता कर्मठच्या मुलाला विचारले-"याचा काय बरं अर्थ? मी काय विचारलं नि तुझ्या वडिलांनी काय उत्तर दिलं?"

गुरूच्या मुलाने उत्तर दिलं-"आपण माझ्या वडिलांना विचारलं की या शिशिर ऋतूत इतक्या वृद्धावस्थेत आपण इतके परिश्रम का करीत आहात? यावर वडिलांनी सागितलं की त्यांची बत्तीशी धडधाकट आहे, त्यांची प्रकृति उत्तम आहे. म्हणून ही थंडी सहन करण्याची ताकत त्यांच्यात आहे!"

यानंतर भार्गवने पुन्हा कर्मठला विचारले-"महाराज, नेहमी घर पाडून ते उभारणारे किती आहेत?"

"असलं काम करून सोडून देणारे चार आहेत! आता त्यांच्या बाजूचे अन्य लोक हे काम करीत आहेत!" कर्मठने उत्तर दिले.



याचं स्पष्टीकरण ही गुरूच्या मुलानेच दिले-"आपण विचारलं की आपल्या घरात मुले किती आहेत? आणि वडिलांनी सांगितलं की त्यांना चार मुले आहेत नि अनेक नातवंडं!"

आता भार्गवने गुरूला विचारले-"गुरुदेव, आपण नित्य कांतिकन्येला घेऊन येत असाल? ही गोष्ट खरी आहे?"

कर्मठ म्हणाले-"नाही, कांतिकन्येला आणलं असतं तर सर्व वस्त्राभूषणे सोडून द्यायला लागली असती. म्हणून माझा आपल्या कन्येवरच विश्वास आहे. आम्हाला तेवढीच पुरे!"

गुरु-पुत्राने त्याचा अर्थ सांगितला– "आपण प्रश्न विचारला की गुरुजी कर्ज काढून धन आणतात का? पिताजींनी उत्तर दिलं–नाही, आपल्या प्राप्तीतच ते सर्व व्यवस्थित भागवतात!"

पण भार्गव एवढ्यावर गप्प बसला नाही. त्याने विचारले–"कल्पवृक्षाचा आधार घेतलेला बरा. अशी काडी घेऊन बसणं ठीक आहे का?"

गुरु कर्मठने उत्तर दिले–"काडीशिवाय कल्पवृक्ष तरी कसा राहील? काडी काडी एकत्र येऊन जो झाडू बनतो त्यानेच तर स्वच्छतेचे काम होते ना? आणि स्वच्छता हे लक्ष्मीचं मूळ आहे!"

गुरुपुत्राने याचा अर्थ सांगितला– "कोणत्याही गावाला राजाश्रय मिळाल्या-वाचून राहणार नाही. मी जर गावाकडे दुर्लक्ष केलं तर गावाचा उद्धार कोण करणार? सर्व सुशिक्षित ग्रामवासी एकत्र आले नि त्यांनी गावाची प्रगति घडवून आणली तर राजाश्रय का मिळणार नाही? आपल्या प्रश्नाचं माझ्या पिताजींनी हेच उत्तर दिलं आहे."

एवढ्यात गुरुजींची तीन वर्षांची नात धावत-पळत तलावापाशी आली. येताच तिने आजोबांवर प्रश्नांचा वर्षाव केला.

मुलीच्या प्रश्नांनी आकर्षित होऊन भार्गवने विचारले–"बेटा, मी एक प्रश्न विचारतो तुला. त्याचं उत्तर देशील?"

चिमुरडी खड्या आवाजात म्हणाली– "मग विचारा की?"

"मौन रहाण्यासाठी काय केलं पाहिजे?" भार्गवने विचारले.

"खूप धांगड-धिंगा केला पाहिजे!" म्हणून चिमुरडी परत फिरली नि तिने घराकडे धूम ठोकली.

सर्व जण हसू लागले. भार्गवला मोठे आश्चर्य वाटले. निःशंक होऊन त्याने आपल्या मुलाला कर्मठच्या गुरुकुलात दाखल केले. कालांतराने दीपक मोठा विद्वान बनला. त्याने आपल्या कुटुंबाची कीर्ति दीपकाप्रमाणे दाही दिशांना पसरवली.





# वीर हनुमान

रावणाच्या आज्ञेनुसार प्रहस्ताने हनुमानाला काहीं प्रश्न विचारले. हनुमानाने उत्तर द्यायला सुरुवात केली–

"राक्षसराज रावणाला प्रत्यक्ष पाहण्या-साठीच मी अशोक-वनाचा ध्वंस केला! तरी पण माझी इच्छा पूर्ण झाली नाही. बलिष्ट राक्षसांनी माझ्यावर हल्ला केला! आपलं संरक्षण करण्यासाठी मला त्यांच्याशी युद्ध करावं लागलं. ब्रह्मदेवाने मला वरदान दिलेले असल्यामुळे मी कोणत्या ही बंधनात अडकलो नाही. तुम्हाला पाहता यावं म्हणून मी ब्रह्मास्त्रात बंदी झालो हे खरं आहे. महापराक्रमी रामाचा मी दूत आहे. मला माझं एक राजकार्य तुझ्याकडून साधायचं आहे. आपल्या कल्याणासाठी मी जे सांगतो आहे, ते नीट ऐक. अन्यथा आपल्या पायावर धोंडा पाडून घेशील!

सुग्रीवाने मला आज्ञा दिली की मी त्याची खुशाली तुला कळवावी आणि तुझे कुशल-क्षेम विचारावे. सुग्रीवाने रामाला सीतेचा शोध करण्याचे अभिवचन दिले, आणि त्यासाठी चारी दिशांना वानरांना पाठवलं. त्यांपैकीच मी एक आहे. मी वायुदेवाचा मुलगा आहे, माझं नाव हनुमान! शंभर योजनांचा समुद्र पार करून मी सीतेचा शोध घेण्यासाठी इथे आलो. तुझ्या ताब्यात असलेल्या सीतेला मी पाहिलं आहे. तू धर्मशास्त्र जाणतोस. एकाद्या स्त्रीला जबरदस्तीने पकडून ठेवणे तुला शोभत नाही. राम-लक्ष्मणांचा ज्याच्यावर क्रोध



आहे असा कोणी ही त्रिलोकात सुखाने राहू शकणार नाही. हे सर्व तुला समजून सांगण्याची आज्ञा सुग्रीवाने मला दिली आहे. मी सीतेला पाहिलेलं आहे. आता तिला घेऊन जाणं हे रामाचं काम आहे. ते ते कसं करतील हे मला माहीत नाही. मी मनात आणलं तर सगळ्या लंकेचा विध्वंस करू शकतो. पण याला रामाची परवानगी पाहिजे. वानर सेनेसमोर त्याने अशी प्रतिज्ञा केलेली आहे की सीतेचं अपहरण करणाऱ्याचा वध तो स्वतः करील. ही सीता तुझ्या मृत्यूला कारणभूत होणार आहे हे सत्य नीट समजून घे. आता आपल्या संरक्षणाबाबत विचार कर. मी मानव नाही नि राक्षस ही नाही. म्हणून कोणाची ही बाजू न घेता मी सत्य-कथन करीत आहे. रामाच्या हातून तुला कोणी वाचवू शकणार नाही."

निर्भयपणे हनुमानाने जेव्हा हे निवेदन केले तेव्हा रावण अतिशय रागाने ओरडला— "ठार करा या वानर हनुमानाला, फार वटवट करतो आहे. याला चांगली अद्दल घडवली पाहिजे."

तेव्हा बुद्धिमान विभीषण रावणाला म्हणाला—"लंकाधिपते, हनुमानाला मारणं राजधर्माच्या विरुद्ध होईल. लोकाचाराच्या विपरीत असं काही न करणं बरं. आपला क्रोध आवरा. दूताला योग्य अशी शिक्षा याला व्हावी."

पण रावणाचा राग जरा ही कमी झाला नाही. तो विभीषणाला म्हणाला—"हा वानर पापी आहे. पाप्याला मारण्यात काही पाप नाही."

विभीषणाला हे पटलं नाही. तो पुन्हा सांगू लागला—"अनुभवी वयोवृद्ध लोकांची शिफारस आहे की काही ही झालं तरी तरी दूताला मारू नये. दूताला योग्य अनेक प्रकारच्या शिक्षा सांगितलेल्या आहेत. त्याला विकलांग बनविता येईल. चाबकाचे फटकारे मारता येतील. त्याच्या डोक्याचं मुंडण करता येईल. त्याला डाग देता येईल.



पण कोणत्या ही शास्त्रात दूताला मारून टाकण्याची शिक्षा सांगितलेली नाही. तुझ्यासारख्या धैर्यशाली राजाने आपला क्रोध आवरला पाहिजे. याला मारून टाकण्यामुळे आपलं काय प्रयोजन सिद्ध होणार आहे? ज्यांनी याला इथं पाठवलं त्यांना मारून टाकलं पाहिजे. हा जे काही बोलतो आहे ते त्याचे स्वतःचे विचार नाहीत. याला सोडून अन्य कोणी समुद्र पार करू शकेल असं मला वाटत नाही. म्हणून याला मारण्याऐवजी राम-लक्ष्मणांना इथे बोलवून त्यांच्याशी युद्ध करणं बरं. त्यांच्याशी लढून विजय मिळवला तर त्रिलोकात तुझी कीर्ति पसरेल! सर्व लोग तुला नावाजतील."

आता रावणाला विभीषणाचा उपदेश पसंत पडला. त्याच्या सूचनेनुसारच सर्व काही करणं योग्य असं त्याला वाटलं. म्हणून रावण म्हणाला—"तू जे काही सांगतो आहेस, ते सर्व बरोबर आहे. दूताला मारणं हा अपराधच आहे. म्हणून याला एक शिक्षा करू या. वानरांना प्रिय असते त्यांची शेपटी. याच्या शेपटीला आग लावून याला सोडून देऊ या!"

रावणाने आज्ञा दिली—"याच्या शेपटीला आग लावा. त्याला शहर भर हिंडवा, चौका-चौकात हे प्रदर्शन पाहू द्या."

राक्षसांनी जुने-फाटके कपडे आणून हनुमानाच्या शेपटीला गुंडाळले. त्याच्यावर तेल ओतलं, नि ती पेटवून दिली.





ते जसं-जसं हे सगळं करीत होते, तस-तसा हनुमानाचा राग जंगलांतील वणव्या-प्रमाणे भडकत होता. अग्निज्वालांनी लपेटलेली आपली शेपूट मार-मारून त्याने काही राक्षसांना धराशायी केले.

लंकेतील मुलांना, वृद्धांना नि स्त्रियांना जेव्हा समजलं की हनुमानाच्या शेपटीला आग लावली गेली आहे, तेव्हा ते मोठ्या उत्साहाने आणि आनंदाने हा तमाशा पहायला रस्त्यावर गोळा झाले. सर्व राक्षसांनी मिळून हनुमानाला पुन्हा एकदा बांधलं नि त्याच्या बरोबर चालू लागले. आपली शेपूट जळण्याची भीति नसल्यामुळें हनुमान न घाबरता त्यांच्या मागे चालू लागला. त्यावेळी तो आपल्या छोट्या रूपात होता.

राक्षसांनी शंख फुंकीत, ढोल-नगारे वाजवीत हनुमानाची लंका भर वरात काढली. असं हिंडत असताना हनुमानाने काही मोक्याच्या वास्तु हेरून ठेवल्या. हनुमानाला हिंडवीत असताना लोक 'हेर' म्हणून त्याचा परिचय देऊ लागले.

राक्षसिणींकडून सीतेला समजलं की हनुमानाच्या शेपटीला आग लावण्यात आली आहे. तिला फार दुःख झालं. तिने अग्निदेवाची प्रार्थना केली की यामुळे हनुमानाला काही इजा होऊ नये.

सीतेला दुःखी झालेली पाहून सरमा म्हणाली—"सीते! त्या वानराबद्दल तू काही काळजी करू नकोस. तो मोठा महात्मा नि महापराक्रमी आहे. आपल्या मागे लागलेल्या राक्षसांना मारून टाकून, या घरावरून त्या घरावर उड्या मारीत साऱ्या लंकेला जाळून टाकणार आहे तो, जरा पहा तर तिकडे!"

सरमा म्हणाली ते अगदी संपूर्ण सत्य होतं. हनुमानाने राक्षसांना शिक्षा देण्याचा विचार केला. त्याने आपलं शरीर इतकं छोटं केलं की सगळी बंधनं गळून पडली नि तो मुक्त झाला मग त्याने आपले शरीर पुन्हा वाढवले आणि नगरीच्या प्रवेश-



द्वारावरील लोह-गदा हाती घेतली. तिच्या साह्याने आपल्या मागे लागलेल्या अनेक राक्षसांचा त्याने चांगलाच समाचार घेतला. आता त्याच्या मनात सारी लंका पेटवून देण्याचा विचार आला. आपली जळती शेपूट घेऊन या घरावरून त्या घरावर उड्या मारू लागला व एकेक घर पेटवून देऊ लागला.

सर्वात अगोदर त्याने प्रहस्ताच्या घराला आग लावली, मग महापार्श्वच्या घरावर उडी मारली. ते घर पेटवून पुढे त्याने शुक, वज्रदंष्ट्र, सारण, इंद्रजित, जंबुमाली इत्यादि राक्षसांच्या घरांवर उड्या मारल्या आणि क्रमशः त्यांची घरे पेटवून दिली. हनुमानाने फक्त बिभीषणाचे घर सोडून दिले. राक्षसांची केवळ घरेच नव्हेत, तर त्यातील सर्व धन-संपत्ति जळून खाक झाली. शेवटी हनुमानाने रावणाचे घर ही जाळायला कमी केले नाही.

रावणाला भिऊन असलेले अग्नि आणि वायु यांनी निर्भय होऊन आपला संपूर्ण प्रताप दाखवला. घरातील सोन्या-चांदीचे दागिने सर्व काही वितळून गेले. मोठ-मोठ्या इमारती भस्मसात झाल्या. हे अग्नि-कांड कसे थांबवावे हे राक्षसांना समजेना. त्यांना अशी ही शंका आली की स्वतः अग्निदेव तर या वानराच्या रूपात अवतरले नाहीत! अनेक राक्षसांनी त्या अग्नीत आपले आत्मार्पण केले. अतिसुंदर लंका-नगरीने आज भयानक रूप धारण केले. राक्षसांची व्यथा सर्व आकाशात दुमदुमली.



आता हनुमानाचा क्रोध शांत झाला. त्याला संतोष झाला. ज्या कामगिरी वर तो येथे आला होता, ती पूर्ण झाली होती. अशोक-वन उध्वस्त झालेलं होतं. अनेक राक्षस मेलेले होते. लंका नगरीची जळून राख झालेली होती. आता हनुमानाने समुद्राजवळ येऊन आपली शेपूट पाण्यात बुडवून आग विझवली.

हनुमानाला पश्चात्ताप झाला की त्याने लंका जाळली हे बरे केले नाही. सगळी



लंका जळून गेली, तर सीता सुरक्षित असेल ना अशी त्याला भीति वाटली. जर सीतेला काही अपघात झाला असेल, तर इथेच आत्मार्पण करण्याचा त्याने निश्चय केला. पण त्याच्या मनात एक विचार आला. ज्या अग्निदेवाने त्याची शेपूट जाळली नाही, तो सीतेला कसा धोका देईल? तो शिशपा वृक्षाजवळ गेला, झाडाखाली बसलेल्या सीतेला त्याने नमस्कार केला आणि म्हणाला–"माते, माझं भाग्य थोर, तू खुशाल आहेस!"

सीता त्या म्हणाली–"हनुमान, तुझे बल व पराक्रम, यांची कशी प्रशंसा करू? या सर्व राक्षसांना मारून, तू एकटा मला रामाकडे घेऊन जाऊ शकतोस! पण रामाने स्वत: यावे आणि शत्रूचा पराभव करून मला सोडवून घेऊन जावे हेच योग्य होईल. म्हणून तू रामाला तसे सांग."

"माते, तुला त्याबाबत जरा ही शंका नको. राम अवश्य येतील आणि तुला घेऊन जातील." असे सांगून हनुमानाने सीतेचा निरोप घेतला. तो अरिष्ट नावाच्या पर्वतावर चढला आणि समुद्र पार करून जाण्यासाठी त्याने आपले शरीर विशाल केले. आपल्या पायांनी अरिष्ट पर्वताला एक जोरदार धक्का दिला नि तो हवेत उडाला. हनुमानाच्या या धक्क्यामुळे अरिष्ट पर्वत थर थर कापू लागला.

ढगांमधून वाट काढीत तो समुद्रावर उडू लागला. समुद्राच्या दुसऱ्या बाजूला महेन्द्र पर्वत दिसताच त्याने सिंहनाद केला. उद्विग्नपणे हनुमानाची वाट पहात बसलेल्या अंगद व त्याच्या सहकाऱ्यांनी तो नाद ऐकला. त्यांच्या आनंदाला काही पारावार राहिला नाही.

तेव्हा जांबवान वानरांना म्हणाला–"हनुमान आपले कर्तव्य यशस्वीपणे पार पाडून आलेला दिसतोय, अन्यथा तो असा जयध्वनि करणार नाही." हे ऐकून वानरांना अतिशय आनंद झाला. हनुमानाला पाहण्यासाठी ते पर्वतावरील वृक्षांवर चढून बसले.





दुरून येणाऱ्या हनुमानाला पाहून त्यांनी वृक्षांच्या फांद्या गदगदा हलवल्या.

पाहता पाहता हनुमान त्यांच्याजवळ पोचला आणि महेन्द्र पर्वतावर उतरला. सर्व वानरांनी आनंद व अतिशय उत्साहाने त्याला घेरलं. हनुमानाला खाण्यासाठी त्यांनी कंदमुळे आणि फळे गोळा केली. हनुमानाने जांबवान, अंगद नि सर्व थोरा-मोठ्यांना नमस्कार केला. तोंड उघडताच थोडक्यात हनुमानाने सांगून टाकलं–"मी सीतामाईला पाहून आलो!" हे ऐकून सर्व वानर फार खुश झाले. काहींनी जोर-जोरात जयघोष केला. काही वानरांनी त्या आनन्दोत्साहात आपल्या शेपट्या जमिनीवर आपटल्या.

हनुमानाने पुन्हा एकदा सर्वांना सांगितलं–"मी सीता मातेचं दर्शन घेऊन आलो!" आणि पुढे अधिक न बोलता तो चूप बसला.

तेव्हा अंगद हनुमानाला म्हणाला–"हनुमान, शंभर योजनांच्या अंतराचा समुद्र तू दोनदा पार केलास. तुझ्या पराक्रमाला काही तोड नाही. दुसऱ्या कोणाला ही हे शक्य नाही. तुझी राज-भक्ति ही असामान्य आहे! आमचं सर्वांचं हे भाग्य आहे की तू रामाच्या पत्नि सीतेला पाहून आलास. आता रामाचे सीता-वियोगाचे दुःख कमी होईल."

हनुमान, अंगद व जांबवान महेन्द्र पर्वतावर बसलेले होते. चारी दिशांना अन्य दगडांवर बाकीचे वानर बसले. लंकेत काय काय घडलं हे हनुमानाच्या तोंडून ऐकण्याची सर्वांना उत्सुकता होती.

जांबवानने हनुमानाला विचारले–"पुत्र, तू सीता देवीला कसं शोधून काढलंस? तिची प्रकृति कशी आहे? रावण तिच्याशी कसा व्यवहार करीत आहे? सगळं सगळं आम्हाला सांग, मग आम्ही काय करायचं ते ठरवू. तू जे जे काही पहिलंस ते जसंच्या तसं आम्हाला सांग. त्यांतील रामाला काय सांगायचं, काय सांगायचं नाही याबाबत आम्ही नंतर विचार करू."





# चांगल्याशी वाईट

प्राचीन काळची गोष्ट आहे. सुदौलपुर मध्ये मोतीराम नावाचा एक गरीब शेतकरी रहात होता. त्याचं स्वतःच घर नव्हतं, एखादं छोटं शेत ही त्याच्याजवळ नव्हतं. कोणाची तरी चार बिघे जमीन खंडाने घेऊन तो शेती करीत असे. मोतीराम नि त्याची बायको मुनिया यांना ऋण काढून सण साजरा करायची सवय लागली. सुदौलपुर मधील अनेक लोकांकडून मोती-रामने कर्ज घेतले. कुणाचं कर्ज परत देण्याचं नाव नाही.

एक दिवशी मुनिया मोतीरामला म्हणाली–"बरं का हो, मेहनत-मजूरी करता करता नाकी नऊ येताहेत. आपलं स्वतःच न घर न शेत! माझं म्हणणं ऐका, कोठून तरी शंभर रुपये मिळवा आणि शहरात जाऊन ती रक्कम माझ्या थोरल्या भावाच्या हाती द्या. तो ही रक्कम कुणाला तरी लाच म्हणून देईल आणि तुम्हाला एखादी नोकरी मिळवून देईल. मग दरमहा मिळणाऱ्या वेतनांतून आपण आरामात दिवस काढू."

मोतीरामला बायकोचा सल्ला योग्य वाटला. हातात तर फुटकी कवडी नव्हती, तरी पण खोटे-नाटे वायदे करून एकाकडून शंभर रुपयांचे नवे कर्ज मिळवले मोती-रामने. आणि मग ही रक्कम घेऊन जंगलाच्या बाजूच्या रस्त्याने तो शहराकडे निघाला. दुर्भाग्य! जंगलात चोरांनी मोती-रामला पकडलं, त्याच्या जवळचे शंभर रुपये काढून घेतले आणि त्याला कैदी बनवून घेऊन गेले. चोरांनी मोतीरामला आपल्या सरदारापुढे दाखल केलं. सरदाराने मोतीरामला आपला सेवक बनवलं आणि रोज आपलं मालिश करण्याचं काम त्याच्याकडे सोपवलं.

"वसुंधरा"



अशा रीतीने मोतीराम चोरांच्या सरदाराचा सेवक बनून त्याच्या मागे राहू लागला. सरदाराला जेव्हा आराम करायची इच्छा होई, तेव्हा मोतीराम त्याला तेल माखून मालिश करीत असे.

असे चार महिने गेले. एक दिवशी उंची कपडे घातलेला एक माणूस घोड्यावर बसून जंगलाच्या रस्त्याने जात असताना चोरांनी त्याला थांबवलं. त्या माणसाने आपली तलवार उपसली आणि धाडसाने चोरांशी सामना केला. तो बराच वेळ झुंजत राहिला. पण शेवटी एकटा पडला. दहा चोरां बरोबर एकटा किती वेळ लढणार? काही वेळाने तो दमून बेशुद्ध झाला. मग त्या चोरांनी त्याला आपल्या सरदारा समोर नेले.

बेशुद्ध स्थितीत असलेल्या त्या माणसाला पाहून चोरांचा सरदार आपल्या सहकाऱ्यांवर संतापला. त्याने सर्वांना चांगलं फैलावर घेतलं. मग थंड पाणी मागवून त्या माणसाला शुद्धीवर आणलं. तो शुद्धीवर येताच चोरांच्या सरदाराने त्या माणसाच्या पायांवर डोकं ठेवलं आणि क्षमा मागितली.

त्या माणसाचं नाव होतं जयगुप्त. लोक म्हणत की दुसऱ्यांचं कल्याण करण्यात त्याच्या सारखा कोणी नाही. एकदा राजवाड्यावरील शिपायांनी त्याला पळवून लावलं होतं, तेव्हा जयगुप्ताच्या घरी त्याला आश्रय मिळाला होता. घायाळ झालेल्या सरदाराला जयगुप्ताने आपल्या घरात लपवलं आणि गुप्त रीतीने त्याच्यावर उपचार करवले. चोरांचा सरदार जेव्हा संकटातून वाचला आणि तब्येत सुधारून जायला निघाला, तेव्हा पुन्हा चोऱ्या व लूटमार न करण्याचं वचन त्याने जयगुप्तला दिलं होतं.

मोठ्या दुःखाने चोरांचा सरदार म्हणाला—"माझ्या सहकाऱ्यांनी माझ्या प्राणदात्याला घायाळ केलं! चांगल्याशी मी वाईट रीतीने वागलो. आता क्षमा मागायला ही मला तोंड राहिलं नाही!"





हे सगळं ऐकून जयगुप्त हसत म्हणाला—"मी क्षमा करावी एवढीच तुझी इच्छा असेल तर ती मागण्यापूर्वीच मी केलेली आहे. पण वचन देऊन तू त्याचं पालन केलं नाहीस याचं मला फार दुःख आहे."

"महात्मन्, एकदा मी वचन दिलं कि त्याचं पालन न करण्याची चूक मी पुन्हा करणार नाही." चोरांच्या सरदाराने निवेदन केलं.

चोरांच्या सरदाराच्या मनात झालेला बदल पाहून जयगुप्ताला आनंद झाला. सरदाराच्या मागे उभ्या असलेल्या मोतीरामला भीति वाटली की आता त्याला कायमचेच सरदाराचा नोकर बनून रहावे लागेल. तो पुढे आला आणि त्याने आपली रामकहाणी जयगुप्ताला सांगितली.

तेव्हा जयगुप्त चोरांच्या सरदाराला म्हणाला—"गेले चार महिने याने तुझी जी सेवा केली, त्याच्या मोबदल्यात त्याला चारशे रुपये वेतन दे नि त्याला सोडून दे."

चोरांच्या सरदाराने जयगुप्ताची सूचना मान्य केली. आपले शंभर रुपये घालून एकूण पाचशे रुपये त्याने मोतीरामला देऊन टाकले.

आता जयगुप्त मोतीरामला म्हणाला—"मी आता सुदौलपुरलाच निघालो होतो, कारण वैद्याने शिफारस केली आहे की तेथील हवामान माझ्या प्रकृतीला चांगले मानवेल. सुदौलपुरच्या किशनलाल नावाच्या माणसाला आपलं शेत नि घर विकायचं आहे असं माझ्या कानांवर आलं. म्हणून मी ते शेत व घर खरेदी करण्यासाठी १५ हजार रुपये बरोबर घेऊन निघालो, नि मध्ये हे सर्व घडलं. जर तावडतोब पैसे न मिळाले तर किशनलाल आपलं शेत नि घर दुसऱ्या कोणाला विकून टाकील अशी शक्यता आहे. पण मी आता या परिस्थितीत सुदौलपुरला येऊं शकत नाही. शहरात जाऊन तिथं काही दिवस आराम करीन आणि मग सुदौलपुरला येईन. मध्यंतरी माझ्या वतीने तू ते शेत नि घर खरेदी कर. ही पंधरा हजार रुपयांची रक्कम घेऊन जा."



"मग जयगुप्त शहराकडे परतला आणि मोतीराम रक्कम घेऊन सुदौलपुरला आला. नवऱ्याच्या तोंडून घडलेल्या सर्व गोष्टी ऐकून मोतीरामची पत्नी मुनिया म्हणाली— "मला वाटतं, हा जयगुप्त एक नंबरचा महामूर्ख आहे. माझ्या मोठ्या भावाच्या नावे आपण किशनलालचं घर नि शेत खरेदी करू या!"

मोतीरामला बायकोचं म्हणणं पटलं. त्यानं दोन हजार देऊन गावातील आपली छोटी छोटी कर्ज फेडून टाकली. नंतर त्याने किशनलालचे शेत आणि घर खरेदी केले नि गावातल्या लोकांना सांगू लागला—"हे घर नि शेत खरेदी करण्यासाठी माझ्या मेहुण्याने पैसे दिले, म्हणून त्याच्यासाठी आम्ही ही खरेदी केली आहे." अशा अनेक खोट्या-नाट्या गोष्टी तो लोकांना सांगू लागला.

सुमारे एक महिन्यानंतर शहरातून जयगुप्ताचा एक माणूस सुदौलपुरला आला आणि त्याने एक पत्र मोतीरामच्या हाती दिलं. पत्रात जयगुप्तने लिहिले होते की तो आणखी एक महिना सुदौलपुरला येऊ शकणार नाही आणि पत्र-वाहकाच्या करवी त्याला कळविण्यात यावं की शेत व घर यांची खरेदी झाली की नाही?

मोतीरामने उत्तरादाखल लिहिलेले पत्र असे होते—"नमस्कार, विनंती विशेष—यापूर्वी आपण एकदा आपला माणूस पाठवून कळविले होते की आपली सुदौलपुरमध्ये शेत व घर खरेदी करण्याची इच्छा नाही आणि मी रक्कम आलेल्या माणसा मार्फत परत पाठवावी. यामुळे लोकांना कळलं की माझ्याजवळ पैसे आहेत. मी ज्यांच्याकडून लहान-मोठी कर्जे घेतली होती, ते सर्वजण येऊन माझ्या घरी ठाण मांडून बसले. नाइलाजास्तव मला सर्वांच्या कर्जाच्या रकमा परत कराव्या लागल्या. आपण सुचवलेलं शेत नि घर माझ्या मेहुण्याने खरेदी केलं. मी आपली रक्कम थोडी थोडी करून परत करीन."



अशा रीतीने आणखी दोन वर्षं गेली. धन-दौलत असली तरी मोतीरामला कधी ही फायदा झाला नाही. कोठे ही त्याचे कल्याण झाले नाही. वेळेवर पाऊस पडला नाही, पिकाला कीड लागली! वादळात घराची पड-झड झाली. घराची दुरुस्ती करण्यासाठी अवाच्या सवा खर्च करावा लागला. यामुळे तो नित्य कर्जातच बुडत राहिला.

याच दिवसात मोतीरामला कोणी सांगितलं की जवळच्या जंगलात एक महायोगी आलेला आहे आणि तो सर्व अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग सुचवतो. मोतीरामला वाटलं हा महायोगीच आपल्याला नीट मार्गदर्शन करू शकेल. शंभर रुपये बरोबर घेऊन तो योग्याच्या दर्शनासाठी निघाला.

पण रस्त्यातच त्याला एका चोराने पकडले आणि जवळची सर्व रक्कम काढण्याची धमकी दिली. एवढ्यात कोठून तरी विजेसारखी दोन माणसं आली, त्यांनी चोराला पकडलं आणि बरोबर घेऊन जात म्हणाला—"चोऱ्या करू नका म्हणून किती ही समजून सांगितलं तरी तुमची बुद्धि ठिकाणी येत नाही! आता तुला मुळीच क्षमा केली जाणार नाही. आमचा सरदारच तुला आता योग्य ती शिक्षा करील."



मोतीरामच्या लक्षात आलं की ते दोघे चोरांच्या सरदाराचे सेवक आहेत, आणि त्याला दिलेल्या वचनानुसार वाटसरूंना चोरांच्या तावडीतून सोडविण्याचे काम करीत आहेत. हे पाहून मोतीरामला फार आनंद झाला. यानंतर तो जेव्हा योग्याकडे गेला तेव्हा योगी तीक्ष्ण नजरेने त्याच्याकडे पहात म्हणाला—"चांगल्या माणसाशी वाईट वागणारा महापापी आहेस तू! जोपर्यंत त्या भल्या माणसाकडे जाऊन माफी मागणार नाहीस, जोपर्यंत तुला मुक्ति मिळणे शक्य नाही."

नाइलाजाने मोतीराम शहरात गेला, जयगुप्ताचा पत्ता त्याने शोधून काढला.



त्याला भेटून आपण दगा दिल्याचे कबूल केले नि क्षमा मागितली.

जयगुप्त किंचित हंसत म्हणाला–"दारिद्र्य अनेक पापांना जन्म देतं! तू मला जेव्हां दगा दिल्याचं समजलं तेव्हा मी तुला ते पत्र लिहिलं. पत्र लिहिल्यावर मी आपला सगळा राग विसरून गेलो. तू आपल्या मनाने येऊन क्षमा मागितलेली नाहीस हे मला ठाऊक आहे. तरी पण मी तुला क्षमा करतो."

जयगुप्ताचा भलेपणा पाहून मोतीरामला कृतज्ञता वाटली. तो आपल्या गावाकडे यायला निघाला. जंगलाच्या जवळ येताच त्याला एक शंका आली. तो मनातल्या मनात विचार करू लागला–जर जयगुप्ताने अगोदरच क्षमा केली होती, तर त्याची स्थिति अशी नाजुक का बरे रहावी?

म्हणून मोतीराम पुन्हा त्या योग्याकडे आला नि म्हणाला–"योगेश्वर, मी जयगुप्ताकडे गेलो तेव्हा तो म्हणाला की त्याने अगोदरच मला क्षमा केलेली होती. तरी पण माझी मात्र समस्यांपासून सुटका का होत नाही? योगी महाराज, तेव्हा माझ्या संकट-परंपरेचं काही तरी दुसरंच कारण असलं पाहिजे नाही?"

यावर योगी म्हणाला–"चांगले लोक क्षमा करतात, पण चांगल्या लोकांची क्षमा वाईटांची पापं धुऊन काढते असं समजणं हा केवळ भ्रम होय. या जगात वाईट लोक खूप असतात, चांगले फार कमी. जर वाईट लोकांचं पाप चांगल्यांच्या क्षमेमुळे धुवून गेलं तर वाइटांच्या अत्याचारांचा कधी अंतच होणार नाही; चांगल्याच्या क्षमेचा दुरुपयोग झाला असता, कारण चांगली माणसं वाईटांना नित्य क्षमा करीतच राहणार. ज्यांना आपल्या दुष्कर्मांबाबत पश्चात्ताप होत नाही, ते आपल्या प्रवृत्तीत बदल करीत नाहीत, तोपर्यंत चांगल्या माणसांनी क्षमा केली तरी परमेश्वर त्यांना कधी ही क्षमा करणार नाही. तू त्या माणसाचं घर नि शेत त्याचं होऊ दिलं नाहीस. तू घर-शेत त्याला देऊन टाक, त्याच्या पायावर लोटांगण घालून क्षमा माग, ती खरी क्षमायाचना होईल. संकटमुक्त होण्यासाठी तू त्याच्याकडे जाऊन क्षमा मागितलीस, पण तुझ्या मन:प्रवृत्तीत मात्र बदल झाला नाही. लूटमार करणाऱ्या चोरांचं मन बदललं, ते आता चोरांपासून वाटसरूंचे संरक्षण करून समाज-सेवा करीत आहेत. एका चोराला जे नीति-नियम आहेत, त्यांचं पालन तू करीत नाहीस. म्हणून जयगुप्ताने आपल्या सवयीनुसार जरी तुला माफ केलं, तरी परमेश्वर तुला क्षमा करणार नाही. माझ्या म्हणण्यांतील तथ्यावर तूच नीट विचार कर!"

आता मोतीरामला आपल्या अपराधांची पुरी जाणीव झाली. आपण जी जी कुकर्मं केली त्यांबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. या पश्चात्तापामुळे मोतीराम खरोखरीच अंत:करणपूर्वक जयगुप्ताची क्षमा मागायला निघाला. मग तेथे जाऊन त्याने आपला पश्चात्ताप प्रकट केला.

मोतीरामचे शांतवन करीत जयगुप्त म्हणाला–"अरे वेड्या, तू माझी जी रक्कम हडपलीस, ती माझ्या एकूण संपत्तीत अति अत्यल्प! चोरांच्या सरदाराला ही मी ही गोष्ट सांगितली होती. इतकंच नाही, मी हे ही सांगितलेलं होतं की तू ज्या गावात आहेस त्या गावात मी पाऊल घालू इच्छित नाही. आता तर ते सगळं झालं-गेलं एकच! आजपासून कां होईना, स्वार्थ सोडून चांगुलपणाने जीवन जग. ते घर नि शेत आता तुलाच राहू दे, मला ते परत घेण्याची इच्छा नाही."

जड अंत:करणाने मोतीराम आपल्या गावी परत आला. निष्कारण खर्च न करता त्याने बराच पैसा जमवला. जयगुप्ताची सर्व रक्कम त्याने सव्याज परत केली आणि समाज-सेवा करायला सुरुवात केली. अशा रीतीने जीवनातील राहिलेले दिवस सत्कर्मं करून तो सुखाने राहू लागला.





# चुगलखोरी

मणिपुरचा राजा चन्द्रकान्त प्रजेला पुत्रवत् मानून जनतेच्या सुखासाठी रात्रंदिवस झटत असे. तो एक धर्मपरायण व पराक्रमी राजा होता. पण चन्द्रावर जसा डाग, तसा या चांगल्या राजातही एक दोष होता. तो म्हणजे 'चुगल्या ऐकणे' आणि त्यावर विश्वास ठेवणे. खोट्या स्तुतीच्या आहारी जाऊन चन्द्रकान्त अशा सगळ्या गोष्टी खऱ्या मानी.

राजाचे हे दौर्बल्य ओळखून काहीजण त्याचे कान भरत असत आणि त्यांचे म्हणणे खरे मानून राजा अबोध व निर्दोष लोकांना कडक शिक्षा सुनवी. अशा प्रकारे चुगलखोरीमुळे राजा हळूहळू लोकांच्यात अप्रिय होऊ लागला, त्यांच्या मनात राजाबद्दल असणारी गौरव-भावना कमी होऊ लागली. राजाच्या या दोषाची ते ठिकठिकाणी चर्चा करू लागले.

एके दिवशी दरबारी ज्योतिषी श्रीनन्द राजवाड्याजवळून जात असताना त्याला समोरून एक माणूस येताना दिसला. त्या माणसाच्या खांद्यावर एक मोठासा फणस होता. पिकलेल्या फणसाचा चांगला सुवास दरवळत होता.

त्याला थांबवत श्रीनाथ म्हणाला—"अरे थांब, थांब! हा फणस तर चांगलाच मोठा आहे की, अन् चांगला पिकल्याचाही वास येतोय! कुणासाठी घेऊन चालला आहेस? या फणसातील गरे खाऊन अनेकांना संतोष होईल."

श्रीनन्द कोण आहे हे माहीत नसणारा, तो माणूस उत्तरला—"महाराज, हा माझ्या बागेत आलेला पहिला फणस आहे. राजा भगवानच असतो असं म्हणतात नं? म्हणून हे पहिलं फळ राजाला भेट देण्यासाठी चालवलं आहे मी! राजा खुश होईल ना माझ्यावर?"

उमा मिथुन

"अरे वा! कल्याण असो तुझं! आणि हां, तुला मी का थांबवलं हे तर सांगितलंच नाही की! समोरून तुला येताना मी जेव्हा नीट पाहिलं, तेव्हा माझ्या लक्षात आलं की या देशाचा राजा बनायची सारी लक्षणं तुझ्या ठिकाणी आहेत! माझी खात्री आहे की एक ना एक दिवस तू नक्कीच इथला राजा बनशील. हे सांगण्यासाठीच खरं तर मी तुला थांबवलं होतं. जातो मी आता. राजा बनल्यावर छान लोक-कल्याणाची कामं कर असे बोलून श्रीनन्द थोडा पुढे गेला."

राजवाड्याच्या गच्चीवर थंड हवा खाण्यासाठी फिरत असलेल्या राजाने श्रीनन्दचे हे बोलणे ऐकले. त्याला या बोलण्याचे मोठच आश्चर्य वाटले. श्रीनन्द हा एक महान ज्योतिषी होता. जेव्हा तोच असे बोलतोय, तेव्हा त्याचे बोलणे खरेच होईल न? राजाने विचार केला—ठीक आहे, पाहू काय होतेय पुढे!

पण इकडे श्रीनन्दचा अभिप्राय ऐकताच त्या फणसवाल्या माणसाचे डोळे चमकू लागले. तो श्रीनन्दला थांबवून विचारू लागला—"महाराज, तुम्हाला असं का वाटलं, हे जरा स्पष्ट सांगा ना! मला तर काही समजत नाही."

"हं! सांगावंसं तर वाटतंच आहे मला! पण मी फुकट का म्हणून सांगू?" श्रीनन्द बोलला.

आपण राजा बनू अशी कोणती लक्षणं आपल्यात आहेत हे जाणून घ्यायला तो



माणूस फारच उत्सुक होता. आपण राजाला भेटायला निघालो आहोत, ही गोष्टही तो विसरून गेला. खांद्यावरचा फणस हातात घेऊन तो श्रीनन्दला म्हणाला– "महाराजा, मी तर एक दरिद्री शेतकरी आहे. मजजवळ तर आत्ता एक फुटकी कवडीही नाहीय! आपण ही तुच्छ भेट स्वीकारून कृपा करून सांगाना, कि माझ्यात कोणतं राजलक्षण दिसलं आपल्याला? आपल्या तोंडून हे ऐकायला मी फार उत्सुक आहे."

थोडेसे हसत श्रीनन्दने त्याला विचारले– "मी कोण आहे, हे तरी ठाऊक आहे का तुला?"

"नाही, मी आपल्याला यापूर्वी कधीच पाहिलेलं नाहीय." तो गरीब शेतकरी म्हणाला.

"हां, असं बोल ना! मी कोण आहे, हे ही तुला अजून माहीत नाही. तरीही मी तुझी दोन-चार शब्दात खुशामत काय केली, अन् तू लगेच विश्वास ठेवलास? इतकाही विचार नाही केलास तू, कि आपण तर एक साधेसुध शेतकरी आहोत, राजा काय बनणार आपण? एवढंच नव्हे तर राजासाठी चालवलेला फणसही तू मला देऊन टाकायला तयार झालास! कोणी काही सांगितलं तर लगेच विश्वास ठेवण्या-इतका तुझ्यासारखा येडपट या राज्यात दुसरा कोणीही नसेल बघ! या देशचा राजा बनायला योग्य असं दुसरं कोणतं लक्षण हवं मग?" असे बोलून श्रीनन्द तेथून निघून गेला.

हे सर्व बोलणं ऐकल्यावर राजाचे डोळे खाडकन् उघडले. आपण इथे उभं राहून ऐकत असू, असं लक्षात घेऊन मुद्दामच श्रीनन्द आपल्याला धडा शिक-वायला हे सर्व बोलला–हे त्याच्या लक्षात आले.

श्रीनन्दच्या अपेक्षेप्रमाणेच राजा चन्द्र-कान्तच्या स्वभावात योग्य तो बदल घडून आला. अन् जनताही पुन्हा त्याच्यावर पहिल्याप्रमाणेच प्रेम करू लागली.



## निसर्गातील आश्चर्य:



### हिरे

भूगर्भातल्या अत्यंत गरमी आणि दाब यामुळे कोळसाच स्फटिक रूप घेऊन हिऱ्यात परिवर्तित होतो. कधी कधी जेव्हां ज्वालामुखीचा स्फोट होतो, तेव्हां हे हिरे जमिनीवर येतात.

### गोगलगाय

सूर्याच्या आकाराच्या गोगलगायी किंवा इंग्रजीत ज्यांना 'लिपेड' असे म्हणतात, त्या आपल्या शंकुसारख्या आकाराच्या कवचासह खडकांना इतक्या घट्ट चिकटून बसतात, की त्यांना खडकापासून सोडवण्यासाठी त्यांच्या वजनाच्या २००० पट अधिक शक्ती लावावी लागते.



### जमिनीत उगवणाऱ्या मेंढ्या

ही मेंढी खरोखरीची मेंढी नव्हे. हे एक रोप असते. ही रोपे न्यूझीलंड-मध्ये आढळतात. यांच्या लोकरी सारख्या दिसणाऱ्या पानांमुळे ही रोपे दुरून मैदानात चरणाऱ्या मेंढ्यांसारखी दिसतात; म्हणून यांना 'वनस्पती-मेंढ्या' असेही म्हणतात.










# जगाची शांतीकडे वाटचाल





अमेरिका नि रशिया जगातील दोन महान शक्तिशाली देश आहेत. आपल्या जवळ असलेल्या भयानक अण्वस्त्रांचा साठा काही प्रमाणात कमी करण्यात आता दोघे ही तयार झालेले आहेत. 'स्ट्रॅटेजिक आर्म्स रिडक्शन ट्रीटी' (स्टार्ट) नावाच्या संधि-पत्रावर ३१ जुलै रोजी दोन्ही देशांच्या अध्यक्षांनी स्वाक्षऱ्या केल्या. यामुळे भयानक युद्धाचा धोका अमळ टळल्यासारखे जगाला वाटू लागले आहे.

अध्यक्ष बुश आणि गोर्बाचेव यांची ही परस्पर भेट पहिल्यांदाच झाली असे नव्हे. परंतु जुलई महिन्याचा शेवटच्या दोन दिवसांत मास्कोत त्यांची जी शिखर-बैठक झाली त्यामुळे या दोन देशात गेले अर्ध शतक धुमसणारे अविश्वा-साचे वातावरण जरा निवळले आणि भयानक अण्वस्त्रांच्या निर्मितीमुळे जगाला वाटणारा धोका थोडा कमी झाला हे निर्विवाद आहे.

या दोन देशातील अण्वस्त्र निर्मितीची चढाओढ जेव्हा वाढत चालली होती तेव्हा जगातील अनेक देश भयभीत झाले. शेवटी १९८२ मध्ये या दोन्ही देशांनी परमाणु-

अस्त्रांची निर्मिती कमी करण्याबाबत आपापसात वाटाघाटी सुरू केल्या.

याप्रमाणे ९ वर्षे बोलणी चालू राहिली आणि शेवटी दोन्ही देशांनी शेकडा ३० अण्वस्त्रे कमी करण्याबाबत 'स्टार्ट' संधी-पत्रावर स्वाक्षऱ्या केल्या. प्रत्यक्षात रशिया शेकडा ३५ टक्के अण्वस्त्रे कमी करील नि अमेरिका शेकडा २५ टक्के यामुळे क्रमशः २००० नि ७००० परमाणु-अस्त्रे नष्ट केली जातील.

संरक्षण-विशेषज्ञ सांगतात की कोणत्याही देशाचे भयानक नुकसान करण्यासाठी ४०० वॉर-हेड पुरेशी आहेत. या संधिपत्राची एक विशेषता अशी आहे की दोन्ही राष्ट्रे मिळून अण्वस्त्रांची ने-आण करणारी प्रत्येकी १६०० वाहनेच आपल्याकडे ठेवू शकतात. याचा अर्थ असा की ढेकळे खूप आहेत, पण फेकायचे साधन मात्र जवळ नाही.

या 'स्टार्ट'च्या संधि-पत्राची मुदत १५ वर्षांची आहे. नंतर दर पाच वर्षांनी यात योग्य ते बदल करता येतील. यात एक अट अशी ही आहे की दोन्ही बाजूंनी नियुक्त केलेल्या निरीक्षण-समितीचे सदस्य संधि-पत्राची अंमल-बजावणी नीट चालू असल्याचे पाहू शकतील.

जग शांतीकडे वाटचाल करीत आहे अशी आपण आशा करायला काही हरकत दिसत नाही.






# खोडकर भूत

ललितपुर गावात तलावाच्या किनारी एक शंभर वर्षांचे जुने वडाचे झाड होते. एक दिवस खोडचाळ नावाचे एक भूत कुठूनसे आले आणि त्याने या झाडावर आपला मुक्काम ठोकला. ते भूत फारच खोडकर आणि चावट होते.

एके दिवशी संध्याकाळी सावन आणि रामदीन नावाचे दोन खेडूत येऊन त्या वडाखाली बसले. सावनला छान लांब शेंडी होती. त्या खोडचाळ भुताने त्याच्याजवळ जाऊन त्याची शेंडी जोरात ओढली.

वेदनेने कळवळून सावनने रागाने राम-दीनकडे पहिले. दातओठ खात त्याने रामदीनला विचारले—"का रे? माझी शेंडी का ओढलीस तू?" आणि असे विचारता-नाच त्याने रामदीनच्या थोबाडीत मारली.

रामदीनचाही पारा चढला—"का रे? तुझी ती घाणेरडी शेंडी ओढून मला काय करायचंय? पण बघ, आता मात्र नक्कीच ओढणार मी ती!" असे म्हणून रामदीनने सावनच्या शेंडीला चांगलाच झटका दिला.

आता दोघांची चांगलीच जुंपली. आपसात भांडत, शिव्या देत दोघेही तक्रार करायला गावपाटलाकडे पोचले. खोडचाळही अदृश्य रूपाने या दोघांच्या मागोमाग गेले.

ते दोघेजण जेव्हा पाटलाकडे पोचले तेव्हा पाटील चावडीतच चिरूट ओढत, गावकऱ्यांशी गप्पा मारत बसलेले होते.

सावनने सारी हकीकत पाटलाला निवेदन करून म्हटले—"या रामदीनला चांगली कडक शिक्षा करा."

यावर रामदीन म्हणाला—"मुळीच नाही, हा सावन अगदी बेधडक खोटं बोलतोय. मी काहीही केलं नसताना त्याने उगीचच माझ्या थोबाडीत मारली. मग



मलाही राग आला अन् मी त्याची खरोखरच शेंडी ओढली."

हे त्यांचे बोलणे ऐकता ऐकता पाटलाने चुकून जळता चिरूट आपल्या काखेत ठेवला. हे पाहून खोडचाळने विचार केला की–चला आता जरा या पाटलाचीही गंमत करू या. त्याने तो जळता चिरूट पाटलाच्या खिशात टाकला.

पाटील त्या तंट्याबद्दल काही बोलणार इतक्यात त्याला आपल्या खिशातून धूर येताना दिसला अन् घाबरून त्याने खिशात हात घातला. त्याला एकदम चटका बसला आणि त्याने झटकन आपला हात बाहेर काढला. एकदम ताठ होत तो बिचाऱ्या या दोघांवरच घसरला–"या वर्षी तुम्ही दोघं कर भरणार आहात की नाही? मी तुम्हाला उद्यापर्यंतच मुदत देत आहे. तोपर्यंत कर भरला नाहीत तर तुमच्या दोघांच्याही जमिनी जप्त करीन मी! काय समजलात?"

पाटलाची बायको रत्ना ही मोठी भांडकुदळ बाई होती. पाटलाचा अर्धवट जळलेला खिसा पाहून तिने कडक आवाजात विचारले–"हे मेलं चिरूट ओढणं काही थांबत नाही. चांगला सोन्यासारखा कुडता जाळून आलात ना?"

खोडचाळाच्या मनात आले की आता या जोडप्यात भांडण लावून देऊन त्यांचीही गंमत बघावी! त्याने पाटलाच्या हातातली छडी उचलून जोरात रत्नाच्या पाठीत मारली. आपण स्वतः काही न करताच आपल्याच हातून पाटलिणीला मार बसलेला पाहून पाटील एकदम आश्चर्यचकित झाला.

मार बसल्याबरोबर रत्ना मात्र एकाद्या कुत्रीसारखी पिसाळून ओरडू लागली–"थांबा, आता मी ही गप्प नाही राहाणार! तुमच्यावर आता बलामत आणली नाही, तर माझं नाव रत्ना नव्हे! परवा पहाटेच त्या देबूकडून पाचशे रुपये लाच खाऊन तुम्ही त्याच्या बाजूने न्याय दिलात ही बातमी गावात प्रत्येकाच्या कानावर नाही घातली तर नाव बदलून ठेवीन." इतके बोलून रागाने फुसफुसतच ती घराबाहेर पडली अन् गल्लीतल्या लोकांना गोळा करून तिने त्यांना बातमी सांगून टाकली.

लोकांवर या बातमीचा परिणाम झालाच. गावच्या काही मोठ्या लोकांनी एकत्र येऊन काही बोलणी करून एक निर्णय घेतला आणि 'पाटलाला आपल्या अधिकारपदावरून दूर करावे' असा अर्ज वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे केला. त्यांनी तीन दिवसात पाटील चन्द्रकान्त याला अधिकारपदावरून काढून दुसऱ्या एकाची त्या जागी नियुक्ती केली.

यानन्तर काही दिवसांनी खोडचाळ संध्याकाळी झाडाच्या फान्दीवर आडवे होऊन झोपायच्या तयारीला लागले. इतक्यात त्याला झाडाखाली दोन माणसं काही कुजबुजत असल्याची चाहूल लागून ते वडावरून खाली उतरले. दोघांच्या बोलण्यावरून त्याला कळले की ते दोघे चोर असून त्यांची नावे करमू व बेचू अशी आहेत.

करमू-बेचू थोड्या वेळाने तेथून निघाल्यावर खोडचाळही त्यांच्या मागोमाग निघाले. ते दोघे सावकार रामचन्द्र याच्या घराशी पोचले. घराच्या भिंतीला त्यांनी भोक पाडले. बेचू आत शिरू लागला आणि करमू जरा बाजूला होऊन पहारा करू लागला.



आता खोडचाळला चांगली संधी मिळाली. भोकात शिरलेल्या बेचूचा एक पाय त्याने पकडला. कोणी येत असल्याची सूचना देण्यासाठी करमूने आपला पाय पकडला असेल असे समजून बेचू बाहेर येण्याचा प्रयत्न करू लागला, पण खोडचाळने त्याला असे पकडले होते, की त्याला बाहेरही येता येईना, अन् आतही शिरता येईना. बेचूने आपला पाय सोडायला सांगत तो झाडायचाही प्रयत्न केला. त्याला करमूचा फार राग आला होता.

इतक्यात पहारा देणारा करमू तेथे येऊन पोचला अन् खोडचाळने बेचूचा पाय एकदम सोडून दिला. भोकात धडपडणाऱ्या



बेचूला पाहून करमूला वाटले की तो भोकात अडकून बसला आहे! म्हणून मदत करण्यासाठी त्याने बेचूचा पाय पकडला. करमूने पुन्हा आपला पाय पकडला असे वाटून बेचूने जोराने एक लाथ करमूच्या तोंडावरच मारली.

अचानक मार बसल्याने करमू कळवळून जोराने किंचाळला. किंचाळी ऐकून रामचन्द्रच्या घरचे नोकरच नव्हे, तर आसपासच्या घरचे नोकरही धावून आले आणि त्यांनी चोरांना पकडून जवळच्या शहरात नेऊन कोतवालाच्या हवाली केले.

त्या दोघांकडे पाहून कोतवाल गुरकावून म्हणाला—"काय रे नालायकांनो, असे प्रत्येक लहान-सहान चोरीत पकडले गेलात, तर माझा मासिक हप्ता कसा चुकवू शकाल? हे पहा, उद्या या वेळी तुम्ही माझ्या हातावर एक हजार रुपये ठेवायला हवेत. नाहीतर मी स्वतःच तुम्हाला धुंडून पकडीन. आता......ला पाय लावून पळा पाहू इथून!" आणि अशा तऱ्हेने कोतवालाने चोरांना सोडून दिले.

हा सारा प्रकार पहात असणाऱ्या खोडधाळाला कोतवालाचा लाचखाऊपणा कळून चुकला आणि त्याने ठरवले की या कोतवालाला चांगला धडा शिकवायलाच हवा!

दुसऱ्या रात्री बेचू-करमूंनी मध्यरात्रीपर्यंत कुठेतरी हात मारायचा प्रयत्न केला, पण त्यांना यश आले नाही. बिचारे उदास झाले आणि लटकलेल्या चेहऱ्यांनी येऊन त्याच वडाखाली येऊन बसले. खोडधाळच्या मनात अचानक एक विचार चमकला. पटकन तो जमीनदाराकडे गेला अन् त्याच्याकडची दागिन्यांची पोटली उचलून घेऊन पुन्हा आपल्या अड्ड्यावर येऊन पोचला. नंतर झाडावरून त्याने ती पोटली चोरांसमोर टाकली.

पोटली पहिल्याबरोबर बेचू करमूंच्या जिवात जीव आला. वनदेवतेचीच आपल्यावर कृपा झाली असे समजून ते दागिने घेऊन मोठ्या आनन्दाने ते निघून गेले. काही दागिने त्यांनी त्या कोतवालाला 'नजराणा' म्हणून देऊन त्याला शान्त केले.

कोतवालाच्या बायकोला दागिन्यांचे भारी वेड होते! ते दागिने घालून ती खूप नटून-सजून नेमकी जमीनदाराच्याच घरच्या कुठल्याशा समारंभाला गेली! आपल्या घरचे दागिने कोतवालाच्या बायकोच्या अंगावर पाहून जमीनदारीण आश्चर्यचकित झाली. पटकन जाऊन तिने आपले दागिने ठेवायची ट्रंक उघडून पाहिली, तर दागिने कुठायत!

जमीनदारणीने तावडतोब हकीकत जमीनदाराच्या कानावर घातली. कोतवालणीला जाब विचारला गेला अन् कालच नवऱ्याने आपल्याला दागिने दिल्याची गोष्ट तिला सांगावी लागली. जमीनदाराने लगेच कोतवालाला बोलावून घेतले. इकडे त्याच वेळी उरलेले दागिने विकण्याच्या प्रयत्नात बेचू-करमूही पकडले गेले.

अशा प्रकारे चोरांबरोबरच कोतवालही तुरुंगाची हवा खायला गेला; आणि खोडकर खोडधाळ आनन्दाने उड्या मारू लागले.

एकदा चार गावकरी त्या जुन्या वडाखाली बसून गोष्टी करत होते. त्यांच्या बोलण्यात गावचा पंडित व मन्त्रवेत्ता ज्ञानदीप यांचा विषय निघाला. या ज्ञानदीपला आपला चार वर्षांचा नातू अगदी जीव की प्राण वाटे. एक पळभरही तो आपल्या नातवाशिवाय राहू शकत नसे.



झाडावर बसलेल्या खोड्याळाने विचार केला की आता या पंडिताची जरा छेडछाड करावी. खोडयाळ लगेच ज्ञानदीपच्या घरी पोचला. घरामागे खेळणाऱ्या नातवाला उचलून तो एका फळबागेत घेऊन गेला. तिथे पोरासमोर काही पेरू आणि आंबे ठेवून खोडयाळ एका आंब्याच्या झाडावर चढून बसला.

थोड्याच वेळात ज्ञानदीप नातवाला शोधत गावकऱ्यांबरोबर त्या बागेत पोचला. फळं खात बसलेल्या आपल्या नातवाला तेथे पाहून तो आश्चर्यचकित झाला! यामागे नक्कीच काही रहस्य असावे, असा त्याला संशय आला.

ताबडतोब गावकऱ्यांना बाजूला सरायला सांगून ज्ञानदीपने तेथेच जमिनीवर छडीने एक वर्तुळ काढले. नन्तर काही मन्त्र म्हणून त्याने त्या खोडकर भुताला आवाहन केले. खोडयाळ आता भीतीने कापू लागले, आणि पुन्हा पुन्हा पंडिताच्या पायावर लोटांगण घालून क्षमा मागू लागले.

ज्ञानदीपने त्याची चौकशी करून, सावनची शेंडी ओढण्यापासून, सर्व घटनांचा पाढा खोडयाळकडून वाचवून घेतला.

नंतर तो पंडित खोडयाळला म्हणाला– "आजपर्यंत तू ज्या खोड्या केल्यास त्यामुळे गावचं भलंच झालं. लाचखोर पाटील आणि कोतवाल पकडले गेले, त्यांना चांगली शिक्षाही झाली. पण आत्ता तू माझ्या नातवाला जे पळवून आणलंस, त्यात कोणाचा काय फायदा झाला? हे तर अगदीच वाईट कृत्य केलंस ना? म्हणून मी तुला एक लहानशी शिक्षा करणार आहे.

"शिक्षा? कोणती बरं ती?" घाबरून खोडयाळने विचारले.

"ऐक! आत्ता, या क्षणी तू हे गाव सोडून जा अन् गावापासून आठ दहा कोसांच्या आत पुन्हा दिसू नकोस. कळलं?" ज्ञानदीप म्हणाला.

"समजलं महाराज! हेच माझं नशीब!" असे म्हणून खोडयाळ वीस कोसांच्या अंतरावरील डोंगराकडे निघून गेले.





# साहसी अपूर्व

[ ८ ]

[ पूर्वकथा : चाचे लोकांच्या तावडीत सापडलेल्या पाच मुलांना वाचवण्यासाठी मोठाल्या माशांवर बसून अपूर्व व समीर जहाजावर पोचले. व्यापारी जहाज लुटण्याचे जे कारस्थान गरलनाथने आपल्या टोळीच्या साह्याने रचले, ते असफल झाले. व्यापारी जहाजातल्या चांगल्या बळकट तरुणांनी चाच्यांच्या टोळीला कैद केले आणि त्यांच्याच मदतीने समीर व ती पाचही मुले आपल्या शहराकडे परतली. —पुढे वाचा ]

आपली मुले हातीपायी धड घरी परतलेली पाहून त्यांचे आईबाप व नातेवाईक फारच खूष झाले. दुष्ट चाचे पकडले गेल्यामुळे त्यांच्या आनन्दात जास्तच भर पडली. राजाने चाच्यांना कैद केले आणि मुलांच्या धैर्य व धाडस या गुणांची स्तुति केली. विशेषत: समीरचा राजाने खूपच गौरव केला. समीरची बुद्धि व धाडस याबद्दल लोकांनी त्याला अक्षरश: डोक्यावर उचलून घेतले.

परंतु या मान-सन्मानामुळे समीरला मात्र मनातल्या मनात कसेतरीच वाटत होते; कारण तो चांगले समजून होता की हे कार्य तर केवळ अपूर्वमुळेच तडीला गेले; आपण तर केवळ त्याच्या आदेशाचे पालन केले.



मान-सन्मानाची आणि कौतुकाची लाट काहीशी ओसरल्याबरोबर समीर एकटाच आपल्या घराजवळच्या एका एकान्त स्थानी गेला आणि त्याने अपूर्वचे स्मरण केले. अपूर्वने त्याला वचन दिले होते की–तुला जेव्हां कधी मला भेटावेसे वाटेल, तेव्हां एकान्त जागी जाऊन माझे स्मरण कर. मी लगेच येऊन तुला भेटेन. पण आता समीरने डोळे मिटताच त्याला अपूर्वचा मंजुळ स्वर ऐकू आला–"मी इथेच आहे समीर! अरे आत्ता मलाच तुला भेटायची इच्छा झाली होती म्हणून मी इकडे आलो, तर पहा काय आश्चर्य! तूही मलाच बोलवायला इकडे आलास!"

अपूर्वला असा अचानक समोर पाहून आश्चर्याने अन् आनंदाने समीरच्या तोंडून शब्दच फुटेना! तो नुसताच–"आ, आ..." करू लागला.

"अरे आपल्याला जो आनन्द झालाय ना, तो आपण साऱ्या गावकऱ्यांनाही वाटायला हवा. विशेषत: तुमच्या गावातल्या गरीब लोकांची परिस्थिति फारच हलाखीची आहे. त्यांना पोटभर खायला मिळत नाही, नि अंगभर कपडाही नाही मिळत! तू त्यांना काही मदत नाही करू शकत?" अपूर्वने समीरला विचारले.

"मी कशी मदत करणार मालक? मला मदत करावी असं खूप वाटतं! त्यांच्या साऱ्या परिस्थितीचं मूळ-त्यांची गरिबी हेच आहे. माझ्याकडे पैसे असतील तर ना मी मदत करणार? मजजवळ कुठला आलाय पैसा?" समीर विचार करीत उत्तरला.

"तुला पैसा मिळवून द्यायची व्यवस्था मी करतो. अरे, पण मी तुला मागेच सांगितलंवतं ना, कि मला मालक म्हणत जाऊ नकोस? पुन्हा असं केलंस तर मी बोलणारच नाही तुझ्याशी!" अपूर्वने आपली नाराजी व्यक्त करीत म्हटले.



"बर बाबा मित्रा, तुझी आज्ञा प्रमाण! आता तर झालं? हं, पण तू मला पैसे कसे जमवून देणार?" समीरने त्याला विचारले.

"मी जेव्हां त्या चाच्यांच्या जहाजावर होतो ना, तेव्हां शिलाद्वीपावर त्यांनी लपवलेल्या खजिन्याबद्दल बोलताना ऐकलं मी. जवळ जवळ दहा वर्षांपूर्वी एक राजकुमारी लग्नानन्तर सासरी निघाली असताना चाच्यांनी त्या लोकांवर हल्ला करून त्यांची संपत्ती, दागिने वगैरे लुटली होती. मी असं ऐकलं की...." अपूर्व पुढे काही बोलणार, इतक्यात समीर उत्साहाने म्हणाला–"हां, हां! त्या डाकाबद्दल आमच्यातल्या मोठ्या माणसांना बोलताना ऐकलंय खरं मी!"

"बरोबरच आहे ते सगळं!" हसतच अपूर्व पुढे बोलू लागला–"राजकुमारीचे मौल्यवान दागिने, हिरे-मोती आणि सोनं-चान्दी वगैरे त्या डाकूंनी शिलाद्वीपवरच्या गुहेत लपवून ठेवलं. पण पुढे अचानक त्यांच्यात आपसात झगडे होऊन त्यांच्या निरनिराळ्या टोळ्या बनल्या. ते सर्व आपसात लढून स्वत:साठी तो खजिना मिळवण्याच्या खटपटीस लागले. पण कोणत्याच टोळीला त्यात यश आले नाही.



इतकंच नव्हे, तर अगदी अलिकडेच झालेल्या एका झटापटीत एका टोळीने शत्रुटोळीतल्या कित्येक लोकांना यमसदनाला पाठवले. त्यातले फारच थोडे जीव वाचवून पळून जाऊ शकले. जी टोळी जिंकली होती, तिलाच तुम्ही पकडून कैद करवलंत. व्यापारी जहाज लुटून नंतर तो खजिनाही ताब्यात घ्यायचा विचार होता त्यांचा. पण आता तर बिचारे तुरुंगाची हवा खात बसले आहेत."

"म्हणजेच आता तो खजिना आपण आरामात आपल्या ताब्यात घेऊ शकतो–असंच म्हणायचंय ना तुला?" समीरने अपूर्वला विचारले.



"हो, पण एक गोष्ट नीट विचारात घ्यायला हवी. जे डाकू जीव घेऊन पळून गेले त्यांना ही टोळी तुरुंगात गेल्याची खबर मिळताच, ते स्वत: खजिना ताब्यात घ्यायच्या प्रयत्नाला लागतील. तेव्हा हा खजिना फार दिवस सुरक्षित नाही रहाणार!" अपूर्व म्हणाला.

"हे सर्व ठीक, पण आपण ते शिलाद्वीप शोधायचं तरी कसं?" समीरने खोलवर विचार करीत प्रश्न केला.

तेव्हा अपूर्व हसत म्हणाला–"परवा आपल्याला ज्या माशांनी जहाजापर्यंत पोचवलं, त्यांना कदाचित शिलाद्वीपही माहीत असेल! माझ्या मनातले विचार ओळखून ते मासे पुढेपुढे जात रहातात. मला वाटतं, या बाबतीतही ते आपल्याला मदत करतील. उद्या पौर्णिमा आहे. शिलाद्वीपला जायला आपल्याला तोच मुहूर्त बरा होईल."

हे ऐकून अदम्य उत्साहाने समीर म्हणाला–"आपण बरोबर त्या पाच मुलांनाही घेऊन जाऊ. तुझा काय विचार आहे? माझे हे मित्र तुला पाहू इच्छित आहेत. तुझ्याबरोबर एकाद्या धाडसी कामातही भाग घ्यायला ते उत्सुक आहेत."

थोडासा विचार करून अपूर्वने या बेताला अनुमति दिली आणि तो तेथून निघून गेला.

समीरने त्या मुलांच्या आईवडिलांची परवानगी काढून त्यांना आपल्या बरोबर न्यायची तयारी केली आणि ते सर्व समुद्रकिनारी पोचले. तेथे त्यांना अपूर्व दिसला. मुलांनी संतुष्टी मोठ्या श्रद्धेने आणि भक्तीने अपूर्वला वन्दन केले. अपूर्वने ही प्रसन्नतेने त्यांना खुशाली विचारली.

पूर्वेला चन्द्र आपल्या सर्व कलांनी पूर्ण होऊन चमकत होता. डोळे मिटून अपूर्वने क्षणभर त्या माशांचे स्मरण केले. दुसऱ्याच





क्षणी समोरच्या लाटांपलिकडून प्रशांत सागरात पाणी उडवत उसळत येणारे ते मोठाले मासे त्या सर्वांना दिसले. विचित्रसे आवाज करीत ते जणू या यात्रेसाठी आपण उत्सुक असल्याचे जाहीर करत होते. त्यांच्यातल्या खूप मोठ्याशा माशावर अपूर्व बसला. त्याची आज्ञा मिळताच समीर नी पाच मुले निरनिराळ्या माशांच्या पाठींवर आरूढ झाली. या शिवाय आणखी दहाबारा मासे त्यांच्या रक्षणासाठी तयार झाले आणि हा सर्व तांडा समुद्रात पुढे घुसला.

ज्या माशावर स्वत: अपूर्व बसला होता तो सर्वांत पुढे राहून इतरांना दाखवत होता. समुद्रावर मन्द वारा वाहू लागला, अपूर्वच्या डोक्यावर काही समुद्री कावळे उडत राहिले. अशा तऱ्हेने बराच वेळ सफर केल्यावर चन्द्र जेव्हां बरोबर त्यांच्या डोक्यावर आला, त्यावेळी उंच उंच शिळांनी युक्त अशा शिलाद्वीपाजवळ हा तांडा येऊन पोचला.

मासे त्या शिळांना चिकटून थांबले, आणि अपूर्व व त्याचे सहा मदतनीस यांनी शिलाद्वीपावर आपले पाय ठेवले. त्या मोठमोठ्या खडकांमधे असंख्य गुहा होत्या. आता त्यापैकी कोणत्या गुहेत डाकूंनी खजिना लपवला आहे, हे कसे ओळखायचे? सोपं नाही हे काम!

मुलांनी समोरच्या पहिल्याच गुहेत डोकवून पाहिले. काहीतरी चमकताना दिसले आत त्यांना. समीर हळूच वाकून आत शिरला. चोहीकडे काळाकुट्ट अंधार होता अन् जमीन काहीशी दमट होती. समीर आपल्या गुडघ्यांवर पुढे सरकू लागला. पण गुहेतल्या वारुळातून साप फुत्कारू लागले! समीर घाबरून बाहेर निघून आला.

"ठीक आहे. शिलाद्वीपाचा पत्ता तर लागला! आता पुन्हा एकदा इथे येऊन खजिना शोधून काढू. आत्ता आपण परत



फिरू या." एक मुलगा समीरला धीर देत म्हणाला.

"ए! बोलू नका कोणी!" अपूर्वने हळूच इशारा दिला.

"लवकर चला, आपण या खडकामागे लपून बसू या. चला, चला!" असे म्हणत अपूर्व आवाज न करता पुढे झाला. त्या खडकापलिकडून कोणाच्याशा जोराने हसण्याचा आवाज येत होता! तो आवाज अपूर्व सावधपणे ऐकू लागला.

"ओहो! आज दहा वर्षांनी आपली इच्छा पुरी झाली. आपलं स्वप्न साकार झालं, खजिना आपल्या हाती लागला! आपल्याला अडवायला आलेले आपले शत्रु आजपर्यंत नरकात ओरडत बसले असतील!" हे बोलणे कठोर कंठस्वर अपूर्वने ऐकले.

"अरे यार, सगळेच्या सगळे थोडेच नरकात पोचले? त्यातले काही अजून तुरुंगात हवा खाताहेत ना!" आणखी कोणी तरी हसत हसत बोलले.

"अरे ठीक आहे, ठीक आहे. आता वेळ घालवू नका. खजिना लवकर आपण नावेत नेऊन ठेवू या." आणखी कोणी एकजण अधिकारवाणीने ओरडला.

"पण मला भूक लागलीय. अगोदर पोटभर खायला हवं. नंतर मी काम करू शकेन. हातात आलेला खजिना पंख फुटून उडून तर नाही ना जाणार?" कोणी एक म्हणाला.

"पण अगोदर आपण ज्या कामासाठी आलो आहोत, ते पुरं करा. खजिना नावेवर चढवून मगच हवं तेवढं खात-पीत बसा." पहिला आवाज गरजला.

खडकांच्या मधल्या फटीतून अपूर्वने पाहिले. पलिकडे पाच घट्टेकट्टे डाकू दिसत होते. गुहेच्या आत खड्डयात खजिन्याचे पेटारे होते. त्या चाच्यांनी एकएक करून ते पेटारे उचलून बाहेर काढले आणि ते नावेवर पोचवू लागले.





अपूर्वला या सर्व हालचाली स्पष्ट दिसल्या. हे सर्व काम संपवायलां त्यांना अर्धा तास लागला. नि सर्व खजिन्याचे पेटारे जहाजावर चढवून झाले.

"हे, आता ठीक आहे. आपण भोजन उरकू या. आज भोजनाचा झकास बेत आहे. आजच्या सारखा दिवस पुन्हा कधी येणार नाही." त्यांच्या म्होरक्याने म्हटले.

दोन चांगले तगडे लोक नावेतून भोजनाच्या पदार्थांनी भरलेली भांडी आणि पेयाची पिपे आणून एका विशाल अशा सपाट पत्थरावर ठेवू लागले. नंतर भोवताली बसून ते सर्वजण मजेने खाऊपिऊ लागले, शिट्या वाजवत गाणीही गुणगुणू लागले, बेशुद्ध नाचू लागले. जास्त पिण्यामुळे बेहोश होऊन काहीजण तेथेच झोपूही लागले.

"चला, आता यांच्या कचाट्यातून सूटून पळायला हीच वेळ योग्य! ही वेळ चुकली तर खजिना आपल्या हातून गेला समजा." अपूर्व आपल्या दोस्तांना म्हणाला.

"मासे कुठायत?" एका मुलाने विचारले.

"ते समुद्रात मजेत विचरत असतील. आपण आता त्या मौल्यवान खजिन्यासह त्या नावेतूनच परत फिरू." चाच्यांच्या त्या नावेकडे जात अपूर्व म्हणाला.

मोठ्या आनन्दाने धावतच सर्व मुले नावेत चढून बसली. माशांनी पुढे येऊन ती नाव आपल्या डोक्यांनी पुढे ढकलली. मुलांनी ताबडतोब वल्ही हातात घेतली आणि ते नाव वल्हवू लागले. खूप खाऊन पिऊन ढेर झालेल्या त्या चाच्यांना तसेच शिलाद्वीपावर सोडून, अपूर्व आणि सहा मुले खजिन्यासह किनाऱ्याकडे निघाली. नाव मोठ्या वेगाने चालत राहिली.

(क्रमशः)





# अधिकार लालसा

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला. त्या फान्दीवरून प्रेत खाली काढून घेऊन आपल्या खांद्यावर टाकले आणि आता तो पुन्हा स्मशानाकडे चालू लागताच प्रेतात रहाणारा वेताळ बोलू लागला—"राजा, तू कोणासाठी इतके कष्ट उपसत आहेस, हे मला मुळीच माहीत नाही. पण हे जग भारी चमत्कारिक आहे. नावलौकिक आणि अधिकारलालसेमुळे खुशाल स्वतःच्या लोकांना पणाला लावून आपलीच टिमकी वाजवणाऱ्या माणसांना जनता 'त्यागाचा पुतळा' आणि 'महान प्रजासेवक' वगैरे नामाभिधाने बहाल करते. तू जर असाच पोकळ नावलौकिकाच्या मोहात पडला असशील तर तुला सावधगिरीची सूचना म्हणून विश्वनाथ नावाच्या माणसाची गोष्ट मी तुला सांगतो. ती तू लक्षपूर्वक ऐक." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

## वेताळाच्या गोष्टी



कोसल राज्याच्या श्रीपुर मंडलात चन्द्रगिरी नावाचे एक गाव होते. त्या गावच्या पाटलाकडे विश्वनाथ नावाचा एक नोकर होता. एकदा हा विश्वनाथ पाटलाला म्हणू लागला, "महाराज, आपल्या कुटुम्बाचं ओझं एकट्यानेच पेलणं मला दिवसेंदिवस कठीण होऊ लागलंय. माझ्या थोरल्या मुलाला एकादं काम मिळवून द्या ना!"

यावर हसत हसत पाटील त्याला म्हणाला—"अरे विश्वनाथ, आपल्या या लहानशा गावात कुठे काही छोटीशी नोकरी असली, तरी ती काय तुझ्यापासून लपून थोडीच राहील? तू स्वतःची ही नोकरी सोडून आपल्या मुलाला देऊ कर. मी ठेवून घेईन त्याला."

ही गोष्ट कळल्यावर विश्वनाथची बायको त्याच्याशी खूप भांडली. पण विश्वनाथने तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून आपली नोकरी आपल्या मुलाला देववलीच.

नोकरी सोडल्यावर विश्वनाथने लहानसे शेत खंडाने करायला घेतले आणि आपल्या धाकट्या मुलासह तो शेतात खपू लागला.

याच सुमाराला विश्वनाथचा एक चांगला पैसेवाला नातेवाईक त्याला भेटायला आला. त्याच्याशी बोलताबोलता विश्वनाथ त्याला म्हणाला—"काहीही असो, आपल्या गावात एक चांगलसं ग्रन्थालय असायला हवं. म्हणतात ना, कि शिक्षणाविना माणूस पशूच! तुम्ही मनावर घेतलंत तर आपल्या गावात छानसं ग्रन्थालय बनू शकेल!"

विश्वनाथचे बोलणे ऐकून मान हलवत तो नातेवाईक म्हणाला—"होय, तू म्हणतोयस ते अगदी बरोबर आहे. ग्रन्थालयासाठी एक इमारत बांधून उत्तम उत्तम अशी पुस्तकं मी आणवून देईन. पण सर्व देखरेख करू शकेल असा एकादा माणूस हे काम फुकटात करायला तयार व्हायला हवा. त्याला वर पगारही मीच द्यावा, हे काही जमणार नाही मला!"

विश्वनाथने यासाठी खूप धडपड केली. ग्रन्थपालाचे काम फुकट करावे—अशी अने-



कांना गळ घालून पाहिली, अनेक मोठ्या लोकांनाही तो भेटला.

"अरे विश्वनाथ, घरात लोणी पडून असावं, अन् तुपासाठी दुसऱ्यांचे उंबरे झिजवावे, याला काय शहाणपण म्हणायचं? आमचं ऐक; तुझा धाकटा मुलगा शिकला-सवरलेला आहे ना? मग त्यालाच सांग की हे काम!" त्या लोकांनी विश्वनाथला फुकटचा सल्ला दिला.

नव्या बनलेल्या ग्रन्थालयाचे काम करू लागल्यावर विश्वनाथच्या मुलाला शेतीवाडीच्या कामाला वेळ मिळेनासा झाला. घरच्या अन् शेतीच्या खर्चामुळे कर्जाचा डोंगर वाढू लागला.

एकदा श्रीपुर मंडळाच्या अध्यक्षाने चन्द्रगिरीच्या पाटलाला बोलावून आज्ञा दिली—"तुमच्या गावच्या जमिनीत खूपसं अभ्रक सापडतंय. तेव्हा काहीही करून तुमचं गाव उठवून दुसरीकडे हलवा आणि जमिनीचं खोदकाम सुरू करा."

"क्षमा करा. माझ्या गाववाल्यांवर मी अन्याय करू शकणार नाही. आपल्या आज्ञेचं पालन करणं मला शक्य होणार नाही." असा रोकडा जबाब पाटलानं अध्यक्षांना सुनावला.

ही हकिकत कळल्यावर दुसऱ्याच दिवशी विश्वनाथ सरळ श्रीपुरच्या मंडलाध्यक्षांकडे गेला आणि नम्रपणे म्हणाला—"महाराज,



हे काम आपण माझ्यावर सोपवा. मी गाव खाली करवून घेईन."

मंडलाध्यक्षांनी विश्वनाथला ताबडतोब योग्य ते अधिकार पत्र देऊन काम सुरू करायला सांगितले. विश्वनाथने जाऊन गावकऱ्यांना गाव खाली करायला सांगितले. गावकरी ते ऐकायला तयार होईनात; पण विश्वनाथने खंबीरपणे त्यांना तोंड दिले. गावकऱ्यांना जराही न जुमानता शिपायांची एक मोठी तुकडी बोलावून त्याने गावकऱ्यांकडून गाव रिकामा करवून त्यांना पर्यायी जागा दिली आणि काही नुकसानभरपाईही देववली. तरीही गावकऱ्यांनी विश्वनाथला खूप नावे ठेवली आणि त्याच्यावर टीकेची झोड उठवली.

परन्तु श्रीपुरच्या मंडलाध्यक्षाने विश्वनाथवर भर सभेत स्तुतिसुमने उधळली. आणि पुनर्निवासित झालेल्या त्याच्या गावचा 'पाटील' म्हणून त्याची नेमणूक केली.

असाच काही काळ लोटला आणि श्रीपूर मंडलाच्या मधून वहाणाऱ्या नदीवर धरण बांधायची योजना कोसलराजाने जाहीर केली, अर्थात या मंडलाची काही गावे धरणाच्या पाण्याखाली जाणार होती. या बाबत सल्लामसलत करण्यासाठी कोसलराजाने मंडलाध्यक्षाला पाचारण केले. "महाराज, क्षमा असावी. या प्रयत्नात आपल्याला जनतेचा पाठिंबा मिळणार नाही. बळजबरीने काही करू जाल तर जनतेत असंतोष व खळबळ माजेल. आपण कृपा करून या मुद्याचा फेरविचार करावा." मंडलाध्यक्षाने हात जोडून विनवणी केली.

"परन्तु कोसलराजाला काहीही करून आपली योजना राबवायचीच होती. हे जाणून विश्वनाथने कोसलराजाची भेट घेऊन त्याला म्हटले–"महाराज, आपली आज्ञा असेल तर हे काम मी अंगावर घेऊन पुरं करीन."

खूश होऊन राजाने श्रीपुर मंडलाध्यक्षाला दूर करून ते स्थान विश्वनाथला दिले आणि त्याबाबत सर्वाधिकारही बहाल केले. या नव्या पदावर रुजू होताच विश्वनाथने धरणामुळे पाण्याखाली जाणाऱ्या गावच्या लोकांना पूर्वीप्रमाणेच आज्ञा देऊन गाव रिकामा करण्याबद्दल दवंडी पिटवली. पण



पुन्हा त्याच प्रकाराची पुनरावृत्ति होऊन लोकांनी बंड करायचा घाट घातला. परंतु विश्वनाथने याही वेळीं मोठ्या प्रमाणात शिपाई बोलावून घेऊन बंडखोरांचे दमन केले. श्रीपुर मंडलाची प्रजा विश्वनाथला 'अप्पलपोटा' म्हणू लागली; 'उच्चपदासाठी हपापलेला माणूस' म्हणून त्याची निन्दानालस्ती करू लागली.

काही महिन्यांनी धरणाचे काम पूर्ण झाले आणि त्याच्या उद्‌घाटनप्रसंगी कोसलराजाने विश्वनाथचा 'महान त्यागी' व 'प्रजासेवक' म्हणून गौरव करून त्याची खूप स्तुति केली.

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विक्रमराजाला विचारले–"राजा, विश्वनाथच्या वागणुकीबद्दल तुझं काय म्हणणं आहे? आपल्या मोठ्या मुलाला आपली नोकरी देऊन टाकून त्याने आपला त्याग दाखवून दिला हे खरे. पण नन्तर त्याने जी जी कामं केली ती तर त्याच्या अधिकारलालसेचाच पुरावा आहेत ना? आपला अधिकार पायरी पायरीने चढवत नेताना त्याने आपल्या गावच्या आणि मंडलातल्या लोकांना त्रासच दिला ना? प्रजेचा असंतोष त्याने बलपूर्वक दाबून टाकला. असल्या माणसाला 'महान त्यागी' आणि 'प्रजासेवक' वगैरे विशेषणे लावून राजाने त्याची भरपूर स्तुति केली, हे ठीक झाले काय? यावरून हीच गोष्ट जाहीर होत नाही का, कि राजा स्वार्थी आहे आणि प्रजेच्या हिताबद्दल अगदीच



निष्काळजी आहे? या सर्व प्रश्नांची उत्तरे माहीत असूनही दिली नाहीस तर, हे राजा, परिणाम तुला माहीत आहेच. तुझे मस्तक फुटून त्याचे शतशः तुकडे होतील."

यावर जराही न कचरता राजा विक्रम उत्तरला—" वेताळा, तुझी ही विधानं पूर्णतः चूक आहेत. विश्वनाथला अधिकारलोलुप व स्वार्थी म्हणणं चुकीचं आहे. त्याचप्रमाणे राजाला आपमतलबी व प्रजेबाबत निष्काळजी म्हणणंही गैर आहे. अभ्रक हे अप्राप्य असे खनीज आहे. ते मिळण्यामुळे देशाची स्थिति सुधारायला मोठीच मदत होणार होती. त्याचप्रमाणे नदीचे वाया जाणारे पाणी अडवून धरण बांधण्यामुळे प्रजेचंच हित होणार होतं. धरणामुळे ओसाड जमिनी सुपीक होतात, शेतीची प्रगति होते. सुरुवातीला काही लोकांना थोडा त्रास होतो खरा, पण हे सर्व 'बहुजनहिताय, बहुजनसुखाय' असेच असते. हा सर्व विचार करूनच कोसलराजाने योजना बनवल्या. पण प्रत्यक्ष त्या अमलात आणण्याचे वेळी खुद्द गाव पाटील व मंडळाध्यक्षच आडवे आले. त्यांना प्रजेच्या कोपाचे भय वाटले आणि त्यांनी आपली जबाबदारी टाळली. पण विश्वनाथ हुषार होता. त्याला खात्री होती की सुरुवातीला लोकांनी विरोध केला, तरी नंतर आपल्याला होणाऱ्या सुखसोयी लक्षात आल्यावर त्यांचा गैरसमज आपोआप दूर होईल, ते खूष होतील! म्हणूनच त्या योजना राबवण्यात विश्वनाथने पुढाकार घेतला. काही माणसं जी महान् कार्ये करतात ती काही अधिकारलालसेने करत नसतात. ती माणसं महान कार्य करतात म्हणून अधिकार व कीर्ति त्यांच्याकडे चालून येतात. विश्वनाथच्या बाबतीत हेच घडले."

अशा तऱ्हेने उत्तर देऊन राजा गप्प झाला. परन्तु आता मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्याच झाडाच्या फांदीवर जाऊन लटकू लागला.

(कल्पित)





# प्रामाणिक

खलिफा हरुन अलरशीद नंतर बगदादचे जे शासक झाले, त्यांच्यात अब्दुल अजीज विशेष प्रसिद्ध होता. तो लोकांना मोठ्या उदारपणे बक्षिसे वाटत असे. असा बादशहा मिळाल्यामुळे जनताही त्याच्यावर फार खुश असे. या बादशहाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे गुन्हेगारांना त्याच्याकडून मिळणारी अजब पद्धतीची शिक्षा! गुन्हेगारांना फटके मारणे, तुरुंगवासाची शिक्षा किंवा फाशी देणे—असल्या शिक्षा तो कधीच सुनवत नसे. तो न्याय दान असे करी, की गुन्हेगाराच्या मनात अपराध भावना खोलवर घर करून राहील, झालेल्या अपमानामुळे गुन्हेगार पुन्हा गुन्हा करू धजत नसे. इतकेच नव्हे, तर प्रामाणिक व मनाने निष्पाप अशा लोकांना बक्षिसे देऊन तो त्यांचा सत्कार करी. यामुळे अब्दुल अजीजच्या शासनकाळात बगदाद मध्ये चोऱ्या किंवा अनैतिक घटना क्वचितच घडत.

बऱ्याच अवधीनंतर बादशहा अब्दुल अजीजला एक मुलगा झाला. त्या आनंदोत्सवात त्याने बऱ्याच गरीबांना दानधर्म केला. अशाच एका गरीब माणसाला एक पोतेभर गहू मिळाले. घरी गेल्यावर पोते उघडून पाहिले तेव्हां त्याला त्या गव्हात एक सोन्याचे नाणे सापडले. त्याच्या पत्नीने त्याला ताबडतोब विचारले—"हे नाणं तुमच्याकडे कसं आलं?"

सारी घटना बायकोला सांगून तो गरीब माणूस म्हणाला—"हे चुकून आलेलं नाणं आत्ताच जाऊन मी परत करून येतो."

हे ऐकताच बायकोने त्याच्यावर चांगलीच आग पाखडली!

पण तिच्या आदळआपटीचा त्या माणसावर काहीच परिणाम झाला नाही. तो म्हणाला—"चुप बस ग! चुकून आलेलं हे

नाणं हडपण्याचा आपल्याला काहीच हक्क नाही." आणि सरळ जाऊन त्याने ते नाणे बादशहाकडे परत केले.

त्या गरीब तरुणाचा प्रामाणिकपणा पाहून बादशहाने त्याला तसली शंभर नाणी इनाम दिली!

तिथेच हजर असलेल्या बशीर नावाच्या सावकाराने हा सर्व प्रकार पहिला अन् त्याला लोभ सुटला! त्याने दरिद्री माणसासारखा पोशाख चढवला आणि आपल्याच घरातली पन्नास सोन्याची नाणी घेऊन तो बादशहाकडे पोचला. मोठ्या अदबीने ती नाणी बादशहाच्या हवाली करत तो म्हणाला—"जहांपनाह, परवा आपण मला धान्याचं जे पोतं दिलं होतं, त्यात मला ही नाणी सापडली. कृपा करून यांचा स्वीकार करावा." हे सर्व करत असताना बशीरची अशी अपेक्षा होती, की आता आपल्या प्रामाणिकपणावर खूश होऊन बादशहा आपल्याला याच्या दहापट नाणी बक्षीस देईल! पण काहीसा संशय येऊन बादशहा बशीरकडे निरखून पाहू लागला. त्याला मोठे आश्चर्य वाटले, की बशीरचे पोट चांगले गरगरीत दिसत होते, तो चांगला घट्टाकट्टा वाटत होता, अन् विशेष म्हणजे त्याचा वेष गरिबाचा असला तरी त्याच्या उजव्या हाताच्या बोटांवर चार सोन्याच्या आणि डाव्या हाताच्या पोटांवर दोन हिऱ्यांच्या अंगठ्या चढवलेल्या होत्या. (त्या काढून ठेवायला तो विसरूनच गेला होता!) बादशहाने त्याचे खरे स्वरूप ताबडतोब ओळखले. भ्रमाचा भोपळा अखेर फुटलाच!

बादशहा ताबडतोब आपल्या वजिराला म्हणाला—"वजीरजी, ही नाणी आपल्या खजिन्यात परत पाठवा आणि या महाराजांना त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल एक प्रमाणपत्र लिहून द्या."

हा न्याय ऐकल्याबरोबर लाजेने बशीरचा चेहरा पांढरा पडला.



# चांदोबा पुरवणी—३६



भारताची दैवते :

## हनुमान

हनुमान हा भारतातला एक खास असा देव आहे. श्रीरामाबद्दलच्या आपल्या अनन्य भक्तीमुळे त्याला देवत्व प्राप्त झाले.

हनुमान हा भगवान शिवाचेच साकार रूप होय. ती तेजस्वी शक्ती वायुने नेऊन तरुण तपस्विनी अंजनाला दिली आणि अशा रीतीने हनुमान हा अंजनाचा पुत्र म्हणून जन्मला. यामुळ त्याचे आंजनेय असेही नाव पडले.

देवकृपा असेल तर जगात काहीही मिळवणे अशक्य नाही, ही गोष्ट हनुमानाने सिद्ध करून दाखवली आहे. त्याने सीतेचा तपास लावला, महान् बलशाली राक्षसराजा रावण याचे गर्वहरण केले आणि लक्ष्मणाचे प्राण वाचवण्यासाठी संजीवनी वनस्पती मिळवण्याकरता त्याने हिमालयातून पर्वतच उचलून आणला. अगणित भक्तांच्या तोंडून निघणारे रामनाम ऐकण्याचा दिव्यानन्द मिळावा म्हणून त्याने चिरंजीवित्व प्राप्त करून घेतले.

वास्तविक हनुमान म्हणजे निष्कपट महाशक्ति, विनम्र असे अपूर्व साहस आणि विश्वसनीय यथार्थता या गुणांचे एकत्रित असे रूप होय. भक्तिपूर्ण दृष्टीने पहाणारांना तो सुन्दर असा भगवान वाटतो.

# टंक-लेखन यंत्रावर अद्‌भुत गति

आशुलेखन व टंक-लेखनाच्या आंतरराष्ट्रीय संघाचे ३९ वें अधिवेशन गेल्या जुलई महिन्यात बेल्जियम देशाची राजधानी ब्रुसेल्स मध्ये झाले. पंजाब मधील जलंधर जिल्ह्यातील गोरया गावचा भारतीय युवक अभिषेक जैन याला 'इंटरस्टेनो १९९१' चॅंपियनशिप चढाओढीत 'ज्यूनियर चॅंपियन' (२० वर्षांखालील गट) जाहिर करण्यात आले.

अभिषेक १३ वर्षे वयाचा बालक आहे आणि त्याची टंकन-गति मिनिटाला १०९.२ शब्द इतकी असून त्यात शेकडा ९९.९२ शुद्धता आहे. वरच्या वर्गात विजयी झालेल्या स्पर्धकापेक्षा ही त्याची गति आणि शुद्धता अधिक आहे. अभिषेक दर मिनिटाला ५४६ स्ट्रोक्स मारतो, नि त्यातील ५११ शुद्ध असतात.




अभिषेक सध्या दहावीत शिकत आहे, म्हणून भारतातील अधिकृत निम्न श्रेणीच्या टंकन-परिक्षेत त्याला प्रवेश मिळत नाही. अभिषेकचे वडील एक टंक-लेखन संस्था चालवतात नि तेथे टंकन व आशुलेखनाचे शिक्षण दिले जाते ही भाग्याची गोष्ट होय. शाळा सुटली की अभिषेक आपल्या वडिलांच्या संस्थेत येतो आणि उत्साहाने इतर विद्यार्थ्यां बरोबर मोकळ्या मशीनवर टंकन करू लागतो. त्याला वडिलांनी कधी अडवळा आणला नाही. ही सात वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. राष्ट्रीय स्तरावरील चॅंपियनशिप साठी आवश्यक गति प्राप्त करून त्याने १९८९ मध्ये पुरस्कार मिळविला होता. आपल्या आई-वडिलांनी दिलेल्या उत्तेजनाने पुढील वर्षी ही त्याने या चढाओढीत भाग घेतला. अभिषेकने ब्रुसेल्सच्या चढाओढीत भाग घेतला. व आपल्या वडिलांच्या बरोबर त्याने बेल्जियमची यात्रा केली हे एक अद्‌भुत साहसच म्हटले पाहिजे. हिंदुस्तानातील एका प्रसिद्ध टाइपरायटर कंपनीने अभिषेकच्या जाण्यायेण्याचा व तेथील निवास-भोजनाचा खर्च केला. आणि अभिषेकने ही कंपनी व आपले वडील या दोघांना ही यश मिळवून दिले.

हिंदी व पंजाबी भाषेत दर मिनिटाला क्रमशः ७५ व ८० शब्द अभिषेक टंकित करू शकतो. आता १९९३ मध्ये इस्तंबूल (टर्की) मध्ये होणाऱ्या 'इंटरस्टेनो' कडे अभिषेकचे लक्ष आहे आणि गिनी बुक ऑफ रेकॉर्डस् मध्ये प्रविष्ट होण्याची त्याला आशा आहे. मॅन्युअल टंकलेखन यंत्राच्या पुढे जाऊन तो इलेक्ट्रानिक यंत्रावर अभ्यास करू लागला आहे. अमेरिकेतील एका संस्थेने आयोजित केलेल्या इलेक्ट्रानिक टंक-लेखन चॅंपियनशिपसाठी अभिषेकला पाचारण करण्यात आले आहे.

अभिषेकला या सर्व प्रयत्नात उत्तम यश मिळावं अशी आपण आशा करू या.

# तुम्हाला माहीत आहे ?

१. पहिल्या शतकातील एका सम्राटाबाबत म्हटले जाते–"जेव्हा रोम जळत होते तेव्हा नीरो सारंगी वाजवीत होता!" त्याचं नाव काय?
२. इ. स. पूर्व सहाव्या शतकात होऊन गेलेल्या एका भारतीयाला 'प्लास्टिक सर्जरी' चा जनक म्हटले जाते. त्याचं नाव काय?
३. एका भारतीयाने वनस्पतींची वाढ मोजण्याचे एक साधन शोधून काढले. तो वैज्ञानिक व ते साधन यांची नावे सांगा.
४. एक राजा जन्मांध होता. आपला नवरा आंधळा आहे म्हणून त्याच्या राणीने आपल्या डोळ्यांवर पट्टी बांधलेली असे. तो राजा व त्याची राणी यांची नावे सांगा.
५. कोणत्या देशाचा राष्ट्रीय ध्वज खूप मोठा असतो? तो फडकवण्यासाठी चांगल्या उंच स्तंभाची आवश्यकता असते.
६. ऑलिंपिक ध्वजावर पाच निरनिराळ्या रंगांचे पट्टे असतात. ते रंग कोणते? ते रंग कसे निवडले गेले?
७. सन १९९६ मध्ये सोविएट पोस्टाच्या तिकिटावर एक भारतीय पहिल्या प्रथम दिसला. तो कोण होता?
८. सन १९०६ मध्ये नोबेल पारितोषिक ज्याला दिले गेले, नंतरच्या वर्षात लागोपाठ त्याच्या आठ शिष्यांना हे पारितोषिक देऊन सन्मान करण्यात आला. तो नोबेल पारितोषिक-विजेता कोण?
९. फार अल्प काळ आपली कारकीर्द असलेला अमेरिकेचा अध्यक्ष कोणता?
१०. मृत समुद्राची (डेड सी) खोली किती आहे?
११. 'द ब्लू-क्रॉस सोसायटी ऑफ इंडिया' ची स्थापना कोणी केली?
१२. 'दीनबंधु' आणि 'देशबंधु' कोणाला म्हणतात?

## उत्तरावली

१. क्लॉडियस सीजर ड्रूसस जेर्मानिकस.
२. सुश्रुत.
३. जगदीशचन्द्र बोस; क्रेस्कोग्राफ.
४. धृतराष्ट्र आणि गांधारी (महाभारत).
५. ब्राझील. राजधानी ब्राझीलिया मध्ये फडकणाऱ्या राष्ट्र-ध्वजाची लांबी ३२८.१ इंच व रुंदी २२९.३ इंच आहे.
६. निळा, पिवळा, हिरवा, तांबडा आणि काळा. जगातील कोणत्याही राष्ट्रध्वजात यांपैकी कोणता-ना-कोणता रंग असतोच.
७. कालिदास.
८. जे. जे. थॉम्पसन.
९. विल्यम हेन्री हॅरिसन. सन १८४१ मध्ये यांनी पावसात भिजत जवळ जवळ दोन तास आपले प्रारंभिक भाषण दिले. यामुळे ते निमोनिया होऊन ३२ दिवसात दिवंगत झाले. ते एक डॉक्टर होते.
१०. ३९५.९ मीटर, अधिकतम खोली.
११. उपेक्षित जनावरांच्या संरक्षणासाठी १९६४ मध्ये मद्रासच्या कॅप्टन व्ही सुंदरम यांनी.
१२. सी. एफ्. ऍण्ड्रूज आणि चित्तरंजन दास.

## कोलंबसापूर्वी



ख्रिस्तोफर कोलंबसने अमेरिकेचा शोध सन १४९२ मध्ये लावला. पण काहींचा असा ही विश्वास आहे की नॉर्वेचा संशोधक लीफ एरिक्सन याने पाचशे वर्षांपूर्वी ग्रीनलँड मार्गे अमेरिकेची सफर केली आणि उत्तर अमेरिकेत प्रवेश केला. या समुद्रयात्रेच्या स्मरणार्थ नवव्या शतकातील समुद्री लुटेऱ्या जहाजासारखे एक वाइकिंग जहाज तारीख ३ मे रोजी नॉर्वेच्या किनाऱ्याहून निघाले. ई.स. १००० मध्ये ज्या मार्गे लीफ एरिक्सन गेला त्या मार्गावरून कोलंबस-दिवस म्हणजे १२ ऑक्टोबर रोजी ते अमेरिकेस पोचेल असा अंदाज आहे.

# चांदोबाच्या बातम्या

## 'अहिंसा' विश्वविद्यालय



अमेरिकेत असलेल्या जैन धर्मियांनी न्यूजर्सी मधील ब्लेअर टाउन मध्ये संपूर्णपणे 'अहिंसे' ला समर्पित केलेले एक विश्वविद्यालय स्थापन करण्याची योजना आखली आहे. हे विश्वविद्यालय जैन व बौद्ध धर्मावर आधारित असेल. सध्या कोस्टारिका मध्ये काम करीत असलेल्या 'शांति' विश्व-विद्यालया सारखे हे 'अहिंसा' विश्व-विद्यालय ही असेल आणि येथे संस्कृति, सभ्यता, इतिहास, मानसशास्त्र इ. विषयांचे शिक्षण दिले जाईल. वॉशिंग्टन मध्ये असलेल्या अमेरिकन विश्व-विद्यालयात लवकरच टागोर-साहित्याच्या अध्यापनासाठी एका प्राध्यापकाची नियुक्ति होणार आहे. हे प्राध्यापक या विश्व-विद्यालयात रवीन्द्रनाथ टागोरांचे जीवन, त्यांचे साहित्य, या महापुरुषाचा जीवन-कालाबाबत विद्यार्थ्यांसाठी व्याख्याने देतील.



# अमरचा चांगुलपणा

अमरची आई लहानपणीच वारली होती. वडिलांनी मोठ्या प्रेमाने त्याला लहानाचे मोठे केले, वडिलांच्या आज्ञांचे पालन करणाऱ्या अमरला सर्व जण प्रामाणिक म्हणून ओळखू लागले. तरी पण अमरचे लोकज्ञान एकंदरीत बेताचेच राहिले, प्रत्येक लहान-मोठ्या बाबीत अमर वडिलांच्या मार्गदर्शनाची अपेक्षा करी. अमरच्या वडिलांना याबाबत फार काळजी वाटे. शेवटचा क्षण जवळ आला तेव्हा अमरला जवळ बोलावून वडील म्हणाले—"बेटा, तू कुठलं ही काम करू शकतोस. कुठलं ही वाईट व्यसन तुला नाही. सर्वांशी चांगला वाग, तुला कशाची कमतरता पडणार नाही." एवढा उपदेश करून वडिलांनी शेवटचा श्वास घेतला.

अमरने हा उपदेश छान लक्षात ठेवला. एक दिवशी अमरला समजलं की राम-शास्त्री नावाच्या एका पंडिताचा राज-सन्मान होत आहे. अमर त्या पंडिताला भेटायला गेला. म्हणाला—"महाराज, आपण महा-पंडित आहात! राजाने आपला सन्मान करणे सर्वस्वी योग्य! तुमचा सन्मान होत आहे हे पाहून मला खूप आनन्द झाला."

चांगल्या लोकांना दुसऱ्यांच्या भाग्या-बाबत आनंद वाटतो—हे अमर दाखवून देत होता.

पण रामशास्त्र्यांवर या बोलण्याचा काही परिणाम झाला नाही. लालबुंद डोळ्यांनी अमरकडे पहात तो म्हणाला—"पांडित्या-बाबत तुला रे काय समजतं? राज-सन्मानासाठी मी योग्य आहे की नाही याचा निर्णय करण्याची योग्यता तुझ्यात कुठली? इथून पुढे कधी आपल्या पेक्षा मोठ्या लोकांच्या बाबतीत विचार न करता

"वसुंधरा"



"असं बडबडत जाऊ नकोस, समजलं?" अमर बिचारा गप्प बसला, त्याला वाईट वाटलं. निराश अंतःकरणाने रस्त्यावरून जाणाऱ्या अमरला गावाच्या पाटलांनी पाहिलं. पाटलांजवळ गावातील काही वयोवृद्ध माणसं जमा झाली होती. आदल्या दिवशी पाटलाने जो एक न्यायनिवाडा केला होता, त्याची तोंड भरून सर्व जण स्तुति करीत होते. अमरने सर्वांना नमस्कार केला नि तिथंच उभा राहिला.

अमरकडे अमळ रागाने पहात गावचा पाटील म्हणाला–"का रे? माझा न्याय तुला नाही वाटतं आवडला? असा मुखस्तंभासारखा काय उभा आहेस?"

काय बोलावं हे अमरला समजेना. तो मुकाट्याने तेथून निघाला. काही लोक आपल्या बरोबरीच्या माणसांकडून आपली प्रशंसा ऐकू इच्छितात, तर काहींना प्रत्येकाकडून आपली स्तुति ऐकण्याची इच्छा असते! हा फरक कसा जाणावा?

अमर आपल्या बरोबरीच्या भीमल नावाच्या एका शेतकऱ्याकडे जाऊन म्हणाला–"भीमल, शेती करावी तर गड्या तूंच! तुझ्या हातात काही तरी जादू आहे असं वाटतं बघ. तू बी पेरलंस की त्यातून जणू सोनं उगवतं!"

हसून भीमल म्हणाला–"कां? आज फार प्रशंसा चाललीय माझी! कारण तर कळूं दे. माझ्याकडून काय काम साधून घ्यायचं आहे आज? तुला स्तुतीच करायची असेल, तर जा आपल्या पाटलाची कर. आपलं काम साधून घेण्यासाठी प्रत्येक जण त्याची तारीफ करीत असतो." भीमल म्हणाला.

आपल्या बरोबरीच्या लोकांची प्रशंसा करणं ही योग्य नाही असा विचार करून इथून पुढं कुणाची ही तारीफ करायची नाही असा अमरने निश्चय केला.

एक दिवशी अमरचं पोट दुखू लागलं, म्हणून तो वैद्याकडे आला. त्यावेळी वैद्य जखमांनी घायाळ झालेल्या



एका माणसाची मलम-पट्टी करीत होते. "या जखमा कशा झाल्या?" अमरने त्या माणसाला विचारले.

एक वेडा बैल अंगावर धाऊन आला नि त्याने मला असं घायाळ केलं, असं त्या माणसाने सांगितलं. तेव्हा वैद्य अमरला म्हणाला–"अमर, हा बिचारा जखमांनी इतका व्याकुळ झालेला आहे. त्याला थोडी सहानुभूति दाखवायचं ही तुला जमत नाही हं?"

आता अमरला समजलं की दुःखी माणसावर दया करणं, त्याचं शांतवन करणं हा ही चांगुलपणाचाच एक भाग आहे.

यानंतर काही दिवसांनी बिहारीच्या घराला आग लागली. तो धाय धाय रडू लागला. अमर त्याच्यापाशी जाऊन म्हणाला–"अरेरे, तुझं सर्वस्व नष्ट झालं! मी तुझ्या दुःखात सहभागी आहे. आता काय होणार?"

पण ही सहानुभूति बिहारीला आवडली नाही. रागाने तो म्हणाला–"नुसते नक्राश्रु ढाळणारे अनेक आहेत. कुणी एक कवडी घेऊन मदतीला मात्र येताना दिसत नाही. जा चालता हो!"

अमरच्या जवळ पैसा मुळीच नव्हता. बिचारा बिहारीला काय मदत करणार? मुकाट्याने तेथून बाजूला होताना अमरच्या लक्षात आलं–'दुःखी माणसावर नुसती दया दाखवणं पुरेसं नाही. त्याला आर्थिक मदत देण्याची क्षमता आपणात असली पाहिजे.'





काही दिवसांनी लखपति ललितकुमारकडे पंचवीस हजार अशर्फ्यांची चोरी झाली. लोक जाऊन त्याचे सांत्वन करू लागले. अमर ललितकुमारला म्हणाला–"तुमचं तर खूपच मोठं नुकसान झालं. आपणास काही मदत करायची माझी इच्छा आहे. आपण म्हणालात तर आपल्या दोन एकर शेतात मी फुकट काम करीन. मी आपल्याकडून अधिक काय मदत करू शकणार?"

दुःखी-कष्टी लखपति ललितकुमारला अमरचं हे बोलणं काही आवडलं नाही. तो म्हणाला–"जा रे! आला मोठा मदत करणारा! पंचवीस हजार अशर्फ्या गेल्या तर मी काही कंगाल होणार नाही. मी काही तुझ्यासारखा दरिद्री नाही! नीट ऐकून घे. मला तुझी मदत बिलकुल नकोय. असल्या दहा चोऱ्या माझ्याकडे झाल्या तरी मी तुझ्याहून अधिक श्रीमंतच राहीन समजलं?"

तिथे जी वयोवृद्ध मंडळी हजर होती, त्यांनी ही अमरला सुनावलं–"दुःखी-कष्टी माणसाशी असं का बोलायचं असतं अमर?"

हे सगळं पाहून अमरला कळेना की आपला चांगुलपणा दाखवावा तरी कसा? याच काळजीत बिचारा त्रस्त झाला.

एक दिवशी गावा बाहेर वडाच्या झाडाखाली बसून अमर आपल्या चिन्तेत गर्क होता. इतक्यात त्याने एका साधूला पाहिलं. साधूने अमरला विचारलं–"का रे बाबा? कसली काळजी करतो आहेस एवढी?"

अमरने साधूला आपली राम-कहाणी ऐकवली. साधू हसत म्हणाला–"आपला चांगुलपणा लोकांना दाखवायचा तू खूप प्रयत्न केलास! म्हणूनच लोक तुझी थट्टा करू लागले!"

अमरने विचारले–"स्वामीजी, आपला चांगुलपणा दाखवणं यात काही चूक आहे का?"

"नाही बेटा, तुझी चूक काही नाही. पण लोकांचा स्वभावच असा आहे की ते दुसऱ्याचा चांगुलपणा समजू शकत नाहीत. नुसती टिंगलटवाळीं करणं लोकांना आवडतं. हे तू नीट समजून घे." साधु अमरचे सांत्वन करीत म्हणाला.

अमरने व्याकुळ होत विचारले–"पण मी सर्वांशी चांगुलपणाने वागावे असे वचन माझ्या वडिलांनी मृत्यु-समयी माझ्याकडून घेतलेले आहे. मी दिलेल्या वचनाचे पालन करू शकणार नाही का?"

"का नाही? ते सहजच शक्य आहे. सगळ्यांशी चांगुलपणाचा व्यवहार करण्यासाठी ज्याची त्याची प्रशंसा करीत भटकायला नको. प्रत्येकावर दया करण्याची ही आवश्यकता नाही!" साधूने उपदेश केला.

अमरने प्रश्न केला–"मग मी काय करायला हवं?"

"सर्वांचं हित-चिंतन करीत जा. बस." साधु म्हणाला.

"म्हणजेच काय करायचं हे काही मला समजत नाही!" अमरने पुन्हा पृच्छा केली.

"जर तुला कुणाची तारीफ करावीशी वाटली तर जरूर कर. कुणाला दया दाखवावी असं वाटलं तर त्याला ही हरकत नाही. केवळ चांगुलपणाचं प्रशस्तिपत्र मिळविण्यासाठी कुणाची प्रशंसा करीत बसू नकोस. ज्यांना जरूर असेल, त्यांना अवश्य मदत कर. कुणी तुझं नुकसान केलं, निंदा केली–तर त्यांना क्षमा करणं हाच चांगुलपणा. रागाच्या भरात विना कारण कुणाची निंदा करू नकोस. आपल्या सदसद्विवेक-बुद्धीनुसार चांगलं काम करीत रहा, दुसरे लोक काय म्हणतात याचा विचार करीत जाऊ नकोस. त्यामुळे दुःखी होऊं नकोस. आलं सगळं लक्षात?" साधूने विचारले.

आता अमरच्या डोक्यात प्रकाश पडला. तसा तो पहिल्या पासून प्रामाणिक होताच. साधूच्या उपदेशानुसार व्यवहार करीत राहिला. गावातील सर्व लोक अमरला 'चांगला' म्हणू लागले. अमर शांतिपूर्वक सुखाने राहू लागला.





# दानाचे फळ

मलयवती राज्याचा शासक होता सर्वोत्तम. त्याच्या मन्त्र्याचं नाव होतं सुमेध. राजा अधूनमधून सुमेधला बरोबर घेऊन, वेष बदलून, आपल्या राज्यात फेरफटका मारीत असे, आणि प्रजेची सुखदुःखं समजून घेण्याचा प्रयत्न करीत असे.

एके दिवशी असंच हिंडत असताना एक घटना घडली. दोन मित्र रस्त्यावरून जात होते. रस्त्याच्या कडेला बसून भीक मागणारा एक पांगळा माणूस त्यांना दिसला. त्यावेळी त्यातल्या एका मित्राने स्वतःच्या खिशात पैसा नसल्यामुळे दुसऱ्याकडून एक नाणे उसने मागून घेऊन त्या भिकाऱ्याला दिले. अन् पैसे दुसऱ्या दिवशी परत करायचे मित्राला कबूल केले. पण दुसऱ्या मित्राने नाणं देत म्हटलं—"अरे तू तर हे भिकाऱ्याला दान देण्यासाठी घेत आहेस ना; मग ते परत करायची काही गरज नाही. तू आणून दिलंस तरी घेणार नाही हं मी!"

ही घटना पाहिल्यावर राजा सर्वोत्तम विचारात पडला—ते नाणं दान दिल्याबद्दलचं पुण्य कुणाच्या नावे जमा होईल? पहिल्या मित्राच्या, की दुसऱ्या? पण खूप विचार करूनही त्याला योग्य उत्तर सांपडलं नाही.

दुसऱ्या दिवशी ही घटना राजाने दरबारात निवेदित केली आणि विचारलं—"या दोघांपैकी कोणाला दानाचं फळ मिळायला हवं?"

सर्व दरबारी विचारात पडले, बराच वेळ डोकी खाजवून काही दरबारी म्हणाले—"दान तर पहिल्या मित्रानेच केलं ना, मग फळ त्याला मिळावं!"

दुसरे काहीजण म्हणू लागले—"वा! असं कसं होईल! नाणं तर दुसऱ्या मित्राचं होतं ना? मग फळ त्यालाच मिळालं पाहिजे."

आणखी काहीजण म्हणाले—"दान एकानं केलं, पण पैसे तर दुसऱ्याचेच गेले! मग फळ दोघांना सारखं सारखं मिळावं."

पण कुणाचंच उत्तर राजाला बरोबर वाटेना. दरबाऱ्यांकडे तीक्ष्ण नजर टाकत तो म्हणाला—"तुमचं कुणाचंच उत्तर बरोबर नाही वाटत. जरा नीट खोलवर विचार करून नीट तार्किक आणि हेतुबद्ध उत्तर द्या."

सर्वांनी पुन्हा खूप विचार केला, पण सर्वोत्तमला योग्य वाटेल असं उत्तर मिळालं नाही.

शेवटी आपला मन्त्री सुमेध याच्याकडे पहात राजाने विचारलं—"महामन्त्री, घटना तर तुम्हीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिलीत नं? मग याबाबत तुमचा काय विचार आहे तो कृपा करून सांगा बरं!"

"महाप्रभु, मला तरी प्रामाणिकपणे असं वाटतं की, दान करण्याची केवळ ऐपत असण्यापेक्षा, दान करण्याचा विचार डोक्यात येणं हे जास्त महत्त्वाचं. तेव्हां असा चांगला विचार करणाऱ्या पहिल्या मित्रालाच दानाचं फळ मिळावं." महामन्त्री उत्तरले.

इतक्यात दरबारी विदुषक घरहास उठून उभा रहात म्हणाला—"महाराज, मी महामन्त्र्यांच्या विचाराशी पन्नास टक्केच



सौ. स्वाती दांबे

सहमत होईन. कारण एक नाणं दान देण्याचं पुण्य पहिल्या मित्राला जरूर मिळावं, पण त्याबरोबरच दुसऱ्याचं नाणं हडपण्याचं पापही त्याला लागतंच ना?"

हे ऐकून सर्वोत्तमला हसू आलं. तो आपल्या मन्त्र्याकडे प्रश्नार्थक नजरेनं पाहू लागला.

आता हळूच हसत सुमेध बोलू लागला— "पहिल्या मित्राने दुसऱ्याचे नाणे हडपण्याच्या उद्देशाने घेतलंच नव्हतं ना! त्यानं तर ते परत करण्याची बोली करूनच मागितलं होतं. दुसऱ्यानंच ते परत घ्यायला नकार दिला, याला काय करणार? तेव्हां पहिल्या मित्राला ते हडपण्याचं पाप नक्कीच लागणार नाही.

पण विदुषक पुन्हा उठून म्हणाला—"पण मग दुसऱ्याला बिचाऱ्याला यात काय लाभ? त्याचं तर एक नाणं खर्च झालंच की! त्यानं ते पहिल्या मित्राला दिलं अन् परत घेतलं नाही; म्हणजे कमीत कमी ते नाणं पहिल्याला दान करण्याचं फळ तर त्याला मिळायला हवं ना! आता बोला तुमचं काय म्हणणं आहे यावर?"

पण सुमेध धाडकन उत्तरला—"तुमचा विचारच चुकीचा आहे. दुसऱ्याला कसलंच फळ मिळणार नाही. कारण यावेळीं पहिल्या मित्राला दान देण्याचा विचार दुसऱ्या मित्राचा मुळी नव्हताच; अन् पहिल्याचाही दान घेण्याचा विचार नव्हता. या सर्व घटनेला दुसरा मित्र निमित्तमात्र आहे. नाणे परत घ्यायला त्यानेच नकार दिला, तेव्हा ते घालवायला जबाबदार तोच ठरतो ना? दान करण्याचा विचारच मनात नसताना दानाचं फळ मिळायची संधी कशी मिळेल?"

आता मात्र सुमेधची तर्कशुद्ध विचारसरणी आणि बुद्धीची प्रखरता घरहासच्या लक्षात येऊन चुकली. राजा सर्वोत्तमलाही त्याचं उत्तर संतोषजनक वाटलं. दरबार भरवून सर्वांपुढे राजाने सुमेधची तोंड भरून स्तुति केली आणि त्याने सुमेधचा छानसा सत्कार केला.






हनुमानाने सीतेचे स्मरण करून एकदा नमस्कार केला आणि तो सांगू लागला:

"महेन्द्र पर्वतावरून उडत जात असताना तुम्ही मला पाहिलंच होतं ना? मी जेव्हा आकाश-मार्गाने जात होतो, तेव्हा एक सुंदर सोन्याचं शिखर माझ्या वाटेत आडवं आलं. त्याचा भंग करण्याचा विचार मी करीत होतो, इतक्यात मोठ्या प्रेमाने मला सामोरं येत ते म्हणालं—"माझं नाव मैनाक. तुझे पिता भगवान वायुदेव यांनी इंद्राच्या तावडीतून मला एकदा वाचवलं होतं! तू रामाच्या कार्यासाठी चालला आहेस, तुला मदत करण्याची माझी इच्छा आहे." मी गडबडीत असल्यामुळे थांबू शकत नव्हतो, त्याचा निरोप घेऊन पुढं निघालो. यानंतर सर्पमाता सुरसा मला गिळून टाकण्याची धमकी देत माझ्या पुढे आली. मी तिला सांगितलं की मी एका महत्त्वाच्या कामगिरीवर निघालो आहे, काम संपवून मी परत येईन तेव्हा तू मला खाल्लंस तरी चालेल. पण तिने माझं म्हणणं ऐकलं नाही. मी सूक्ष्म शरीर धारण करून तिच्या तोंडात घुसलो आणि दुसऱ्याच क्षणी बाहेर आलो. तेव्हा सुरसाने मला आशीर्वाद देऊन पुढे रवाना केले. नंतर काही अंतरावर माझ्या छायेला कोणी तरी पकडलं. ती सागरात राहणारी एक राक्षसीण होती. माझा निरुपाय झाला. मी पुन्हा सूक्ष्म रूप धारण करून तिच्या शरीरात गेलो आणि तिचं हृदय फाडून बाहेर पडलो. नंतर

## १७. मधुवनाचा विध्वंस



मला कळलं की तिचं नाव होतं सिंहिका! नंतर मी लंकेपर्यंत पोचलो, लपत-छपत लंकेत प्रवेश केला. तेथे लंका एका विशाल-काय राक्षसीच्या स्वरूपात माझ्या समोर येऊन उभी राहिली. मी तिचा पराभव केला. आता मी सीतेचा शोध सुरू केला. रावणाच्या घरी सीता मला दिसली नाही. एका भव्य उद्यानात शेवटी मला ती दिसली, तिची काया कृश झालेली होती. भयंकर राक्षसिणींच्या घोळक्यात शोकमूर्ति सीता बसलेली होती!"

अशा रीतीने आपण स्वतः जे काही पाहिलं ते सर्व समग्र हनुमानाने वानरांना सांगितलं. शेवटी तो म्हणाला—

"सीता महान् पतिव्रता आहे. तिला पाहताच माझ्या मनात तिच्याविषयी अपार भक्ति-भावना निर्माण झाली. ती एक वीरपत्नी आहे. आपल्या पतीने रावणाचा वध करावा अशी तिची इच्छा आहे. आपण सर्व जण मिळून सहज रावणाचा वध करू शकतो. मला वाटलं, असं करून सीतेला घेऊन राम-लक्ष्मणाकडे गेलं तर किती छान होईल! खरं म्हणजे रावणाला मी एकटा ही मारू शकतो. इंद्रजितची अस्त्रे माझा नाश करू शकणार नाहीत. तुम्ही म्हणालात तर मी इंद्रजितला ही ठार करू शकतो. जांबवान आणि अंगद त्या सर्व राक्षसांचा वध करू शकतील. दोन महाबली राक्षस आहेत—मैंद आणि द्विविद. कोणाच्या ही हातून मरण येणार नाही असा वर त्यांना मिळालेला आहे. बोला, आता तुमचं काय म्हणणं आहे?"

हनुमानाचं म्हणणं मान्य करीत अंगद म्हणाला—"होय, तुझं बोलणं बरोबर आहे. सीतेचा शोध लावून तिला बरोबर न घेता परत जाणं योग्य नाही. असं आपण केलं तर ती मोठी चूक होईल. 'आम्ही सीतेला पाहिलं, पण तिला घेऊन आलो नाही' असं आपण रामाला कसं सांगणार? काही खास राक्षसांचा वध तू केलाच आहेस, आता फारच थोडं काम शिल्लक आहे. सीतेला घेऊनच आपण रामाकडे जाऊ या."



तेव्हा जांबवान अंगदाला म्हणाला—"तू जे म्हणतोस ते तसं ठीक आहे. पण एक गोष्ट विसरून चालणार नाही. रामाची आज्ञा असेल त्याप्रमाणेच आपण वागल पाहिजे. म्हणून रामाच्या आज्ञेनुसार जे करायचं तेच आपण करू."

सीता कोठे आहे याचा शोध घ्यायला रामाने वानरांना सांगितलं होतं. सीतेला घेऊन या असं तर रामाने मुळीच सांगितलं नाही. हनुमानाने वानरांना सांगितलं की सीता त्याच्या बरोबर यायला तयार नाही.

यावर सर्वांनी जांबवानचं म्हणणं मान्य केलं. आपण सीतेला पाहिल्याची वार्ता ताबडतोब रामाकडे जाऊन सांगितली पाहिजे. सर्व वानर आकाशमार्गाने निघाले आणि भूतलावरील जणू नन्दनवन अशा मधुवनात पोचले. मधुवनाचं संरक्षण करण्यासाठी सुग्रीवाने आपला मामा दधि-मुख याची नियुक्ति केलेली होती.

मधुवनात पोचताच मधुपान करण्यासाठी वानरांनी अंगदाला अनुमति मागितली. आणि अंगदाने त्यांना परवानगी दिली. सीतेला शोधून काढल्याच्या आनंदात सर्व वानरांनी भरपूर मधुपान केले, एकमेकांना अधिक पिण्यासाठी उत्तेजन देऊं लागले. सर्व वानर गाऊ-नाचू लागले. कांही वानर तर वेड्यासारखे हसू लागले. काही बेशुद्ध



होऊन जमिनीवर पडले. काही सैरावैरा पळू लागले, तर काही हवेत उडू लागले. काही वानर आरडा-ओरडा करू लागले. काही वानर एकमेकांचे हात धरून चक्राकार नाच करू लागले. नशेत काही जण आपल्या गुप्त गोष्टींबाबत एकमेकांशी बोलू लागले. काही वानर तोल जाऊन एकमेकांवर पडत होते. कुणाला ही आपल्या शरीराची शुद्ध राहिली नाही.

अशा प्रकारे वानरांनी मधुवनातील सर्व दारू संपवून टाकली, इतकंच नाही तर आता ते वृक्षांचा विध्वंस करू लागले. यावर दधिमुख रागाने लाल झाला आणि त्याने सर्व वानरांना मधुवनातून बाहेर



जायला सांगितलं. पण त्याची आज्ञा कोणी ही मानली नाही. मग दधिमुखाने काहींना समजाऊन सांगितलं, तर काहींना धमकावणी दिली. आता वानरांच्याने राहवेना, ते दधिमुखावर तुटून पडले नि त्याला आपल्या नखांनी ओरबाडून अनेक प्रकारे त्रास देऊ लागले.

हनुमान वानरांना म्हणाला–"तुम्ही मनसोक्त प्या, तुम्हाला कोणी मना केलं तर मी त्याच्याकडे पाहून घेईन!"

"हनुमानाने कुकर्म करायला सांगितलं तरी मी ते करीन, मग सत्कर्म करायला सांगितलं तर का बरं करणार नाही?" अंगद नशेत म्हणाला.

अंगदाच्या या बोलण्यावर सर्व वानर खुश झाले. मधुवनाचे जे पहारेकरी त्यांच्या वाटेत आड आले, त्यांना ते मारून टाकू लागले आणि मधुपान करीत असताना वानरांनी झाडांवरील सर्व फळे खाऊन टाकली. त्यांना आडवणारा आता कोणी राहिला नाही. शेवटी संपूर्ण मधुवन ध्वस्त झालं.

हा अन्याय पाहून दधिमुख शांत बसू शकला नाही, आपल्या सैन्यासह जोरजोरात आरोळ्या ठोकत वानरांशी युद्ध करायला तो निघाला.

दधिमुख अंगदाचा आजोबा होता, पण या नात्याचा काही ही विचार न करता अंगदाने त्याला झोडपून काढले. आता निरुपाय होऊन दधिमुख आपल्या लोकांसह सुग्रीवाकडे गेला.

दधिमुखाने जेव्हा सुग्रीवाच्या पायांवर डोकं ठेवलं तेव्हा सुग्रीव अमळ घाबरला. त्याला वाटले काही तरी महान संकट कोसळले आहे. त्याने विचारले–"अरे, अशी माझ्या पायांवर काय लोळण घेत आहेस? उठ, जरा ही न घाबरता सांग तर खरं झालं काय? मधुवनावर काही संकट तर नाहीं ना आलं?"

दधिमुख म्हणाला–"महाराज, आपले वडील ऋक्षरज यांच्या वा आपल्या काळात





जे करण्याचे साहस कोणी केलं नाही, तो अन्याय आता मधुवनात चालला आहे, अंगद वगैरे वानरांनी आज मधुवनात प्रवेश करून पहारेकऱ्यांना मार-पीट केली, आकंठ मधुपान करून चूप बसले नाहीत, बरेचसे मद्य सांडून टाकले. तुमच्या बद्दल ही त्यांना भय राहिलं नाही असं वाटतंय!"

दधिमुख जेव्हा सुग्रीवाकडे आला होता, तेव्हा राम-लक्ष्मण ही तिथेच होते. दधिमुखाला इतका चिंतामग्न पाहून लक्ष्मणाने सुग्रीवाला विचारले—"हा का बरे इतका दुःखी आहे?"

तेव्हा सुग्रीवाने लक्ष्मणाला निवेदन केले—"आपण सीतेचा शोध घेण्यासाठी ज्या वानरांना दक्षिण दिशेला पाठविले होते, त्यांनी मधुवनात येऊन मधुपान करून धिंगाणा चालविला आहे असं हा सांगतोय! त्यांनी सीतेला नक्कीच पाहिलं असलं पाहिजे, नाहीतर मधुवनात प्रवेश करण्याचे साहस ते करणार नाहीत. त्यांच्यातील हनुमानाला सीतेचा पत्ता जरूर लागला असला पाहिजे. हे काम झालं असलं तर त्यानेच केले असेल, दुसऱ्या कोणाला हे काम जमण्यासारखं नाही. जांबवान, अंगद नि हनुमान एकत्र असले तर पराजय केवळ अशक्य! लक्ष्मणा, तू ही नीट विचार कर, जर सीतेला त्यांनी शोधून काढलं नसेल तर असा जल्लोष ते कधी करणार नाहीत. मधुवन ब्रह्माने माझ्या वडिलांना दिलेले वरदान आहे."

हे सर्व ऐकून लक्ष्मणाला फार आनंद झाला.

सुग्रीव दधिमुखाला म्हणाला—"वानरांनी मधुपान केले असले तर करू दे. ते आपलं काम फत्ते करून आले आहेत, म्हणून मी त्यांना माफ करतो. पण त्यांनी आपलं हे काम कसं पूर्ण केलं हे जाणून घ्यायला मी नि राम-लक्ष्मण अगदी उतावळे झालो आहोत."

हे ऐकून दधिमुखाची सर्व चिंता दूर झाली. राम-लक्ष्मण नि सुग्रीव यांना



अभिवादन करून त्याने सर्वांचा निरोप घेतला आणि जसा आला तसा मधुवनात पोचला. मग तो अंगदाला म्हणाला—"अंगदा, माझ्या सहकाऱ्यांनी तुझ्या मार्गात अडथळा आणला म्हणून तू रागावू नकोस. तू तर युवराज आहेस, तुझा या मधुवनावर संपूर्ण अधिकार आहे. चूक मीच केली, मला क्षमा कर. तुम्ही सर्व जण परत आला आहात हे जाणून राजा सुग्रीवाला फार आनंद झाला आहे. सुग्रीवाने माझ्या करवी तुला निरोप पाठविला आहे की तुम्ही सर्वांनी तावडतोब जाऊन त्यांना भेटावे."

तेव्हा अंगद वानरांना म्हणाला—"आपण इथं पोचल्याची वार्ता रामापर्यंत गेली आहे असं दिसतंय. आता आपल्याला लगेच तिथं गेलं पाहिजे. मधुपान करून आता तुमचा थकवा गेला असेल. आता इथे थांबून काय करायचंय?"

सर्व वानर तावडतोब निघायला तयार झाले. अंगदाने आज्ञा दिली नसली म्हणून काय झाले, त्याची इच्छा त्यांना आज्ञेसारखी होती. अंगद आकाशात उडाला, तसेच सारे वानर ही मागे निघाले. मेघगर्जना करीत ते सुग्रीवाकडे जायला निघाले.

त्यावेळी सुग्रीवाने रामाला निवेदन केलं—"वानरांनी सीतेला पाहिलं याबाबत काहीच शंका नाही. अन्यथा मी दिलेल्या



मुदतीनंतर ते परत आलेच नसते. आपलं कार्य पूर्ण केल्यावाचून अंगद मला भेटायला येणारच नाही. मधुवनात वानरांनी मधुपान केलंच नसतं. सीतेचा शोध लागला असं समजायला आता काही हरकत नाही. हे रामा, आता तुझी काळजी संपली असं समज."

अशात आकाशात सिंहध्वनि करीत येणारे वानर त्यांना दिसले. मग काही क्षणातच सर्व वानर सुग्रीवा समोर जमिनीवर उतरले.

हनुमानाने रामाला साष्टांग नमस्कार करून म्हटले—"मी सीतेला पाहिलं! ती खुशाल आहे." रामाने मोठ्या प्रेमाने हनुमानाकडे पाहिलं.

तो हनुमानाला म्हणाला–"हनुमान, सीता कोठे आहे? ती माझ्या संबंधी काय विचार करीत आहे? काही ही न लपवता मला सर्व विस्ताराने सांग."

सर्व वानरांनी हनुमानाला विनंती केली–"सांग तूच आता सगळी वार्ता!"

सीता ज्या दिशेला होती, तिकडे वळून हनुमानाने नमस्कार केला. नंतर सीतेने दिलेला मणी हनुमानाने रामाला दिला आणि सीतेला त्याने कसे पाहिलं हे सांगायला सुरुवात केली.

"शंभर कोसांच्या अंतरावर असलेला समुद्र पार करून मी सीतेला शोध करायला गेलो. तेथे रावणाची लंका नगरी होती. त्या नगरीत राक्षसिणींच्या गराड्यात दुबळ्या झालेल्या सीतेला मी पाहिलं. सीतेला तेथे जो त्रास होत होता तो पाहून मला फार वाईट वाटलं. मी जेव्हा तिला पाहिलं तेव्हा तिने आत्म-हत्या करायचा निश्चय केलेला होता. मी तिला कसं तरी विश्वासात घेऊन या निश्चयापा[illegible] आपण जेव्हा चित्रकूट पर्वतावर होता, त्यावेळची एक कावळ्याची घटना सीतेने मला सांगितली. सीतामाईने हा चूडामणी मोठ्या भक्तिभावाने आपल्या जवळ ठेवलेला होता. ती मला म्हणाली की मी तुम्हाला नि सुग्रीवाला जाऊन सांगावं–आता ती एक महिना भरच जिवंत राहू शकेल. म्हणून समुद्र पार करून जाण्याची लवकरच काही तरी उपाय-योजना करा."

हनुमानाने दिलेला चूडामणी छातीशी धरून राम ओक्सा-बोक्शी रडू लागला. त्याच्या बरोबर लक्ष्मण ही रडला. डोळ्यातील अश्रु पुसत राम सुग्रीवाला म्हणाला–"हा चूडामणी पाहून माझ्या हृदयात कशी कालवा-कालव होत आहे. हा मणी जनकाने सीतेला दिला होता. लग्नाच्या वेळी सीतेने हा मणी आपल्या डोक्यावर धारण केला होता. हा पाहून मला दशरथ नि जनक यांची आठवण येत आहे. यात मला जणू सीतेलाच पाहिल्याचा भास होत आहे."



# बुद्धीची परीक्षा

आपल्या परिवारात सर्वात बुद्धिमान कोण आहे, याची परीक्षा करावी असा विचार एकदा त्रिरीषनगरचा राजा विजयवर्धन याच्या मनात आला. आपले सर्व दरबारी कर्मचारी आणि नोकर-चाकर यांना एका जागी बसवून त्याने विचारले–"अग्निकुंडात उडी मारली, तर माझ्याबरोबर तुम्ही उडी माराल? मी समुद्रात उडी घेतली, तर तुम्हीही घ्याल?"

सगळे नुसतेच एकमेकांकडे टकामका पाहू लागले. पण शिवराज नावाचा एक कर्मचारी मात्र उठून म्हणाला–"महाराज, मी आपणाबरोबर अग्निकुंडात तावडतोब उडी मारीन; पण समुद्रात उडी मारायची असेल तर कृपया मला पंधरा दिवसांची मुदत द्यावी."

राजाने विचारले–"नीट खरं सांग! तुला आपल्या प्राणांची काहीच पर्वा नाही? अन् अग्निकुंडात उडी मारायला तयार असलेला तू, समुद्रात उडी मारायला मुदत का मागतोस?"

शिवराज यावर म्हणाला–"क्षमा करावी महाराज! मुलाबाळांचा धनी आहे मी. अग्निकुंडात उडी मारून आपण आपला प्राण थोडाच गमवाल? म्हणूनच मी आपणाबरोबर अग्निकुंडात तावडतोब उडी मारायची तयारी दाखवली. पण समुद्रात उडी मारायची गोष्ट निराळी. आपण पोहू शकता, आपण सहज उडी माराल. पण मला कुठं पोहोता येतं? ते अगोदर शिकून घ्यावं म्हणून पंधरा दिवसांची मुदत मागितली मी!"

या उत्तरावर राजा हसू लागला आणि शिवराज सर्वात बुद्धिमान असल्याचं घोषित करून राजाने त्याची खूप प्रशंसा केली.

–कु. पूजा दामले





# पाच भाकरी

धोंडीबा आणि मनोहर नावाचे दोघे प्रवासी बरीच लांबची यात्रा उरकून एका संध्याकाळी एका खानावळवालीकडे भेटले. दुसऱ्या दिवशी सकाळी ते जेव्हा आपापल्या पुढल्या प्रवासासाठी पुढे निघाले तेव्हा म्हाताऱ्या खाणावळवालीनं प्रवासात खाण्यासाठी दोघांनाही जाड जाड भाकरींच्या दोन पोटल्या बांधून दिल्या. धोंडिबा काहीसा मोठ्या मनाचा आणि कंजूष प्राणी होता. म्हातारीने त्यांचा ह्रा स्वभाव ओळखूनच धोंडिबाच्या पोटलीत तीन तर मनोहरच्या पोटलीत दोनच भाकरी घातल्या होत्या.

सुरुवातीचा प्रवास दोघांना एकाच रस्त्याने करायचा असल्यामुळे दोघेही बरोबरच चालत राहिले. दुपारच्या वेळी एका तलावाकाठी असलेल्या दाट झाडीखाली ते पोचले. तेथेच जेवण उरकायचे ठरवून तलावावर हातपाय धुवून दोघेही झाडाखाली येऊन बसले आणि त्यांनी आपापल्या पोटल्या सोडल्या. धोंडिबाला आपल्या पोटलीत तीन, तर मनोहरला दोनच भाकरी बांधलेल्या आढळल्या.

"पाहिलंत म्हातारी कशी खवडूस आहे? पोटलीत तिनं दोनच भाकरी बांधल्या आहेत!" मनोहर काहीसा चिडून म्हणाला.

यावर हसत हसत धोंडिबा म्हणाला—"अरे, दोन-दोन भाकरी तरी आपण कुठे खाऊ शकणार आहोत? हं, आपण तेवढ्या संपवू शकलो, तर उरलेली एक भाकरी आपण अर्धी-अर्धी वाटून खाऊ! मग तर झालं?"

दोघं खायला सुरुवात करणार, इतक्यात त्याच झाडाखाली नामदेव नावाचा आणखी एक यात्रेकरू आला.

"बाबांनो, मी भुकेनं मरायला टेकलोय! तुमच्यातलं थोडं अन्न मला पण दिलेत तर उपकार होतील बघा माझ्यावर!" नामदेव दोघांना म्हणाला.

"या ना! अवश्य या आमच्याबरोबर जेवायला. आमच्या जवळच्या भाकरी आपल्या तिघांना अपुऱ्या नाही पडायच्या." धोंडिबा आनन्दाने आगन्तुकाचे स्वागत करीत म्हणाला.

धोंडिबा एवढे म्हणायचाच अवकाश, कि नामदेव ताबडतोब त्यांच्याबरोबर येऊन बसला. त्या तिघांनीही त्या पाच भाकरी वाटून खाल्ल्या. जाताना नामदेवने आपल्याजवळचे पाच आणे धोंडिबाच्या हातावर ठेवत कृतज्ञता प्रकट केली. धोंडिबा 'नको-नको' म्हणत असतानाही ते पाच आणे देऊनच नामदेवने आपला रस्ता सुधारला. धोंडिबा त्यातले दोन आणे मनोहरला देऊ करत म्हणाला—"हे दोन आणे तुमच्या वाट्याचे. माझ्या तीन भाकरी होत्या म्हणून तीन आणे माझे!"

"वा, वा! ह्रा तर सरळसरळ अन्याय आहे. भाकरी काय आपण नामदेवला विकल्या होत्या थोड्याच! त्याने आपण होऊन पैसे दिलेत. तेव्हा दोघांनी अडीच अडीच आणे घेणं बरोबर होईल." असे म्हणून मनोहरने आणखी दोन पैसे मागितले. दोन पैसे देण्याबद्दल धोंडिबाची काही तक्रार नव्हती, पण मनोहरच्या कंजूषपणाचा मात्र त्याला राग आला.



"मग तर चलाच माझ्याबरोबर. पुढे येणाऱ्या गावात जाऊन तिथल्या पाटलाकडून आपण निवाडा करून घेऊ. तो म्हणेल ते प्रमाण, कबूल?" धोंडिबाने विचारले.

दोघेही आणखी पुढे गेल्यावर एका गावात पोचले. तेथल्या पाटलासमोर दोघांनी आपापली कैफियत मांडली.

पाटलाने दोघांचेही ऐकून घेतल्यावर मनोहरकडे वळून तो म्हणाला—"आता माझा निवाडा ऐकून घ्या. नामदेवने जे पाच आणे दिले, त्यातले चार आणे धोंडिबाला मिळायला हवेत आणि तुला एकच आणा मिळाला पाहिजे. तेव्हा तू दोन आण्यांपैकी एक आणा धोंडिबाला परत कर."

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट

हा न्याय ऐकून नामदेव चाट पडला! अर्धा वाटा मिळायचा तो कुठेच गेला, अन् उलट एक आणा परत करायचा म्हणजे काय?

"पाटीलबाबा, हा कुठला न्याय तुमचा? आमच्या भाकरींची संख्या पाहिली, तरी मला दोन आणे मिळायला पाहिजेत ना? आपण तर मला एकच आणा मिळावा असं म्हणताय, हे कसं काय?" कंजूष मनोहर विचारू लागला.

"मी सांगतोच तेच न्याय्य आहे. माझं म्हणणं नीट ऐकून घे. पाच भाकरींची वाटणी तुम्ही कशी केलीत ते सांग बरं?" पाटलाने विचारले.

"हो, सांगतो की! आम्ही एकेका भाकरीचे तीन तीन सारखे तुकडे केले. असे पाच भाकरींचे पंधरा तुकडे झाले. आम्ही तिघांनी ते सारखे वाटून पाच पाच तुकडे घेतले." मनोहर उत्तरला.

"ठीक आहे. तुझ्या भाकरीचे एकूण किती तुकडे झाले?" पाटलाने विचारले.

"सहा." मनोहरने सांगितले.

"मग त्यातले पाच तर तूच खाल्लेस अन् फक्त एक तुकडा नामदेवला दिलास. पण धोंडिबाच्या भाकरीच्या नऊ तुकड्यां-पैकी त्याने चार नामदेवला दिले. नामदेवने एकूण पाच तुकडे खाल्ले आणि पाच आणे दिले. त्याने तुझ्या भाकरीतला एकच तुकडा खाल्ला, म्हणून तुला फक्त एक आणाच मिळावा आणि धोंडिबाच्या चार तुकड्यांचे त्याला चार आणे मिळावे. बरोबर ना?" पाटलाने आपल्या निवाड्याचे स्पष्टीकरण दिले.

आता नाइलाजाने मनोहरने आपल्या दोन आण्यांपैकी एक आणा धोंडिबाला परत केला आणि आपल्या लोभीपणाबद्दल स्वत:लाच शिव्या देत आपल्या रस्त्याने चालता झाला. पाटलाची बुद्धिमानी आणि तर्कसंगत निवाड्याची स्तुति करून धोंडिबानेही आपला रस्ता सुधारला.



# हरदासाची मूळपदावर

वीरपुरला गोवर्धन आणि गंगाधर नावाचे दोन मित्र रहात असत. एके दिवशी संध्याकाळी ते दोघं शेजारच्या गावच्या बाजारासाठी निघाले. इतक्यात दुधाचा घडा डोक्यावर घेतलेलं कुणीसं त्यांच्यासमोरून गेलं.

"वा, वा! चांगला शकुन झाला की! आपलं नक्की भलंच होईल." गोवर्धन म्हणाला.

गोवर्धनचा शकुन-अपशकुनावर मोठा विश्वास! "हं! ही सगळी आपली तुझी कल्पना आहे झालं! जे व्हायचं तेच होणार असतं. असला अंधविश्वास सोडून दे यापुढे." गंगाधर म्हणाला.

नंतर ते दोघं शेजारच्या गावी पोचले. तिथे रस्त्याच्या कडेला एक साधु भाषण देत होता अन् बरेचसे लोक त्याला घेऊन ते ऐकत होते. दोघं मित्रही जरासे तिथे थांबले.

साधु आपल्या भाषणात अंधविश्वासाबद्दल कडाडून टीका करत होता. 'शकुन आणि शिंका येणं वगैरेंवर विश्वास ठेवण्याचा मूर्खपणा करू नका' असं तो मोठ्या आग्रहाने सांगत होता. लोकांवर त्याचा चांगला प्रभाव पडत होता.

"वा वा! आपण किती भाग्यशाली आहोत! अशा महात्म्याचं भाषण ऐकून आपण तर तृप्त झाले बुवा! साधूने मोठी महत्त्वाची गोष्ट सांगितली." गंगाधर म्हणाला. अन् तो असंही म्हणाला की–"बघ! आता तूही अंधविश्वास सोडून दे गोवर्धन."

"हो हो! तुझं म्हणणं अगदी बरोबर आहे. मी घरून निघतानाच म्हणालो होतो न, दुधाच्या घड्याचा शकुन चांगला झाला? बघ, तसंच झालं ना? चांगल्या शकुनाचा लाभ असा झाला, की आपल्याला चांगलं भाषण ऐकायला मिळालं!" गोवर्धन आपल्याच तालात म्हणाला.

–सौ. रेवती रणनवरे





# पुस्तकी वैद्य आणि अनुभवी वैद्य

श्रीमुख नावाच्या एका तरुणाची आपण महान् वैद्य बनावे अशी तीव्र इच्छा होती. दंडकारण्यात रहाणारा दिव्यात्म नावाच्या मुनीला वैद्यक शास्त्राचे सूक्ष्म ज्ञान आहे, असे कळल्याने श्रीमुख अनेक अडचणींना तोंड देऊन दिव्यात्मकडे पोचला.

श्रीमुखची श्रद्धा व जिज्ञासा यांवर खूष होऊन मुनीने त्याला शरीरशास्त्र व वनांतील कंद, मुळे व अन्य सर्व वनस्पतींचे सूक्ष्म असेही उपयोग समजावून देऊन त्याला निरनिराळ्या रोगांची चिकित्सा-पद्धती सविस्तर शिकवली.

एके दिवशी दिव्यात्म श्रीमुखला म्हणाला—"पुत्रा, आता तुझा विद्याभ्यास तर संपला, पण वैद्य म्हणून चिकित्सा करायला सुरुवात करण्यापूर्वी तू एकाद्या कुशल वैद्याच्या हाताखाली मदतनीस म्हणून काही काळ काम कर."

गुरूला साष्टांग नमस्कार करून त्याचा आशिर्वाद घेऊन श्रीमुख चित्रपूर नावाच्या नगरात पोचला. तेथे ख्यातिप्राप्त असे चार वैद्य होते. त्या चारातही सदानन्द हा जास्त समर्थ मानला जाई. या सदानन्द-लाच भेटून त्याच्याशी बोलावे असे श्रीमुखला वाटले. परन्तु तो तर सदाच रोग्यांनी वेढलेला आणि आपल्या कामात व्यस्त असलेला दिसे. म्हणून श्रीमुख प्रथम बाकी तिघांना जाऊन भेटला.

त्या तिघांना श्रीमुख म्हणाला—"महाराज, रोगचिकित्सा करणाऱ्या वैद्यांनी प्रथम शरीरशास्त्र, रोगलक्षण आणि वनस्पतिशास्त्र यांचा मुळातून अभ्यास करायला हवा. माझ्या गुरुजींनी मला प्रथम एकाद्या समर्थ वैद्याच्या हाताखाली काही दिवस काम करून मगच स्वतंत्रपणे काम सुरू करायचा सल्ला दिला आहे. पण आपण तर वैद्यकशास्त्रात माझ्यापेक्षा मुळीच श्रेष्ठ नाही आहात, म्हणून माझी तुम्हाला अशी विनंती आहे की तुम्ही सदानन्द वैद्याशी परिचय करून घेण्यास मला मदत करावी."

उत्तरादाखल तिघेही वैद्य त्याला म्हणाले—"त्या सदानन्दचे केवळ नशीबच थोर, म्हणून त्याला हा लौकिक प्राप्त झाला. नाहीतर खरं पाहता त्याला माझ्या-इतकंही वैद्यशास्त्राचं ज्ञान असं नाहीय. तो जी जी औषधं देतो, ती सर्व इकडली-तिकडली चौकशी करून मगच देतो. प्रथम मला त्याच्या या लबाडीची कल्पना नव्हती, म्हणून सुरुवातीला मीही त्याला पुष्कळ मदत केली. माझ्याकडून मिळालेल्या ज्ञानाच्या आधारानेच तर तो आज माझ्या-पेक्षाही मोठा वैद्य बनून बसलाय."

या हकीकतीवर श्रीमुखचा मुळीच विश्वास बसला नाही. त्याने काही दिवस सदानन्दच्या घरावर नजर ठेवली आणि नन्तर या तीन वैद्यांच्या सांगण्यात तथ्य आहे असा त्याने शोध लावला. शोध सर्वतोपरी पूर्ण करण्यासाठी तो स्वतःच एका रोग्याचे सोंग घेऊन सदानन्दकडे गेला आणि केवळ एकाद्या पंडितालाच कळू शकतील अशी काही रोगलक्षणे त्याला सांगितली. सदानन्दने त्याला चार दिवसांनी पुन्हा यायला सांगितले.



चार दिवसांनन्तर श्रीमुख पुन्हा जेव्हां गेला, तेव्हा सदानन्द त्याला म्हणाला—"तुझ्या रोग-निवारणाचे तीन मार्ग आहेत. कोणतंही औषध न घेता, केवळ मी सांगेन त्या भाज्या एक वर्षपर्यंत खात रहाणे—हा पहिला मार्ग. दुसरा मार्ग म्हणजे, मी जी औषधं देईन ती खात राहून चार महिने-पर्यंत पथ्यपाणीही संभाळणे आणि तिसऱ्या मार्गाने एकाच आठवड्यात रोग बरा करता येईल. पहिल्या मार्गाची फी एक हजार रुपये, दुसऱ्याची तीन हजार आणि तिसऱ्या मार्गाची पाच हजार. तुला कोणता मार्ग पसन्त असेल तो सांग. म्हणजे मी तुझ्या काही परीक्षा करून त्याप्रमाणे चिकित्सा करीन."

सौ. कल्याणी देसाई



हे ऐकून श्रीमुख फारच आश्चर्यचकित झाला. सदानन्दकडे प्रशंसात्मक दृष्टीने पहात तो त्याला म्हणाला—"तुम्ही कोणी सर्वसामान्य वैद्य वाटत नाहीत. या रोगाचे आजपर्यंत केवळ दोन मार्ग होते. माझे गुरु दिव्यात्म यांनी तीन महिन्यांपूर्वी तिसरा मार्ग बरेच संशोधन करून शोधून काढला होता. आपणाला तोही माहीत आहे, हे विशेष!"

आता सदानन्दने विचारले—"ओहो! तर तू दिव्यात्मचा शिष्य होय? या रोगाची चिकित्सा-पद्धत जाणण्यासाठी मी मुद्दाम माझा खास माणूस दिव्यात्मकडे पाठवला होता. दिव्यात्मने आपल्या उत्तराबरोबरच तुझ्याबद्दलही लिहिलं होतं. पण इतक्या थोड्या काळात तुला हा रोग कसा काय झाला? अन् तुला स्वत:लाच उपाय माहीत असून तू माझ्याकडे का आलास?"

श्रीमुखने यावर आपल्याला आलेला अनुभव व आपला उद्देश सदानन्दला सांगून विचारले—"पण आपण वैद्यक कुठे, कुणाजवळ शिकला? या शहरात केवळ आपलाच इतका लौकिक व्हावा याचं कारण काय बरं? अन् उपचारासाठी तर तुम्ही इतरांपेक्षा जास्त फी आकारता, याचं कारण काय असावं?"

सदानन्द आता त्याला आपली कहाणी सांगू लागला. वस्तुत: तो वैद्य नव्हताच. पोट भरण्यासाठी कोणा वैद्याकडे औषधं घोटायचं काम तो करी. पण ते करता करता तो अत्यंत लक्षपूर्वक वैद्यकीचं काम पहात व समजून घेत राहिला. निरनिराळे रोग व त्यांचे निवारण याबद्दल तो कुतुहलाने विचारत असे. एक दिवस त्या वैद्याचा मृत्यु झाला. त्याचे सारे नातलग येऊन त्याचा पैसाअडका वगैरे घेऊन गेले. पण त्यावेळी जे रोगी वैद्याकडून औषधपाणी करून घेत होते त्यांची अर्धवट राहिलेली चिकित्सा सदानन्द पुरी करत राहिला. सर्व रोगी चांगले बरे झाले आणि त्यांनी सदानन्दच्या ज्ञानाची





खूप तारीफ केली. इतकेच नव्हे, तर त्यांनी प्रचारही केला की, मेलेल्या वैद्यापेक्षाही सदानन्दची परीक्षा काकणभर सरसच असते, त्याचा हातगुणही फार चांगला आहे—इत्यादि. पण वैद्यकशास्त्राचे नीटसे ज्ञान नसताना उपचार करणे सदानन्दला भावेना. यासाठी कुठे जाऊन तो शिक्षण घेऊ शकला नाही. आपल्या कुटुंबासाठी काही न काही करणे त्याला भागच होते. म्हणून ते गाव सोडून सदानन्द चित्रपुरला आला, आणि ओळखीच्या लोकांकडे कामासाठी विचारू लागला.

सदानन्दच्या ओळखीचा एक वैद्य त्याला म्हणाला—"हे पहा सदानन्द, मला वैद्यकशास्त्रातल्या बऱ्याचशा खुब्या माहीत आहेत, पण मला 'चांगला वैद्य' म्हणून कीर्ती मात्र लाभली नाही. पण मी ऐकलंय की तुझा हातगुण चांगला आहे, म्हणून मी एक चांगला सल्ला देतो बघ! तू आपल्या गावात 'एक चांगला वैद्य' म्हणून नाव कमावलं होतंस. मी इथे असा प्रचार करीन की, एक महान वैद्य आपल्या चित्रपुरला आला आहे. तुझ्याकडे येणाऱ्या रोग्यांची लक्षणं पाहून. उपाय मी सांगत जाईन. अशा प्रकारे मी तुला मदत करू शकेन. तुला जी कमाई होईल त्यांतली काही मला देत जा."

सदानन्दने हा प्रस्ताव मान्य केला आणि तो म्हणाला—"ठीक आहे, असंच करू या. पण माझ्या अज्ञानामुळे एकाद्या रोग्याचं काही नुकसान झालं तर मात्र मी औषधोपचार करणं सोडून देईन."

त्या दिवसापासून ज्याबद्दल स्वत:ला माहीत असेल, अशा रोगांच्या चिकित्सेबद्दल अन्य वैद्यांना पैसे देऊन सदानन्द माहिती करून घेऊ लागला. अशा तऱ्हेने त्याने चांगला नावलौकिक मिळवला.

आपली ही सारी हकिकत सांगून सदानन्द श्रीमुखला म्हणाला—"गुरूकडे शिकणं निराळं. पण ते शिक्षण जेव्हा अन्य वैद्यांकडून घ्यावं लागतं तेव्हां त्यावर खर्च